किंमत पांच रुपये

गुढी पाडवा, शके १८८८, २३ मार्च १९६६
मुद्रक– श्री ज्ञानदेव गोविंद सानोल्कर, श्री राजमुद्रा राय उदय विजय फोटो लिथो ऑफसेट प्रेस कंपाउंड, घाटकोपर, मुंबई ७७. प्रकाशक– श्री म. ग. महादेश्वर, अध्यक्ष, योग भक्ति दर्शन ग्रंथ समिति मुंबई व पुणे, श्री वासुदेव निवास, ३११८ एरंडवन, कर्वे पथ, पुणे ४

# अनुक्रमणिका

—◈◈◈—

# लेखक परिचय

श्री अप्रबुद्ध, नागपूर

श्री. अज्ञात, पुणे

श्री अनंतराव आठवले, पुणे





पंडित पाडुरंगशास्त्री आठवले, ठाणे



पंडित यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे, नांदेड

श्री आलमपुवा कालगावकर





श्री बापूसाहेब कुबडे, सोलापूर



श्री एकनाथ पंढरीनाथ कुलकर्णी



श्री. कल्याण श्रीपाद कुलकर्णी



डॉ. दि. ब. केळूर, एम्. ए., पीएच्.डी. पुणे



पंडित विष्णुशास्त्री खरे, सातारा

श्री शंकरमहाराज खंदारकर





प्राध्यापक ना. पा. गुणे, एम्. ए.



योगिराज श्रीवामनरावजी गुळवणी महाराज, पुणे



पंडित आत्मारामशास्त्री जेरे, नृसिंहवाडी



पंडित श्रीपादशास्त्री जेरे, कोल्हापूर



श्री. ल. द. जोगळेकर, दिवा



श्री. कृष्णाजी हरी जोशी, मुंबई

डॉ. प्र. न. जोशी, एम्. ए., पीएच्. डी. पुणे

श्री रघुनाथशास्त्री जोशी, ठाणे

श्री म कृ जोशी





प्राचार्य श वा दांडेकर, पुणे



श्री श वा देवधर, मुंबई



ह भ प श्री द देशपांडे, पुणे



पंडितराज राजेश्वरशास्त्री द्रविड काशी





श्रीमंत राजे धुंडिराज बहादूर, हैद्राबाद



श्री स के नऊरगांवकर पुणे



श्री रंगनाथ महाराज परभणीकर





प्रा डॉ ग मो पाटील, एम् ए, एल्एल् बी., पीएच डी, पैठण



डॉ रा द भाणी, मिरज



नवयुगधर्ममालाकार महादेव कृष्ण फडके पनवेल



श्री वामनबुवा ब्रह्मचारी जयसिंगपूर



पंडित भालचंद्र शास्त्री धारवाड



श्री. ना. व्यं भागवत, मुंबई



श्री. रंगनाथ एकनाथ विप्रदास, सासवड

श्री. व. द. माहुलीकर, घाटकोपर
श्री. ना. मो. मोघे, मिरज
श्रीरंग अवधूत महाराज
श्रीशंकराचार्य
श्री. भा. ए. सोमणी, मुंबई
महामहोपाध्याय बाळशास्त्री हरदास
नाग.

## जाहिरातदारांची सूचि

अभिव्यक्ति
इलेक्ट्रो मेटॅलर्जिकल वर्क्स
इंडिया टेक्स्टाइल ट्रस्ट
ईस्टर्न मॅनिटरी ईंजिनियर्स
एक्सेल प्रोसेस लिमिटेड
एल्डे कॉर्पोरेशन
एल्. कान्त आणि कंपनी
एशियाटिक रोलर कास्टिंग कंपनी, कलकत्ता
ए. रमण आणि कं., अहमदाबाद
ओशिवल ऑइल ट्रेडिंग कंपनी
औरंगाबाद जिल्हा स. भूविकास बँक लि.
कल्याणी क्लॉथ स्टोअर्स
काका ब्रदर्स, कानपूर
काशिनाथ नारायण परांजपे
किसान सेवा मंडळ रत्नागिरी
कॉस्मॉस कन्स्ट्रक्शन कंपनी
एस्. एच्. केळकर
कुलकर्णी आणि केळकर
एस्. व्ही. कुलकर्णी आणि कंपनी
कुलकर्णी ब्रदर्स चष्म्यांचे व्यापारी
कुवरजी देवजी
के. जोशी आणि कंपनी, पुणे
केतकर बंधू
कोना मिल्क बार
गजानन आणि कंपनी
एन. व्ही. गोखले
एस. जी. गोखले आणि कंपनी
जनता सहकारी बँक लिमिटेड
जयभारत इन्शुअरन्स कंपनी लिमिटेड
जयहिंद रबर प्रॉडक्ट्स
जी. एम्. आपटे आणि सन्स
जे. पांचोली अँड कंपनी
एम. जी. जोशी ब्रदर्स
ज्युपिटर इंजिनियरिंग वर्क्स
ज्योति वायर इंडस्ट्री
ट्रायफेनील मेथेन केमिकल्स
डायमंड ब्लॉक मॅन्युफॅक्चरिंग कंपनी
डी मुकुंद आणि कंपनी
डोडिया ब्रदर्स
दत्त प्रिंटरी
दत्तात्रय कृष्ण गोडबोले ब्रदर्स
दादर बुक डेपो
एन. सी. दास
दीपक हॅन्डलूम फॅक्टरी
द्वारकानाथ आणि कंपनी
नवभारत कॉर्पोरेशन
निर्णयसागर प्रेस
नॅशनल टाइप फाउंडर्स
नॅशनल वायर अँड मेटल वर्क्स
न्यू नॅशनल टाइप फाउंड्री

न्यू आदर्श दुग्ध मंदिर
प्रकाश ट्रेडिंग कंपनी
पंजाबी चंदू हलवाई
पब्लिशर
पामार्ट
पॉप्युलर बिल्डर्स
पॉप्युलर कन्स्ट्रक्शन कंपनी
फाईन आर्ट प्रिंटर्स
बलवंत पुस्तक भांडार ('दत्तचिंतन' व 'दत्तावतार')
बँक ऑफ महाराष्ट्र लिमिटेड
बिटको प्राईप
ल. वि. बेडेकर
व्ही. पी. बेडेकर आणि सन्स प्रायव्हेट लिमिटेड
गजानन जनार्दन बोडस अत्तरवाले
भगवंतराव हॉटेल
भारत पातळ डेपो
भारत मशिनरी स्टोर्स, औरंगाबाद
महेश प्रिंटर्स
मराठवाडा ॲग्रो इंडस्ट्रियल कॉर्पोरेशन
आर्. जे. मयेकर
मामा काणे
मावानी आणि कंपनी
मोहनलाल आणि कंपनी
रतिलाल नागरदास
रॅलीज इंडिया लिमिटेड
रॉय आणि कंपनी
राजा ट्रेडर्स
रेडिओ क्राफ्टर्स
रेन्बो प्रिंटिंग इंक्स
वामन हरी पेठे
विजय स्टोअर्स अंबरनाथ
विचारे आणि कंपनी
विजय मॅन्युफॅक्चरिंग कंपनी
व्ही. पामलेज लिमिटेड
व्होल्टाज लिमिटेड
श्रीकृष्ण दुग्धालय व भोजनालय
श्री वासुदेवानंद सरस्वती ग्रंथ प्रकाशन मंडळ
बॉम्बे बुक डेपो ( श्रीचित्रापुरगुरुपरंपरा चरित्र )
श्रीधर स्टेनलेस स्टोअर्स
श्री. द देशपांडे
श्रीभारत बुकडेपो ( सार्थ तुकाराम अभंग गाथा )
श्रीपाद प्रोसेस वर्क्स
सँडो ट्रेडर्स
समर्थ ट्रेडर्स
साहित्य सहकार मुद्रणालय
सुरेश कोल्हटकर
सुरेखा प्रकाशन ( सार्थ लघुवाक्यवृत्ति )
सेंट्रल रेल्वे
स्वस्तिक लॅबारेटरीज ॲंड इंडस्ट्रीज
स्वस्तिक रबर प्रॉडक्ट्स लिमिटेड
यू. एच. हिंगोराणी
होमिओ लॅबोरेटरीज
हार्डकॅसल वॉड ॲंड कंपनी लिमिटेड
हेदवकर मेटल प्रेसिंग वर्क्स
हाल्वाई इंजिनियरिंग, पुणे
हिरे आणि गुजाळ, औरंगाबाद
हैद्राबाद मशिनरी कं.

॥ श्रीगुरुः शरणम् ॥

# सहज बोलणे हाचि उपदेश

श्रीगुळवणी महाराज, २० नारायण पेठ, पुणे २.
येथील जुन्या निवासस्थानात



योगिराज श्रीवामनरावजी गुळवणी महाराज यांना मुंबईतील काही साधकांनी प्रश्न पाठविले. त्यांची ही समर्पक उत्तरे.

प्र. १—आध्यात्मिकतेच्या अतिरेकाने भारताची हानी झाली आहे असा अनेक पौर्वात्य व पाश्चात्य विचारवंतांचा ग्रह झालेला दिसतो याविषयी आपले काय म्हणणे आहे ?

उत्तर—हा ग्रह बरोबर नाही. एकंदर लोकसंख्येच्या मानाने अध्यात्माचा विचार करणारी माणसे फारच थोडी असतात. त्यांच्या मताचा परिणाम सर्वच लोकांवर होतो असे म्हणता येणार नाही. श्रीमद्भगवद्गीतेत श्रीकृष्णांनी अर्जुनाला युद्धाला प्रवृत्त केले आहे ही एकच गोष्ट आध्यात्मिक विचाराने भारताची हानी झाली नाही हे सिद्ध करण्यास पुरेशी आहे.

प्र. २—दीक्षा घेतलेल्या साधकाच्या साधनेने त्याच्या व्यावहारिक अडचणी दूर होतात काय ?

उत्तर—व्यावहारिक अडचणी, उदा० नोकरी लागणे, लग्न होणे, संतती होणे वगैरे, दूर होणार नाहीत. परंतु शारीरिक व्याधी दूर होणे, मनाला स्वास्थ्य येणे, असाध्य रोग बरे होणे या गोष्टी व्यावहारिक आहेत असे मानले तर त्या निश्चित होतात असे दिसून येते.

प्र. ३—दीक्षा घेतलेल्या साधकाच्या साधनेने पूर्वकर्माच्या फलामध्ये फरक होतो काय ?

उत्तर—होतो वरच्या प्रश्नाच्या उत्तरात मनुष्याचे असाध्य रोग बरे होतात असे सांगितले आहे. त्यावरून पूर्वकर्मात फरक होतो असे दिसून येईल

प्र. ४—गायत्री मंत्र साधनेला पोषक कसा होतो ?

उत्तर—गायत्री मंत्र व इतर मंत्र यांनी पुण्यकर्म होते. त्या योगाने पूर्वपापामुळे जे अडथळे येतात ते दूर होत जातात. पातंजल योगसूत्रात योगाभ्यासात येणारे प्रतिबंध प्रणवाच्या जपाने दूर होतात असे लिहिले आहे.

प्र. ५—श्रद्धा म्हणजे काय ? श्रद्धा निर्माण होण्यास व वाढण्यास काय करावे ?

उत्तर—श्रद्धा म्हणजे गुरुवाक्यावर व वेदान्तवाक्यावर विश्वास. ती उत्पन्न होण्याला शास्त्रात सांगितल्याप्रमाणे कर्म करू लागले असता काही अनुभव येऊ लागतात, ते अनुभव आले म्हणजे श्रद्धा उत्पन्न होते. मात्र आरंभी कोणतीही गोष्ट श्रद्धा नसली तरी शास्त्रात सांगितल्याप्रमाणे केली पाहिजे अनुभवपूर्वक आलेली श्रद्धा आपोआप वाढत जाते. उदा० एका तरुण प्राध्यापकाला दीक्षा घेण्याची इच्छा झाली. मी त्याना योगवाणी हे पुस्तक वाचण्यास सांगितले. काही महिन्यानंतर श्रावण महिन्यात मी व श्री. भालेराव सकाळी ९ वाजता त्याना भेटण्यास गेलो व योगवाणी पुस्तक वाचले काय असे विचारले. ते म्हणाले, "ते पुस्तक मी वाचून पाहिले. परंतु त्यावर माझा मुळीच विश्वास नाही. मात्र मला दीक्षा अवश्य घ्यावयाची आहे." "आईला व देवाला नमस्कार करून या" असे मी त्याना सांगितले त्याप्रमाणे ते नमस्कार करून आल्यावर तेथेच त्याना डोळे मिटून बसण्यास सांगितले. थोड्याच वेळात ते मागे पडले व शारीरिक क्रिया जोरात सुरू झाल्या तेव्हा श्री भालेराव

यानी जवळची पुस्तके, खुर्च्या वगैरे सामान बाजूला करून जागा मोकळी केली. अर्धा पाऊण तासानंतर उठून बसण्यास व डोळे उघडण्यास सांगितले. डोळे उघडताच, "पुस्तकात लिहिलेल्या सर्व गोष्टी खऱ्या आहेत" असे ते म्हणाले. ही श्रद्धा उत्पन्न होण्याला सांगितल्याप्रमाणे श्रद्धा नसताना ते डोळे मिटून बसले म्हणून त्यांना अनुभव आला. पुढे श्रद्धा आपोआपच वाढत गेली

**प्र. ६—आयुष्यातील प्रत्येक घटना ब्रह्मलिखित आहे काय ? मग कर्तबगारीला वाव काय ?**

**उत्तर**—आयुष्यातील प्रत्येक घटना ब्रह्मलिखित नाही. म्हणून कर्तबगारीला वाव आहे. योगवासिष्ठात पुरुषप्रयत्नालाच महत्त्व दिले आहे. "सर्वमेवेह हि सदा संसारे रघुनंदन । सम्यक् प्रयत्नात् सर्वेण पौरुषात् समवाप्यते ॥" शास्त्रीय प्रयत्नाने सर्व गोष्टी प्राप्त होतात, असे शास्त्राचे मत आहे. शास्त्रीय प्रयत्नाचे प्राबल्य मानले नाही तर वैद्यशास्त्रापासून मोक्षशास्त्रापर्यंत सर्व शास्त्रे व्यर्थ होतील, असे श्रीविद्यारण्यांनी "जीवन्मुक्ति विवेक" या ग्रंथात सिद्ध केले आहे. "केल्याने होत आहे रे, यत्न तो देव जाणावा," वगैरे श्रीसमर्थांची शिकवण सर्वांच्या परिचयाचीच आहे.

**प्र. ७—आत्मा हा निर्लेप आहे असे मानतात. मग तो जन्म घेतो हे कसे ?**

**उत्तर**—आत्मा निर्लेपच आहे. तो केव्हाही जन्माला येत नाही व मरतही नाही. "अजो नित्य शाश्वतोऽयं." पूर्व कर्मे बरोबर घेऊन जीव जन्माला येतो.

**प्र. ८—दत्तप्रभू ही देवता आपल्याला दृष्टिगोचर होऊ शकते काय ? कशी ?**

**उत्तर**—श्री दत्तप्रभू ( आपली इष्ट देवता ) आपल्याला दृष्टिगोचर होऊ शकतात. "स्वाध्यायादिष्टदेवता संप्रयोगः" असे पातंजल योगसूत्रात सांगितले आहे याचा अर्थ गुरुदत्तमंत्राच्या जपाने आपल्या इष्ट देवतेचे दर्शन, तिचे स्पर्शन व तिच्या बरोबर भाषण होऊ शकते. याच्याबद्दल सर्व सत्पुरुषांच्या चरित्रात उल्लेख आहेत. 'श्री निरंजन रघुनाथ' यांनी आपले चरित्र आपल्या गुरूंच्या सान्निध्यात बसून लिहिले आहे. त्यात त्यांना गिरनार पर्वतावर श्रीदत्ताचे साक्षात् दर्शन झाल्याचे वर्णन केले आहे. आपल्या योगभक्ति दर्शनात श्री विप्रदास यांनी आपले अनुभव लिहून पाठविले आहेत. त्यात त्यांनी त्यांना झालेल्या श्रीभगवताच्या दर्शनाची सविस्तर हकीगत लिहिली आहे. श्री एकनाथ यांचे गुरु श्रीजनार्दनस्वामीमहाराज यांना श्रीदत्ताचे दर्शन होत असे व त्यांनी श्रीएकनाथांनाही श्रीदत्तदर्शन घडविले, ही हकीकत त्यांच्या चरित्रात आहे.

**प्र. ९—पूर्वजन्मीच्या आठवणी या जन्मी राहणे शक्य आहे का ?**

**उत्तर**—पूर्वजन्मीची आठवण कित्येक लोकांना होऊ शकते. हल्ली वर्तमानपत्रातून याची पुष्कळ माहिती येत असते. तुकारामाची शिष्या बहिणाबाई यांनी आपल्या पूर्वीच्या १३ जन्माची हकीकत अभंगात लिहून ठेवली आहे. पातंजल योग सूत्रात "अपरिग्रहस्थैर्ये जन्म—कथंतासंबोधः" असे सांगितले आहे.

**प्र. १०—अंत प्रेरणाशक्ती ही प्रयत्नाने संपादन करता येते काय ? कशी ?**

**उत्तर**—अंत:प्रेरणाशक्ती पूर्वजन्माच्या प्रयत्नाचे फळ आहे. म्हणून ती प्रयत्नसाध्य आहे.

**प्र. ११—मृत आत्मे हे सजीव व्यक्तींच्या जीवनात प्रवेश करतात हे खरे का ? त्याला उपपत्ती काय ?**

**उत्तर**—मृतात्मे सजीव व्यक्तींच्या जीवनात प्रवेश करतात हे खरे आहे. गाणगापूर, नरसोबाची वाडी वगैरे ठिकाणी या गोष्टी प्रत्यक्ष पाहाण्यात येतात एखादी व्यक्ती मरताना वासना राहिल्यामुळे पिशाच योनीला जाते. श्रीटेंबेस्वामीमहाराज यांच्या चरित्रात अशा मृतात्म्यांच्या पुष्कळ गोष्टी आहेत मी स्वतः त्यांच्या बरोबर असताना अशा पुष्कळ गोष्टी पाहिल्या आहेत एखाद्या मनुष्याने पूर्वज मात दुसऱ्या एखाद्या व्यक्तीचे द्रव्यापहरण केल्यामुळे ज्याचे द्रव्य हरण केले ती व्यक्ती मरताना सूडभावना राहिल्यामुळे पिशाच योनीला प्राप्त होते व ज्याने द्रव्य घेतले त्याच्या अंगात येऊन त्याचा छळ करते असे दिसून येते

**प्र. १२—साधनेत कधी कधी ज्या क्रिया होतात, त्याच प्रकारच्या क्रिया भक्तियोगात भाव निर्माण झाल्यावर होतात असे म्हटले जाते. उदा० निरनिराळ्या मुद्रा जेव्हा साधनेत अशा तऱ्हेच्या मुद्रा झाल्यावर व त्या थांबल्यावर विशिष्ट प्रकारच्या भावाप्रत आलो असे समजावयाचे काय ?**

**उत्तर**—साधनेत जशा क्रिया होतात तशा भक्तियोगातही होतात. यावरून ती स्थिती आपल्या ठिकाणी होत असल्यास आपल्या ठिकाणी भक्तियोगाचे पूर्वसंस्कार आहेत असे समजण्यास हरकत नाही.

**प्र. १३**—साधनेत ज्या काही कधी क्रिया होतात त्या आपोआप न होता मुद्दाम करीत आहोत की काय असा भास होतो अशी शंका येणे म्हणजे साधनेत काही कमतरता आहे असे समजावयाचे काय ? अशा शंका इतर साधकानाही येतात काय ?

**उत्तर**—साधनेत ज्या क्रिया होतात त्या आपण स्वत करतो असे भ्रमाने वाटते विशेष अनुभव येऊ लागला म्हणजे तो भ्रम आपोआपच कमी होतो असा भ्रम पुष्कळ साधकांना होतो परंतु ते खरे नाही अशी शंका येण्याने साधनात काहीही कमतरता आहे असे समजण्याचे कारण नाही

**प्र. १४**—साधकाची समाधानकारक दिशेने प्रगती होत आहे हे समजण्याचा निकष काय ? प्रथमतरी सिद्धी हा निकष सांगितला आहे परंतु ही सिद्धी प्राप्त झाली याचा तरी निकष काय ? सिद्धी हा निकष सामान्य साधकाच्या आटोक्याबाहेर असल्यामुळे आपली प्रगती होत आहे किंवा नाही हे त्याने कसे ओळखावयाचे ?

**उत्तर**—साधनात आपणाला जे अनुभव येतात ते या *शास्त्रात सांगितलेल्या अनुभवाप्रमाणे* येत असल्यास साधकाची समाधानकारक दिशेने प्रगती होत आहे असे समजावे. या ठिकाणी सिद्धींचा संबंध नाही योगवाणी व महायोग-विज्ञान या दोन ग्रंथात साधकाला येणाऱ्या अनुभवाचे वर्णन केले आहे ते पाहावे

## योगिराज श्री वामनरावजी गुळवणी यांचा नवा वास्तू श्रीवासुदेव निवास



॥ श्री गुरु शरणम् ॥

### आवाहन

श्री-वामनामी करुनी पुकारा । तुझाच तू मांडियला पसारा ॥
मुमुक्षूंस माहेर, शांती विसावा । मिळो ह्या स्थळीं, प्रार्थना वासुदेवा ॥ १ ॥
पाषाण जे तरविले रामकाळी । ते लावुनी, वास्तु ही सिद्ध झाली ॥
षट् चक्र रूपात्मक हें महान । मंदीर योगास निवासस्थान ॥ २ ॥
श्री वासुदेवा यतिराज ताता । योग्यामध्ये लोकनाथा वरिष्ठा ॥
तुम्हास आवाहन साधकांचें । राहोनि येथें पुरवा मनींचे ॥ ३ ॥

— मा व्य भागवत

# मनोगत आणि ऋणनिर्देश

योग भक्ति दर्शन ग्रंथ समितीची स्थापना पुणे येथे योगिराज श्रीवामनराव गुळवणी महाराज यांच्या आशीर्वादाने १९६५च्या मे महिन्यात झाली. तिचे पुढीलप्रमाणे पदाधिकारीः

अध्यक्षः श्री. स. बा. महाडेश्वर. उपाध्यक्ष श्री. शंकरराव आजेगावकर (वकील), श्री. ना. त्र्यं. भागवत, श्री. कृ. गो. तथा बापूसाहेब कुवडे, श्री. वि. मो. वैद्य इंजिनियर, डॉ. भालचंद्र द्वारकानाथ देसाई. सपादकमंडळ विद्या. वाचस्पति श्री. दत्तात्रेयशास्त्री कवीश्वर, प्रा. डॉ. दि. ब. केरूर, श्री. श्री. त्र्यं. नपाते. सरचिटणीस श्री. स. ह. मोडक, मुंबई, चिटणीस श्री. शं. बा. देवघर व श्री. अ पा. विणेकर; पुणे चिटणीस प्रा. प्र. न. दीक्षित व रिंदुमाधव नारायण सरदी. खजिनदारः श्री. म. सि. अत्रे; मुंबई खजिनदार श्री. ग. ना. परांजपे सहाय्यक श्री. कृ ह. जोशी, श्री. शरद दाते, श्री. विष्णुपंत जोगळेकर, श्री. पा. रा. लेले, श्री. मनोहर गोखले.

समितीचे एकमेव कार्य योग भक्ति दर्शन ग्रंथाचे प्रकाशन हे चैत्र शु. १ गुढी पाडवा शके १८८८ (दि. २३-३-१९६६) रोजी समाप्त झाले आणि त्या दिवशी ही समिति आपोआप विसर्जित झाली.

समितीच्या या कार्यामध्ये ज्या ज्या व्यक्तींनी व संस्थांनीं लेख व जाहिराती देऊन सक्रिय भाग घेतला त्या सर्वांचे समिती मन पूर्वक आभार मानते. त्यातल्या त्यात ज्या श्रीराजमुद्रा मुद्रणालयाने आपली सर्व मुद्रणयंत्रणा अहोरात्र या ग्रंथाच्या छपाईसाठी राबविली, त्याचे चालकद्वय श्री. खानोलकर व श्री. भिडे, तसेच या मुद्रणालयाचे सर्व कर्मचारी आणि समितीच्या वतीने मुद्रणाचे काम पाहणारे श्री. मु. शां. वैद्य व गुरुभक्त श्री. श्रीपादराव देशपांडे यांचे आभार मानण्यासाठी तर समितीजवळ योग्य शब्दच नाहीत. अधिक काय सांगावे ? श्रीगुरुकृपेने हा ग्रंथ साधकांच्या सेवेस सादर होत आहे, त्यांनी त्याचा जास्तीत जास्त उपयोग करून घ्यावा, हीच सदिच्छा. शेवटी श्रीदत्तचरणी व श्रीगुरुचरणी प्रार्थना की ही ज्ञानसाधना पुढील अशाच तऱ्हेच्या कार्याची नांदी ठरो.

स. बा. महाडेश्वर

अध्यक्ष योग भक्ति दर्शन ग्रंथ समिति

**ग्रंथासाठी मागणी पुढील ठिकाणी करावी :**

१ श्रीवासुदेव निवास, परंडवन, कर्वे पथ, पुणे ४

२ श्री. ना. त्र्यं. भागवत, जानकी निवास, ६९ ज्योतिबा फुले रोड, नायगाव, मुंबई १४

३ श्री कृ. ह. जोशी, ७२।८० जीवनजी महाराज नवी चाळ, शेवटचा माळा, मुगभाट, मुंबई ४

४ श्री कृ. गो. तथा बापूसाहेब कुवडे, नवजीवन बिल्डिंग, १०५ गोल्डफिंच पेठ, सोलापूर



श्रीदत्तावतार प. प. श्रीवासुदेवानंद सरस्वति ऊर्फ टेंब्येस्वामिमहाराज



## जगद्गुरु श्रीशंकराचार्यांचा आशीर्वाद

॥ श्रीशङ्करो विजयतेतमाम् ॥

स्वस्ति श्रीमत्समस्तसुरवृन्दपूजितपादारविन्दशिष्यप्रतिबिम्बवर्यश्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्यपदवाक्यप्रमाणपारावारपारीणयमनियमासनप्राणायामप्रत्याहारध्यानधारणासमाध्यष्टाङ्गयोगानुष्ठाननिष्ठतपश्चक्रवर्त्यनाद्यविच्छिन्नगुरुपरम्पराप्राप्तषड्दर्शनसंस्थापनाचार्यव्याख्यानसिंहासनाधीश्वरसकलनिगमागमसारहृदयसाङ्ख्यत्रयप्रतिपादकसकलनास्तिकमतोच्छेदपूर्वकसकलधर्मसंस्थापनैकधुरीणवैदिकमार्गप्रवर्तकसर्वतन्त्रस्वतन्त्रश्रीमद्राजधानीऋष्यशृङ्गपुरवराधीशश्रीमद्राजाधिराजगुरुमण्डलाचार्यश्रीमच्छङ्कराचार्यान्वयसञ्जाताभिनवपञ्चगङ्गातीरवासकमलानिकेतनकरवीरसिंहासनाधीश्वरश्रीसच्चिदानन्दश्रीविद्यानृसिंहभारतीकरकमलकिञ्जल्कोद्भवश्रीमदभिनवश्रीसच्चिदानन्दश्रीविद्याशङ्करभारतीस्वामिकृतानि श्रीभाक्तपरिवारच्छात्राणामनुदिनमेधमानभव्यजनकानि श्रीमच्छङ्कराराधनावसरीयनारायणस्मरणानि ॥

*श्रीमद्दत्तगुरुवरावताराणां श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेंबे-स्वामिमहाराजानां परमभक्तैः श्री. वामनराव गुळवणी-महाभागैः सरथापिते श्रीवासुदेवनिवासाश्रमे, **योगभक्तिदर्शनग्रन्थः** अचिरादेव प्रकाशयिष्यते; तस्मांद्गुणसम्पादनार्थं श्रीगुरुपीठदेवतार्शीर्वचनाकाङ्क्षा सम्पादकमण्डलस्य श्री. विद्यावाचस्पतिकवीश्वरोपाह्व श्री. दत्तात्रेयशास्त्रिणः सकाशात् विज्ञाय नितान्तं सन्तुष्यामः।*

*अज्ञानतिमिरान्धानामञ्जनशलाकास्थानीयं पवित्रतमं ज्ञानमेव मुख्यं राष्ट्रसंवर्धकं धनम्। तच्च विशेषतः सन्मननाधीनम्। प्रमेयासम्भावनाख्यमहत्तरधीदोषनिवर्तकं तच्च नैकेन पुरुषेण पुरुषायुषेणापि सर्वात्मना कर्तुं पार्यते। अतश्च नैकेषां मननशीलानां मननसमुद्भूतोऽयं ग्रन्थः। विशेषतश्च ऋतम्भरप्रज्ञयमीन्द्रश्रीवासुदेवानन्दसरस्वतीस्वामिराजविरचितयोगरहस्यबोधरहस्याख्यसाधनमर्मप्रकाशकं सानुवादप्रकरणद्वयसनाथः जिज्ञासुसाधकानां भूयसे उपकाराय कल्पेतेत्यत्र नैव संशीतिलेशोऽपि।*

तदिद विश्वहितसम्पादक मङ्गलकार्यं, सर्वान्तर्यामिण श्रीलीलाविश्वम्भरस्य परमकृपया निष्प्रत्यूह प्रचीयताम्, स्वनुष्ठीयता, श्रीभगवत्पादै प्रतिष्ठापित, सदाचारपरम्पराप्राप्त स्वस्वोचितकर्मभक्तिज्ञानयोगादिसाधनजात सर्वैरधिकारिभि यथावद्विज्ञानपूर्वकम्, समामाश्रिता च ईशगुरुकृपया साधकवृन्देन निश्चित श्रेय परमशान्तिरूपमिति श्रीशारदाचन्द्र मौलीश्वरचरणसरसिजयोरनवरत प्रार्थयामहे ।

महानुशासन इतीरर्ति

का व १३/१८८७, २१।११।६७, आनदाश्रम, पुण्यपत्तनम.

प्रातःस्मरणीय श्री रगअवधूत महाराज यांचा आशीर्वाद



गुरुवर्य श्रीवामनरावजी गुळवणी महाराज आणि श्रीरगअवधूत महाराज याची भेट

वज्रेश्वरी ता ११ १ ६६

॥ ॐ ॥

श्रीदत्त प्रसन्नोऽस्तु ।

स्वयमाश्रीम्नु म कम । ना यत्प रते शर्मं । तथापि वामुदेव परम । योगाश्रम नूतन ॥ १ ॥
तयासी अमुचा अतरात्मा । आशीर्वाद असे साचा । प्रभीर योगमसागाचा । होवो निरतर तथून ॥ २ ॥
गथ यागभक्तिदर्शन । नक्की रत गाथा मपूण । योगकामा मार्ग दर्शन । मिळो त्यातून सर्वांना ॥ ३ ॥
महाराज गुळवणी । योगमार्गरत्न जनी । नमस्तात ज्नि प्रतिष्ठी । स्वानन्दवर्षी निरकुश ॥ ४ ॥
वामनाम वहुरम । नाव्हामि प्रतापणा नाम । मासराव श्रद्धाराम । हातस नेणें सांप्रत ॥ ५ ॥
उमाजा आला याव्हभात । पुण्या योगाश्रमानिमित्ते । वामुदेवनाम त्यार्त । आशीर्वाद पुर मा ॥ ६ ॥

जगत्सुहृद् रग अवधूत [ सही ]

दि ६।१।६० भाजवकुत निवास न नंद, पो सावर शाखा अडरेश्वर, गुजरात राज्य



श्रीदत्तावतार
प. प. वासुदेवानंद सरस्वती महाराज
जन्म . श्रावण वद्य ५/६ शके १७७६
समाधि आषाढ शुद्ध १ शके १८३६



कुंडलिनी योगप्रवर्तक
वंगीय प. प. लोकनाथतीर्थ महाराज
समाधि · माघ वद्य २ शके १८७९



प. पू. दत्तयोगी
श्री. वामनरावजी गुळवणी महाराज
जन्म मार्गशीर्ष वद्य १३ शके १८०८

# सादर निवेदन

श्री गणेश-दत्त-गुरुभ्यो नमः ।

श्री० प० प० श्रीवासुदेवानन्द सरस्वती टेम्बेस्वामिमहाराज,
श्री० प० प० श्रीलोकनाथतीर्थ स्वामिमहाराज,
श्रीवामनराव गुळवणी महाराज
यांचे सांप्रदायिकांस

# सादर निवेदन

"एकदां सकाळीं भाष्यपाठ संपल्यावर महाराज म्हणाले कीं, 'आजपर्यंत जो प्रत्यक्ष उपदेश केला व ग्रंथ लिहिले त्या सर्वांचें सार आज सांगावयाचें आहे. मुक्तीचा लाभ करून घेणें हें मनुष्यजन्माचें मुख्य कर्तव्य आहे. त्याकरितां प्रथम, मन स्थिर व्हावें या उद्देशानें वर्णाश्रमविहित धर्माचें यथाशास्त्र आचरण झालें पाहिजे. वेदांताचें श्रवण, मनन व निदिध्यासन नित्य करावें. मुख्यतः श्रवणाकडे अधिक लक्ष द्यावें. त्यामुळें मनातील आसक्ति कमी होईल सात्विक प्रवृत्तीनेंच मानवांची उन्नति होते. सात्विक प्रवृत्ति होण्याकरितां आहार हा, हित, मित, मेध्य म्हणजे पवित्र असण्याकडे लक्ष दिलें पाहिजे. आपली प्रकृति सात्विक झाली हें ओळखण्याची खूण अशी कीं, स्वधर्मावर दृढ श्रद्धा, स्नानसंध्या, देवपूजा, पंचमहायज्ञ वेळेवर करणें, अतिथिसत्कार, गोसेवा, कथा, कीर्तन, भजन, पुराण यांचें श्रवण, सर्वांबरोबर गोड बोलणें, दुसऱ्याचें नुकसान होईल असें न वागणें, मातापितरांची सेवा करणें, स्त्रियांनींही सासरीं राहून सासू-सासरा, व इतरही वडील माणसें यांच्या आज्ञेंत राहून पतीची दृढ निष्ठेनें सेवा करणें, इत्यादि गुण आपल्यामध्यें येणें म्हणजे आपली प्रकृति सात्विक बनल्याची चिन्हें आहेत. उदरनिर्वाहाकरितां व्यापार, शेती, नोकरी, कोणताही धंदा केला तरी वेदविहित कर्म व गुर्वाज्ञापालन हें कधींही सोडूं नये. स्वकर्म केलें तरच अंतःकरण शुद्ध होतें अंतःकरण शुद्ध झालें तर उपासना स्थिर होते. उपासना स्थिर झाली तर मनाला शांति मिळते. मनाची गडबड थांबली

श्री. प. प. श्रीवासुदेवानन्द सरस्वती महाराज



म्हणजे आत्मज्ञान होऊन मोक्षाचा लाभ होतो.' याप्रमाणें उपदेश करून महाराजांनी सात ज्ञान भूमिकाही सुंदर रीतीनें समजावून सांगितल्या. आणि, 'हें सर्व थोडक्यांत सांगितलें आहे. याप्रमाणें जो वागेल तो शेवटीं पूर्ण सुखी होईल' असें शेवटीं सांगितलें."



श्री. प. प. श्री लोकनाथतीर्थ महाराज

श्रीवासुदेवानन्द सरस्वतीस्वामिमहाराज ग्रंथप्रकाशन मंडळातर्फे प्रकाशित झालेल्या श्रीगुरुदेवचरित्रांतील उत्तरार्धांत ३३२–३३३ पानांवर वरील मजकूर आहे. गरुडेश्वरीं शेवटीं केलेला हा, श्रीमहाराजांचा साररूप उपदेश आहे. भारतीय संस्कृतीचें स्वरूप व पूर्ण शांतिरूप तिचें साध्य श्रीमहाराजांनी यांत व्यक्त केलें आहे. हें समजावून देऊन अधिकारी सज्जनांना सन्मार्गाला लावण्या करितां श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनें श्रीमहाराजांनी, संपूर्ण भारतवर्षांत संचार करून, प्रत्यक्ष उपदेश व संस्कृत, प्राकृत, विविध ग्रंथ अशा उभय रूपानें, साधकांना साधनाचें योग्य मार्गदर्शन श्रीमहाराजांनी केलेलें आहे. श्रीलोकनाथतीर्थस्वामिमहाराजांनीही अपूर्व असा शक्तिपातयोग संप्रदायाचा पुरस्कार करून, अनेकांना सन्मार्गप्रवण केलें आणि या संप्रदायाचा प्रसार करण्याबद्दल श्री. वामनराव गुळवणी महाराजांना आज्ञा केली. या त्रिवर्गांचीं संक्षिप्त चरित्रें, श्रीवासुदेव निवासाश्रमातर्फे प्रकाशित होत असलेल्या योगभक्तिदर्शन ग्रंथांत दिलेलीं आहेत.

श्रीवासुदेवानन्द सरस्वती स्वामिमहाराज व श्रीलोकनाथतीर्थ स्वामिमहाराज या उभय महंतांच्या आज्ञाप्रमाणें शास्त्रविहित साधनांचें पूर्ण ज्ञान व त्यांचें योग्य अनुष्ठान सर्वत्र प्रचलित व्हावें आणि 'दुरितांचें तिमिर जावो । विश्व स्वधर्मसूर्यें पाहो । जो जें वांछील तो तें लाहो । प्राणिजात ॥ १ ॥. किंबहुना सर्व सुखी । पूर्ण होऊनि तिन्हीं लोकीं । भजिजो आदि पुरुखीं । अखंडित ॥ २ ॥' हा महापुरुषांचा दिव्य संकल्प सफल व्हावा या उद्देशानें श्रीगुळवणी महाराजांनी ३० नारायण पेठ, पुणें या आपल्या स्वतःच्या निवासस्थानांतच सुमारें १५ वर्षांपूर्वी शके १८७२ साली विजयादशमीस श्रीगुरुप्रार्थनापूर्वक प्रकाशन आरंभ केलें. परमार्थमार्गाचें यथार्थ ज्ञान होण्याकरितां श्रीवासुदेवानन्द सरस्वती ग्रंथ प्रकाशन मंडळ स्थापून व त्याचे द्वारा श्रीमहाराजांचे संपूर्ण वाङ्मय प्रकाशित करण्याचें ठरवून, अवघ्या चार वर्षांत म्हणजे शके १८७६ धारण कृष्ण पंचमीस, दोन हजार पानांचें श्रीमहाराजांचें उपलब्ध संस्कृत, प्राकृत सर्व वाङ्मय बारा खंडांमध्यें प्रकाशित करून व हैद्राबाद मुक्कामीं श्रीमहाराजांचा जन्मशताब्दीमहोत्सव करून तें सद्गुरुचरणीं समर्पण केलें. याप्रमाणें उद्दिष्ट कार्याचा एक भाग पूर्ण झाल्यावर, श्रीमहाराजांचें स्मारक म्हणून एक स्थान निर्माण करावें असा सर्वांचाच इष्ट असलेल्या सत्कार्यनिर्धारावरून श्रीगुळवणी महाराजांनी सद्गुरुचरणीं प्रार्थना केली आणि त्यांच्या अमोघ संकल्पानें, 'श्रीवासुदेव निवास' हें पवित्र आश्रमस्थान येथें निर्माण झालें आहे. सध्या श्रीगुळवणी महाराजांचा मुक्काम या स्थानांतच आहे. त्यांच्या संकल्प पूर्तीकरितां

श्री गुळवणी महाराजांच्या पूज्य मातोश्री



अनेक उदार सज्जनांनी मुक्त हस्ताने केलेल्या सात्विक साहाय्याचेच हे फल आज दिसून राहिले आहे, यात संशय नाही. मागील वर्षी पौष मासात वास्तुशांति करून श्रीगुळवणी महाराज या स्थानात राहण्यास आले. पुढे दोनच महिन्यांनी रंगपंचमीचे दिवशी, रीतसर एक विश्वस्त पत्र तयार करून विश्वस्ताचे ताब्यात हे स्थान व काही कायमनिधीची रक्कम देऊन श्रीगुळवणी महाराजांनी लौकिक दृष्टीने आपले स्वामित्व विसर्जित केले असले तरी उत्पत्तीप्रमाणे या स्थानाची स्थितीही वर्धिष्णु स्वरूपात त्यांच्याच सत्यसंकल्पभावानें यापुढेही अखंडित चालू राहाणार आहे अशी आमची दृढ भावना आहे.

भगवद्गीतेचा उपदेश अर्जुनाला करण्याचे एक कारण श्रीज्ञानेश्वर महाराजांनी एका ठिकाणीं असें सुचविले आहे – 'अर्जुना तू पात्र असशी । परिसूनिया अनुष्ठिसी ॥' सद्गुरूंचे मुखातून साधनमार्गाचे श्रवण करणे आणि त्याप्रमाणे आचरण करणे, ही साधकाची दोन मुख्य कर्तव्ये श्रीज्ञानेश्वरमहाराज या ओवींत सुचवीत आहेत. साधनमार्गाचे व्यवस्थित ज्ञान होण्याकरिता श्रीमहाराजांचे ग्रंथ प्रकाशित झालेच आहेत. त्यांच्या साहाय्याने योग्य मार्गदर्शकाकडून अधिकारी जिज्ञासु साधक उचित साधनाचे ज्ञान करून घेऊ शकेल, व आपापल्या स्थानात राहून त्याचे आचरणही करील. ईशकृपेनें याप्रमाणे प्रत्येक व्यक्ति, स्वस्वकर्तव्यनिष्ठ जशी जशी बनत जाईल तशी तशी त्या व्यक्तीची व भारताची सर्वांगीण उन्नति होत राहील असें, 'स्वल्पमप्यस्य धर्मस्य त्रायते महतो भयात्' या वाक्याने श्रीभगवान् स्पष्ट सांगत आहेत.

## श्रीवासुदेवनिवासाश्रमनिर्मितीचा हेतु व तेथील कार्य

श्रीगुळवणी महाराजांच्या पूज्य मातोश्रींना श्रीदत्तप्रभूंनी प्रसादरूप पादुका दिल्या आहेत. त्यांचे अर्चन नित्य रुद्र पवमानाभिषेक पूर्वक आज तीन तपें अखंड चालू आहे. तसेच कुलदेवी श्रीतुळजाभवानी व श्रीवासुदेवानन्दसरस्वती गुरुमहाराज यांचेही अर्चन नित्य चालू आहे. हेंच सत्कार्य पुढेही अखंडित चालू रहावे व सर्वही साधकांना पाहिजे त्या वेळी अनुष्ठान करण्याकरिता एखादें स्वतंत्र पवित्र स्थान असावें या उद्देशानें श्रीवासुदेवनिवासाश्रम वास्तूची निर्मिति झालेली आहे. श्रीगुळवणी महाराजांच्या विशुद्ध संकल्पाप्रमाणे या स्थानामध्ये, नित्य व नैमित्तिक अशीं कार्यें पुढीलप्रमाणे चालू आहेत.

१ रोज सकाळीं रुद्रपवमानाभिषेकपूर्वक पूजन
२ सायंकाळीं पंचोपचार पूजन व आरती मंत्रपुष्प
३ चैत्र अमावास्या–श्रीनारायणस्वामि महाराजांचा पुण्यतिथि उत्सव
४ आषाढ शुद्ध प्रतिपदा–श्रीवासुदेवानन्द सरस्वती टेंबे स्वामिमहाराजांचा पुण्यतिथि उत्सव
५ आषाढ पौर्णिमा–श्रीगुरुपौर्णिमा उत्सव

६ श्रावण कृष्ण पंचमी–श्रीवासुदेवानन्दसरस्वती टेंबे स्वामिमहाराजांचा जयन्ती उत्सव
७ आश्विन शुद्ध प्रतिपदा ते नवमी–देवीनवरात्र उत्सव
८ मार्गशीर्ष पौर्णिमा–श्रीदत्तजयंती उत्सव
९ माघ कृष्ण तृतीया–श्रीलोकनाथतीर्थस्वामि महाराजांचा पुण्यतिथि उत्सव



पुणें येथील श्री वासुदेव निवासांतील पूजा मंदिर

वरील उत्सवांमध्ये वैदिकांचा मंत्रजागर व मोठ्या प्रमाणावर अन्नसंतर्पण होत असतें.

तसेच वैशाख मासांत गौरीचें हळदी कुंकू, गणेश चतुर्थीस श्रीपादवल्लभ जयंती, गणेशोत्सव, आश्विन वद्य द्वादशी (गुरुद्वादशी), पौष शुद्ध द्वितीया–श्रीनृसिंहसरस्वती जयंती, महाशिवरात्र इत्यादि लहान उत्सवही चालू आहेत.

या शिवाय अखंड नंदादीप, नित्य सप्तशती पारायण, नित्य नैवेद्य वैश्वदेवपूर्वक ब्राह्मणसुवासिनी भोजन चालू आहे. भगवत्सान्निध्यात शांतपणें कांहीं अनुष्ठान घडावें या हेतूनें अनेक साधक येथें येऊन एक दिवस, तीन दिवस, सात दिवस, या प्रमाणें यथासंभव राहून जातात.

या अतिथींची भोजनादि व्यवस्था आश्रमातर्फे चालू आहे. तसेच योग्य विद्वान, पुराणिक, हरिदास, प्रवचनकार, वैदिक, गवई इत्यादि सज्जनांची प्रभुदरबारांत वाङ्मयसेवाही मध्यें मध्यें होत असून त्यांना यथाशक्य संभावनाही अर्पण केली जाते. याशिवाय, संहिता स्वाहाकार, वेदपारायण, श्रीभागवतसप्ताह इत्यादि कार्यक्रमही प्रसंगानें आश्रम वास्तूंत होतात. याप्रमाणें धार्मिक कार्यक्रमांची रूपरेषा वर दर्शविल्याप्रमाणें आहे.

याशिवाय श्रीमहाराजांच्या व अनुषंगानें इतरही संतांच्या वाङ्मयाचें यथासंभव प्रकाशन करण्याचें सत्कार्यही आश्रमविश्वस्तांकडे सोपविलें आहे. त्याअनुसरूनच हे योगभक्ति-दर्शन ग्रंथाचें प्रकाशन आज आश्रमातर्फे होऊन राहिलें आहे. हें कार्य, सुशिक्षित सर्व स्त्री-पुरुषांना अत्यंत उपयुक्त ठरणारें आहे.

वर निवेदन केलेलीं कार्यें अखंडित चालू राहण्याकरितां एका स्थिर निधीची आवश्यकता आहे. ग्रंथप्रकाशन, संहिता स्वाहाकारासारखीं धार्मिक कार्यें ही सरकार व व समृद्ध धनिक, यांचें साहाय्य, ज्या वेळीं जसें लाभेल तशीं होत राहतीलच. (उत्सवप्रसंगीं व्यवस्था

श्रीगुळवणी महाराजांनींच स्वतः कायमनिधिरूपानें बहुतेक केलेली आहे.) बाकीच्या नित्यपूजानैवेद्यादि व्यवस्थेकरितां कांहीं कायमनिधि आवश्यक आहे. त्याकरितां, अनंतहस्त परमात्मभावनेनें, पत्रकारंभीं निर्दिष्ट केलेल्या सांप्रदायिकांच्या समोर आम्ही पुढीलप्रमाणें, प्रायः सर्वांना झेपणारी अशी एक योजना मांडीत आहोत:—

एकाच वेळी अथवा हप्त्यानें, एकावन्न (५१) रुपये देणारे एक सहस्र गुरुभक्त जर, श्रीगुरुकृपेनें आश्रमाला साहाय्यक लाभले, तर या जमणाऱ्या एकावन्न हजार स्थिरनिधीच्या व्याजातून नित्यपूजा, आरती मंत्रपुष्प, नैवेद्य, इत्यादि व्यवस्था अखंड चालू राहील असा अंदाज आहे. वरीलप्रमाणें एकावन्न रुपये देणाऱ्या सर्व सद्भक्तांना श्रीदत्तजयंतीचा उत्सव झाल्यानंतर पोष्टानें प्रसाद पाठविला जाईल.

'नित्यश्रीर्नित्यमंगलम्' अशा प्रभुदरबारामध्यें नित्य अन्नसंतर्पण चालू आहे. रोज एक, अनेक असा अतिथींची ये जा चालू आहे यांत, स्त्री, पुरुष, ब्राह्मण, इतर, बाल, वृद्ध श्रीमंत, गरीब सर्वांचाच समावेश आहे. काशीपासून रामेश्वरापर्यंत सर्वत्र असणाऱ्या सद्भक्तांचा इकडे ओढा आहे. सद्भावनेनें व पावित्र्याच्या इच्छेनें येणाऱ्या सज्जनांना, निदान एक वेळ का होईना, भाजी भाकरी, जे काय नैवेद्यास असेल तें, मिळालें पाहिजे. येथें फक्त रहा आणि खानावळींत जेवा असें त्यांना सांगणें या विश्वेश्वराच्या दरबारांत तरी उचित ठरणार नाहीं. म्हणून हा एक अपरिहार्य असा मोठा खर्च आश्रमाला करावा लागत आहे, आणि हा शास्त्रविहित असाच आहे—

हा मोठा खर्च भागविण्याकरितां, एकदम अथवा हप्त्यानें कमीत कमी शंभर किंवा यापेक्षां अधिक रुपये देणारे साहाय्यक मिळविण्याचें कर्तव्य, विश्वस्तांना करावयाचें आहे. या साहाय्यकांनीं दिलेल्या द्रव्याच्या व्याजातून येथें वर्षांतून एक दिवस, दोन दिवस, त्यांच्या-त्यांच्या द्रव्यांशाप्रमाणें अन्नशांति होत राहून तें श्रेय त्यांना मिळत राहील याही साहाय्यकांच्या नावाची नोंद ठेवली जाऊन त्यांच्याकडेही प्रतिवर्षी श्रीदत्तजयंतीनंतर, प्रसाद, पोष्टानें रवाना होईल.

याप्रमाणें, वरील कोणत्याही एका अथवा दोनही योजनेंत प्रविष्ट होण्याची ज्यांची इच्छा असेल त्यांनीं प्रथम, आपल्या पूर्ण पत्त्यासह व योजनेच्या निर्देशासह आपली संमति खालील पत्त्यावर कळवावी. संमतिपत्राबरोबरच आपलें द्रव्यही कोणास पाठविणें असल्यास तसे करण्यासही हरकत नाहीं. संमतिपत्राप्रमाणें त्यात निर्दिष्ट केलेल्या योजनेमध्यें नावाची नोंद केल्याचें उत्तर आश्रमाकडून येईलच. हप्त्यानें द्रव्य देऊं इच्छिणाऱ्यांना प्रार्थना अशी कीं, त्यांचे येतील तसे पैसे इकडे जमा होत राहतीलच, पण त्यांच्या राहिलेल्या हप्त्याबद्दल मात्र आश्रमाकडून पुनः विचारणा होणेची अपेक्षा न बाळगता त्यांनीं स्वतःच नोंद ठेवून आपलें संकल्पित द्रव्य आश्रमाकडे पोचविण्याची दक्षता घ्यावी.

'हे विश्वचि माझे घर। ऐसी मति जयाची स्थिर।
किंबहुना चराचर। आपणचि जाहला॥'

अशा पूज्य श्रीगुळवणी महाराजांच्या सत्य संकल्पानें *पुण्यासारख्या शहरांत निर्माण झालेल्या श्रीगुरुस्थानाच्या* चिरंतन व्यवस्थेबद्दल हे सादर निवेदन श्रीगुरुभक्तांचे सचिव प्रकट करण्याचें विश्वस्तांचें कर्तव्य, आज आम्ही पार पाडीत आहोंत. 'हरिर्दाता हरिर्भोक्ता' या उक्तीप्रमाणें श्रीहरीनें दिलेल्या आपल्या ऐश्वर्यांचा अंशतः तरी विनियोग श्रीहरीकडेच करण्याची सद्बुद्धि सर्वांना व्हावी आणि त्याच्या साहाय्यानें येथें अखंडित चालू राहणाऱ्या पुण्यकर्मांतील पुण्यांशाचा लाभ त्यांनाही होऊन ते पूर्ण सुखी व्हावेत हीच सर्वान्तर्यामी श्रीवासुदेवाजवळ आमची नित्य प्रार्थना आहे.

पत्रव्यवहाराचा पत्ता :—

भुजंग बळवंत भालेराव,
श्रीवासुदेव निवास, कर्वे रोड, पुणे ४

श्रीदत्तजयंती शके १८८७

विश्वस्त :—श्रीवासुदेवनिवास, पुणे ४



१ द. धुं. कवीश्वर, पुणे



२ भु. ब. भालेराव, पुणे



३ वि. मो. वैद्य, पुणे



४ ना. त्र्यं. भागवत, मुंबई

विशेष सूचना-पैसे पाठविणे झाल्यास, 'भु. ब. भालेराव, श्रीवासुदेव निवास, कर्वे रोड, पुणे ४' किंवा 'श्रीगुळवणी महाराज, श्रीवासुदेव निवास, कर्वे रोड, पुणे ४' या पत्त्यावरच मनिऑर्डरनें किंवा चेकनें पाठवावेत म्हणजे पोंच पावती पाठवितां येईल. इतर कोणाकडेही पैसे देऊं नयेत.

विश्वस्तमंडळ, श्रीवासुदेवनिवास, कर्वे रोड, पुणे ४



वंगीय प. प. श्रीलोकनाथतीर्थ स्वामिमहाराज

# योग:-

## स्वरूपम् उपयोगिता च

### इयमेव सत्त्वप्रचुरा भूमिका

क्षिप्त मूढ विक्षिप्तैकाग्रनिरुद्धरूपेण पञ्चविधासु भूमिकासु एकाग्रभूमिकानिरुद्धभूमिकयोरेव योगरूपत्वमुपवर्णितं योगदर्शने। इयमेव सत्त्वप्रचुरा भूमिका—

'स्वाम्यमात्यश्च राष्ट्रं च दुर्गं कोशो बलं सुहृत्।
एतावदुच्यते राज्यं सत्त्वबुद्धिव्यपाश्रयम्॥'

इति नीतिसारवचने राज्याङ्गतयापि व्यवस्थापिता, अतोऽत्यन्तमुपादेया प्रेक्षावताम्। सत्त्वभूमिकाया लक्षणं वैद्यक-भावप्रकाशोक्तं द्रष्टव्यम्—

'आस्तिक्यं प्रविभज्य भोजनमनुत्तापश्च तथ्यं वचो
मेधाबुद्धिधृतिक्षमाश्च करुणा ज्ञानं च निर्दम्भता॥
कर्मानिन्दितमस्पृहं च विनयो धर्मः सदैवादरात्
एते सत्त्वगुणान्वितस्य मनसो गीता गुणा ज्ञानिभिः॥'

'समाधिविशेषाभ्यासात्' इति न्यायसूत्रे योगापरपर्यायस्य समाधेर्लक्षणम्—'धारणा प्रयत्नेन धार्यमाणस्य मनसस्तत्त्वबुभुत्साविशिष्टेनात्मना सह संयोगः' इत्युक्तम्। स च यत्तत्त्वबुभुत्सया घटितः स्यात्तज्जन्यमदृष्टं तद्विषयकं साक्षात्कारं मानसं करोति। कामातुरपरिभाव्यमानकामिनीसाक्षात्कारोऽत्र प्रमाणम्। अत एव कामिनीजिज्ञासाया कामिनीज्ञानान्यज्ञानत्वावच्छिन्नं प्रति प्रतिबन्धकत्वं प्रसिद्धं न्यायशास्त्रे। एवं रीत्या बुभुत्साया स्वविषयान्यज्ञानप्रतिबन्धकत्वं यद्भवति तद्विधारकप्रयत्नद्वारेति प्रयत्नस्य विधारकत्वं बुभुत्सानान्तरीयकमिति स्पष्टं तार्किकाणाम्।

### चिन्ताद्वारा साक्षात्कारो घटते

इयमेव बुभुत्सा, चिन्तेति व्यपदिश्यते—

'योगजो द्विविधः प्रोक्तो युक्तयुञ्जानभेदतः।
युक्तस्य सर्वदा भानं चिन्तासहकृतोऽपरः॥'

इत्यादि न्यायशास्त्रप्रतिपादितेषु वाक्येषु तथा प्रतिपादनात्।

'आधिश्चिन्ता हितानाप्तेः शून्यता श्वासतापकृत्।'

इत्यादिना साहित्ये शून्यताया अन्यज्ञानप्रतिबन्धकत्वरूपता स्पष्टमुक्ता,

'आहारे विरतिः समस्तविषयग्रामे निवृत्तिः परा
नासाग्रे नयनं यदेतदपरं यच्चैकतानं मनः।
मौनं चेदमिदं च शून्यमखिलं यद्विश्वमाभाति ते
तद्ब्रूयाः सखि योगिनी किमसि भोः किं वा वियोगिन्यसि॥'

इति पद्ये च चित्रितः दृश्यते। तथा च सिद्धमेतत्, चिन्ताद्वारा साक्षात्कारो घटते।

### योगः समाधिः

युक्तयोगिना तु चिन्तापेक्षा नास्तीति यदुच्यते तत्कारणं न्यायकन्दल्यामेवमुक्तम्—'योगः समाधिः, स द्विविधः, सम्प्रज्ञातोऽसम्प्रज्ञातश्च। सम्प्रज्ञातो धारकेण प्रयत्नेन क्वचिदात्मप्रदेशे वशीकृतस्य मनसस्तत्त्वबुभुत्साविशिष्टेनात्मना संयोगः। असम्प्रज्ञातश्च वशीकृतस्य मनसो निरभिसन्धिर्निरभ्युत्थानात् क्वचिदात्मप्रदेशे संयोगः।

तत्रायमुत्तरो, मुमुक्षूणामविद्यासंस्कारविलयार्थमन्त्ये जन्मनि परिपच्यते, न धर्ममुपचिनोति, अभिसन्धिसंस्कारविरहात्, नापि बाह्यं विषयमभिमुखीकरोति, आत्मन्येव परिणामात्। पूर्वस्तु योगोऽभिसन्धिसहाय प्रतनोति धर्मं, यदर्थतत्त्व-बुभुत्साविशिष्टश्च तदर्थमुद्योतयतीति तेन योगेन योगि नश्च्युतयोगा अपि योग्यतया योगिन उच्यन्ते, न च तेषामप्रक्षीणमलावरणाना तदानीमतीन्द्रियार्थदर्शनमस्त्यत आह——युक्तानामिति। युक्ताना——समाध्यवस्थितानां योगजधर्मानुगृहीतेन मनसा, स्वात्मनि स्वात्मान्तरेषु स्वात्मन आत्मान्तरेषु परकीयेषु आकाशे दिशि काले वायौ परमाणुमनःसु तत्समवेतेषु गुणादिषु समवाये चावितथम-विपर्यस्त स्वरूपदर्शन भवति' इति।

अथेदानीं अथ न्यायकन्दलीग्रन्थो व्याख्यायते। धारणेण प्रयत्नेनेति—

'यमादिगुणसंयुक्त मनस. स्थितिरात्मनि।
धारणा प्रोच्यते सद्भिर्योगशास्त्रविशारदै'॥'

वसिष्ठ (रघु. ८-१८)

इति वचनप्रामाण्यात् ध्यानजनकीभूताऽवस्था लभ्यते। सजातीयवृत्तिप्रवाहरूपता ध्यान, 'तत्र प्रत्ययैकतानता ध्यानम्' इति सूत्रात्। तादृशध्यानजनकीभूता दशा, १ निर्वेदेन, २ अमर्षेण, ३ चिन्तया, ४ अद्भुतरसेन वा भवति, ५ विषादेनोत्तमप्रकृतिस्थेन वा।

## १ निर्वेद

'दारिद्र्यव्याधिदु खेर्ष्यावियोगपरवृद्धिभि'।
ईर्ष्यातत्त्वावबोधाभ्या निर्वेदो नाम जायते॥
अन्तर्वाष्पोद्गमध्याननिःश्वासाश्च मुहुर्मुहु'।
स्वात्मावमानन दैन्य गद्गदत्व विवर्णता॥
अनुभावास्तु गदिता निर्वेदस्यैवमादय।
स्त्रीनीचादिषु वर्ण्योऽय रुदितश्वसितादिभि.॥
तत्त्वावबोधजो योगिष्वनुपादेयता भवेत्॥'

(भावप्रकाशे)

तत्र प्रथमो निर्वेदपदार्थ —

'निर्वेदस्थायिभावोऽस्ति शान्तोऽपि नवमो रस.॥'

इति काव्यप्रकाशे वर्णित.। व्याख्यातश्च गोकुलनाथो पाध्याये —

'प्रवृत्त्यजनक ज्ञानमुपेक्षाबुद्धिः।

सा चेष्टसाधनस्यापि बलवदनिष्टसाधनत्वावगाहिनी द्वेषद्वारा निवृत्तिं भावयन्ती शमसुख जनयति। सैव वासनारूपेण परिणता बीभत्सप्रकृतिर्जुगुप्सेत्युच्यते।' इति विवरणे। 'सैव सर्वविषयिका चेच्छम इत्युच्यते' इति रसमहार्णवे। तथा च शान्तरसस्थायिभावस्य निर्वेदस्य समस्तविषयकजुगुप्सारूपत्व पर्यवसित, ध्येयवस्त्वन्यसमस्त विषयकजुगुप्सारूपत्व तु स्त्रीनीचादिनिष्ठस्य निर्वेदस्य।

## २ अमर्ष.

अमर्षः प्रतिक्रियेच्छारूप इति साहित्यशास्त्रे वर्णितः स्थिरः क्रोध इति गोकुलनाथोपाध्यायैर्व्याख्यात।

'प्रतिक्रियेच्छाऽमर्षः स्याद्विद्यैश्वर्यबलाधिकै'।
आक्षिप्तस्य सभामध्येऽपमान गमितस्य वा॥
शिरःप्रकम्पनस्वेदध्यानोपायगवेषणैः।
उत्साहव्यवसायार्थैर्वर्ण्योऽसौ रसकोविदै॥' (भावप्र०)

## ३ चिन्ता

जिज्ञासा सुखमूर्ला वेति व्याख्यातश्चिन्तापदार्थस्तैरेव।
'ऐश्वर्यभ्रशदारिद्र्यादिष्टद्रव्यापहारत।
वितर्कात्मा भवेच्चिन्ता स्मृतेरन्या प्रतीयते॥
नि श्वासैश्चापि सोच्छ्वासैरधोमुखविचिन्तनै।
सन्तापशून्यचित्तत्वकार्श्याकाशावलोकनै।
एव चिन्तानुभावास्तु कथ्यन्ते काव्यकोविदै॥' (भावप्र०)

## ४ अद्भुतरस

अद्भुतरस, विस्मयस्थायिभावक, विस्मयपदार्थश्च लोकोत्तरोत्कर्षवत्तया ज्ञानम्, उत्कर्षश्च निर्दोषगुणवत्त्व मितिव्याख्यात तै। तत्र लोकोत्तरत्व नाम कृत्यसाध्यतया लोकैरनुमितवृत्तिकृतिसाध्यत्वप्रदर्शनम्। तथाविधप्रदर्शन विषयीभूत निर्दोषगुणवत्त्व लोकोत्तरोत्कर्षपदवाच्य सम्पद्यते। एतादृशलोकोत्तरपदार्थ वे प्रमाण, नाडीपरीक्षाग्रन्थे श्रीशङ्कर-सेनकृत विस्मयपदार्थ व्याख्यादर्शनात्स्पष्ट भवति। तदुक्तम्—

'पतित. सन्धितो भेदी नष्टशुक्रश्च यो नर।
शाम्यते विस्मयस्तस्य न किंचिन्मृत्युकारणम्॥'

पतित उच्चाटित, सन्धित अस्थ्यादिसन्धानेन सहित, भेदी अतिसारवान्, नष्टशुक्रो बस्मादिनाऽतिरमणेन वा शुक्रक्षयवान्। विस्मयोऽसाध्यत्वानुमान, शाम्यति नावतरति। कारण प्रागुक्त तत्तदेव' इति।

रसमहार्णवे अद्भुतरसातिरिक्तरससाधनत्वज्ञान, काव्यजन्यानन्दजनकत्वज्ञान वा विस्मय इति व्याख्यात गोकुलनाथोपाध्यायैरेव। सर्वेषामेतेषा समन्वयेन पूर्वोक्त एव विस्मयपदार्थ सम्पन्न.।

' ध्यान नयनविस्तार प्रसादो वदने दृशि।
आनन्दाश्रुसरोमाञ्चमनिमेषावलोकनम्॥
जनिश्चयत्व मनसो यस्मात्तन्मानसोऽद्भुत ।
चेलाङ्गुलीना भ्रमणमुत्थायोत्थाय वल्गनम्॥
दानप्रबन्धो नटनमाश्लेषश्च परस्परम्।
परस्परस्य भुजयो परस्परतलाहति ॥
एवमादिविकारो य स भवेदाङ्गिकोऽद्भुत ।
हाहाकार साधुवाद कपोलास्फालनध्वनि ॥
उच्चैर्हासो हर्षघोषो गीतमुच्चावच वच.।
एवमादिर्विकारो य स भवेद्वाचिकोऽद्भुतः॥ '
( भावप्र० )

५ विषाद

विषादश्च दु खविशेषरूप साहित्यशास्त्रोक्त उत्तमप्रकृतिषु ध्यानमुत्पादयति।

' कार्यानिस्तरणाद्दैवाद् व्यापत्ते राजदोषत ।
चौर्यादिग्रहणाद्विघ्नाद्विषादो नाम जायते॥
ज्येष्ठमध्यकनिष्ठेषु स त्रिधा कथ्यते बुधै ।
सहायान्वेषणोपायचिन्तादि ज्येष्ठतो भवेत्॥
वैमनस्यमनुत्साहो विघ्नं शय्या च मध्यमे।
ध्यानश्वसितमूर्छादिः कनिष्ठाना निरूप्यते॥' (भावप्र०)

तथा च पूर्वोक्तनिर्वेदाद्यवस्थापञ्चकमेव ध्यानजनक सिद्ध्यति।

'देशबन्धश्चित्तस्य धारणा' इति योगसूत्रे, ध्येयाधिकरणप्रदेशाविशेषविषयकवृत्तिप्रवाहो धारणा, इति व्याख्यात नारायणतीर्थै। प्रयत्नसाध्यतादशाया वृत्तिप्रवाहो धारणा, अप्रयत्नतादशाया वृत्तिप्रवाहो ध्यानमित्यपि स्वीकृत तैरेव। तथा च निर्वेदाद्यवस्थापञ्चकान्यतम सिद्धये यत्न सर्वोऽपि धारकप्रयत्न.। तेन प्रयत्नेन मनसो धार्यमाणत्व यस्मिन्नात्मप्रदेशे भवति स एव 'देशबन्ध' इति सूत्रे देशपदार्थः। तत्र च मनस संयोग एव देशबन्धपदार्थ पर्यवसित । 'तप स्वाध्यायेश्वरप्रणिधानानि क्रियायोग ' 'समाधिभावनार्थं क्लेशतनूकरणार्थश्च इति, सूत्रे. समाध्युत्पादनार्थत्व, क्लेशतनूकरणार्थत्व च यत्क्रियायोगे वर्णित, तद्घटकस्य सर्वथाऽऽहारवर्जनात्मकस्य तपसो निर्वेदजनकत्व, विषादजनकत्व, चिन्ताजनकत्व च, ईश्वरप्रणिधानस्याद्भुतजनकत्व, स्वाध्यायस्यामर्षजनकत्व च सम्भवति। एतदतिरिक्तान्यपि तपासि, ईश्वरप्रणिधानोद्देशेन क्रियमाणानि धारकप्रयत्नरूपाण्येवेति, 'वैधक्लेशजनक कर्म तप ' इति स्मृतितत्त्वव्याख्यानुसारेण यद्यपि तपास्येव, तथापि क्रियायोगघटक तपोऽनशनात्मक मुख्यमेव ग्राह्यम्। शीघ्रसमाधिप्रदत्वात्क्लेशतनूकरणार्थत्वाच्च पुन प्रथक्करणमिति व्याख्यात नारायणतीर्थै ।

तथा च—अविद्यास्मितारागद्वेषाभिनिवेशात्मकपञ्चविधक्लेशतनूकरणार्थो वैधक्लेशात्मकसामान्यतपोघटित अनशनात्मकमुख्यतपोघटितो वा पूर्वोक्तक्रियात्मक क्रियायोग एव धारकप्रयत्न इति सिद्धम्।

### अहपदार्थश्चित्तम्

अविद्यासस्कारविलयार्थमिति।— अहपदार्थश्चित्तम्—

' चित्तद्रव्य हि जतुवत्स्वभावात्कठिनात्मकम्।
तापकैर्विषयैर्योगे द्रवत्व प्रतिपद्यते॥
कामक्रोधभयस्नेहहर्षशोकदयादय ।
तापकाश्चित्तजतुनस्तच्छान्तौ कठिन तु तत्॥
द्रवताया प्रविष्ट सन्यत्काठिन्यदशा गतम्।
चेत पुनर्द्रुतौ सत्यामपि तन्नैव मुञ्चति॥
द्रुते चित्ते विनिक्षित स्वाकारो यस्तुवस्तुना।
सस्कार वासना भाव भावनाशब्दभागसौ॥

इति भक्तिरसायनोक्तरीत्या द्रुतचित्तनिष्ठो वस्त्वाकार कठिन सस्कार., कामक्रोधादितापकैश्चित्ते द्रवत्वमुपगते, स्वयमपि द्रवीभाव प्राप्य विनश्यतीत्यवगमात् सस्कार विलयपदेन कन्दल्या व्यवहृत । अयमेव क्लेशतनूकरणपर्यायोऽपि।

परिणामादिति— आत्मान्यविषयकसस्काराणां तनूकृतत्वादित्यर्थ ।

### भारतीय राजनीतिशास्त्रे योग

अनेन हि ग्रन्थेन युक्तावस्थापि न्यायशास्त्रोक्ता स्पष्टीकृता। न्यायशास्त्रस्यैवोपशास्त्रभूतेन भारतीयराजनीतिशास्त्रेण राजनीतावप्य योगस्यावश्यमनुष्ठेयत्वमुक्तम्। तथा हि कामन्दकीयनीतिसारे—

' ज्ञानाङ्कुशेन कुर्वीत वश्यमिन्द्रियदन्तिनाम्। '

इत्यत्र जयमङ्गला—' तत्र ज्ञानं द्विविधम्, आत्मालम्बनं बाह्यालम्बनं च । तत्राद्यस्योत्तरत्रोपयोगं वक्ष्यामः । द्वितीयं द्विविधं प्रतिबुद्धमप्रतिबुद्धं चेति । तत्र कार्याकार्यविवेकादुत्पद्यमानं मनोनियमनसमर्थं प्रतिबुद्धम्, अन्यदप्रतिबुद्धम्। -तस्मात्प्रतिबुद्धज्ञानेनाङ्कुशस्थानीयेन मनोनियमनपूर्वकमिन्द्रियदन्तिनमस्वतन्त्रं कुर्यात् यथा विषयेषु न विप्रतिपद्यते ' इति ।

एवं—' तस्मात्प्रयत्नसंरोधाद्भावयेन्निर्मनस्कताम् '

यथा मनसो बाह्याभ्यन्तरप्रवृत्तिर्न भवति । प्रयत्नसंरोधश्चात्मालम्बनज्ञानात् । तद्धि योगाभ्यासात्प्रयत्नान् संरुणद्धि ' इति ।

अतएव प्रत्यक्षानुमानागमदेशकालशक्तिपुरःसरार्थविनियोगलक्षणाया भारतीयराजनीतौ योग उक्तलक्षणः परमावश्यकत्वेन राजनीत्यनुष्ठातृभ्यो विहितः —

' सुनिपुणमुपसेव्य सद्गुरुं सुचिरनुवृत्तिपरो विभूतये ।
भवति हि विनयोपसंहितो नृपतिपदाय शमाय च क्षमः ॥'

इत्यादिभिर्वाक्यैः ।

'विवेकश्रुतिसम्पत्तिगुरुभक्तितपस्वितेत्येतच्चतुष्टयसिद्ध्यर्थं, विवेकश्रुतिसम्पत्तिगुरुभक्तितपस्वितेत्येतच्चतुष्टयं यावज्जीवमहं करिष्ये ' इति सङ्कल्पेन कृतेऽनुष्ठाने अयं योगः सिद्धो भवतीति सङ्गीतरत्नाकरे वर्णितेन धृतिभावेनावगतो भवति। तद्यथा—

' विवेकः श्रुतिसम्पत्तिर्गुरुभक्तिस्तपस्विता ।
एते विषयभावेन करणत्वेन च स्थिताः ॥
इष्टाधिकानामिष्टाना लाभस्तु विषयत्वतः ।
व्रीडाकरणभावेन विभावा यत्र सम्मताः ॥
प्राप्तभोग्योपभोगस्य त्वप्राप्तातीतभोगयोः ।
जीर्णे नष्टे चाविषादोऽननुशोचनमित्यपि ॥
अनुभावद्वयं यत्र धृतिं ता ब्रुवते बुधाः ॥ ' इति ॥

—पण्डितराज राजेश्वरशास्त्री द्रविड, काशी



# योग

# स्व | रू | प | आ | णि | उ | प | यु | क्त | ता

क्षिप्त, मूढ, विक्षिप्त, एकाग्र व निरुद्ध अशा पाच प्रकाराने युक्त असणाऱ्या चित्ताच्या भूमिका किंवा ज्या अवस्था आहेत त्यात एकाग्र व निरुद्ध अशा चौथ्या व पाचव्या भूमिकेला किंवा अवस्थेलाच पातंजलादि योगदर्शनामध्ये 'योग' अशी संज्ञा दिली आहे. ही योगभूमिकाच सत्त्वप्रचुर अशी आहे. स्वामी-अमात्य-राष्ट्र-दुर्ग-कोश-बल व सुहृत् अशा सात पदार्थांना मिळून 'राज्य' अशी संज्ञा आहे व हे राज्य सत्त्वबुद्धीच्या आधारावर राहिले आहे. म्हणजे अन्वय व्यतिरेकाने सत्त्वबुद्धीच या राज्याला कारण आहे. याप्रमाणे असलेल्या नीतिसार वचनात राज्याचे अंग म्हणूनही या योगभूमिकेला महत्त्व दिले आहे. म्हणून शहाण्या माणसानी इचा अत्यंत आदराने जगाच्या व आपल्या कल्याणाकरता स्वीकार केला पाहिजे.

## सत्त्वभूमिकेचे लक्षण

सत्त्व भूमिकेचे लक्षण वैद्यक भावप्रकाश ग्रथामध्ये पुढे सांगितल्याप्रमाणे वर्णिले आहे. ते म्हणतात:— ज्ञानी लोकानी सत्त्वगुणाने युक्त असलेल्या मनाचे सोळा गुण वर्णन केले आहेत. सात्त्विक मनाची माणसे धर्म, ईश्वर वगैरे श्रुत्यादिवर्णित अलौकिक पदार्थ विद्यमान आहेत अशा निश्चयाची असतात. ते स्वसंपादित पदार्थांचा एकट्यानेच उपभोग न घेता अधिकारानुरूप दुसऱ्यास वाटून देऊन मग त्याचा स्वतः उपभोग घेतात. त्याना उत्ताप, मानसी पीडा किंवा पश्चात्ताप होत नाही. कारण ते विचारपूर्वक कार्य करणारे असतात. ते सारयुक्त व खरे बोलणारे असतात. त्याच्या बुद्धीत, पाहिलेल्या किंवा ऐकलेल्या गोष्टींचा निश्चय नष्ट न होऊ देण्याचे म्हणजे न विसरण्याचे सामर्थ्य असते, व ते ऊहापोहकुशल असतात. धैर्य व क्षमा हे गुण त्याच्या अंगी असतात. कारुण्य, शास्त्र व व्यवहारज्ञान, अदांभिकत्व, लोक व शास्त्र यानी अनिंद्य असलेल्या कर्मांचे अनुष्ठान, निरिच्छता, नम्रता व आदराने सर्वदा धर्मानुष्ठानशीलता, याप्रमाणे सोळा गुण याचे ठिकाणी नियमाने असतात. हे सर्व वर्णन भावप्रकाश ग्रथामध्ये पहाण्याजोगे आहे.

## 'समाधि' पदार्थाचे लक्षण

"समाधिविशेषाभ्यासात्" या न्यायसूत्रात आलेल्या व योग असे दुसरे नाव असलेल्या 'समाधि' पदार्थाचे लक्षण टीकाकारानी पुढीलप्रमाणे केले आहे. ते म्हणतात:— धारक प्रयत्नाने स्थिर केलेल्या मनाचा, तत्त्वबोधाची इच्छा असणाऱ्या आत्म्याशी जो सयोग, त्यालाच 'समाधि' असे नाव आहे. तो मन.सयोग ज्या पदार्थाच्या तत्त्वबोधेच्छेने युक्त असेल, त्या संयोगाने उत्पन्न झालेले जे अदृष्ट

म्हणजे धर्म, तो त्या पदार्थाचा मानस साक्षात्कार करून देतो याविषयी लौकिक दृष्टान्त देणे असल्यास, कामातुर माणसाने स्वेष्ट कामिनीचा घेतलेला जो ध्यास, तो त्या कामिनीच्या साक्षात्काराला कारण होतो, असे सांगता येईल म्हणूनच न्यायशास्त्रामध्ये, एकदा का कामिनीजिज्ञासा चित्तात निर्माण झाली, म्हणजे ती जिज्ञासा इतकी जबरदस्त असत, की इतर विषयाच्या ज्ञानाची साधने सिद्ध असताना सुद्धा त्या साधनापासून इतर पदार्थांचे ज्ञान न होता कामिनीज्ञानच त्याला होते. इतर ज्ञानाची सामग्री दुर्बल होते अशाच रीतीने कोणत्याही पदार्थाच्या बोधे च्छेला, स्वविषयाहून अन्य विषयाच्या ज्ञानाला जे प्रतिबंधकत्व असते, ते सुद्धा वर वर्णिलेल्या विधारक प्रयत्न द्वाराच असते म्हणून कोणताही प्रयत्न चित्ताला विधारक व्हावा अशी इच्छा असेल, तर त्या ठिकाणी चित्ताची धारणा इष्ट असेल, त्या विषयाची उत्कट बुभुत्सा आवश्यक आहे हे तत्व तार्किक लोकाना सांगण्याची बिलकुल आवश्यकता नाही ते त्याना सूर्यप्रकाशाप्रमाणे स्पष्ट आहे

### तीन अलौकिक सन्निकर्ष

या बुभुत्सेलाच 'चिन्ता' असे शास्त्रकार म्हणतात पदार्थज्ञानाला कारणीभूत असणाऱ्या सन्निकर्षांचे वर्णन करीत असता न्यायशास्त्रातील कारिकावली ग्रंथात अलौकिक सन्निकर्ष प्रसंगी सामान्य लक्षणा, ज्ञानलक्षणा व योगज असे तीन अलौकिक सन्निकर्ष सांगून त्यापैकी युक्त व युंजान असा दोन प्रकारचा जो योगज सन्निकर्ष आहे, त्यातील युक्त सन्निकर्षशाली योग्याला पदार्थांचे भान सर्वदा असते व युंजान सन्निकर्षयुक्त योग्याला वर सांगितलेल्या चिंतेने म्हणजे बुभुत्सेचे सहाय्य घ्यावे लागते असे म्हटले आहे. अर्थातच युक्त योग्याचे अदृष्ट अन्यनिरपेक्ष व युंजानाचे अदृष्ट चिंतासापेक्ष असे ठरते म्हणूनच युक्तापेक्षा युंजान योगी खालच्या दर्जाचा असे म्हणावे लागते

### चिन्ताद्वारा साक्षात्कार

साहित्यशास्त्रात आपल्या वियोगिनी सखीला पाहून तिची मैत्रीण तिला 'तू वियोगिनी आहेस की योगिनी आहेस?' असे जे विचारते, ते वियोगिनी व योगिनी या दोघींची लक्षणे सारखीच दिसतात म्हणून सामान्य धर्म ज्ञानामुळे संशयाक्रान्त होऊनच तो विचारते ती म्हणते, 'हे सखि, तुला योगिनीप्रमाणेच आहार करण्याची बिलकुल इच्छा नाही स्रक्चंदनादि सर्व जे सुखदायक पदार्थ त्यागा सून तू अगदी निवृत्त आहेस तुझी दृष्टी नेहमी नासाग्रावर असते इकडे तिकडे तू ढुंकून सुद्धा पहात नाहीस हे एक तिसरेच शिवाय तुझ मन नेहमी एकाग्र असे असते कोणाशीही तू एक अक्षर सुद्धा बोलत नाहीस आणि या जगाकडे तू शून्य दृष्टीने सर्वदा पहात असतेस त्यामुळे तू काय योगिनी आहेस? परंतु तसे म्हणावे तर उघड रीतीने योगाभ्यास केल्याचे आमच्या पाहाण्यात नाही व वियोगिनीची सुद्धा अशीच स्थिती असते त्यामुळे तू वियोगिनी आहेस? हे मला खरे खरे सांग' याप्रमाणे केलेल्या सखीच्या प्रश्नात आपल्या मैत्रिणीच्या ठिकाणी तिने शून्यता शेवटी दाखविली आहे ही शून्यता आहारादि अन्य पदार्थ ज्ञानामध्ये प्रतिबंधक आहे असे स्पष्ट दिसत आहे. नाही तर इतर सर्व ज्ञानाचा अभाव त्या त्या ज्ञानाची साधने असताना असंभाव्य आहे. साहित्यशास्त्रात हिताची प्राप्ती न झाल्याने श्वास व ताप करणारी आधी–चिंता–व शून्यता हे विकार होतात असे म्हटले आहे प्रकृत प्रसंगी आम्हास चिंताद्वारा साक्षात्कार होऊ शकतो एवढेच या उदाहरणा वरून घेणेचे आहे, ते या उदाहरणाने सिद्ध झाले.

### समाधीचे दोन प्रकार

आता युक्त योग्याना चिंतेची अपेक्षा नाही असे जे म्हटले, त्याचे कारण न्यायकदली ग्रंथात याप्रमाणे दिले आहे –योग म्हणजे समाधी तो दोन प्रकारचा आहे एक संप्रज्ञात व दुसरा असंप्रज्ञात धारक प्रयत्नाने कोणत्या तरी आत्म्याच्या प्रदेशात संयोग म्हणजे समाधि त्यातील दुसरा म्हणजे असंप्रज्ञात समाधी हा मुमुक्षूना उपयोगी आहे व तो दोरच्या जन्मामध्ये अविद्या संस्काराच्या विलयाकरता परिपक्व होतो त्या समाधीने धर्म–रूप अदृष्ट निर्माण होत नाही कारण मुमुक्षूला इच्छारूप अदृष्टोत्पादक सहकारी कारण नसते कारण मुमुक्षु निरिच्छ असतो हा समाधी बाह्य विषयाकडे मुमुक्षूला प्रवृत्तही करीत नाही कारण आत्म्याच्या ठिकाणीच त्याचा परिणाम होतो म्हणजे आत्म्याहून अन्य विषयाचे संस्कार या समाधीने कृश म्हणजे नष्टप्राय झालेले असतात पहिला जो संप्रज्ञात

नावाचा योग आहे त्या योगाला अभिसंधि म्हणून योग्याची इच्छा किंवा कामना सहायक असल्याने त्या योगापासून धर्मरूप अदृष्ट निर्माण होते व योगी ज्या अर्थाच्या तत्त्वज्ञानाची इच्छा करीत असेल त्या अर्थाचा साक्षात्कार त्याला होतो त्यामुळे या योगरूप साधनाने युक्त असणारे योगी मुख्य असंप्रज्ञात योगापासून जरी च्युत झाले असले तरी इच्छा असल्यास असंप्रज्ञात योगालाही ते योग्य असतात म्हणून त्याना योगी अशी गौण का होईना संज्ञा प्राप्त होते परंतु त्याच्या चित्तातील वासनादि मल क्षीण न झाल्याने त्या वेळी त्याना अतींद्रिय असणाऱ्या पदार्थांचे दर्शन होत नाही असे युक्तानामित्यादि ग्रंथाने भाष्यकारानी याच वर्णन केले आहे युक्त म्हणजे समाध्यवस्थेत स्थित असणाऱ्या योग्याना, अर्थातच असंप्रज्ञात योग्याना, आपल्या योगज धर्माने अनुगृहीत अशा मनाने आपल्या आत्म्याविषयी, आपल्याहून भिन्न असणाऱ्या दुसऱ्याच्या आत्म्याविषयी, आकाश दिशा काल वायु सर्व परमाणु, मन व त्याच्या ठिकाणी समवाय संबंधाने राहणारे जे गुण कर्मादि पदार्थ याचे समवाय याविषयी खरे व अभ्रांत असे याच्या स्वरूपाच ज्ञान होते याप्रमाणे भाष्य ग्रंथ आहे

## धारणेचे लक्षण

आता या न्यायकन्दली ग्रंथाचे व्याख्यान त्यातील अर्थाच्या स्पष्टीकरणाकरता करीत आहो —कन्दलीमध्ये 'धारकेण प्रयत्नेन' असे म्हटले आहे यात धारक प्रयत्न शब्दाचा अर्थ 'धारणा' असा होत आहे वसिष्ठानी (रघु ८ १८) श्लोकात योगाभ्यास विशारद अशा सज्जनानी यमादि गुणयुक्त आत्म्याच्या ठिकाणी मनाची जी स्थिती तिला धारणा म्हणतात असे धारणेचे लक्षण केले आहे असे म्हटले आहे या वसिष्ठवचनाला प्रामाण्य मानून ध्यानाला उत्पन्न करणारी अशी जी चित्ताची अवस्था तिलाच धारणा असे म्हणतात असे दिसते चित्ताचा जो सजातीय वृत्तिप्रवाह त्यालाच ध्यान असे म्हणतात असे "त्या ठिकाणी प्रत्ययाची एकतानता म्हणजे ध्यान" अशा पातञ्जल योगसूत्रावरून सिद्ध होते अशी ध्यानाला उत्पन्न करणारी चित्ताची दशा म्हणूनच धारणा पाच कारणाने होते. निर्वेदाने, अमर्षाने, चिन्तेने, अद्भुतरसाने किंवा उत्तम प्रकर्षित विषादाने ती निर्माण होते

## निर्वेदाचे अनुभाव

त्यात निर्वेदाचे लक्षण भावप्रकाश ग्रंथात असे केले आहे:—दारिद्र्य, व्याधि, दुःख, इष्टवियोग, दुसऱ्याची भरभराट ईर्ष्या व तत्त्वावबोध अशा सात कारणानी निर्वेद उत्पन्न होतो याचे परिणाम म्हणजे अनुभाव वारवार आतल्या आत नेत्रात अश्रू येणे, ध्यान करणे, निःश्वास सोडणे, आपलाच धिक्कार आपण करणे, दीनता प्रकट करणे, स्वरात गद्गदता येणे, पादरे फिक्ट पडणे इत्यादि प्रकारचे आहेत स्त्री किंवा हलक्या वृत्तीच्या लोकात रडणे, भेकणे व उच्छ्वासादिकाने हा निर्वेद ओळखण्याचा असतो योग्याच्या ठिकाणी हा निर्वेद तत्त्वावबोधापासून होत असतो परंतु हा निर्वेद त्याचे ठिकाणी ग्राह्य अवस्थेत असत नाही म्हणजे स्पष्ट समजत नाही काव्यप्रकाशकारानी शान्तरसवर्णनप्रसंगी निर्वेद ज्याचा स्थायि भाव म्हणजे मूळ स्वरूप आहे असा शान्त नावाचा नवम रस आहे असे त्याचे वर्णन केले आहे. गोकुलनाथोपाध्यायानी विवरणग्रंथात याचे पुढीलप्रमाणे विवेचन केले आहे —ते म्हणतात प्रवृत्तीला उत्पन्न न करणारे जे ज्ञान, त्याला उपेक्षा बुद्धी म्हणतात ती उपेक्षा बुद्धी, आपल्या इष्ट पदार्थाला कारण असणाऱ्या वस्तूचे ठिकाणी सुद्धा, ही वस्तु बलवदनिष्टाला साधन आहे अशी बुद्धी निर्माण करून, त्या वस्तूबद्दल द्वेष निर्माण करते, व निवृत्ती उत्पन्न करून शमात्मक सुखाला कारण होते तीच बुद्धि वासनारूपाने परिणाम पावली, म्हणजे बीभत्सरसाला निर्माण करणारी 'जुगुप्सा' या संज्ञेला प्राप्त होते, असे म्हटले आहे हीच उपेक्षाबुद्धी सर्वविषयक जर झाली, तर तिला 'शम' असे म्हणतात, असे रसमहार्णवामध्ये म्हटले आहे एकंदरीत शान्त रसाचा स्थायीभावरूप जो निर्वेद, तो समस्त विषयाची जी जुगुप्सा, तत्स्वरूप आहे असे, सिद्ध झाले स्त्री किंवा नीचादिव्यक्तिनिष्ठ जो निर्वेद, तो मात्र ध्येय वस्तूहून अन्य समस्त विषय-जुगुप्सारूप आहे असे समजावे याप्रमाणे धारणेचा कारण जो निर्वेद याचे वर्णन झाले

## अमर्ष मीमांसा

आता धारणेचे दुसरे कारण जो अमर्ष, त्याचे वर्णन भावप्रकाशात याप्रमाणे आहे.—विद्येने, ऐश्वर्याने अथवा

बलाने आपल्यापेक्षा अधिक असणाऱ्या पुरुपाने आपला अधिक्षेप केला किंवा सभेमध्ये आपला अपमान केला असता त्याची प्रतिक्रिया करण्याची जी इच्छा, तिला ' अमर्ष ' असे म्हणतात. अमर्ष या व्यक्तीला झाला आहे हे ओळखण्याची साधने म्हणजेच अनुभाव· आपली मान विशिष्ट अभिप्रायाने हालविणे, घाम येणे, ध्यान करणे, प्रतिक्रियेचे उपाय हुडकणे, त्याबद्दल उत्साह बाळगणे, व तदर्थ उद्योग करणे वगैरे कार्यावरून रसकोविद लोकांनी तो ओळखता येतो असे सांगितले आहे. गोकुलनाथ उपाध्यायांनी साहित्यशास्त्रात प्रतिक्रियेच्छारूप म्हणून वर्णिलेल्या अमर्षाचे व्याख्यान स्थिरक्रोध अशा रीतीनें केले आहे.

## चिंतेचे अनुभाव

धारणेचे तिसरे कारण जी चिंता, तिचे भावप्रकाशकारांनी असे वर्णन केले आहे:—ऐश्वर्यभ्रंश, दारिद्र्य, इष्ट द्रव्याचा अपहार, या योगाने जो चित्तात वितर्क निर्माण होतो, त्याला चिन्ता असे म्हणतात. परंतु ही चिंता म्हणजे स्मृति नव्हे. स्मृतीपेक्षा दुसरी ही वृत्ति आहे उच्छ्वास-निःश्वास, अधोमुख होऊन चिंतन करणे, संताप करणे, शून्यचित्तता, शरीरकृशता, आकाशावलोकन वगैरे परिणाम किंवा अनुभाव चिंतेपासून होतात असे काव्यकोविद म्हणतात असा तो लेख आहे गोकुलनाथोपाध्यायांनी जिज्ञासा किंवा स्मरणाची इच्छा याला चिंता असे म्हटले आहे.

## अद्भुत रस

धारणेचे चौथे कारण अद्भुत रस हे आहे. याचे विवेचन भावप्रकाशात याप्रमाणे आहे:– अद्भुतरस मानस, शारीर व वाचिक असा तीन प्रकारचा आहे. मानस अद्भुतरसात ध्यान-नेत्रांचा विस्तार, मुखावर व नेत्रांत प्रसन्नता दिसणे, रोमाञ्चसहित आनंदाश्रु येणे, तटस्थ अशा नेत्रांनी पहात राहणे व मन चंचल असणे असे प्रकार होतात. शारीर अद्भुतरसात कपडे किंवा हाताची बोटे हालविणे, वारंवार उठून बडबडणे, दान देण्याची तयारी दाखविणे, पोषाख करणे, परस्पर आलिंगन करणे, परस्पराच्या हातावर हात मारणे इत्यादि विकार प्रगट होतात वाचिक अद्भुतरसात हाहाकार करणे, शाबास असे म्हणणे, गालाच्या आस्फालनाने ध्वनि करणे, मोठ्याने हासणे, हर्ष व घोष करणे, गाणे म्हणणे, बरेवाईट शब्द बोलणे इत्यादि विकार हर्षोत्पत्तीस येतात असे म्हटले आहे.

## विस्मय

गोकुलनाथोपाध्यायांनी अद्भुत रसाचे वर्णन पुढील प्रमाणे केले आहे. ते म्हणतात:– अद्भुतरसाचा 'विस्मय' हा स्थायी भाव आहे. विस्मय म्हणजे विलक्षण उत्कर्षयुक्त ही व्यक्ति आहे असे ज्ञान असे समजावे. उत्कर्ष म्हणजे दोषरहित गुणवत्ता असे ते म्हणतात. उत्कर्षामध्ये वैलक्षण्य हे आहे की कोणालाही न करता येण्यासारखी गोष्ट या व्यक्तीने केली असे दाखविणे अशी दाखविलेली जी दोषरहित गुणवत्ता तिलाच लोकोत्तरत्व किंवा वैलक्षण्य असे म्हणता येईल. अशा लोकोत्तर किंवा विलक्षण पदार्थाबद्दल प्रमाण म्हणून श्रीशंकरसेनकृत नाडीपरीक्षा ग्रंथात केलेली विस्मयपदार्थाची व्याख्याच पुरेशी होईल. उंच ठिकाणावरून पडलेला, किंवा मोडलेली शरीरातील ज्याची हाडे जोडलेली आहेत असा, अतिसार ज्याला झाला आहे असा, क्षय-रोगादिकाने ज्याचे वीर्य नष्ट झालेले आहे असा, जो मनुष्य, त्याच्याबद्दल वैद्याच्या मनात विस्मय उत्पन्न होत नाही कारण पूर्वी सांगितलेल्या मृत्यूच्या कारणांपैकी येथे एकही मृत्युकारण नाही असे त्यांनी म्हटले आहे. त्यात विस्मय शब्दाचा अर्थ करताना विस्मय म्हणजे असाध्यत्व–ज्ञान असे व्याख्यान त्यांनी केले आहे

## विस्मय पदार्थाचे व्याख्यान

गोकुलनाथोपाध्यायांनी विस्मय पदार्थाचे व्याख्यान असे केले आहे. ते म्हणतात.– अद्भुतरसाहून अतिरिक्त जे शृंगारादि रस त्यांचे हे कारण आहे· असे ज्ञान किंवा वाक्यापासून उत्पन्न होणाऱ्या आनंदाला हे जनक आहे. असे ज्ञान, म्हणजेच विस्मय आहे असे समजावे. या सर्व विद्वानांच्या एकवाक्यतेने आम्ही पूर्वी वर्णन केलेला विस्मय पदार्थच योग्य आहे असे सिद्ध झाले.

## विषाद

आता धारणेचे पाचवे कारण विषाद हा आहे. विषाद सुद्धा उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशा अधिकारि भेदाने

तीन प्रकारचा होतो प्रथम विषाद उत्पन्न होण्याची कारणे भावप्रकाशात अशी दिली आहेत — अंगीकृत कार्याची समाप्ती दैववशात न करता येणे, राजाच्या दोषाने विशेष आपत्ती येणे, चोरी अथवा अन्य वाईट प्रकरणी त्यात सापडणे, अथवा नाना प्रकारची विघ्ने येणे, ही विषादाची कारणे आहेत आता उत्तम माणसास विषाद झाला म्हणजे त्याचा परिणाम चिंता उत्पन्न होणे, कोणी सहाय करणारा हुडकणे, वगैरे प्रकारे होतो मध्यम माणसास विषाद झाला म्हणजे चित्त ठिकाणावर नसणे, चित्तात अनुत्साह असणे, विघ्नादिक आले असता स्वस्थ निवृत्त राहणे, वगैरे विकार होतात व कनिष्ठ माणसास विषाद झाला म्हणजे ध्यान, श्वासप्रश्वास, मूर्च्छा, वगैरे विकार होतात दु ख विशेष हे विषादाचे स्वरूप आहे उत्तम प्रकृतीच्या माणसास हा विषाद झाला म्हणजे तो त्याला ध्यान करण्याकडे प्रवृत्त करतो एवंरीत, पूर्वी सांगितलेल्या ज्या निर्वेदादि पाच अवस्था, धारणाद्वारा या ध्यानाला कारण आहेत हे सिद्ध झाले

## धारणा

"देशबन्धश्चित्तस्य धारणा" या पातञ्जलसूत्राच्या व्याख्येत नारायणतीर्थांनी ध्येयपदार्थाचे अधिकरण जो प्रदेश विशेष, त्याविषयी जो वृत्तिप्रवाह, त्यालाच धारणा असे म्हटले आहे ज्या वेळी तो वृत्तिप्रवाह प्रयत्नसाध्य असतो, त्या वेळी त्या प्रवाहाला धारणा असे नाव आहे, व प्रयत्न न करता सहज असा जो वृत्तिप्रवाह चालतो, त्याला ध्यान ही संज्ञा आहे असे ते म्हणतात म्हणजे आता निर्वेदादि पाच अवस्थेपैकी कोणत्या तरी अवस्थेनी सिध्दी होण्याकरता जो प्रयत्न केला जातो, तो सर्वही प्रयत्न धारक प्रयत्न या संज्ञेला प्राप्त झाला त्या प्रयत्नाने ज्या आत्मप्रदेशामध्ये मन धरले जाते, त्या प्रदेशालाच 'देशबन्धश्चित्तस्य धारणा' या सूत्रातील 'देश' पदानी घेतले पाहिजे, व त्या देशाशी मनाचा संयोग, म्हणजेच देशबन्ध असे सिध्द झाले

## क्रियायोग

तप, स्वाध्याय, व ईश्वरप्रणिधान यास क्रियायोग म्हणतात तो क्रियायोग समाधि उत्पन्न करण्याकरता व क्लेश क्षीण करण्याकरता आहे या दोन सूत्रामध्ये क्रियायोगाला समाधि उत्पत्तीचे व क्लेश तनूकरणाचे जे साधनत्व दाखविले आहे, त्यात क्रियायोगान्तर्गत 'तप'ही आहे हे तप सर्वथा आहार राहित्य अशा स्वरूपाचे आहे हे तप निर्वेद, विषाद व चिन्ता या तिनीला कारण आहे ईश्वर प्रणिधान हे अद्भुतरसाला कारण आहे व स्वाध्याय हा अमर्षाला जनक आहे असे म्हणणे संभवनीय आहे या तिनीहून इतर जी तपे आहेत, ती जर ईश्वरप्रणिधानाच्या उद्देशानी केली, तर ती धारक प्रयत्न रूपच होतात विधि विहित कर्मानुष्ठानाने होणारे जे क्लेश, त्याला उत्पन्न करणारे जे कर्म, त्याला 'तप' असे स्मृतितत्त्वकाराच्या व्याख्येच्या अनुरोधाने म्हटल्यास तीही कर्मे तपरूप होतील परंतु क्रियायोगात घटक होणारे तप मात्र आहारवर्जनात्मक मुख्यच घेणे योग्य आहे कारण हे तप शीघ्र समाधी सिद्ध करणारे व क्लेश क्षीण करणारे आहे म्हणून इतर गौण तपापेक्षा सर्वथा आहारवर्जनरूप तप क्रियायोगात पृथक दाखविले आहे, असे योगसूत्रव्याख्याकार नारायण तीर्थांनी म्हटले आहे एतावता अविद्या, अस्मिता, राग, द्वेष व अभिनिवेशात्मक पंचविध क्लेश क्षीण करण्याकरता विधिविहित कर्मानुष्ठानजन्य सामान्य तपाने युक्त किंवा आहारवर्जनात्मक मुख्य तपानी युक्त असणारा पूर्वी सांगितलेला तप-स्वाध्याय-ईश्वरप्रणिधानात्मक तीन साधनात्मक जो क्रियायोग, तोच धारक प्रयत्न आहे असे सिद्ध झाले

## चित्त मीमांसा

आता कदली ग्रंथात 'अविद्यासंस्कारविलयार्थम्' असे जे म्हटले आहे त्याचाही विचार कर्तव्य आहे चित्त हा अद्रवपदार्थ आहे चित्त द्रव्य हे लाखेप्रमाणे स्वभावत च कठीण आहे. त्याला अग्नीप्रमाणे तापक जे विषय त्याचा संयोग झाला असता पातळपणा येतो म्हणजे ते चित्त द्रव्य विघळते काम क्रोध-भय-स्नेह-हर्ष शोकाच्या प्रभती विषय चित्तरूप लाखेला तापविणारे म्हणजे पातळ करणारे पदार्थ आहेत ते सर्व नाहीसे झाले तर ते चित्त पुन पूर्वी प्रमाणे कठीण होते चित्ताची द्रवावस्था असताना त्यात प्रविष्ट झालेला पदार्थ पुन त्याची कठीण अवस्था झाली तरी तो त्यातून जात नाही द्रवावस्था असताना

चित्तात प्रविष्ट झालेल्या वस्तूच्या आकाराला संस्कार वासना-भाव भावना इत्यादि शब्दांनी शास्त्रात व्यवहार केला जातो, असे जे मधुसूदनसरस्वती प्रणीत भक्ति रसायनामध्ये म्हटले आहे, त्याला अनुसरून असे म्हणता येईल की द्रुतचित्तामध्ये असणारा वस्तूचा जो कठिण आकार म्हणजेच संस्कार, कामक्रोधादि तापक पदार्थांच्या संयोगाने चित्तद्रुत झाले असता तो स्वत ही द्रुत होऊन नष्ट होतो व या संस्कारनाशालाच कदलीकारानी संस्कार विलय या शब्दाने दाखविले आहे. क्लेशतनूकरणपदाचाही अर्थ, हा संस्कारनाशच समजला पाहिजे. आता कदली कारानी 'आत्मन्येव परिणामात्' असे जे म्हटले आहे त्याचा अर्थ, आत्म्याहून अन्यविषयक संस्काराचा नाश असाच अर्थ केला पाहिजे, याप्रमाणे कदली टीका व इतर योगादि ग्रंथाची अशी एकवाक्यता वरील बाबतीत झाली

## राजनीति व योगानुष्ठान

आता न्यायशास्त्राचेच अगभूत म्हणजे उपशास्त्र जे भारतीय राजनीतिशास्त्र त्यात राजनीतीत योगाचे अनुष्ठान अत्यत आवश्यक आहे असे सांगितले आहे. कामन्दकीय नीतिसार ग्रंथात ज्ञानरूप अकुशाने इन्द्रिय नावाच्या हत्तीला वश करावा असे म्हटले आहे या श्लोकावर असलेल्या जयमङ्गलानामक टीकेत याचे व्याख्यान पुढील प्रमाणे आहे टीकाकार म्हणतात –तत्वज्ञान दोन प्रकारचे आहे एक आत्मविषयक व दुसरे बाह्य म्हणजे अनात्म विषयक त्यापैकी आत्मविषयक तत्वज्ञानाचा विचार व उपयोग याबद्दल पुढे सांगू तूर्त दुसरे जे अनात्मविषयक तत्वज्ञान आहे ते दोन प्रकारचे आहे एक 'प्रतिबुद्ध' व दुसरे 'अप्रतिबुद्ध' असा त्याचा विभाग आहे. कार्य काय व अकार्य काय याच्या विवेकाने उत्पन्न झालेले व मनाच्या नियमनास समर्थ असलेले जे तत्वज्ञान त्याला 'प्रतिबुद्ध' असे म्हणतात, व याहून अन्य जे ज्ञान त्याला 'अप्रतिबुद्ध' असे म्हणतात त्यातील प्रतिबुद्ध ज्ञान हे अकुश असल्याने त्याने मनाच्या नियमनाने इन्द्रियरूप हत्तीला वश करून घ्यावे ज्यामुळे तो हत्ती पुन विषयामध्ये फसणार नाही याप्रमाणेच नीतिसारात् 'म्हणून प्रयत्नाने मनाचा विरोध करून निर्मनस्कता निर्माण करावी' असेही म्हटले आहे टीकाकारानीही मनाची बाह्य व अभ्यतर प्रवृत्ती न होईल असा सरोधन प्रयत्न करावा व हा सरोधन प्रयत्न आत्मविषयक तत्वज्ञानाने होतो व ते तत्वज्ञान योगाभ्यासाने होते असे म्हटले आहे म्हणून योगाभ्यासच सर्व प्रयत्न सरोधनाचे कारण आहे असे सिद्ध होते

म्हणूनच प्रत्यक्ष, अनुमान, आगम, देश, काल, शक्ति यांच्या विचाराने अर्थ विनियोग रूप जी भारतीय राजनीती, तिला पूर्वी वर्णिलेला 'योग' राजनीतीचे अनुष्ठान करणारे जे लोक आहेत त्याना अत्यत आवश्यक म्हणून सांगितला आहे. नीतिशास्त्रात–

सद्गुरूची एकनिष्ठपणे उत्तम सेवा करणार व त्या योगाने अतर्बाह्य शुद्ध झालेले, म्हणूनच सद्गुरूच्या आज्ञे प्रमाणे आपले वर्तन ठेवणारे, विनयाची केवळ मूर्तीच, असे जे लोक, तेच लोक ऐश्वर्याला, नृपति या पदवीला व शमाला म्हणजेच निर्वाण पदालाही समर्थ होतात, अर्थातच ऐहलौकिक सुखाचे भाजन होतात इत्यादि वाक्यानी या योगाचे वर्णनही केले आहे. विवेक, श्रुतिसपत्ति, गुरुभक्ति व तपस्विता या चार गोष्टी सिद्ध होण्याकरता 'मी यावजीव या चार गोष्टी सतत करीत राहीन,' असा शपथ पूर्वक सकल्प करून जर याचे अनुष्ठान केले तर हा योग सिद्ध होतो असे सगीत रत्नाकर ग्रंथात वर्णिलेल्या 'धृतिभाव' पदावरून लक्षात येते

विवेक, श्रुतिसपत्ति, गुरुभक्ति व तपस्विता हे विषय रूपाने व साधन रूपाने ही स्थित आहेत आपल्याला इष्ट असल्यापेक्षा अधिक किंवा इष्ट असेल तेवढाच लाभ हा धृतिभावाचा विषय म्हणजे आलबन विभाव असे म्हणावे व्रीडा म्हणजे लज्जा ही करण म्हणजे साधन किंवा उद्दीपन विभाव म्हणावे प्राप्त झालेल्या भोग्य पदार्थांचा उपभोग जीर्ण किंवा नष्ट झाला तरी त्याबद्दल चित्तात विषाद न वाटणे व नष्ट झालेल्या किंवा पुढे होण्याचा सभव असलेल्या भोगाबद्दल शोक न करणे ही दोन ज्याचे अनुभाव किंवा परिणाम आहेत त्याला धृती असे पडित लोक म्हणतात, असे सगीत रत्नाकरात वर्णिले आहे म्हणून योगाची अत्यत उपयुक्तता सर्व बाबतीत आहे असे सिद्ध झाले

— अनुवादक पडित आत्माराम शास्त्री जेरे, नृसिंहवाडी

# महापुरुष त्रय दर्शन

'श्रीगुरुदेवदत्त' या भगवन्नामाचा उच्चार केल्याबरोबर
'त्रिगुणात्मक त्रयमूर्ति दत्त हा जाणा'
असे जसे सहज लक्षात येते, तद्वत 'सद्गुरु श्रीवामनरावजी गुळवणी महाराज' यांचे स्मरण करताच दत्तावतारी श्री. प. प. वासुदेवानन्द सरस्वती टेंबे स्वामी महाराज व श्री. प. प. लोकनाथतीर्थ स्वामी महाराज हे दोन्ही महापुरुष श्रीवामनरावजींमध्ये प्रवेश करून त्यांचे द्वारा आपले उर्वरित कार्य करून घेत आहेत, असे दिसून येते.

'ब्रह्मा विष्णू महेश' या देवतात्रयींनी श्रीदत्तनामधारक चिरंजीव असे रूप धारण करून सती अनुसूया मातेची 'नैमित्तिक इच्छा' सफल केली व अनेक भाविक, मुमुक्षु अज्ञान साधकांच्या उद्धाराकरिता 'नित्याचा' श्रीदत्त सांप्रदाय सुरू केला. इतकेच नव्हे तर सांप्रदायाचे उर्वरित कार्य वाढीला लावण्याकरिता 'श्रीपाद श्रीवल्लभ' व 'श्रीनृसिंह सरस्वती' हे जसे अंशावतार धारण केले तद्वतच श्री 'प. प. वासुदेवानन्द सरस्वती' रूपानेही अंशावतारच धारण करून कार्य केले.

मानवी जीवनाच्या शाश्वत कल्याणाचा विचार वैदिक वाङ्मयानेच केलेला आहे. आजच्या जगात मानवाची शाश्वत उन्नति व्हावी म्हणून जे काही विविध प्रकारचे वाङ्मय उपलब्ध आहे, त्या सर्वांत आपल्या भारतीय वैदिक वाङ्मयास श्रेष्ठ दर्जाचे प्रथम असे स्थान लाभले असून त्याचे प्राचीनत्व सर्वमान्य झालेले आहे. या वैदिक धर्मांच्या सदाचारानीच भारतीय संस्कृतीचे सर्वतोपरि संरक्षण व संशोधन केलेले आहे व या कार्याकरिताच साधुसंतांच्या रूपाने श्रीपरमात्मा अवतारधारण करून कार्य करीत असतो. त्यापैकीच हे 'श्रीवासुदेवानन्द सरस्वती स्वामी महाराज' एक आहेत.

## श्री टेंबे स्वामी महाराजांच्या अवतार कार्यांचे धावते दर्शन

जन्म :-सावंतवाडी संस्थानमधील माणगाव येथील अत्रिगोत्री वे. हरिभट टेंबे म्हणून एक दत्तभक्त होते. यांनी शके १७५० मध्ये स्वहस्ते लिहिलेले श्रीगुरुचरित्र अद्यापपर्यंत सुरक्षित आहे.

वे. हरिभटांचे चिरंजीव वे. गणेश भट व सून सौ. रमाबाई हे दंपत्यही सात्त्विक, आचारसंपन्न व दत्तोपासक असून १२ वर्षे गाणगापुरी तपश्चर्या केली. देवानी घरी जाण्यास सांगून पुन्हा गाणगापुरी येण्याची जरूरी नाही, असे सांगितले. यांचे उदरी श्रावण वद्य ५ शके १७७६ रविवार रोजी पुत्ररत्न झाले. त्याचे नाव वासुदेव असे ठेवले.

अध्ययन :-आजोबांनी घरीच बालपणी वैदिक व संस्कृत शिक्षणास प्रारंभ केला. नवव्या वर्षी उपनयन झालेवर वे. विष्णुभट्ट उकिडवे यांचेकडे वेदाध्ययन सुरू केले. वासुदेवाने हे वेदाध्ययन सोवळ्यात केले. त्यामुळे त्याला बालवयात व अल्पकालात 'वेदाच्या मंत्रांची सिद्धी'

प्राप्त होऊ लागली. वडील सत्त्वशील असून त्यांची 'विधिवशात् प्राप्तेन् संतुष्यताम्' व 'गृहेषु अतिथिवत्' अशी वृत्ती होती वासुदेवाचे संस्कृत अध्ययन वे. शा. स. शंभुशास्त्री साठले यांचेकडे झाले. धाकटे बंधु सीताराम ऊर्फ भलोबा यांची मुंज वासुदेवानीच केली.

**विवाह** '–वासुदेव वय लहान असूनहि 'त्रिकालस्नान संध्या, परान्न वर्ज्य व वादविवाद वर्ज्य करून निरनिराळी व्रते करण्यात मग्न असे.' घरी गरीबीमुळे लग्न होणे कठीण, तेव्हा नाना कोनकरानी मध्यस्थी करून बाबाजी पंत गोड्याच्या एका भोळसर मुलीशी वासुदेवाचे लग्न केले. याबाबत वासुदेवाचा विचारहि घेतला गेला नाही. पूर्वी तशी पद्धतहि होती. येथपर्यंत आम्ही 'वासुदेव' असेच संबोधिले. यापुढे 'महाराज' म्हणून संबोधणार आहोत.

**ज्योतिष अध्ययन** :–विवाहोत्तर महाराज गोवा प्रांती गेले पेडणे या गावी एका श्रीमंतास ज्योतिषाचा चमत्कार दाखविला. नंतर वे. निळभट पत्रे यांचेकडे सहा महिने ज्योतिषाचे अध्ययन केले वडील आजारी झालेमुळे त्वरित यावे लागले. शके १७९९ मध्ये वडील निधन पावले.

## श्रीदत्त आज्ञेनुसार हालचालीस प्रारंभ झाला

महाराजाना वाडीस जाऊन 'श्रीगोविंद स्वामींची भेट व दर्शन घ्यावे' असा दृष्टांत झाला. त्याप्रमाणे मातुश्रींची आज्ञा घेऊन महाराज वाडीस आले. तेथे आलेवर मिरजेच्या शंकर भटजींकडून पोथी आणवून श्रीगुरुचरित्र सप्ताह करावा अशी श्रींची आज्ञा झाली. त्याप्रमाणे केले व श्रीगोविंद स्वामींचे दर्शन भेटीत फारच आत्मीयता निर्माण झाली व गुरुशिष्य नाते सुरू झाले

**श्रींचे साक्षात दर्शन** .–वाडीस रात्री शेजारतीनंतर खाली घाटावर कोणी जात नसत जाऊ नये अशी श्रींची आज्ञाच आहे ही आज्ञा महाराजाना माहित नसलेमुळे एक दिवस महाराज मध्यरात्री खाली घाटावर जाताच श्रींनी भव्य वेषात दर्शन देऊन खाली अपरात्री न येण्याची ताकीद दिली.

**उपासना** :–महाराजानी स्वीश्वर बुवाकडून विधान समजून घेऊन 'पार्थिवपूजा' सुरू केली. श्रीगोविंद स्वामींचे आज्ञेवरून दत्तोपासना सुरू केली. त्या वेळी ब्राह्मणास 'अग्नि व सूर्य' यांची उपासना असताना दुसरी उपासना कशास हवी असे महाराज गोविंदस्वामी याना म्हणाले. रात्री स्वप्नात साक्षात् दत्तानी मंत्रोपदेश दिला. तेव्हा निजलेल्या जागेवरून गोविंदस्वामी म्हणाले की 'शास्त्रीबुवा! मंत्र मिळाला ना?' महाराजाना गोविंद स्वामींचा अधिकार पाहून फार संतोष झाला

सोलापूरकडील एक 'मौनीस्वामी' वाडीस आले ते बोलतील ते खरे होत असे. साक्षात् दत्तमहाराजानीहि त्याना मान दिला. भारताचार्य रामभाऊ कवीश्वर यांचा यज्ञ स्वाहाकार मौनी स्वामींचे नेतृत्वाखाली झाला.

## कागलची मूर्ति

महाराजाचे मनात कोल्हापूरहून एक मूर्ति आणून माणगावी स्थापन करावी असे होते. परंतु द्रव्याचे अभावी जमले नाही. तेव्हा कागल गावी एका मूर्तिकारास दृष्टांत झाला व त्याने एक 'श्रीदत्तमूर्ति' तयार करून महाराजाना आणून दिली महाराजानी त्याला १ रुपया दिला व इतरानी २० रुपये जमवून दिले. ही मूर्ति सात बोटे उंच, द्विभुज, वरदाभयकर, सिंहासन घातलेली अशी पितळेची होती ही मूर्ति फार पराक्रमी ठरली. हिने महाराजाचे सान्निध्यात राहून 'देवा भक्तां'चे नाते कसे असते हे पुढे दाखविलेले आहे.

## प्र सा द

एकदा महाराज शौचास निघाले असताना वाटेत मुलानी प्रसाद घेण्याचा आग्रह केला. त्याप्रमाणे महाराजानी प्रसाद ग्रहण केला पंढरपुरी आलेवर पांडुरंगाने ब्राह्मणरूप धारण करून महाराजाना 'डाळ चुरमुरे पंढरीचा प्रसाद' दिला. तो महाराजानी घेऊन वस्त्रात बांधून ठेवला. रात्री देव स्वप्नात भेटले व 'आमचा प्रसाद ग्रहण केला नाही?' असे विचारले 'तेव्हा बाजारातील भाजका पदार्थ ग्रहण करू नये म्हणून तुम्हीच शास्त्रात सांगितले आहे, त्या विरुद्ध आम्ही कसे वागावे?' असा महाराजानी प्रश्न केला. 'ठीक आहे' म्हणून देव निघून गेले. सकाळी उठून पाहता वस्त्रातील प्रसाद देव परत घेऊन गेले असे समजले.

महाराज बार्शीस वे. दत्तुशास्त्री साधले ऊर्फ बावडेकर-

बुवा याचेकडे आले. महाराज जाताना काही पैसे दिले तर घेणार नाहीत म्हणून बावडेकरबुवांनी महाराजांना न कळता त्यांचेजवळील देवाचे करंड्यात ६ रुपये टाकले. महाराज भिक्षेवरून येताच हे ओळखून 'आमचे देवाने द्रव्यसंचय करण्यास सुरुवात केली आहे' असे बावडेकर-बुवांना महाराज म्हणाले, सर्व मंडळी स्तंभित झाली.

## गंगाखेडी पत्नी वियोग व चतुर्थाश्रम स्वीकार

गंगाखेडला आल्येवर काही दिवसांनी देवाचा दृष्टांत झाला की 'आम्ही आजपासून चौथे दिवशी तुम्हा दोघास पति–पत्नीस घेऊन जाण्यास येणार आहोत.' परंतु महाराजांनी देवास चक्क सांगितले की, 'आम्ही संन्यास घेणार आहोत. तेव्हा इतक्यात आम्ही मुळीच येत नाही.' नंतर फक्त पत्नी मात्र गेल्या. पत्नीच्या १४ व्या दिवशी महाराजांनी चतुर्थाश्रम–संन्यास धारण केला व 'माधुकरी अन्न' सुरू केले.

## दंड ग्रहण

पुढे महाराज उज्जयिनीस आले. कारंजाचे श्रीनृसिंह सरस्वतीस्वामींचे वंशातील शुक्लयजुर्वेदीय माध्यंदिन शाखेचे एक 'श्रीनारायणानंद सरस्वती' म्हणून स्वामी होते त्यांना दंड देण्याविषयी महाराजांनी प्रार्थना केली. त्यांनी आपले गुरू श्रीअनिरुद्धानंद यांना विचारता 'तशी *आम्हास दत्ताज्ञा आहे, तुम्ही त्यांना दंड द्या.*' असे उत्तर मिळाले. त्याप्रमाणे दंड मिळाल्येवर हे 'श्रीवासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज' म्हणून प्रसिद्ध झाले व 'जगाच्या कल्याणा संतांची विभूति' या न्यायाने कालक्रमणा झाली.

## महाराजांचे चातुर्मास

सके १८१३ ते १८३५ पर्यंत २३ चातुर्मास झाले. ते असे :–१. उज्जयिनी, २. ब्रह्मावर्त, ३. हरिद्वार, ४ व ५. हिमालयात (अज्ञात स्थळी), ६ हरिद्वार, ७ पेटलाद, ८. तिलकवाडा, ९. द्वारका, १०. चिखलदा, ११. महत्पूर, १२, १३ व १४ ब्रह्मावर्त, १५. नरसी, १६ वद्वाई, १७ तंजावर, १८. मुक्त्याला, १९. पवनी, २०. हावनूर, २१. कुरुगड्डी, २२. चिखलदा व २३. श्रीक्षेत्र गरुडेश्वर.

## महान् गूढ

महाराजांचा चौथा व पाचवा चातुर्मास नक्की कोठे झाला हे अद्याप अज्ञात आहे. महाराज हिमालयात गेले एवढे खरे. पुढे कोठे होते कळले नाही. त्यासंबंधी बरेच संशोधन केले. ज्योतिषांना विचारले, साधुसत्पुरुषांना विचारले. कोणीही उत्तर देण्यास समर्थ झाले नाही. महाराज दक्षिणी ब्राह्मणाशिवाय कोणाचीही भिक्षा स्वीकारीत नसत. हिमालयात एक दोन वेळा कोणास तरी भेटले एवढे कळले. कोणी म्हणतात महाराज 'समाधि अवस्थेत' कोठे तरी गुहेत असावेत. कोणी म्हणतात त्यांनी 'परकाया प्रवेश' केला होता. वगैरे नाना विचार पुढे आले, परंतु ते सर्व अद्याप गूढ आहे हेच खरे.

## संचार

महाराजांनी आसेतु हिमाचल सर्वत्र पायीच संचार केला. पायात खडावाहि कधी धारण केल्या नाहीत. त्यांचा सर्व संचार श्रीदत्त आज्ञेनुसार झाला. संचारात अनेक आर्त व पीडितांना संकटमुक्त केले. कित्येकांना जीवदानही दिले. सर्वांच्या कामना तृप्त केल्या. सर्पदंश, भूतपिशाच्च, मंत्र, तंत्र, नाडीपुडी, अंगारा, ताईत, पेटी, भस्म वगैरे व नारायण नागबली, गोप्रदान, लघुरुद्र, महारुद्र, *अश्वत्थ, औदुंबर, शंकर, विष्णु, दत्त, देवी, मारुती, राम* वगैरेंची उपासनाही सांगत. भक्तांना गीता, उपनिषद, विष्णुसहस्रनाम, श्रीगुरुचरित्र वगैरे सांगत. सारांश सर्वांना सन्मार्गास लावीत असत.

महाराजांनी एकदा नारायण व्रत केले तेव्हापासून *त्यांना संग्रहणी सुरू झाली ती शेवटपर्यंत सोबत होती.*

महाराजांनी एकदा देवास 'दत्तराज एक नवे यज्ञोपवीत' स्वतः तयार करून समर्पण करण्याचे ठरविले हा क्रम एक वर्षभर केला.

## दिव्य सख्यत्व

महाराजांचे व देवाचे पुढे पुढे इतके सख्य झाले होते की देवास केलेल्या उपचाराचे परिणाम महाराजांवर होऊ लागले.

## प्रमुख सत्शिष्य

श्रीनृसिंहसरस्वती स्वामी ऊर्फ दीक्षित स्वामी, सिताराम बुवा, गाडाबुवा, गांधिमहाराज पटील प्रभृति होत

## 'नरनारायण दर्शन'

महाराज बद्रीनारायणाचे वाटेत प्रवास करीत असताना वाटेत एका तुटलेल्या कड्यावरून नरनारायणाने महाराजांना दर्शन दिले तसेच बरोबरच बुडून तपश्चर्या करणारा एक 'योगी हा 'महाराज' जवळचे रस्त्यावर येताच वर आला व त्याने तेथूनच महाराजांचे दर्शन घेतले महाराजांनी 'नारायण' म्हणताच तो पुन्हा पूर्ववत् पाण्यात बरोबरच गुप्त झाला बद्रीनारायणाचे दर्शन लावून घ्यावे असा दंडक आहे कारण ती परिसमूर्ति आहे परंतु श्रीआज्ञेनुसार महाराजांना सर्वपूर्वक दर्शन घडले

## नर्मदा मातेचे प्रथम दर्शन

महाराज नेहमी गंगातीरीच वास करतात तेव्हा त्यांनी आपले तीरावर यावे म्हणून 'नर्मदा मातेने कुमारीरूपाने महाराजांना दर्शन देऊन बोलावणे केले' महाराजांनी होय म्हणून फारसे मनावर घेतले नाही तेव्हा त्यांनी लवकर इकडे यावे म्हणून नर्मदा मातेने एक किरकोळ व्याधी निर्माण करून मग उपचारार्थ नर्मदा तीरी आणविले तेव्हा त्यांनी नर्मदालहरी' हे स्तोत्र केले

## नर्मदा वात्सल्य

महाराज नर्मदातीरी असताना यांना वेळोवेळी नर्मदा माता दर्शन देऊन त्यांची भिक्षेची वगैरे सोय करीत असत 'संग्रहणीमुळे ताक भिक्षा महाराजांना प्रिय असे तेही त्या पुरवीत असत इतके त्यांनी मातृवात्सल्य दाखविले नेमावर हे 'नर्मदा मातेचे नाभिस्थान आहे 'आमरेश्वर हे 'योनिस्थान' आहे आमरेश्वरी 'धावरी कुंडात स्नान करून बुडी मारून 'आजळभर वाण महाराजांनी वर आणले तेव्हा साक्षात् भगवान शंकरांनी दर्शन देऊन 'तुम्ही पूजा करणार काय?' असे विचारले तेव्हा ते जमणार नाही असे म्हणून महाराजांनी ते सर्व वाण परत कुंडात समर्पण केले

इंदूर संस्थानात मही नदीचे तीरावर पेटलाद येथे महाराजांच्या चातुर्मास झाला तेथून दत्तलीलामृताब्धिसार नावाचा एक हजार ओवीचा ग्रंथ तयार झाला

## श्रीदत्तमूर्तीने केलेला चमत्कार

पेटलादचा चातुर्मास झालेवर महाराज 'चिखलदा' येथे आले तेथेच दिवाळी झाली पेटलादहून निघताना जवळील 'मूर्तिदेव म्हणाले 'आम्हालाही बरोबर घेऊन चला' महाराज देवांना म्हणाले, तुम्ही येथच रहा मागाहून मंडळीबरोबर या तेथे आमची एकट्याचीच दिवाळी होणार आहे तुम्हाला तेथे दिवाळीचे अभ्यंग स्नान वगैरे उपचार मिळणार नाहीत आमचे बरोबर आलात तर फक्त आमचे कडून तुम्हास साधे स्नान व भस्म स्नान घडेल दुसरे काही मिळणार नाही कारण आम्ही सन्यासी आहोत,' वगैरे महाराजांनी देवांना सांगितले तेव्हा देवांनी महाराजांना सर्व कबूल करून 'बरोबर न्याच असे देव म्हणाले त्याप्रमाणे या श्रीदत्तमूर्तीसह महाराज चिखलदा येथे आले

तेथे आलेवर दिवाळी आली नर्क चतुर्दशीचे पहाटे महाराजांनी देवांना 'साधे' स्नान व भस्म स्नान घातले नंतर त्या मूर्तीने तेथून नदीत जाऊन बुडी मारली व 'लहान लेकरू रडल्याप्रमाणे आकांत' सुरू केला तेव्हा लोक जमले महाराज नदीवर आले व त्यांनी बुडी मारून देवास वर आणले व देवाचे म्हणणे सर्वांना सांगितले तेव्हा मग गावात देवांना अभ्यंग स्नान घालून लोकांनी महोत्सव केला व आनंद लुटला यावरून देव भक्ताचे नाते कसे असते हे समजून महाराजांचे थोरवीविषयी सर्वांना धन्यता वाटली

द्वारकेस महाराज गेलेवेळी तेथील श्रीशंकराचार्यांचे गादीवर महाराजांनी आरूढ व्हावे म्हणून त्यांना प्रार्थना करण्यात आली परंतु महाराज अत्यंत वैराग्यशील असलेमुळे यांनी ती नाकारली

गाणगापुरी संगमावर श्रींचे साक्षात् दर्शन झाले व श्रींनी 'मी भक्तिकरिता संगमावरच बराच काळ असतो असे सांगताच तसेच कृष्णातीरी कृष्णामाईचेहि दर्शन झाले व त्या वेळी महाराजांनी 'कृष्णालहरी हे स्तोत्र केले वाडीहून पंढरपुरी ८० मैल एका दिवसात महाराज आले तेव्हा ते 'योग मार्गाने प्रवास करीत असत हे सर्वांना समजले महाराजांचे योग सामर्थ्य फार मोठे होते परंतु ते सहसा प्रगट करीत नसत न कळत प्रकट होई तेव्हाच कळे

### महाराजांचा पाठ

वाडीस महाराजांचा मुक्काम असताना तेथे दीक्षित स्वामींना मन्यास पद्धति सागत असत. तसेच नतर गीता उपनिषत, नतर ब्रह्मेन्द्रकृत ब्रह्मसूत्रवृत्ती व जीवन्मुक्ति विवेक सागत. त्या वेळी पाठ सुरू करण्यापूर्वी 'वाडीचे विख्यात पुराणिक गणेशभक्त वक्रतुडबुवा कवीश्वर हे आले का?' म्हणून महाराज प्रथम चौकशी करत, तेव्हा वक्रतुड बुवा उठून महाराजाना नमस्कार करून 'मी आलो आहे' असे दररोज सागत असत व नतरच पाठ सुरु होई, यावरून वक्रतुडबुवा याना केवढा मोठा अधिकार होता हे समजून येते.

### बहुरूप धारण

एके दिवशी महाराज दिवसभर समाधि अवस्थेमध्येच होते परतु त्या दिवशी बेळगावचे काळकुद्रीकर याच्या पत्नी स्वयपाक करून महाराजाची भिक्षेकरिता मार्गप्रतीक्षा करीत बसल्या. त्या वेळी महाराजानी दुसरे रूप धारण करून जाऊन ते भिक्षा माधुकरी घेऊन आले. नतर लोकाना हे सर्व समजले.

### 'दिगंबरा दिगबरा श्रीपाद वल्लभ दिगंबरा'

महाराजानी 'दिगबरा दिगबरा' हे भजन प्रथम वाडीस सुरु केले व पुढे या भजनाचा अखिल भारतात प्रचड प्रचार त्याचे सचारामध्ये झाला. पुढे त्याचे सर्व शिष्य मडळींनीही याच 'साप्रदायिक भजनाचा' आश्रय करून अनेकाना या भावनामाची गोडी लावली.

### 'कलियुगातील तिसरा अवतार योगिराज'

वाडीहून दोन मैलावर कृष्णातीरी मोळा या ठिकाणी एक साधुपुरुष रहात असत त्याचे आग्रहाचे निमत्रणा वरून महाराज एकदा तेथे गेले बरोबर दीक्षित स्वामी व वे. वक्रतुडबुवा कवीश्वर यानाहि नेले होते. एक दिवस वास्तव्य तेथे झाले. तेथे दुपारी 'वक्रतुडबुवाचे प्रवचन' झाले. त्यामध्ये त्यानी कलियुगामध्ये श्री दत्ताचा पहिला अवतार 'श्रीपाद श्रीवल्लभ' दुसरा अवतार 'श्रीनृसिंह सरस्वति' व तिसरा अवतार 'योगिराज श्रीवासुदेवानद सरस्वती' असे कसे आहेत, हे सर्व उत्तम तऱ्हेने प्रतिपादन केले. या श्रवणास खुद्द महाराज हजर होते. म्हणूनच आम्ही सुरुवातीस महाराज हे अशावतार आहेत असे नि सदिग्ध म्हटले आहे.

### अन्नसमाराधना

'वैजनाथ' नावाचा एक ब्राह्मण वाडीस आला. तो आपणास 'अक्कलकोटचे स्वामीचा शिष्य' म्हणवीत असे. महाराजानी 'हा ब्रह्मनिष्ठ आहे' असे सर्वांना सागितले. तो आपले भोजनदक्षिणेचे पैसे नवगावकर मास्तरकडे ठेवी असे एकदर त्या वेळी आठ रुपये जमले होते लोक त्याला विचारीत की, 'या पैशाचे तू काय करणार?' त्यावर तो म्हणे, 'मला भावाकडे भेटण्यास जावयाचे आहे त्या वेळी ते उपयोगी पडतील.' लोकास हे खोटे वाटून लोक त्याची थट्टा करीत. हे महाराजानी एकदा पाहिले. त्याने ते पैसे आपले शेवटचे दिवसाकरिता ठेवले होते. नतर एके दिवशी त्याला बोलावून त्या आठ रुपयापैकी एक रुपया ठेवला व बाकीचे सात रुपयाचे महाराजानी त्याजकडून 'भोजन साहित्य' आणविले व त्याचा स्वयपाक करविला नतर सर्वांना आमत्रण देवविले व देवास नैवेद्य करून अवावर महाराजानी छाटी टाकून आमत्रण केले व मडळी भोजनास बसविली. दोन हजार पान झाले सर्वांना 'गुरु चरित्रातील समाराधनतेची आठवण झाली व धन्यता वाटली

### श्रीदत्तमालामंत्राचा प्रभाव

महाराज आजेगाव येथे आले. तेथील 'श्रीकृष्णराव देशमुख' याचे हे इनाम गाव निजाम सरकारने जत केले असे समजले. तेव्हा महाराजानी कृष्णराव देशमुख याना श्रीदत्तमालामत्राचे अनुष्ठान करण्यास सागितले त्यानतर इनाम परत मिळाले. तसेच 'कृष्णरावाचे चिरजीव शकर राव' याना टी बी. झाला होता. तोहि गेला व ते बरे झाले. या घराण्यावर महाराजाचे फार प्रेम असे व हे घराणेहि आजतागाईत महाराजाची सेवा अव्याहत करून आहे

### साधूंची अंतर्यामी भेट

'उमरावतीचे साक्षात्कारी महापुरुष श्री गुलाबराव

महाराज ' यांनी महाराजांकडे एकदा भेटण्यास व दर्शनास येण्याची इच्छा प्रकट करून निरोप पाठविला. त्यावर महाराजांनी त्यांना निरोप पाठविला की, ' उभयतांची अंतर्यामी नित्य भेट होत आहे तेव्हा अशा लौकिक भेटीस येण्याची आवश्यकता नाही. ' हा निरोप ऐकून गुलाबराव महाराजांना फार मोठे समाधान वाटले.

## स्वाहाकार

महाराजांनी आपले संचारात अनेक ठिकाणी वेगवेगळे बरेच स्वाहाकार करविले. ' राजूरचा यज्ञ स्वाहाकार ' तर फारच गाजला. या स्वाहाकाराची सर्व योजना सीताराम महाराजांनी केली. या स्वाहाकाराचे वेळी ' हंपी मठाचे श्रीशंकराचार्य स्वामी महाराज ' ' हैदराबादचे अधिकारी महापुरुष भटजी बापू ' वगैरे मोठमोठी मंडळी मुद्दाम आली होती.

## ' अश्वत्थामा दर्शन '

महाराज नर्मदातीरी त्रिशूलपाणीचे जंगलात गेले वेळी मिल्ल वेषाने अश्वत्थामा यांनी महाराजांना दर्शन दिले. उभयतांना संतोष वाटला. नंतर महाराज गरुडेश्वरी आले.

## श्रीक्षेत्र गरुडेश्वर

महाराज गरुडेश्वर येथे आलेनंतर तेथील नर्मदाकिनारी असलेल्या ' श्रीनारदेश्वर मंदिरात महाराज अनुष्ठान तपश्चर्या करीत असत व त्या मंदिराचे बाहेर ' एका दगडावर रात्री झोपत असत. ' या ठिकाणी सोमण नावाचे एकच दक्षिणी ब्राह्मणाचे कुटुंब होते. तेथेच फक्त महाराज भिक्षा माधुकरी घेत असत.

## श्रीसत्यदत्तपूजा कथा

महाराजांनी येथेही श्रीसत्यदत्त पूजा-कथा सुरू करवून घेण्यास सुरवात केली व त्या वेळी ' गुळाचा साजा प्रसाद देण्याची प्रथा सुरू केली ती आजतागायत सुरू आहे.

## सौ. इंदिराबाई महाराणी होळकर

महाराणी साहेबांचे वडील महाराजांचे भक्त होते. राणी साहेबांचे जन्माचे वेळी महाराजांनी ही राणी होणार असे भविष्य सहज वर्तविले होते. पुढे इंदोरचे श्री. तुकोजी-रावांबरोबर यांचा विवाह ठरला. साखरपुडाही झाला. परंतु श्री. तुकोजीराव परदेशात गेल्यामुळे येण्यास उशीर झाला. तेव्हा महाराजांनी या मुलीकडून ' शिवाराधना ' करविली व ब्राह्मणद्वारा ' देवेन्द्राणि नमस्तुभ्य ' या मंत्राचा जप करविला. नंतर लवकरच विवाह झाला. या राणीसाहेबांना नंतर महाराजांनी कृपा आशीर्वाद दिला. व त्यांचे सर्वतोपरी कल्याण झाले. त्यामुळे पुढे राणीसाहेब महाराजांच्या एकनिष्ठ भक्त बनल्या व त्यांनी ' माणगावी व गरुडेश्वरी ' लाखो रुपये खर्चून घाट-मंदिर वगैरे सर्व बांधकामे करून चिरंतन सेवा केली. म्हणून त्यांना 'आधुनिक अहिल्याबाई होळकरीण' असेच संबोधतात.

## योगभक्तिदर्शन

मुमुक्षु, जिज्ञासु व साधक यांना मार्गदर्शक व उपयुक्त असा एक ' योगभक्तिदर्शन नामक ग्रंथ प्रसिद्ध करण्याचे योजिल्यामुळे त्या निमित्ताने सद्गुरु ' श्रीवामनरावजींच्या दर्शनामध्ये महापुरुष त्रयाचे दर्शन ' सहजा सहजी कसे घडते आहे हे थोडक्यात येथे पाहणे आहे.

श्रीवामनरावजींचे ठिकाणी श्रीवासुदेवानन्द सरस्वती स्वामी महाराजांची ' भगवद्भक्ति ' व श्रीलोकनाथतीर्थ स्वामी महाराजांची ' योगशक्ति ' यांचे गंगेयमुनेप्रमाणे योग्य ते मीलन झालेले दिसून येते व आबालवृद्ध स्त्री पुरुष जनता जनार्दनाच्या उद्धारार्थ व शाश्वत कल्याणार्थ वामनरावजींनी केलेली तिची ' नियुक्ती ' पाहून सहज लक्षात येते की टेंबे स्वामी महाराजांच्या अवतार कार्याचाच ' हा उर्वरित उत्तरार्ध आहे.'

आता आपण ज्या माध्यमाचा आश्रय करून वरील विचार करीत आहोत, त्यांची—श्रीवामनरावजींची—थोडीशी पूर्वपीठिका, पार्श्वभूमि म्हणून प्रथम पाहणे जरूर आहे. कारण त्याशिवाय पुढील महत्वाच्या घटनांची आपणास नीटशी कल्पना येणार नाही.

वामनरावजींची जीवनयात्रा खरोखरीच अलौकिक व आश्चर्यकारक अशी असून ' प्रारब्धाच्या शास्त्रीय सिद्धांताचे हे एक प्रात्यक्षिकच आहे ' असे दिसून येते. त्यांचे आनुवंशिक संस्कार, बाळपण, शिक्षण, कलेची उपजत आवड व त्यामधील हरहुन्नरता, योगाभ्यास, सदाचार,

तपश्चर्या, उपासना, शास्त्रनिष्ठा, महापुरुषाचा सम्यक आश्रय, त्याग, दयाळुत्व, परोपकार, सद्गुरु वाङ्मय प्रकाशन वगैरे विविध पैलू फारच चित्ताकर्षक आहेत.

पूर्वी कोल्हापूर भागातील कौल्व गावचे एक सदाचारसंपन्न वैदिक 'नागेश भटजी कुळकर्णी' यांना संतान नव्हते. कोल्हापूर येथील 'साक्षात्कारी महापुरुष श्रीनारायण स्वामी' यांचे कृपेने वंशपरंपरेने कोल्हापुरी कोणी ना कोणी तरी सेवा करावी या अटीवर पुत्ररत्न झाले. त्यांचे नाव वे. नारायण भटजी. या नारायण भटजींना चार मुले व तीन मुली झाल्या. त्यामधील ज्येष्ठ चिरंजीव 'वे. दत्तभटजी' हे आमच्या 'वामनरावजींचे पितृदेव' होत.

वे. दत्तभटजींचा प्रथम विवाह झाला. पत्नीचे नाव उमाबाई असे होते. त्यांना सात मुले झाली. परंतु एकसरच कालवशात् ती सर्व मुले व प्रथम पत्नी उमाबाई ही निजधामास गेली. नंतर वे. दत्तभटजींनी कोल्हापूर प्रांताचे हिरवडे या गावच्या अग्निहोत्री श्री. मारुतीपंत कुळकर्णी यांच्या एकुलत्या एक कन्येशी द्वितीय विवाह केला. हिचे नावही 'उमाबाईच' ठेवले. त्याच आमच्या 'वामन रावजींच्या मातृदेव' होत.

वे. दत्तभटजी व त्यांच्या सहधर्मचारिणी उमाबाई हे उभयता महान् भगवद्भक्त होते. दत्तभटजी अत्यंत विरक्त असल्यामुळे त्यांनी पुढे आपल्या ज्येष्ठ पुत्राकडे आपली परंपरागत वैदिकवृत्ति सोपविली, व ते स्वत: 'परान्न वर्ज्य' करून दररोज 'महान्यासपूर्वक रुद्र एकादशनी व पवमान पंच सूक्तांचा अभिषेक पूर्वक पूजा' करून बारा वाजता गावापासून अर्धा मैल लांबीवरील 'भोगावती नदीवर ब्रह्मयज्ञ' करून घरी येऊन 'भोजनोत्तर श्रीविष्णुसहस्रनाम पाठ' करीत व 'श्रीनारायणस्वामींचे 'सांप्रदायिक भजनही करीत. तसेच 'प्रतिपौर्णिमा उभयता पतिपत्नी घोड्यावरून श्री क्षेत्र नरसोबा वाडीची' वारी करीत असत.

## श्रीगुरुपादुका प्रसाद

उभयता वाडीस असताना श्रींच्या पादुका आपणास मिळाव्यात या तीव्र जिज्ञासेने उमाबाईंनी कडक उपोषण सुरू केले. सातवे दिवशी एका कागदाचे पुडीत दुपारी बारा वाजता त्या देवासमोर बसल्या असताना त्यांचे ओटीत श्रींच्या अष्टगंधयुक्त पादुका प्रसाद दिला. त्यामुळे उभयतांना परमहर्ष झाला.

## बंधुभगिनी

वे. दत्तभटजींस शंकरभट, बापूभट, नरहरपंत, गोविंदराव व वामनराव असे पाच पुत्र व ताईबाई, गोदूताई व सकूताई अशा तीन कन्या मिळून आठ अपत्ये झाली. ती सर्व धर्मपरायण होती. त्यातल्या त्यात ज्येष्ठ पुत्र शंकरभटजी, कनिष्ठ पुत्र वामनराव व कन्या गोदुताई यांचा पारमार्थिक अधिकार चांगला मोठा होता. ज्येष्ठ बंधु शंकर भटजी सर्व यात्रा वगैरे करून, शेवटी चतुर्थाश्रम घेऊन, वाडीस वास्तव्य करून श्रीचरणी लीन झाले.

## उमाबाईंना साक्षात दर्शन

उमाबाईंचा अधिकार फार मोठा होता. त्यांना सकुताईंच्या वेळी गरोदरपणी एक रोग झाला. कोल्हापूरचे डॉक्टर आपटे यांनी हा रोग असाध्य आहे असे सांगताच 'दैवी उपाय' म्हणून त्यांना वाडीस आणले व श्रीसेवा सुरू केली. या वेळी एके दिवशी 'एक अलौकिक चमत्कार घडला' तो असा. हे नारायणस्वामींच्या मठात रहात होते. तेथे दुपारी ज्येष्ठ पुत्र शंकरभटजी व 'एक तेजस्वी संन्यासी स्वामी महाराज' असे उभयता यांचे मुक्कामी नारायणस्वामींचे मठात आले. श्रीस्वामींनी उमाबाईंच्या प्रकृतीची चौकशी केली. उमाबाई स्वयंपाक करीत होत्या. त्या पंगतीमध्ये लगेच हात धुवून उठल्या व त्यांनी श्रींना नमस्कार केला. नंतर श्रींनी स्वचरणतीर्थ दोन पळ्या स्वहस्ते उमाबाईंना दिल्या व स्वामी एकदम अदृश्य झाले. हे तीर्थ घेताच थोड्या वेळात उमाबाईंच्या पोटातील रोग फुटून आतील किल्मिषाचा प्रवाह सुरू झाला. व चुलीसमोरील थारोळे भरून त्या रोगाचे किल्मिष बाहेर पडले व उमाबाई निचेष्ट अवस्थेत पडून राहिल्या. नंतर नेहमीप्रमाणे काही वेळाने ज्येष्ठ चिरंजीव शंकरभटजी आह्निक आटोपून मुक्कामी मठात आले व मातुश्रींची ही अवस्था पाहून घाबरून गेले व त्यांना शुद्धीवर आणण्याचे उपाय केले. त्या शुद्धीवर आल्यावर श्रीवासुदेवानन्द स्वामी महाराजांच्या दुर्गा मावशी तेथे होत्या. त्यांनी उमाबाईंना कृष्णामाईचे स्नान घालून आणले व सर्व व्यवस्था केली.

वरील हकीकत वाडीत सर्वांना समजली व हे सन्यासी दुसरे तिसरे कोणी नसून ' साक्षात् श्रीनृसिंह सरस्वती स्वामी महाराजच होत ' अशी सर्वांची खात्री होऊन सर्वांनी आश्चर्ययुक्त असे धन्योद्‌गार काढले. एकनिष्ठ भक्ताचा पाठिराखा परमात्मा असून भक्तरक्षणार्थ तो नाना लीला प्रकट करतो हेच खरे.

## जन्म

श्रीवामनरावजींचा जन्म कुडुत्री येथे मार्गशीर्ष वद्य १३ शके १८०८ दिनांक २३ डिसेंबर १८८६ रोजी झाला. 'शुद्ध बीजापोटी फळे रसाळ गोमटी ' या न्यायाने वे. दत्तभट व मातुश्री उमाबाई या सात्त्विक, शुद्धाचारसंपन्न दांपत्याचे उदरी वामनरावांचा जन्म झाला. यामध्ये जगन्नियन्त्या प्रभूंनी आपल्या एका ' अलौकिक शास्त्रीय सिद्धांताची साक्ष ' पटवून दिली.

श्रीमद्‌भगवद्‌गीतेच्या सहाव्या अध्यायात श्रीकृष्णार्जुन संवादी ज्या वेळी अर्जुनाने ' योगभ्रष्टाची पुढे काय गति होते ' असा प्रश्न विचारला तेव्हा भगवतांनी सांगितले की, ज्या योगभ्रष्टाच्या वैराग्याची परिपक्वता झालेली नसून काही नव्यत्तर वासनांचे संचित प्रारब्ध शिल्लक असते, अशांना त्या वासना पूर्ण होण्याचे दृष्टीने अनुकूलता मिळावी म्हणून ' शुचीनां श्रीमतां गेहे ' असा जन्म मिळतो व ज्याच्या वासना नष्ट होऊन चांगले प्रखर वैराग्य अंत:करणात उदित झालेले असते, अशांना ' अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्, ' दरिद्री पण अधिकारी अशा महायोग्यांचे पोटी जन्म मिळतो. या दोन्ही जन्मांत ' दुसरा जन्म दुर्लभतर ' असा असून श्रेष्ठ आहे. त्या दृष्टीने वामनरावांचा हा जन्म दुसऱ्या प्रकारचा श्रेष्ठ असा लाभला आहे हे त्यांच्या उपजत प्रखर वैराग्य व सत्त्वशील वृत्तीवरून सहज दिसून येते.

श्रीवामनरावजींच्या कुंडलीवरून व सामुद्रिक चिन्हांवरूनही अनेक ज्योतिषांनी व सत्पुरुषांनी त्यांचा पारमार्थिक अधिकार, वैराग्य, सद्‌गुरुकृपा, या बाबतीत स्पष्ट अनुकूल असे अभिप्राय दिलेले असून पुढे त्याप्रमाणे अनुभवही आला आहे.

वामनरावांची बालपणी सर्वसामान्य खिलाडू वृत्ति न दिसता उलट अल्प वयात प्रौढपणाच दिसून येई. बालपणी त्यांच्या ' आत्या तानूबाई ' यांनी त्यांचे चांगले संगोपन केले व त्यांना त्यांचाच लळा लागला होता.

## शिक्षण

तारुण्यास मराठी चौथीपर्यंत शिक्षण झाले व पुढे कोल्हापुरी राजाराम हायस्कूलमध्ये शिक्षण झाले. या शिक्षणाचे वेळी ' मूधरगडपेठा ' वगैरे २, ३ स्कॉलरशिप्सहि मिळाल्या होत्या.

वयाचे ' आठवे वर्षी उपनयन ' झाले. घरी वडील बंधूंनी संध्या, पूजा, वैश्वदेव, पुरुषसूक्त वगैरे धार्मिक आचारांचे शिक्षण करून घेतले. तसेच कोल्हापुरी पं. आत्मारामशास्त्री पित्रे यांचेकडे रूपावलि, समासचक्र, अमरकोश, रघुवंशातील आठवा सर्ग, अजविलाप, मालविकाग्निमित्र नाटकातील काही अंक व पंचतंत्र वगैरे संस्कृत अभ्यास झाला. याही वेळी काही पुस्तके बक्षीस मिळाली.

## कलेची उपजत आवड

वामनरावांना लहानपणापासून पूर्व संस्कारानुसार चित्रे काढण्याचा नाद असे. त्यामुळेच त्यांना ड्रॉइंगचे शिक्षण दिले. १९०६ साली फर्स्ट ग्रेड, १९०७ मध्ये सेकंड ग्रेड परीक्षा देऊन थर्ड ग्रेडकरिता मुंबईस शिक्षणास गेले. सहा महिने बोरीबंदरवरील आर्ट स्कूलमध्ये अभ्यास केला व १९०८ मध्ये थर्ड ग्रेड परीक्षा दिली. नंतर पुढील शिक्षणाकरिता ' अनंत गुर्जर ' या नावाच्या एका सहाध्यायाबरोबर ' परदेशात अमेरिकेस ' जाण्याचा प्रयत्न केला परंतु तो सफल झाला नाही. फक्त अनंत गुर्जर मात्र गेला.

## पूर्वसंस्कारानुसार परमार्थाकडे ओढा

वामनरावांना अमेरिकेस जाण्याबाबत यश न येण्यात प्रभूंचा काही उद्देश होता. त्यांचे प्रारब्ध फार वेगळे होते व हाच त्यांच्या ' आयुष्याची दिशा ठरविणारा अत्यंत महत्त्वाचा क्षण ' होता. लहानपणापासून देवधर्माची आवड. आचारात कधीहि आळस नसे. घरातील परंपराही फारच अनुकूल होती. वामनरावांनी चांगली नोकरी करून प्रपंच थाटावा अशी मातुश्रींची व वडील बंधूंची इच्छा असणे स्वाभाविक होते. परंतु श्रीसमर्थ उक्तीनुसार ' चिंता करितो विश्वाची ' या न्यायाने ' विश्वप्रपंच ' करण्याचे वामनरावांचे प्रारब्ध होते.

तेच प्रकट झाले. या प्रारब्धात अनेक मुमुक्षु साधक जिज्ञासूंच्या शाश्वत कल्याणाचे बीज साठविलेले होते.

## श्री प. प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज यांची प्रथम भेट व दर्शन

सन १९०७ साली गुरुद्वादशीस महाराजांचा मुक्काम वाडीस होता. विशेष महत्वाची गोष्ट म्हणजे 'महाराजानी या उत्सवात पंक्तीमध्ये येऊन स्वत प्रसाद ग्रहण केला.' त्यामुळे सर्वांना तो परमानंद वाटला.

या वेळी वामनराव कोल्हापुरी होते. त्याना वाडीहून वडील बंधूंनी एक पत्र लिहून सुंदर कामगिरी सांगितली की श्रीदत्ताचा एक फोटो तयार करून त्याचे गळ्यात महाराजानी केलेल्या एका 'श्लोकाचा विशिष्ट पद्धतीने हार तयार करून घालावा व तो फोटो घेऊन वाडीस यावे. त्याप्रमाणे उत्तम फोटो तयार करून घेऊन वामनराव वाडीस आले. त्याच वेळी महाराजांची प्रत्यक्ष प्रथम भेट होऊन दर्शन घडले. महाराजाना तो फोटो पाहून फार समाधान वाटले व वामनरावाना आशीर्वादयुक्त 'एक हातात बांधण्या करिता पेटी दिली' ती आजपर्यंत वामनरावांचे हातात कायम आहे.

## जीवदान

मध्यंतरी वामनरावाना प्लेग झाला. मोठी गाठ आली होती. झोपडीवर रहावयास गेले होते. दहा दिवस वामनराव बेशुद्ध अवस्थेत होते. नंतर ताप कमी झाला परंतु गाठ तशीच राहिली ती श्रीगुरुचरित्राची पारायणे सुरू केल्यावर फुटली व बरे वाटले. हा पुनर्जन्मच झाला. नंतर वाडीस येऊन माधुकरी मागून श्रीगुरुचरित्राचे सात सप्ताह केले त्या वेळी महाराजांचे बंधु श्रीसीताराम महाराज यानी भस्म लिहून दिला होता.

## सद्गुरूंचा अनुग्रह

पवनीस श्रीवासुदेवानन्द सरस्वती स्वामी महाराजांचा चातुर्मास झाला. तेव्हा वडील बंधु शंकर भटजी वडिलांचे और्ध्वदेहिक उरकून पवनीस प्रथम एकटेच आले. नंतर तेथून महाराजांचे अनुज्ञेने पत्र लिहून त्यानी मातुश्री व गोदुताईसह पवनीस येण्याविषयी वामनरावाना लिहिले. पवनीस वैनगंगा नदी असून गावात १०८ मारुती, १०८ गणपती अशी अनेक मंदिरे आहेत. महाराज पवनीस दोन महिने अगोदरच आले होते. त्यांचेबरोबर 'सीताराम महाराज व गाडा बुवाहि' होते. 'नामदार काळीकरांचे मुरलीधर मंदिरात मुक्काम होता.' या वेळी 'महाराजांनी मातुश्री, गोदुताई व वामनराव या त्रिवर्गांना अनुग्रह दिला.' हा दिवस शके १८३१ च्या 'अनंतचतुर्दशीचा होता.' या वेळी हिंगोलीचे श्री. शंकरराव देशमुख आजेगावकर व त्यांच्या भगिनी ग. काशीताई यांना अनुग्रह झाला.

## सुवर्णदिन

हा 'अनंतचतुर्दशीचा दिवस' वामनरावजींच्या आयुष्यातील सुवर्णाक्षरानी लिहून ठेवण्यासारखा चांगला 'भाग्यदिन' ठरला. त्यामध्ये 'अनंताने अनंताच्या कल्याणाची गुरुकिल्ली' वामनरावांच्या हाती स्वाधीन केली. महाराजांचा हा चातुर्मास फारच गाजला व त्याची प्रसिद्धीही बरीच झाली. या वेळी पुढे महाराजाना काश्मीरला जाण्याची आज्ञा झाली असल्यामुळे पुन्हा त्यांचे दर्शन होणे कठीण. ते परत येतील किंवा नाही अशी शंका निर्माण झाल्यामुळे बरीच मंडळी जमली होती. त्यामुळे अनेक महान भगवद्भक्तांची व वामनरावांची भेट होऊन 'गुरुशिष्य सान्निध्याने घटे मिळाले व ते उभ्या आयुष्यात आदर्श म्हणून उपयुक्त ठरले.

## श्रीक्षेत्र गाणगापुरी सेवेस

वामनरावानी मुंबईस नोकरीचे काही जमत नाही असे पाहून एके दिवशी सर्व सामान स्नेही रहाळकरांकडे ठेवून अंगावरील दोन वस्त्रे व लोटा घेऊन मुंबई सोडली गाणगापुरी जाऊन श्रीगुरुचरित्राची पारायणे करावीत असा विचार केला. वाटेत दौंडला उतरले. 'चैत्र शुद्ध एकादशी होती. अत्यंत कडक उन्हाळा. त्या दिवशी दौंडला नदीवर स्नानसही जाणे शक्य झाले नाही. स्टेशनवरील नळासही गरम पाणी. स्नान उरकले. 'कडक उपास घडला.' या 'दिवसापासून वामनरावांनी नित्याचे एकादशीव्रत सुरू केले.' पुढे गाणगापूर स्टेशनवर 'क्वारंटाईन' होते. त्यातून श्रीकृपे अचानक सुटका झाली. चैतन्य देवाकडे

धर्मशाळेत वास्तव्य करून कण्या व ताक संपादन केले. कडक उन्हाळा व त्यामध्ये उपास घडल्यामुळे 'उन्हाळी लागली.' मग वामनरावांनी 'लंगोटी भिजवून घातली' तेव्हा बरे वाटले.

दुसरे दिवशी सकाळी बैलगाडीने १२ वाजता गाणगापुरी आले. उपाध्याय वे. लक्ष्मणभटजींकडे उतरले. दुसरे दिवसा पासून श्रीगुरुचरित्र सप्ताह सुरू केला. सहा सप्ताह झाल्यावर सातवा एका दिवसात केला. कारण त्या वेळी तेथे गाणगापुरी एक 'रमल ज्योतिषी' आले होते. त्यांना वामनरावांनी विचारले की 'माझी गुरु महाराज टेंबे स्वामी यांची भेट केव्हा होईल?' खऱ्या गुरुभक्ताचे अंतःकरणात गुरुमाउलीशिवाय दुसरे कोणते आर्जव असणार? या प्रश्नाचे उत्तर असे मिळाले की, 'झाली तर सहा महिन्यात भेट होईल, नाही तर पुन्हा भेट होणार नाही.' हे अंतःकरणाला जबरदस्त धक्का देणारे उत्तर ऐकल्यामुळे सातवा सप्ताह पारायण एक दिवसात केले व सात पारायणे संपवून सांगता केली. जवळ काही सुद्धा पैसे नव्हते. तेथे माधुकरी मागून ही सेवा केली होती. तेव्हा जवळची एक उशी व काही वस्त्रे पुजाऱ्यास देऊन सांगता केली.

## श्रीमहाराजांचे शोधार्थ

शके १८३२ चा चातुर्मास हावनूरला होण्याचा संभव आहे असे समजले होते. 'हावनूर हे गाव धारवाड जिल्ह्या मध्ये तुंगभद्राकाठी' आहे. तेव्हा महाराज जवळपासच कुठे तरी असतील अशा समजुतीने वामनरावांनी प्रवास सुरू केला. हा त्यांचा प्रवास पायी सुरू झाल्यामुळे फारच कष्टमय व खडतर झाला. कारण जवळ काहीच पैसे नव्हते.

प्रथम गाणगापुराहून पायी हुमणी गाठली. तेथून अहेरवाडीस एका वैष्णवाकडे जेवण करून नंतर विजापूर करून सीतीमनीस आले. सीतीमनीचे स्टेशनमास्तरकडे लग्न होते. त्या लग्नास आलेल्या पाहुण्यांनी अशी बातमी सांगितली की धारवाडकडच्या मार्थहाळ दत्त मंदिरात गुर्लहोसूरचे चैतन्याश्रमातील थोरले स्वामींचे शिष्य राजेंद्रअप्पा मास्तर रहात असतात. त्यांचेकडे महाराज, थोरले स्वामींसह आले आहेत, ही बातमी मिळताच वामनराव सीतीमनीहून गदगला आले. तेथे गदगला जवळ एक घोंगडे होते ते दोन रुपयास विकून त्याचे तिकिट काढून धारवाडला आले. राजेंद्रअप्पांची भेट घेतली. महाराज तेथे नव्हते. परंतु पूर्वीच येऊन कोठे तरी गेले एवढेच समजले.

नंतर तेथून मुदगल गावी वामनरावांचा एक 'मुरली भार्गव नावांचा स्नेही पोलीस सब् इन्स्पेक्टर फौजदार होता.' त्याचेकडे वामनराव गेले. त्यांनी मोठ्या प्रेमाने दोन दिवस ठेवून घेतले. तो एका मोठ्या हुद्यावर होता व बरेच दिवसांनी आपला एक जुना स्नेही आणि तोहि भिकार वेषात—या वेळी वामनराव अंगावरील दोन वस्त्रांवरच होते. दाढी वाढली होती. पायी सतत प्रवास सुरू होता. कष्टाने व वेळेवर अन्नहि मिळत नसल्यामुळे खंगलेले स्वरूप होते.—अशा विपन्न स्थितीत असूनहि या मित्राने ओळख दिली व दोन दिवस ठेवून घेतले हे त्याचे अविस्मरणीय असे मोठेपण होय. नंतर त्याने वामनरावांना तीन रुपये विनकेवळ खर्चास देऊन विनतिपूर्वकाने हरिहरला रवाना केले.

'तुंगभद्रा काठी हरिहराचे एक सुंदर मंदिर होते.' तेथे एक मुक्तिनाथ नावाचा तेलगी ब्राह्मण नरसोबाचे वाडीहून असाच महाराजांचे शोधार्थ निघाला होता. त्याची अचानक भेट झाली. म्हैसूर संस्थानमध्ये जागोजागी दहा दहा मैलावर संस्थानचे अन्नछत्र असे. तेथे उभयता अन्नग्रहण करून तुंगभद्रा काठाने प्रवास करीत एका गावी आले. तेथे 'प्राणदेव गुडी' म्हणजे 'मारुती मंदिर' होते. तेथे एक दिवस विश्रांति घेतली. निघण्याचे दिवशी तो मुक्तिनाथ काही पोथी वाचीत मारुतीजवळ बसला होता. वाऱ्याने पोथीचे पान उडू लागले म्हणून त्याने मारुतीचे पायाजवळ एक 'लहानशी पितळेची मूर्ती' होती ती त्या पोथीवर पान उडू नये म्हणून ठेवली होती. पोथी झाल्यावर गडबडीत त्याने त्या 'मूर्तीसह पोथी गुंडाळली' व तो पुढे प्रवासास निघाला. पुढील मुक्कामास त्याचे ते नजरेस आले. नंतर परत येताना त्याच रस्त्याने येऊन मूर्ति परत मंदिरात ठेवू असा विचार करून उभयता पुढे निघाले.

'तुंगा व भद्रा यांचे संगमावर 'कुडलीमठ' येथे श्रीशंकराचार्य व श्रीमध्वाचार्य यांचे मठ आहेत. तेथे शंकराचार्यांचे मठात एक मुक्काम करून परत निघाले. वाटेत मारुतीची मूर्ति जागचे जागी ठेवून हरिहरला आले. त्या मुक्तिनाथाजवळ शंभर रुपये होते. तेथून तो रेल्वेने प्रवास करीत स्वतंत्रपणे निघाला व वामनरावांची आणि

त्याची फाटाफूट झाली.

वामनराव हरिहरहून हुनळीस आले. तेथे गदगच्या पुढे २६ मैलावर आब्बेगिरी नावाच्या गावी महाराज आहेत अशी बातमी लागली. तेथे गावापासून एक मैल अंतरावर एका ब्राह्मणाचे मळ्यात 'गोविंदस्वामी नावाचे चिम्मड सांप्रदायी' रहात होते. तेथे वामनराव आले. त्यांनी वामनरावांची चौकशी केली. कोल्हापूरहून महाराजांच्या शोधार्थ आलो आहे असे सांगताच त्यांनी आदर व्यक्त केला. इतक्यात तो हरिहरहून फाटाफूट झालेला मुक्तिनाथहि तेथे आला. या स्वामींनी पुढे वामनरावांना पंधरा दिवस ठेवून घेतले व तो मुक्तिनाथ रामेश्वरकडे महाराजांचे शोधार्थ निघून गेला.

## 'वृद्धपशूचा शुभशकुन'

वामनरावांचा गुरुपौर्णिमा उत्सव येथेच झाला. त्या गोविंदस्वामींनी वामनरावांना एक 'घोंगड्याची कफनी' व काही पैसे देऊन उत्तरेकडे जाण्यास सांगितले. याप्रमाणे वामनरावांना मळापूर स्टेशनवरून जावयाचे होते. निघताना समोरून 'एक इसम एक पांढऱ्या शुभ्र बैलास दोरी बांधून घेऊन येत होता.' 'हा आशादायक वृद्ध पशूचा शुभशकुन झाला व आनंद वाटला की आता 'महाराज नक्की भेटणार.' नंतर बागलकोटला आले. स्टेशनवर गाडीत एका इसमाने 'स्वामी महाराज हावनूरला असल्याचे सांगितले.' त्या इसमास ही बातमी सुनदेस आत्मारामपंत जोग यांचे पेन्शनर समजली होती. नंतर पायी गलगली गाठली. तेथे नोटेस्वामी होते. ते शिवचिदंबराचे भक्त होते. नंतर बागलकोटहून पुढे हावेरीस आले. तेथील कोर्टातील वकीलांकडे आलेल्या एका पक्षकाराने व जोगांचे नातू निष्ठपंत यांनीहि सांगितले की 'दोन महिन्यापूर्वीच महाराज हावनूरला आले आहेत.'

## सद्गुरु भेट व एकांत सहवास

महाराज एकांतात राहण्याच्या उद्देशाने हावनूरला आलेले आहेत असे समजले. वाटेत एक आगडी म्हणून गाव लागले. तेथे एका सत्पुरुषाचा आश्रम होता. तेथे प्रवासी मुक्काम करून पुढे १७ मैलावर सभापूर गावचे कुलकर्णीकडे महाराज आले होते असे समजले. तेथून नंतर हावनूरला गावाबाहेर एक तिरुटेश्वराचे मंदिर होते. तेथे महाराजांचा मुक्काम होता. तेथे वामनराव आले व 'महाराजांना पाहताच त्यांना ब्रह्मानंद झाला.' भेट व दर्शन झाले. प्रवासातील सर्व हकीकत महाराजांना निवेदन केली. ती ऐकून महाराजांनी 'प्रथम घरी कळविले आहेस का?' असे विचारले. अशा रीतीने गुरुशिष्यांची भेट झाली.

## दुर्मिळ सेवासद्भाग्य

वामनराव हावनूरच्या मुक्कामात दररोज महाराजांचे बरोबर माधुकरी मागत असत. महाराजांनी वामनरावांना प्रथम विचारले की 'तू कधी पूर्वी माधुकरी वगैरे मागितली आहेस का?' त्यावर वामनरावांनी महाराजांना सांगितले की मी पूर्वी गाणगापुरी माधुकरी मागितली आहे. तशी मला सवय आहे. व येथेहि मी माधुकरीच मागणार आहे. हे ऐकून महाराजांना फार समाधान वाटले. 'दररोज तीन घरची माधुकरी' आली की भरपूर होई. वामनरावहि महाराजांसारखे एकभुक्त रहात असत. तेथे वामनरावांना महाराजांची सेवा इतर दुसरे कोणी तेथे त्या वेळी नसल्यामुळे चांगली घडली. महाराजांचे भोजन झाल्यावर दररोज त्यांचे उष्टेहि काढणे वामनरावांना घडले.

दुपारी महाराज 'सदाशिव ब्रह्मेन्द्राची ब्रह्मसूत्रवृत्ति' लिहून घेत असत. हावनूरला तुंगभद्रा असल्यामुळे पाण्याचे फार सुख होते. तेथे महाराज स्नानास गेले म्हणजे त्यांचे शेजारचे बाजूस वामनराव स्नान करीत असत व त्या वेळी 'दररोज महाराजांनी स्वहस्ते वामनरावांच्या अंगावर पाणी घातले व 'स्वचरणतीर्थहि दिले.' वामनरावांचे केवढे सद्भाग्य असले पाहिजे याची कल्पना येते. रात्री उजेड नको म्हणून एके दिवशी वामनराव देवाचा दिवा कमी करू लागले तेव्हा महाराज वामनरावांना म्हणाले की देवाचा दिवा कधीहि कमी करू नये. तसेच महाराजांची छाटी वामनराव धूत असत तेव्हा पाणी जास्त पिळू नये असेहि महाराज म्हणाले.

येथील मुक्कामात दुपारी श्रीलक्ष्मणभट गाराठी यांचे घरी टीकेवरून महाराज गीता सांगत असत. त्या वेळी या लक्ष्मणभट यांनी एक ज्ञानेश्वरी गीता वामनराव यांना दिली. ती गीता वामनराव यांचे बरेच दिवस नित्याचे वाचनात होती. अलिकडे ती गीता जीर्ण झाली असल्यामुळे मोल्यपुरी नामे कुनदे यांचेकडे देवात पूज्य ठेवून दिली

आहे. महाराज त्या वेळी म्हणाले की—

'स्वशाखोपनिषत् गीता विष्णुनाम सहस्रकम् ।
श्रीरुद्रं पौरुष सौर जपेन्मुच्येत बंधनात् ॥'

या वेळी 'महाराजानी वामनरावाना गीता व विष्णुसहस्रनामाची भथा स्वत. दिली.' तेथेच नागपचमी व श्रावणी झाली.

## शिष्याचे गुरूस मार्मिक उत्तर

एके दिवशी ज्योतिषाचा विषय निघाला. महाराजाना वामनरावानी विचारलेवेळी महाराजानी सागितले की पुढे ममग्रही येणार आहे. तेव्हा त्याकरिता महाराजानी एक वैदिक मत्र लिहून देऊन सागितले की याचा जप अगोदर सहा महिने व पुढे सहा महिने दररोज २८ प्रमाणे करीत जा. तेव्हा वामनरावाना अकरावा गुरु होता. महाराज वामनरावाना म्हणाले की, 'अरे, तुला तर अकरावा गुरु दिसत आहे. मग तुझा फायदा तर काही झालेला अद्याप दिसत नाही.' त्यावर वामनरावानी महाराजाना फार मार्मिक उत्तर दिले की, 'महाराज, माझा फायदा झालेला आहे.' त्यावर 'काय फायदा झाला आहे?' असे महाराजानी विचारताच, वामनराव म्हणाले, 'महाराज, आपली भेट व दर्शन झाले. यापेक्षा आणखी कोणता मोठा फायदा या जगात आहे?' हे ऐकून महाराजाना किंचित हास्य केले. वामनरावाना महाराजाचे प्रसन्न हास्य पाहून ब्रह्मानद झाला. महाराज सर्वच मुकुटमणी होते. त्याना सर्व शास्त्रे अवगत होती. त्याचा अधिकार फार मोठा होता इतकेच नव्हे तर 'साक्षात ते दत्तावतारच होते.' अशा सद्गुरूची प्रसन्नता म्हणजे साक्षात् भगवत् कृपाच होय.

## कट्टर वैष्णवाची उपेक्षा

या ठिकाणी दुपारी गीतेचे प्रतिपादन चालू असताना एक विद्वान वैष्णव ब्राह्मण ते ऐकण्यास दररोज येत असे. तो कट्टर वैष्णव असल्यामुळे त्या शकराचे देवाल्यात न येता तो बाहेरच बसत असे. मधून मधून महाराजाना काही शकाही विचारी, परतु महाराज त्याचे बोलण्याकडे लक्षही देत नसत व उत्तरही देत नसत. एके दिवशी सहज वामनरावानी महाराजाना विचारले की 'महाराज तो ब्राह्मण काही शका आपणास विचारतो. आपण त्याचे उत्तर का देत नाही?' यावर महाराज म्हणाले की, 'जो शकराचे देवाल्यात येणे हे पाप समजतो त्याला काय उत्तर द्यावे व समाधान तरी कसे व काय करावे? अशाची उपेक्षा करणेच बरे. त्या भागात वैष्णव लोक फार कट्टर असल्याचे अनुभवास आले. परतु भूत प्रेत पिशाच वगैरेनी पछाडलेल्या मडळीना महाराज 'शकराचीच उपासना' सागून ती पीडा दूर करीत. त्यामुळे त्याचा हा स्मार्तांचा द्वेष बराच कमी झाला.

## योग शिक्षा

रात्री महाराज एक छोटी डुलकी घेऊन नतर उठून बसत व समाधि अवस्थेत निजानदात पहाटेपर्यंत असत. हे तेथे असलेल्या एका जळगावच्या तरुण विद्यार्थ्याने पाहिले. त्याची साक्षी वामनरावानीही प्रत्यक्ष पाहून करून घेतली. याच मुक्कामात वामनरावाना महाराजानी आसने, प्राणायामादि शिकविले व अजपाजपही सागितला. हा सहवास फारच सदभाग्याचा व आनददायक असा सुखाचा घडला.

## वियोग

पुढे श्रावण शु. १० ला वडिलाचे श्राद्ध होते त्यामुळे श्राद्धास घरी हजर राहिलेच पाहिजे असे महाराजानी सागितल्यामुळे नाइलाजाने वामनरावाना तेथून परत निघणे भाग पडले. महाराजानी सागितल्याप्रमाणे वामनरावानी मुबईहून कपड्याची ट्रक रेल्वे पार्सलनी मागविली. दररोज पोस्टाची वाट पहात होते. एके दिवशी सकाळी महाराज स्वत होऊनच म्हणाले की 'आज तुझी ट्रक येईल बरं का!' त्याप्रमाणे बरोबर पोस्टमास्तरनी रेल्वे रिसीट पाठवून दिली.

निघण्याचे दिवशी उभयतानी लवकर माधुकरी आणली. एकदमच भोजन केले. दररोज महाराजाचे झाल्यावर वामनराव भोजनास बसत असत. आज एकदमच बसले. भोजनो त्तर आत्मारामपताकडून एक नारळ आणण्यास सागितला. वामनराव नारळ घेऊन येईपर्यंत 'महाराजानी अगारा व कुकु वगैरे पुड्या बाधून ठेवल्या होत्या.' 'त्या पुड्या व नारळ प्रसाद दिला.' निघताना अत्यत वाईट वाटले.

ती गाईवासराची ताटातूटच होती.' वामनरावाचे नेत्र अश्रुयुक्त झाले. जड अंत:करणाने महाराजाचा आशिर्वाद घेऊन वामनराव तेथून निघाले. त्याची अवस्था ज्याना ते हृदय आहे त्यानाच त्या वियोगाची कल्पना येणार. त्याचे वर्णन कोण करू शकणार?

## तुगाष्टक

येथील मुक्कामात महाराजानी त्या देवळाचे चौकटीवर खडूने तुगाष्टक लिहून ठेवले होते. तसेच चिदंबर दीक्षिताचे स्तुतीवर तीन श्लोकहि लिहिले होते व महादेवावर केलेले श्लोकहि तेथेच लिहून ठेवले होते. त्याचे पालुपद 'तारी मला तू त्रिपुरांतकेश्वरा' असे होते. वरील श्लोकात अेक 'तुगभद्रेचा हारबद्ध श्लोक' होता. तेव्हा वामनरावानी तेथील मास्तरकडून कागद वगैरे मागून घेऊन तुगभद्रेचे एक चित्र तयार करून तिच गळ्यात तो हारबद्ध श्लोक घातला व ते चित्र त्या महादेवाचे दरवाजावर लावले

निघताना वामनरावानी महाराजाना विचारले, 'पुन्हा भेट केव्हा होणार?' तेव्हा महाराज स्वत कडे हात दाखवून म्हणाले की 'हे पाहिले असेच लक्षात ठेवावे.' असे म्हणून थ्यंबकभट यानी दिलेली गीता त्याना परत केलीस का?' असे विचारले. त्यावर वामनराव म्हणाले की, 'त्यानी ती गीता मला बक्षीस दिली आहे.' हे ऐकून महाराजानी समाधान व्यक्त केले.

वडिलाच्या श्राद्धदिवशी १० वाजता वामनराव घरी पोहोचले. सर्वाना आनद झाला. नतर महाराजाकडील सर्व हकीकत ऐकून वामनरावाच्या महत् भाग्याविषयी सर्वांना धन्यता वाटली.

## पुन्हा सद्गुरु समागम

शके १८३३ चा चातुर्मास कुरुगड्डीस झाला. तेव्हा तेथे श्री. शकरराव आजेगावकर व त्याच्या भगिनी ग. भा काशीताई हे सेवेस होते.

शके १८३३ चा कुरुगड्डीचा चातुर्मास झालेवर महाराज सचारास निघाले. हिंगोलीस आले वडील बधु अगोदर हिंगोलीस गेले व त्याचे पत्र आलेवर वामनराव हिंगोलीस आले. कोल्हापूरहून मनमाडला आले तेथे मुबईचे स्नेही रहाळकर भेटले तेथून पूर्णेस आले. पूर्णा हिंगोली लाईन नुकतीच सुरू झाली होती. गाडीचे विचारे मालडब्यात बसून हिंगोलीस आले. तेथे मोकाशी मास्तरचे बधूकडे एकादशीचा फराळ करून पिंपरीस आले

महाराजाचा पिंपरीस मुक्काम होता एका लिबाचे झाडा खाली भजन सुरू होते. महाराजाना भेटून साष्टाग नमस्कार करताच वामनरावाना महाराजानी विचारले की 'बधूची भेट झाली का?' महाराजाची स्मरणशक्ति फार दाडगी होती. तेथे सर्व ब्राह्मणाचा सत्कार झाला तेव्हा गाडा महाराजातर्फे वामनरावाना एक रेशमी नागपुरी उपरणे दिले

## गोदावरीचे स्नान

दुसरे दिवशी पौर्णिमेस पहाटे गोदावरीचे स्नानास जावे म्हणून महाराज निघाले. इतर सर्वांना निरोप देऊन बरोबर श्रीगाडाबुवा, वामनराव, शकरभटजी, दत्तोपत आजेगावकर व गाडाबुवाचा एक शिष्य नथुराम अशी पाचच मडळी होती.

## आसनपरीक्षा

पुढे महाराज औंढ्या नागनाथ येथे आले. त्या वेळी रात्री भजन सुरू झाले. वामनरावाचे मनात महाराजना आसने करून दाखवावीत असे होते म्हणून त्याचे तर्फे गाडाबुवानी महाराजना तसे विचारले. तेव्हा येथे सवड नाही असे उत्तर मिळाले. थोड्या वेळाने स्वत वामनरावानीच महाराजाना विचारले तेव्हा त्यानी आसने करण्यास मागितले. त्याप्रमाणे आठ आसने केली महाराजानी समाधान व्यक्त केले व 'सिद्धासन आणि पश्चिमोत्तान' ही दोन आसने वाढवावीत अशी सूचना केली. मालामत्राच्या पुरश्चरणाची आज्ञा दिली वामनरावाना धन्यता वाटली

## औदुंबरचे पुरश्चरण व चमत्कार

शके १८३४ चा चातुर्मास चिखलदा येथे झाला. त्या वेळी औदुबरी वामनरावानी 'श्रीमालामत्राचे पुरश्चरण' केले. तेथे मातुश्री बरोबर होत्या. त्या ठिकाणी 'श्री विष्णुबुवा ब्रह्मचारी' हे 'गायत्री पुरश्चरण' करीत होते तेथे वामनरावाचे पत्रास महाराजाचे चिखलदाहून उत्तर आले की, प्रवास फार त्रासाचा आहे म्हणून इकडे येऊ नये श्री. विष्णुबुवा ब्रह्मचारी फक्त तिकडे गेले

औदुंबर येथे श्रीदत्तमाला मंत्राचे पुरश्चरणाखाली जप चालू असताना तेथील एक गृहस्थ शिरूामपूरचे 'दादा साहेब मंत्री' यानी वामनरावाना सकाळी स्नानाचे वेळी घाटावर 'तुम्ही हे काय करता?' असे विचारले. 'जप करतो' असे वामनराव म्हणाले. त्यावर 'तुमचा तीन हजार जप कमी आहे' असे ते म्हणाले. कारण 'रात्री त्याना स्वप्नात एक सुवासिनी भेटली व तिने वामनरावाचे चुलते निवर्तले असल्यामुळे त्या अशौचामधील जप कमी झाला,' असे सांगितले वामनरावाचे बंधूनीं दहावे दिवशी मिळेल असे पत्र लिहिले होते. तेव्हा या दहा दिवसाचा जप तीन हजार कमी झाला. यायोगे 'मानवी हिशेब व देवाघरचा जमाखर्च' यामध्ये कसा फरक असतो हे सिद्ध झाले.

## सद्गुरूची शेवटची भेट

श्रीक्षेत्र गरुडेश्वरी महाराजाचा मुक्काम असताना तेथे त्यानी ब्रम्हसूत्र वृत्ती, दशोपनिषदे, श्वेताश्वतर, कैवल्य, मौक्तिक वगैरेहि उपनिषदे सांगितली. त्या वेळी तेथे एकादशीस 'पवमान स्वाहाकार' होत असे व परशुराम भटजीकडून वामनरावानी पवमान सथा घेतली. 'या मुक्कामात महाराजानी वामनरावाना धौती सांगितली.' एके दिवशी एकादशीस वामनरावाना थंडी वाजून आली व ताप भरला. त्या वेळी 'औषध नको धौती व मयूरासन कर' असे महाराज म्हणाले व त्याप्रमाणे केल्यावर बरे वाटले.

## महाराजाना दीक्षित स्वामींविषयी स्वाभिमान

एके दिवशी सहज बोलता बोलता महाराज म्हणाले की, 'मला दीक्षित स्वामीविषयी फार अभिमान आहे' व त्याचे कारणही त्यानी लगेच सांगितले. ते असे – एकदा 'दीक्षित स्वामी व श्रीशंकराचार्य' याची भेट झाली. उभयताचा शास्त्रीय विषयावर संवाद झाला. त्या वेळी श्रीशंकराचार्यांनी दीक्षितस्वामींना शंका-समाधान प्रश्नोत्तरात फारच छेडले. दीक्षित स्वामीचे जागी कोणीहि दुसरे विद्वान् सद्गृहस्थ असते तर ते खास चिडून रागावलेच असते. परंतु दीक्षितस्वामी मान शांत चित्ताने व निर्विकार अंत करणाने बोलत होते. रागाचा लवलेशहि त्यांच्या चेहऱ्यावर किंवा बोलण्यात व्यक्त झाला नाही. ही त्याची 'परम शांति' पाहून त्या 'शंकराचार्यांना फार आश्चर्य वाटले' व शेवटी त्यानी स्वत च दीक्षित स्वामींना मोकळ्या अंत करणाने स्पष्ट विचारले की मी इतके तुम्हाला राग यावा या उद्देशाने विचारतो त्यावर तुम्ही रागावत कसे नाहीत? त्यावर दीक्षित स्वामींनी आचार्यांना उत्तर दिले की 'महाराज, एवढेच माझ्या गुरुमहाराजानी मला शिकविले आहे.' या मार्मिक उत्तराने आचार्यांना परम संतोष वाटला व त्यानी दीक्षितस्वामींच्या अधिकाराचे कौतुक केले. असे महाराजांनीं सांगून दीक्षितस्वामींचे विषयीचा आपला स्वाभिमान व्यक्त केला. हे सर्वांनी ऐकून त्या सर्व मडळींना दीक्षित स्वामींच्या शांत स्वभावाचे व त्याचेवर असलेले महाराजाचे निस्सीम प्रेम पाहून कौतुक व सहर्ष समाधान वाटले. 'दीक्षित स्वामी याना महाराजाचे हे साक्षात् प्रतिबिंबच आहे' असेच सर्व समजत असत.

दत्त आज्ञेशिवाय जशी महाराजाची काहीच हालचाल नव्हती त्याप्रमाणे महाराजाच्या आज्ञेशिवाय दीक्षित स्वामींचीहि काहीच हालचाल नव्हती. म्हणून महाराजाचे सर्व शिष्यात त्याना अग्रपूजेचा मान असे. महाराजाची व वामनरावाची ही शेवटची भेट ठरली.

## महायोगविज्ञानाचे योगानन्द, महाराजांचे भेटीस

शके १८३५ चा महाराजाचा चातुर्मास गरुडेश्वरी झाला व हाच त्याचा शेवटचा चातुर्मास होय व 'श्रीक्षेत्र गरुडेश्वर हेच त्याचे शेवटचे लौकिक दृष्ट्या निर्याण स्थान व भक्ताच्या दृष्टीने कायमचे वसतिस्थान ठरले.'

गरुडेश्वरी महाराज असताना 'महायोग विज्ञानाचे योगानन्द' तेथे आले होते. ही गोष्ट पुढे वामनरावाना योगानंदाकडून पत्रद्वारे कळली. नंतर वामनरावाची व योगानंदाची पुढे समक्ष भेट झाली तेव्हा योगानंदानी महाराजाचा समक्ष पाहिलेला एक चमत्कार वामनरावाना सांगितला. ते म्हणाले, 'एके दिवशी गरुडेश्वरी सकाळी महाराजानी एक लहान झारी तीर्थाने भरून घेतली व तीमधून सबंध दिवसभर अनेक लोकाना त्यानी तीर्थ दिले. परंतु झारी काही रिकामी झाली नाही व तीमध्ये पुन्हा तीर्थही घातले नाही.' ही प्रत्यक्ष पाहिलेली गोष्ट त्यानी सांगितली. पुढे या योगानंदाचा व वामनरावाचा श्रीकृपे फार घनिष्ट संबंध जडला व तो योगसंप्रदायनादीस कारणीभूत झाला.

कडक होता हेही माठे योगाभ्यासी होते याचा शिष्य परिवारहि बराच आहे. वामनरावाची व याची वाडीस दोन वेळा व पवनीस एकदा अशी भेट झाली होती

## वामनरावाच्या आयुष्याचा धावता चित्रपट

वामनरावाची नोकरी सन १९१७ ते १९२६ पर्यंत १० वर्षे बार्शीस म्यु. मराठी शाळा न १ मध्ये ड्रॉइंग मास्तर म्हणून झाली व नतर १९२६ ते १९४२ पर्यंत पुणे येथे नूतन मराठी विद्यालय या इग्रजी हायस्कूलमध्येही ड्रॉइग मास्तर म्हणूनच झाली

बार्शीस ह. भ प यशवनराव वैद्य हे शाळा न १ चे हेडमास्तर होते यानीच वामनरावाना नोकरीवर घेतले तसेच पुणे येथील नोकरीही याच्याच धुरीणत्वामुळे लागली त्यामुळे 'यशवतरावाचा व वामनरावाचा अत्यत जिव्हाळ्याचा व आत्मीयतेचा ऋणानुबध जडला' व त्याचा उभयतानाहि सुखावह असा सदुपयोग झाला वामनरावाच्या घरची वडिलार्जित इस्टेट इतर बधूमध्ये वाटून देऊन 'वामनरावाच्या योगक्षेमाची काळजी जबाबदारी यशवतराव वैद्यानी स्वीकारली व केवळ प्रारब्धावर योगक्षेम अवलबून असल्याच प्रात्यक्षिकच-वामनरावाचे आयुष्य कसे आहे हे आम्हा सर्वांना दाखवून दिले' स्वत ची स्नानसध्या, योगाभ्यास व उपासना सभाळूनच उरलेल्या वळीच सर्व नोकरी केली. पुणे येथील नोकरी वैद्य मास्तराचे स्नेही श्री नटेश अयर, सुपरिंटेंडिंग इजिनियर याच्या प्रयत्नाने मिळविली, त्या वेळी महामहोपाध्याय दत्तोपत पोतदार शिक्षणप्रमुख होते

## वामनराव व हरहुन्नरता

वामनराव हे उपजत कलावत असल्यामुळे त्याचे अगी हरहुन्नरता चागली दिसून आली या सर्व हरहुन्नरतेमध्ये 'त्यानी द्रव्यार्जनाकरिता मात्र काही मुद्दा केले नाही हे त्याचे अगचे औदार्य व वैराग्य विशेष दिसून आले नाही तर गोण्यानी पैसा मिळाला असता

मातुसताचे, देवादिकाचे विशेषत सद्गुरु महाराजाचे अनेक फोटो त्यानी यत्रद्वारा व स्वहस्ते काढले बार्शीस शाडूच सुदर गणपती तयार केले श्रीशकराचार्य शिराळकर गुरुस्वामी महाराज याना श्रीनिपगुरूचा पडदा तयार करून दिला एका प्रदर्शनार्थ श्रीसरस्वतीचा पडदाही तयार केला. पुणे येथे क्रेप पेपर्सची फुले व इतर जिन्नस तयार करण्याची सुरुवात वामनरावानीच प्रामुख्याने प्रथम केली व अनेकाना ती कला शिकविली व त्याची हा कीर्ति परदेशापर्यंत जाऊन परदेशी तज्ञानी वामनरावाच्या या कलाकृतीचे मोठे कौतुक केले

श्रीगोविंद महाराज पडीत पुणे येथे आलेवेळी उडपीचे अधिकारी स्वामी म्हैसूरला असत. त्याचेकरिता वामनरावा कडून 'एक चक्राकित कुडलिनीचे सुदर चित्र' तयार करून नेले

## वामनरावाचा यात्रा प्रवास

वामनरावाच्या आसेतु हिमाचल अनेक ठिकाणच्या सत महत्त्वाच्या यात्रा झाल्या असून श्रीकाशीक्षेत्री अनेक वेळा जाऊन बरेच दिवस वास्तव्यहि झाले आहे श्रीबद्रीनारायणाची यात्रा तर 'श्रीशकराचार्य वाडीकर जेरेस्वामी महाराज याचे समवेत' सुदर अशी झाली तसेच सद्गुरु टेंबेस्वामी महाराज याची सचारस्थळहि प्रत्यक्ष अवलोकन केली आहेत साराश भारतीय सर्व प्रमुख यात्रा, क्षेत्रे, तीर्थे, सगम वगैरे सर्व वामनरावानी केली आहेत त्याचे यात्रावर्णन एक ग्रथच होईल इतकी रम्य हकीकत त्यामध्ये आहे या ठिकाणी स्थलसकोचत्वामुळ त्याच्या आयुष्यातील फक्त धावती नजर ठेवूनच लिहीत आहोत

## वामनरावजींच्या आयुष्यातील सुवर्णमय उत्तरार्ध

सद्गुरु टेंबेस्वामी महाराज समाधिस्थ झाल्यानतर योग शास्त्रातील तज्ज्ञ मडळीस भेटून आपल्याला उर्वरित योगज्ञान कोण देईल अशी रात्रदिवस तीव्र तळमळ वामनरावाना लागून राहिली होती त्याकरिता ते कोणी अधिकारी दिस त्यास त्याना भेटत असत

श्रीक्षेत्र पुष्कर येथ एक प प ब्रह्मानद स्वामी नावाचे मोठे अधिकारी व साक्षात्कारी योगी आहेत असे समजले तव्हा वामनराव त्याचेकडे एक महिनाभर जाऊन अभ्यासाकरिता राहिले मागाहून वैद्य मास्तरहि पुष्करला आले होते स्वामींनी चागले मार्गदर्शन केले

### हुदगा वा ट

हुदगानाहेम स्वरा घागान श्रीदत्तमन्दिरात श्रीगोविंद महा

राज पडीत याचा मुक्काम आहे असे समजले. त्याची योगाभ्यासातील तयारी चागली होती. श्रीसीतारामपत महाराज यानी पूर्वी हुशगाबादेस मुक्काम असताना त्याचे शिष्य मडळींनी मुद्दाम त्या ठिकाणी अभ्यासास येणाऱ्या साधकाकरिता ५–६ बगले बाधून ठेवले आहेत अशा प्रकारची सर्व सोय आहे असा विचार करून वामनरावजी हुशगाबादेस श्रीगोविंद महाराजाकडे अभ्यासास म्हणून आले. सन १९२२ च्या 'गणेशचतुर्थीस' जाणे झाले. साक्षात् मुहूर्तमार्तंडाचे त्या दिवशी आगमन होते मग सत्कार्यास निघालेल्या वामनरावजींचे कार्य सफल का होणार नाही

## कुडलिनी जागृत व्हावी ही महत्त्वाकाक्षा

वामनराव हुशगाबादेस आले तेथे ३–४ महिने मुक्काम झाला. तेथे त्याचे अगोदर नुकतेच 'शकरराव आजेगावकर व बाबा महाजन' हे उभयताही याच उद्देशाने आले होते 'मागाहून वैद्य मास्तरही पुष्कळ काही दिवस राहून हुशगाबादेस आले.' ही सर्व मडळी गोविंद महाराज याचे देखरेखीखाली अभ्यास करीत होती. 'तुमची कुडलिनी जागृत करून देतो असे त्यानी आश्वासनही दिले होते '

## वामनरावांची योगाभ्यासातील तयारी

वामनरावाची अभ्यासाची तयारी फारच उत्कृष्ट होती त्याचे ब्रह्मचर्य, उपासना, शुद्धाचार, शास्त्रनिष्ठा वगैरे सर्वच अनुकूल होते तेव्हा त्याचा अधिकार पाहून त्याना श्रीगोविंद महाराजानी पुढील प्राणायाम-पद्धति सागितली व त्याप्रमाणे अभ्यास करण्यास लावले हा कुडलिनी चालनाचा हठयोगातर्गत श्रेष्ठ दर्जाचा प्राणायाम व काही क्रिया फारच कष्टमय आहेत परतु तसा तीव्र जिज्ञासू, मुमुक्षू, साधक त्या सर्व सहन करून तितिक्षापूर्वक अभ्यास करतो तसेच वामनरावहि हा अभ्यास करीत होते. या त्यांच्या कष्टमय जीवनाची किंवा प्रखर तपश्चर्येची दयाघन प्रभू परमात्म्यास व सद्गुरु टेंबेस्वामी महाराज याना दया आली व त्यानी या सर्व यातनेमधून वामनरावाना मुक्त करण्याचे उद्देशाने एक अनपेक्षित व महत्त्वाची अशी घटना घडविली

## नागपूरचे श्री. दादासाहेब पराडे

या वेळी हुशगाबादेस नागपूरचे श्री दादासाहेब पराडे म्हणून एक सब् जज्ज होते. पुढे ते डिस्ट्रिक्ट जज्ज होऊन सेवानिवृत्त झाले. ते सरकारी नोकरीतील चागले कायदेतज्ज्ञ होते. ते आग्ल विद्याविभूषित जरी होते तरी अत्यत सात्त्विक वृत्तीचे, सदाचार सपन्नता व शास्त्रावरील नितात निष्ठा असून याना योगाभ्यासाचीही आवड व प्रेम होते या वेळी योगायोग असा आला की, 'एक बगाली तरुण तेजस्वी स्वामी' हुशगाबादेस आले व तेथील मगळवार घाटावर उतरले होते हे कोण ?

## श्रीमत् प. प. चिन्मयानन्द (बंगाली स्वामी) महाराज

बगालमध्ये ढाक्का या शहरामध्ये एक देवीचे उत्तम जागृत असे स्थान आहे या देवीच्या पुजाऱ्याचे घराणे मोठे देवभक्त असून देवीची पूजा-अर्चादि उपासना उत्तम करून असत त्या पुजाऱ्यास एक पुत्ररत्न झाले त्याचे नाव 'श्रीयोगेशचंद्र चक्रवर्ती' असे होते बालपणापासून हा मुलगा तेजस्वी, महान् भगवद्भक्त व वैराग्यशील असा दिसून आला. मातृभाषेचे व इग्रजी शिक्षण घेऊन या मुलाने ज्यूट फॅक्टरीमध्ये काही दिवस थोडीशी नोकरी केली. त्याचा परमार्थाकडे ओढा असल्यामुळे त्याने ती नोकरी सोडून देऊन घरी कोणासही काहीच न कळविता 'थेट श्रीकाशी क्षेत्र गाठले'

## प. प. स्वामी शंकर पुरुषोत्तमतीर्थ

या मुलास साधुसताच्या भेटीची आवड असल्यामुळे यानं एक दिवशी काशीस छोटी गैबी येथील आश्रमात जाऊन प. प. स्वामी शकर पुरुषोत्तमतीर्थ याची भेट घेतली. या तरुण व तेजस्वी मुलास पाहून स्वामींना फार सतोष वाटला व त्या मुलास आपल्याजवळ ठेवून घेतले काही दिवस स्वामीचे सहवासात राहून या मुलाने स्वामीची नितात सेवा केली व त्याचे प्रेमही सपादन केले. तसेच स्वामीचेबरोबर हरिद्वार, हृषिकेश डेहराडून वगैरे ठिकाणी प्रवासही केला

## गु रु कृ पा

'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया।
उपदेक्ष्यति ते ज्ञानं ज्ञानिनस्तत्त्व दर्शिन ॥

स्वामी महाराजांना ती बालमूर्ति, (वय लहान असून आचार संपन्नता, प्रखर वैराग्य, शास्त्रावरील नितांत निष्ठा, एकांतवासप्रियता, गुरुसेवा-तत्परता, वगैरे सद्गुण) पाहून प्रसन्न चित्ताने त्यांचेवर अनुग्रह केला त्याला 'आपली शक्तिपात् साम्प्रदायिक दीक्षा देऊन कृतार्थ केले.

## शक्तिदेवीचीच कृपा

पूर्वीचीच उत्तम तयारी, 'शक्तिदेवीचा तो प्रसाद' मिळाल्यामुळे आनुवंशिक संस्कारांचे सिंहासन तयार होते व त्यामध्ये काशीस शक्तिपात सांप्रदायाचे विद्यापीठ चालविणारे कुलगुरु श्री प. प. स्वामी शंकर पुरुषोत्तमतीर्थ यांचेसारखे सद्गुरु भेटून प्रसन्न चित्ताने दीक्षा दिली एवढेच नव्हे, तर दीक्षा देण्याचा अधिकारहि बहाल केला त्यामुळे या ब्रह्मचारी बाळाचे तेज अप्रतिम वाढले ते येवढे की सामान्य माणस त्यांचे नजरेस नजर देऊ शकत नव्हता

श्रीशंकर पुरुषोत्तमतीर्थांची परंपरा फार उज्ज्वल होती त्यांचे गुरु 'श्रीस्वामी नारायणतीर्थ व परमगुरु श्रीस्वामी गंगाधरतीर्थ हे मोठे अधिकारी व साक्षात्कारी महापुरुष होऊन गेले या आश्रमात श्रीशंकराचार्यांचे मंदिर आहे तसेच येथे पारायण व गोसेवा नित्य चालू आहे त्याचप्रमाणे सुंदर दुर्मिळ ग्रंथांचे संग्रहालयही आहे 'योगवाणी व गुरुवाणी ही दोन पुस्तके शक्तिपात् सांप्रदायाची निदर्शक आहेत'

## श्रीयोगानंद महाराज, हृषिकेश

वासाची आवड म्हणून ते काही दिवस गंगाकाठी टेहरीचे जंगलात वास्तव्य करून होते त्या वेळी त्यांची अवस्था

गंगातीरे हिमगिरिशिला बद्धपद्मासनस्य ।
ब्रह्मध्यानाभ्यसन विधिना योगनिद्रां गतस्य ।
किं तैर्भाव्यं मम सुदिवसैर्यत्र ते निर्विशंकाः ।
कंडूयंते जरठ हरिणा शृंगमंगे मदीये ॥

या भर्तृहरींच्या उक्तीप्रमाणे झालेली होती बसल्या बसल्या बोलता बोलता ते समाधि अवस्थेत जात असत

## हुशंगाबादेस आगमन व यदृच्छेने वामनरावांची भेट

'हे बंगाली स्वामी हुशंगाबादेस नर्मदा तीरी मंगळवार घाटावर उतरले' होते एके दिवशी हे स्वामी चतुर्जी नावाच्या बंगाली वकीलाकडे माधुकरीस आले त्यांना पाहताच चतुर्जी वकीलांना समाधान वाटले त्यांनी त्यांची विचारपूस केली त्यावेळी बोलण्यात चतुर्जी वकीलांनी ही हकीकत पराडे सब जज्ज यांना सांगितली कोणीहि सत्पुरुष आले की त्यांची भेट घेण्याचा पराडे यांना नादच असे हे चतुर्जींना माहीत होते म्हणून त्यांना कळविले लगेच संध्याकाळी चतुर्जी व पराडे या स्वामींना येऊन भेटले व त्यांचे दर्शन घेतले किंचित् विचारपूस केली त्या उभयतांना स्वामींची तेजस्वी बालमूर्ति पाहून फारच आश्चर्यकारक असे कौतुक वाटले निघताना पराडे यांनी त्या बंगाली स्वामींना आपल्याकडे भिक्षेचे निमंत्रण दिले

## बंगाली स्वामींचा अधिकार

ठरल्याप्रमाणे स्वामी भिक्षेस आले भोजनोत्तर सहज बोलणे चालले असताना योगाभ्यासाचा विषय निघाला तेव्हा ओघाओघाने संधि साधून पराडे यांनी स्वामी महाराजांना असे विचारले की, 'महाराज! आपण नेहमी प्रवास करीत असता तेव्हा तरुणांसाठी वेध दीक्षा देणार कोणी असे त्यांचे आपल्या पाहण्यात आहेत काय?' असे विचारताच ते स्वामी हसून उद्गारले की, 'होय तसे दीक्षा देणारे माझे पाहण्यात आहेत' हे ऐकून त्या जिज्ञासु वृत्तीच्या पराडे साहेबांना फारच उत्कृष्ट आनंद वाटला व लगेच त्यांनी त्या स्वामींना प्रार्थना केली की 'असे दीक्षा देणारे अधिकारी महापुरुष कोण व कोठे आहेत हे आम्हास



दंडधारी श्री. प. प. श्री लोकनाथतीर्थ महाराज

योगिराज श्रीवामनरावजी गुळवणी महाराज



श्री गुळवणी महाराजांची योगसाधना
अर्धमत्स्येन्द्रासन



श्री गुळवणी महाराजांची चित्रसाधना



श्री गुळवणी महाराजांची चित्रसाधना

आपण कृपा करून सांगाल तर आम्ही आपले अत्यंत ऋणी होऊ.' हे ऐकून स्वामी एकदम उद्‌गारले की, 'तशी दीक्षा देणारा मीच आहे.' हे ऐकताच पराडे अगदी स्तंभितच झाले व आश्चर्ययुक्त परमहर्ष होऊन स्वामींकडे सारखे पहातच राहिले. थोड्या वेळात स्वामी स्वस्थळी रवाना झाले.

श्री. पराडे यांनी ही सर्व हकीकत श्रीवामनराव प्रभृतींना सांगताच 'ज्याची आपण चातक पक्षाप्रमाणे मार्गप्रतीक्षा करीत होतो तेच हुडागानादेस येतात काय व स्वत. आपण कोण आहोत याची स्पष्ट कल्पना देतात काय. हा सर्व ईश्वरी चमत्कार पाहून सर्वांना प्रभु दयाघनाच्या कृपेचे आश्चर्य वाटले.'

## नमुना दीक्षा

नंतर वामनराव प्रभृति सर्व मंडळी स्वामींचे दर्शनास गेली. स्वामींचे अधिकारांची प्रचीति घेण्याचे उद्देशाने श्री. पराडे यांनी तेथील एक श्री. नारायणप्रसाद, एम. ए., एल्‌एल्. बी., वकील यांना दीक्षा मिळावी या उद्देशाने श्रीस्वामींच्याकडे पाठविले. ज्या वेळी हे गृहस्थ स्वामीजीं कडे गेले तेव्हा त्यांनी स्वामीजींना 'उभे उभा राहूनच नमस्कार केला' आधुनिक सुशिक्षितात विनम्रभाव मुळीच दिसून येत नाही. ही गोष्ट स्वामीजींचे चटकन् लक्षात आली व त्यांनी ती पुढे वामनराव यांचेजवळ बोलूनहि दाखविली.

श्री. नारायणप्रसाद यांना स्वामीजींनी आपले समोर डोळे मिटून बसण्यास सांगितले. 'श्रीस्वामी महाराजांचा दीक्षारूपी प्रसाद' होताच त्या वकीलास स्वत चे 'शरीरात अनेक प्रकारच्या हालचाली व क्रिया चालू झाल्याचा अनुभव येऊ लागला स्वामी आज्ञेवरून दररोज अभ्यासास बसू लागताच त्यांना विविध अनुभव येऊ लागले. 'हे पाहून श्री. पराडे, वामनराव, आजेगावकर प्रभृतींची श्रीस्वामी महाराजांच्या दीक्षा दातृत्वाच्या अधिकाराची खात्री पटली'

## वामनरावांचे सान्निध्यात स्वामीजी

पुढे काही दिवसांनी वामनराव वरचेवर स्वामी महाराजा कडे जात येत असल्यामुळे चांगलाच परिचय झाला. स्वामी महाराज जेथे रहात होते तेथे असावी तशी सोय नव्हती उलट उपसर्ग होता. हलक्या 'कल्पनातील हे संन्यासी' असल्यामुळे मंडळी यांची थट्टा-मस्करीच करीत असत. हे पाहून वामनरावांनी त्या ठिकाणाहून आपल्याकडे रहा यास यावे अशी श्रीस्वामीजींना प्रार्थना केली. ती लगेच मान्य करून स्वामीजी वामनरावाचे सान्निध्यात येऊन राहिले. त्या वेळी वामनरावाच्या मातुश्री तेथे असल्यामुळे स्वामीजींच्या भिक्षेचीही सोय झाली. ही योजना झालेमुळे स्वामीजींना चांगलेच स्वास्थ्य लाभून समाधान वाटले.

## इतर दीक्षा

नंतर श्री. पराडे यांना दीक्षा मिळून चांगले अनुभव सुरू झाले तेथे प. सातवळेकर यांचे सूचनेवरून प्राणा यामाचा अभ्यास करीत असणारे एक 'पूर्णानन्द' नावाचे आर्यसमाजी यांना दीक्षा झाली ही दीक्षा होताच त्यांना एक जबरदस्त खाती झाली व स्वामींना जुलाब सुरू झाले असे होताच स्वामींनी त्यांना विचारले की 'पूर्वी तुला कोणी विष घातले होते काय?' यावर त्यांनी पूर्वी आपणावर तीन वेळा विषप्रयोग झाला होता असे सांगितले. हे ऐकून स्वामीजींचे निदान किती अचूक आहे हे पाहून सर्व मंडळी चकितच झाली स्वामीजी म्हणाले, 'हे शास्त्र फार नाजूक आहे. यामध्ये जितके चांगले आहे तितकेच धोकेही फार आहेत. प्रभुकृपेनेच याचे संरक्षण होते.'

हिंगोलीचे बाबा महाजन यांना परत जाण्याची घाई होती स्वामींची प्रकृतीही बरी नव्हती म्हणून 'पुढे पाहू' असे प्रथम म्हणाले परंतु निघताना त्यांची स्वामींना दया आली व दीक्षा दिली. बाबांना ब्रह्मानंद झाला. 'हे बाबा एक तास मच्छेंद्र पीठासन करीत होते.'

## वामनरावांची प्रार्थना व स्वामीजींचा सांप्रदायिक मर्यादा विनय

नंतर पुढे वामनराव यांनी दीक्षेविषयी सूतोवाच केले त्यावेळी स्वामीजी म्हणाले की 'तुम्ही हल्ली श्रीगोविंद महाराज पंडित यांचे सूचनेनुसार अभ्यास करीत आहातच व तो अभ्यासहि चांगला आहे व हे एकाचे तत्रानें चाल असलेल्या कार्यक्रमात दुसऱ्याने हात घालणे योग्य नाही, असे सांगून 'स्वामीजींनी सांप्रदायिक मर्यादा-विनय व्यक्त केला. पुढे वामनरावजींचा व स्वामीजींचा परस्पर घनिष्ट ऋणानुबंध जडल्यामुळे व वामनरावांनी अभ्यासातील उत्तम

तयारी पाहून, 'त्याचा व्यक्तिगत अधिकार जाणून एके दिवशी अनपेक्षितपणे श्रीस्वामी महाराजानी वामनरावाना दीक्षा दिली.' दीक्षा देताच वामनरावावर त्याचा फारच चांगला परिणाम झाला व त्याना पुढील महत्वाचे अनुभव चटपट येऊ लागले व प्रगति दिसून आली. बरेच दिवसाची त्याची मनीषा व केलेल्या भगीरथ प्रयत्नाना यश आले हे पाहून वामनरावाना परम संतोष झाला.

## वामनरावाची दीक्षा व परांडे याची मनीषा

वामनरावजींसारख्याना ही दीक्षा मिळाल्यामुळे श्री. परांडे याना फारच समाधान वाटले. परांडे हे वामनरावाची योग्यता व अधिकार जाणून होते. इतकेच नव्हेतर एके दिवशी परांडे यानी वामनरावजींजवळ असे उद्‌गार काढले की — 'वामनराव! ही अत्यत महत्वाची उज्वल विद्या आपले महाराष्ट्रात आली पाहिजे, असे मला फार तळमळपूर्वक वाटते.' हे त्याचे मुखातून निघालेले 'उद्‌गार नव्हे भविष्यवाणी' जगन्नियत्या त्रिकालज्ञ प्रभूनीच प्रकट केली, असे पुढे अनुभवास आले.

## दुशंगाबादेत वाडीदर्शन

वामनरावाचा 'प्रतिवर्षी गुरुद्वादशीस जाण्याचा नियम' फार दिवसाचा आहे. एकदा बार्शीहून वाडीस आले होते. या खेपेस फक्त त्याचे वाडीस जाणे झाले नाही. याची त्याना जाणीवहि होती परतु प्रभू इच्छाच अशी होती की त्याना हुशंगाबादेसच ठेवून त्याच्या आयुष्यातील अत्यत क्रांतिकारक अशी घटना नव्हे भवितव्यता सर्वज्ञ मुकुटमणी भगवान योगीराज दत्त महाराज यानी पूर्वीच ठरविली होती. नाही तर त्या शिवाय आपल्या योगमार्गाचा दत्तसाप्रदायाचा प्रचार होणार कसा? ही त्या जगन्नियत्याम काळजी होती म्हणूनच त्यानी 'श्रीस्वामीजींचा व श्रीवामनरावजींचा भेट-दर्शन-दीक्षा योग घडविला.'

## हुशंगाबाद ते हिंगोली–बार्शी

हुशंगाबादचा मुक्काम आटोपून श्रीवामनराव, शंकरराव आजेगावकर, मातुश्री उमाबाई ही मडळी श्रीस्वामी महाराज याचेसह हिंगोलीस आली. फक्त वैद्य मास्तर कार्तिकीकरिता थेट पढरीस गेले. हिंगोलीहून स्वामी महाराजाचा निरोप घेऊन वामनराव मातुश्रीसह बार्शीस परत आले व स्वामी महाराज हिंगोलीस थोडे दिवस राहून हुशंगाबादला परत गेले.

## श्रीस्वामी महाराजांचे बार्शीस आगमन

श्रीस्वामीजींचा व वामनरावाचा अत्यत जिव्हाळ्याचा ऋणानुबंध जडला होता. त्यामुळे वामनरावाचे बोलावण्या वरून श्रीस्वामीजी बार्शीस तीन वेळा आले. पहिले खेपेस वामनरावाचेकडे मुक्काम होता. दुसरे खेपेस प्रल्हादशास्त्री याचेकडे मुक्काम होता व तिसरे खेपेस श्रीभगवत मदिरात मुक्काम केला होता.

## वामनरावजींना लाभलेले परिसत्व

श्रीस्वामी महाराजाची भेट व दीक्षा होताच वामन रावजींचा व्यक्तिश उन्नतीच्या दृष्टीने प्रश्न अत्यत समा धानकारक रीतीने सुटलेला होता व त्यामध्ये त्याचे समाधानहि होते. स्वामी महाराजाचा कृपा वरदहस्त प्राप्त होऊन सुवर्ण प्राप्ती तर झालीच होती. परतु अद्याप 'परिसत्व' मात्र प्राप्त झालेले नव्हते. गुरुमाऊली केवढी दयाघन असते.

'आपणासारिखे करिती तात्काळ। नाही काळवेळ तयालागी'

या सत वाक्याची सत्यता व प्रचीति आली.

योगायोग असा की श्रीस्वामी महाराज बार्शीस आले असे समजताच सोलापुराहून बापू कुबडे हे स्वामीजींचे दर्शनास आले. वामनरावजी बार्शीस नोकरीस आल्यानतर त्यानी वैद्यमास्तर, प्रल्हादशास्त्री, मुगुटकर वकील, नारायण राव परदरे, बापू कुबडे, व्यकू कुलकर्णी प्रभृतींना योगा भ्यासातील आसन, प्राणायाम व काही क्रियाचा अभ्यास शिकविला होता बापू कुबडे यानी श्रीस्वामी महाराजाचे विषयी वामनरावजी व वैद्यमास्तर याजकडून सर्व ऐकले होते. स्वामीजी बार्शीस आलेवर मुगुटकर वकील व नारा यणराव पुरदरे याना स्वामीजींकडून दीक्षा मिळाली होती शास्त्रीबुवाचीहि इच्छा होती परतु त्याना त्या वेळी बार्शीस दीक्षा न मिळता पुढे हुशंगाबादला जाऊन दीक्षा मिळाली. शास्त्रीबुवाबरोबर वामनरावहि गेले होते.

## बापू कुबडेना श्रीस्वामीजींचे आश्वासन

वरील सर्व मडळींना दीक्षा मिळाल्यानतर बापू कुबडे

यानाहि आपणास दीक्षा मिळावी असे वाटणे साहजिक होते म्हणून ते चार दिवसांची रजा घेऊन सोलापूरहून नार्शीस याच उद्देशाने आले व श्रीस्वामी महाराज याना दीक्षेबद्दल प्रार्थना केली. स्वामीजींनी अद्याप वय ल्हान आहे, इतक्यात काही नको असे सांगितले. परंतु बापू कुंडे यांचे त्यायोगे समाधान झाले नाही. त्याना अत्यंत वाईट वाटले. नेत्रावाटे अश्रू आले. वामनरावजींनी व शास्त्रीबुवानी त्याची समजूत घातली. रजा संपताच परत सोलापुरी नोकरीवर जाणे जरूर आहे म्हणून निघताना बापूनी श्रीस्वामी महाराज यांचे चरणावर सद्‌गदित अंत:करणाने मस्तक ठेवले व आशिर्वादाची याचना केली. त्या वेळी तेथे वामनरावजी, शास्त्रीबुवा, वैद्यमास्तर, मातुश्री उमाबाई व भगिनी गोदुताई असे होते. स्वामीजींना नमस्कार करून नंतर वामनरावजी प्रभृति इतराना नमस्कार करून निघताना बापूनी श्रीस्वामीजींकडे दृष्टिक्षेप करताच स्वामीजींचे दयार्द्र अंत:करण हालले व असे वाक्य मुखातून बाहेर पडले की, 'तुम्हारी इच्छा पुरी होगी, वामनराव उनको देख लेंव' हे ऐकताच सर्वांना आनंद झाला. बापूनी पुन्हा स्वामीजींना साष्टांग नमस्कार करून सोलापुरची वाट धरली

## वामनरावजींना दीक्षाधिकारत्वाची प्राप्ती

बापू कुंदे, व्यंकू कुलकर्णी याना वामनरावानीच योगाभ्यास शिकविलेला असलेमुळे त्यांचे सद्‌गुरूत्व श्रीवामनरावजींकडे आहे हे स्वामीजींनी जाणले व अशा सद्‌गुरूत्वास लागणारी सर्व सामग्री श्रीटेंबेस्वामी महाराजांच्या कृपा आशीर्वादाने वामनरावजींनी संपादन केलेली आहे, हा त्यांचा अधिकार स्वामीजींनी आपल्या सहवासातच जाणला म्हणून त्याना या 'योगशास्त्रातील शक्तिपात रहस्यात्मक तंत्रशास्त्रीय वेध दीक्षा देऊन कृतार्थ केले, इतकेच नव्हे तर हा दीक्षा देण्याचा अमोल अधिकारहि या नार्शीच्या मुक्कामात बहाल केला' वामनरावजींना केवढी कृतार्थता वाटली असेल! इतर सर्वांना मात्र धन्यता वाटली व वामनरावांविषयींचा आदर शतदा: वृद्धिंगत झाला

## सद्‌गुरुत्व व प्रथमचे तीन दीक्षा प्रयोग

शास्त्रीबुवाना दीक्षा मिळाल्यानंतर त्यांच्या पत्नींनाहि आपणास दीक्षा मिळावी, अशी इच्छा झाली व ती त्यांनी वामनरावजी याना निवेदन केली

'ना पृष्ट: कस्यचित् ब्रुयात' व 'तद्विद्धि प्रणिपातेन परिप्रश्नेन सेवया'

या शास्त्रउद्देशानुसार शास्त्रीबुवांच्या सहधर्मचारिणी सौ. गोपिकाबाई याना एक शुभ दिवस पाहून वामनरावजींनी प्रथम दीक्षा देण्याचा हा शुभारंभ म्हणजे एक 'ही शक्तिपूजाच होती.' आदिशक्ति स्वरूप कुंडलिनीच्या उत्थापनाच्या कार्याची सुरुवात एका सात्त्विक अधिकार संपन्न सुवासिनीकडून झाली हीच एक प्रकारची शक्तिपूजा होय.

लगेच वामनरावांचे बापूस सोलापुरी पत्र आले की, 'मी अमके दिवशी येथून निघून वाटेत औंढीस व्यंकू कुलकर्णी यांचेकडे जाऊन नंतर सोलापुरी येत आहे. 'स्वामी आज्ञेनुसार कार्य झालेले आहे.' त्याप्रमाणे दुसरी दीक्षा व्यंकू कुलकर्णी यास देऊन सोलापुरी आले व बापू कुंडे याना तिसरी दीक्षा देऊन कृतार्थ केले या तिन्ही दीक्षा चांगल्या यशस्वी झाल्याचे पाहून व श्रीस्वामी महाराजांनी वामनरावजींना या त्यांच्या सांप्रदायिक पद्धतीची दीक्षा देण्याचा अधिकार दिला आहे हे ऐकताच वामनरावांच्या कृपाछत्राखालील सर्वांना ब्रह्मानंद झाला

## वामनरावजींच्या आयुष्यातील उत्कर्ष

वामनरावजींच्या आयुष्यातील हा सर्वात मोठा उत्कर्ष होय. आजपर्यंत वामनरावजी मुमुक्षु, जिज्ञासु, साधक व गुरुभक्त होते ते शेवटी गुरु झाले. परंतु अद्याप पर्यंत त्याना 'सद्‌गुरुत्व' प्राप्त होणेचे राहिले होते. ते हे श्रीस्वामीजींच्या कृपेने प्राप्त झाले या त्यांच्या भाग्योदयात अनेकांचे भाग्य साठविलेले होते. या दिवसापासून वामनरावजी हे सद्‌गुरु गुळवणीमहाराज, योगिराज गुळवणी महाराज, या नावाने संबोधिले जाऊ लागले व श्री. दादासाहेब पराडे याना आपली सदिच्छा व भविष्यवाणी सत्य झाली याबद्दल धन्यता वाटली

## कल्याण मासिकानी कल्याणकारक केलेली प्रसिद्धी

सद्‌गुरु वामनराव महाराजांना हा अधिकार प्राप्त झाल्यावर ते स्वत: प्रसिद्धि पराङ्मुख असलेमुळे त्यांनी यांची

कोठेही वाच्यता न व्हावी म्हणून बरीच दक्षता घेतली होती. परंतु कस्तुरी मृगाने कितीही लोकेपणा टाळण्याचा प्रयत्न केला तरी त्याच्या नाभिकमलामधील कस्तुरी ही आपला सुगंधाचा प्रभाव पसरून दिगंत कीर्ति करतेच. तद्वत् वामन रावजींचेही झाले. त्यांची प्रसिद्धि अगदी प्रथम जर कोणी केली असेल तर ती 'पूर्वाश्रमीचे प. त्र्यंबकशास्त्री खरे, नागपूरचे डॉ. खरे यांचे बंधू यांनी गोरखपूरच्या कल्याण मासिकाच्या योगांक या जाडा मोठ्या वार्षिक अंकामध्ये वामनरावजींची अधिकृत प्रसिद्धी केली ' या खरे शास्त्रींनी पुढे चतुर्थाश्रम घेऊन श्रीशंकराचार्य पीठावर आरोहण केले होते. यांना या विषयाची फार आवड होती. वामनरावांच्या समक्ष भेटीत त्यांना फार संतोष झाला. या प्रसिद्धीनंतर अखिल भारतामधून अनेक साधकांची सद्गुरु वामनरावजींकडे रीघ लागली.

## गुरुमहाराजांचे पुण्यपत्तनी आगमन व नाना भालेराव यांची भेट

सन १९२६ साली गुरुमहाराज काशीहून पुण्यास आले. काशीस असेपर्यंत गुरुमहाराजांच्या घरची सर्व व्यवस्था वैद्यमास्तर-बापू-त्र्यंबक वगैरे पहात असत. पुणे येथे आल्यावर एवढ्या मोठ्या शहरात अशा सत्पुरुषाची सेवा करण्यास कोण मिळणार अशी आम्हास काळजी निर्माण झाली परंतु जगन्नियंता प्रभू गुरुमहाराजांची काळजी वाहत होता. त्याने डोंगजे येथील श्रीयुत भुजंगरावनाना भालेराव यांना त्यांच्या मोत्यासारख्या हस्ताक्षराचे आधारे पुणे येथे कोर्टात नोकरीस आणले व लगेच वैद्य मास्तरांनी त्यांना गुरुमहाराजांचे सेवेस लावले. ते आजतागायत श्रीगुरुसेवा नितांतपणे करीत आहेत. इतकेच नव्हे तर त्यांच्या सहधर्मचारिणी सौ. गोदूबाई व चिरंजीव भालचंद्र, नारायण, योगेश प्रभृती सर्व कुटुंबाचे गुरुसेवा हे जीवनव्रत बनले आहे.

## निवासस्थान-२०, नारायण पेठ, गोवर्धकर बिल्डिंग, पुणे २

कॉंट्रॅक्टर दादासाहेब गोवर्धकर यांचे बिल्डिंगमध्ये गुरु महाराज येऊन राहिले. दादासाहेब, त्यांच्या पत्नी माई व मुले, मुली, सुना वगैरे सर्व कुटुंबियांनी गुरुमहाराजांना भाडेकरी न समजता कुटुंबीय समजून आदरयुक्त आज नागायत ३६ वर्षे मोठ्या प्रेमाने वागविले व त्यांची आपुलकीने विचारपूस केली. या जागेचे केवढे भाग्य की या जागेत या तीन तपात गुरुमहाराजांचे वास्तव्य असलेमुळे अनेक प्रकारची धार्मिक अनुष्ठाने झाली. हजारोंनी अन्नदान घडले. अनेक साधुसत्पुरुषांचे आगमन व वास्तव्य झाले व शेकडो मुमुक्षु-साधक आपल्या आत्मोन्नतीचे साधन प्राप्त करते झाले. त्यामुळे या '२०, नारायण पेठ, पुणे-२ गोवर्धकर बिल्डिंगचा डिंडिम अखिल भारतात गाजून राहिला ' नोकरी असेपर्यंत गुरुमहाराज घरभाडे नियमित देत असत. सेवानिवृत्तीनंतर 'गुरुभक्त नारायणराव मोघे ' हे आजतागायत घरभाडे देत आले आहेत.

## प. प. चिन्मयानन्द हे स्वामी लोकनाथतीर्थ झाले

स्वामीजींचे गुरुमहाराजांकडे काशीस दोन-तीन वेळा येणे झाले. नंतर स्वामींच्या नजरेत सहज आले की, भारतातील इतर सर्व प्रांतापेक्षा या महाराष्ट्रात शास्त्रीय आचाराचे परिपालन समन्वयात्मक दृष्टिकोनातून सुंदर होत आहे. येथे दुराग्रह नाही परंतु शास्त्रीय मर्यादाभंगही नाही. दंडधारी चतुर्थाश्रम सन्यासी यांना जो मान आदर आहे तितका अदंडी स्वामीस नाही. हे पाहून स्वामींनी काशीस आपले सद्गुरु स्वामी श्रीशंकर पुरुषोत्तमतीर्थ यांचेकडून दंड धारण केला व त्या वेळी सद्गुरूंनी स्वामींचे नाव स्वामी लोकनाथतीर्थ असे ठेवले.

## स्वामी लोकनाथतीर्थांचे पुणे येथे आगमन

गुरुमहाराज पुणे येथे आल्यानंतर त्यांचे बोलावण्यावरून स्वामीजी पुण्यास चार वेळा आले. तीन वेळा गुरुमहा राजांकडे २०, नारायण पेठ येथेच मुक्काम होता. एका खेपेस श्री. शंकरराव मार्कंड यांचेकडे मुक्काम होता. पुणे येथे श्री. भुजंगराव भालेराव, वासुदेवराव भालेराव, सरदार बापूसाहेब नातू, श्री बापूसाहेब मिटकर, शंकरराव मार्कंड प्रभृतींना स्वामीजींकडून दीक्षा मिळाली.

## श्री. बापूसाहेब मिटकर यांना दूरदर्शन सिद्धीची प्राप्ती

श्री. बापूसाहेब मिटकर हे मोठे अधिकारी असून

गुरुमहाराजांचा व त्यांचा अत्यंत आत्मीयतेचा ऋणानुबंध आहे उभयतांचे एकमेकाकडे नित्य जाणेयेणे आहे. स्वामीजींकडून दीक्षा मिळाल्यानंतर बापूसाहेब यांना दूरदर्शन ही सिद्धी प्राप्त झाली आहे. तेव्हापासून त्यांचेकडे अनेक लोकांची भेटण्यास रीघ लागलेली आहे.

श्रीयुत शंकरराव मार्कंड हे एक महान् निष्ठावान् गुरुभक्त असून त्यांनी स्वामीजींची फार नितांत सेवा केली आहे तसेच पुणे येथील श्री. अन्नालाल शेठजींकडेही एक महिना स्वामीजींचा मुक्काम होता. त्या वेळी भगवतराव उपाध्ये सेवेस होते.

## स्वामीजींचे नाशिक येथील वास्तव्य

श्रीक्षेत्र नाशिक येथे पंचवटीमध्ये श्री. नानासाहेब मुटे यांनी एक गोरारामंदिर बांधले असून तेथे चतुर्थाश्रमी स्वामी संन्यासी यांची रहाण्याची, भिक्षेची वगैरे सर्व व्यवस्था करून एक ट्रस्ट केलेला आहे. त्या ठिकाणी स्वामीजी काही दिवस वास्तव्यास आले होते. त्या वेळी तेथे श्रीकेशवस्वामी श्रीरामाश्रमस्वामी, श्रीभगवानस्वामी, श्रीगणेशानंदस्वामी व श्रीचिदानंदस्वामी एवढी स्वामी मंडळी होती. श्रीभगवान स्वामी हे बापू कुंडे यांचे चुलत बंधु होते. बुवा गुरुमहाराजांचा व भगवानस्वामींचा चांगलाच परिचय होता. सगमनेरी या भगवानस्वामींनी आश्रम स्वीकारापूर्वी आपले सद्गुरु राजाराममहाराज यांचे घरी प्रवरा नदीची सोनळ्यामध्ये २४ वर्षे कावड वाहून सेवा केली

## स्वामी लोकनाथ-तीर्थांचा अधिकार व निर्याण

यदृच्छेने श्रीस्वामीजींचा व गुरुमहाराजांचा संबंध घडला. उभयतांचे एकमेकावर आत्मीयतेचे निरलस प्रेम व त्यामधून अनेक-शकडो-हजारो साधकांच्या भाग्योदयाची बीजे निर्माण होऊन गुरुकृपेचा बगीचा निर्माण झालेला आपणास दिसत आहे

स्वामींच्या सहवासात थोडा वेळ जरी बसले तरी त्यांच्या सहज सुलभ समाधि अवस्थेचा आनंददायक लाभ पहावयास मिळे. आम्ही अनेक वेळा तो आनंद लुटला आहे. बोलता बोलता एकादा अंतर्मुख वृत्तींचा विषय निघाला की—

**कंपतिल चचल येतो गुरुतर मंदक जात परितोषा ।**
**होते हृदयगुहायां चिरतरमेकैव चिन्मयी मुद्रा ॥**

अशी अवस्था होऊन समाधी लागे.

पुढे स्वामीजी काशीस गेल्यावर गुरुमहाराज स्वामींना दरमहा पन्नास रुपये शेवटपर्यंत पाठवून तेथील शिष्य जानवतसिंह यांचे मार्फत त्यांनी स्वामीजींची व्यवस्था ठेवली होती

पुढे स्वामीजींना निर्याणाचा-परमात्म्याचा संदेश आला. तेव्हा गुरुमहाराज स्वामीजींकडे काशीस जाऊन त्यांच्या सान्निध्यात राहिले. त्या वेळी सोलापूरचे मोहोळकर वकील पत्नीसह व शंकरशास्त्री मोहोळकर, मुदाळशास्त्री प्रभृतीही काशीस गेले होते. 'स्वामीजींनी या वेळेचे आचरणे योगप्रभावाने पत्र पाठविले व पुढे काही दिवसांनी माघ वद्य ७ शके १८७६ रोजी स्वामीजी स्वस्वरूपी विलीन झाले. शेवटची सर्व व्यवस्था गुरुमहाराजांनीच यथाशास्त्र व यथायोग्य अशी केली गुरुमहाराजांना व आम्हा इतरांना स्वामीजींचा हा वियोग चांगलाच जाणवला.

## गुरुमहाराजांचा भवानी मुक्काम

बापू कुंडे १९२२ मध्ये सोलापुरी नोकरीस गेल्यानंतर सुट्टीमध्ये गुरुद्वादशीस वाडीस जाऊन उरलेल्या सुट्टीचा मुक्काम सोलापुरी होई. गुरुमहाराजांच्या मातुश्री उमाबाई व बापूंच्या मातुश्री यांची राहणी, आचारविचार वगैरे सर्व सारखे होते. त्यांचे त्यांचा तसा सहवास घडून आत्मीयताही निर्माण झाली होती. तेव्हा साहाजिकच बापूंच्या मातुश्रींच्या ठिकाणी गुरुमहाराजांविषयी मातृवात्सल्य निर्माण झाले व तो ऋणानुबंध शेवटपर्यंत गुरुमहाराजांनी सोलापुरी येऊन टिकविला व समाधान लाभून दिले.

हिंगोलीचे आजेगावकर व मोहरीचे क्षीरसागर या उभयता जमीनदार व्याह्यांनी हैदराबाद येथे एक जाड बंगला बांधला व त्यास 'सदाचार' हे नाव दिले. तव्हापासून गुरुमहाराजांचे हैदराबादेस जाणे व राहणे सुरू झाले. तसेच वाडीस जाता येता मिरजेस श्रीयुत नारायणराव मोरे यांचे अगर डॉ. प्रभणी यांचेकडेही मुक्काम होई.

## गुरुमहाराजांचे वार्षिक उत्सव

प्रथम वाडीला असताना श्रीटेंबेस्वामी महाराजांचा आषाढ शुद्ध प्रतिपदेस पुण्यतिथी उत्सव सुरू झाला. त्या दिवशी तीर्थराजांची पूजा होऊन तीर्थराज मस्तक धारण

फल्यावर ब्राह्मण मडळी उपनिषदामधील आनन्दवल्लीचे वेदमत्र म्हणू लागले. मानुपानदापासून ब्रह्मानदापर्यंतचे वर्णन सुरू असताना जसजसी उत्तरोत्तर पायरी चढू लागली तसतसे गुरुमहाराजाचा श्वास अपूर्व होऊ लागला. सर्व शरीर उर्ध्व खेचले गेले. कप जोरात सुरू झाला. अष्ट सात्विक भाव उत्पन्न होऊन विलक्षण वेग वाढला. तेव्हा ही विलक्षण परिस्थिति पाहून सर्व मडळी घाबरली. सर्व नजीक सोवळ्यात उभे असलेली मडळी धरण्यास धावली पण आनदाचे वर्णन सपताच गुरुमहाराजाचे अगात झालेला भक्ति–सचार हळू हळू शात झाला. सर्वांना आश्चर्य वाटले. ही अवस्था आज तागायत प्रति–पुण्यतिथी होत असते.

पुढे गुरुपौर्णिमा उत्सव सोलापुरी वैद्यमास्तर व बापू कुलकडे याचेकडे सुरु झाला. त्या वेळी गुरुमहाराज सोलापुरी आलेवेळी बार्शी वगैरे जवळची मडळी सोलापुरी या उत्स-वास येऊ लागली.

नतर श्रावण वद्य ५ श्रीटेंबेस्वामींची जयती व दत्त जयती हे दोन उत्सव हैद्राबादी आजेगावकर व श्री क्षीर सागर याचेकडे होऊ लागले

अलिकडे गुरुमहाराजाचे प्रकृतिस्वास्थ्याचे दृष्टीने सर्व उत्सव पुण्यासच होत असतात

## भगिनी गोदुताईचा असह्य वियोग

सेवानिवृत्तीनतर गुरुमहाराज सतत प्रवास करुन असत कारणीस नेहमी जाणे घडे. तेथे श्री. आप्पूत याचेकडे वास्तव्य होई. तेव्हा वाडीला वडील बधू चतुर्थाश्रम घेऊन वास्तव्य करुन होते. त्याचे सेवेस भगिनी गोदुताई याना वाडीस पाठविले. मातृवियोगाचे वेळी भगिनी गोदुताई असलेमुळे तो वियोग गुरुमहाराजाना सुसह्य झाला. या गोदुताईचा आध्यात्मिकदृष्ट्या फार मोठा अधिकार होता. त्याची योगाभ्यासातील तयारी फार मोठी होती. सबध महाराष्ट्रात त्याच्या इतका उत्तम अभ्यास केलेली महिला नव्हती. नित्य आत्मचिंतनात मग्न असत. आश्चर्य हे की, वाडीस वडील बधू श्रीचरणी लीन होताच अवघ्या अडीच महिन्यानी गोदुताईनीहि आपला अवतार सपवला व त्या आपले कार्य सपले असे समजून प्रभुचरणी विलीन झाल्या हा भगिनी–वियोग झाला तेव्हा मात्र गुरुमहाराजाना मातृवियोग झाल्यासारखे जाणवले.

## सद्गुरु टेंबेस्वामी महाराजांची वाङ्मयमूर्ति

गुरुमहाराजाच्या आयुष्यातील सर्वांत मोठी, महत्वाची व चिरकाल टिकणारी जर कोणती कामगिरी झाली असेल तर ती म्हणजे टेंबेस्वामी महाराजाचे समग्र वाङ्मय प्रकाशन ' ही होय. हे वाङ्मय हेच मुख्य स्मारक आहे. आजच्या युगात अशा वाङ्मयाचे प्रकाशन अगदी आवश्यक आहे. गुरुमहाराजाची ही कामगिरी केवळ निरपेक्ष सेवा व्रतधारी विद्यावाचस्पति प. दत्तात्रेयशास्त्री रुवीकर याचे आधारावर पार पडली. इकडे अमित परिश्रम कोणीहि सामान्य शास्त्री करू शकत नव्हता. प. दत्तमहाराज रुवीकर याचा व गुरुमहाराजाचा फारच आत्मीयतेचा ऋणानुबंध आहे. इतकेच नव्हे तर त्याच्या सहाय्याशिवाय कोणतीही गोष्ट गुरुमहाराज अमलात आणीत नाहीत. सारांश या ग्रथ प्रकाशनाचे कार्यात दत्तमहाराजानी अतिशय परिश्रम घेतले म्हणूनच हे कार्य झाले.

## हैदराबाद ग्रंथप्रकाशन समारंभ

टेंबेस्वामी महाराजाचे समग्र वाङ्मय १२ खडात सुमारे साडेसहा हजार पृष्ठाचे प्रकाशन झाले व श्रीचे चरणी ते समर्पण केले. हा उत्सव १९५४ मध्ये झाला. शकरराव आजेगावकर याचे चिरजीव श्री. बाबूराव व जामात श्री भाऊसाहेब क्षीरसागर या उभयतानी या उत्सवाची धुरा स्वीकारली होती. सात दिवस अखड विविध कार्यक्रम झाले अनुष्ठानास एकदर ७५ मडळी बसली होती सर्व ग्रथाची पारायणे, विविध मत्राचा जप, महारुद्रादि अभिषेक व यजस्वाहाकार ही कार्ये झाली व त्याचे जोडीस भजन, प्रवचन कीर्तन व अमाप अन्नदान हे होतेच. परगावची बरीच पाहुणे मडळीही आली होती शकरराव आजेगावकर याच्या सूनबाई सौ. इदुताई व कन्या सौ. माईसाहेब क्षीरसागर या उभयता अन्नपूर्णा उभ्या असलेमुळे कसलीहि न्यूनता भासली नाही या उत्सवात प्रामुख्याने ललितागगमधील देवीभक्त धुडिराज महाराज, राजा त्र्यबकराज बहादुर, राजा धुडिराज बहादुर, श्री. भाऊसाहेब धामणगावकर जहागिरदार, गणपतराव कैलासकर, कातरान अवडकर, नेवरेकर प्रभृती हैदराबादची थोर मडळी सतत लक्ष घालून होती ही सर्व मडळी महाराजाची प्रेमळ भक्त आहेत

## पुणे येथील अमृतमहोत्सव

गुरु महाराजाचा मुक्काम सोलापुरी असताना तेथील

श्री. विष्णुपंत मंत्री, श्री. अग्निहोत्रीमास्तर, श्री. विद्वांस बंधू, श्री. मोहोळकर वकील, नापू कुंदडे प्रभृतींनी महाराजांना डिसेंबर १९५६ मध्ये वयाची सत्तर वर्षे पुरी होत असून ७१ वे वर्ष लागत आहे तेव्हा त्या वेळी काही धार्मिक कार्यक्रम व सत्कार समारंभ करावा व त्या वेळी एखादा योगशास्त्रप्रवर्तक ग्रंथही प्रकाशित करावा असा विचार विनिमय झाला. शंकरराव आजेगावकर यांचे अध्यक्षतेखाली लगेच एक छोटी समितीही नेमली व एक पत्रक काढावे असे ठरले. या कार्यास प्रथम गुरुमहाराजांनी अनुमती व आशीर्वाद मिळविला व कार्य सुरू झाले.

## गुरुमहाराजांचा अखिल भारतीय परिवार

प्रथम पत्रक काढण्यासंबंधी सुरवात करावी म्हणून जो पत्रव्यवहार सुरू झाला तेव्हा असा अनुभव आला की अखिल भारतात महाराजांचा जो अनुयायी वर्ग आहे त्यांच्याकडून फारच मोठ्या प्रमाणात पाठिंबा दिसून आला प्रथम पत्रकावर १०८ सह्या असून त्यावरून पाहता महाराजांचा केवढा मोठा व्यापक भक्तवर्ग आहे ही कल्पना येते.

## स र्व सं ग्रा ह क त्व

गुरुमहाराजांचे सर्वसंग्राहकत्व अलौकिक आहे. त्यामध्ये अनेक आबालवृद्ध स्त्री पुरुष, विद्वान्, पंडीत, शास्त्री, वकील, डॉक्टर, लक्षाधीश, भिक्षाधीश, प्रोफेसर्स, व्यापारी, जहागिरदार, रिक्षावाले, टॅक्सीवाले, सरकारी व खासगी ऑफिसर्स, गवई, तपस्वी, संन्यासी, ब्रह्मचारी, शिक्षक वगैरे असून सर्व प्रांतामधून ही मंडळी आहेत. गुजराथी, मद्रासी, बंगाली शीख, पारशी वगैरे सर्व यामध्ये आहेत.

## सोलापूर ऐवजी पुणे

हा उत्सव प्रथम सोलापुरी अल्प प्रमाणात करावा असे ठरले होते. परंतु पुढे मोठ्या प्रमाणात सर्वांची सहानुभूति दिसून आली व पुणे येथील महाराजांची प्रेमी मंडळी प. दत्तात्रेयशास्त्री वर्चीश्वर, वे. शा. सं. जगन्नाथशास्त्री पुजारी प्रभृतींनी ह. भ. प. सोनोपंत ऊर्फ मामा दांडेकर व म. म. दत्तोपंत पोतदार यांच्या विचारे हा उत्सव मध्यवर्ति स्थान पुणे येथेच होणे इष्ट आहे असे ठरविले व ते सोलापुरचे मंडळींनी लगेच मान्य करून हा उत्सव पुणे येथे मोठ्या थाटात पार पडला. सात दिवस कार्यक्रम होता. 'पुन्या मुरलीधर मंदिरात व शिवाजी मंदिर' येथे सर्व यज्ञ स्वाहाकारादि धार्मिक कार्यक्रम व प्रवचन, कीर्तनादि कार्यक्रम झाले. शेवटचे दिवशीचा सत्कार समारंभ 'टिळक स्मारक मंदिरात' मोठ्या भव्य प्रमाणात झाला.

## श्रीगुरुदत्तयोग ग्रंथ प्रकाशन

लहानपणी विद्यार्थी असताना गुरुमहाराजांचे शेजारी गोवईकर बिल्डिंगमध्ये रहात असलेले श्रीयुत शंकरराव विद्वांस यांचे स्नेही कोल्हापूर येथील राजाराम कॉलेजमधील प्रोफेसर प्रा. खानवेलकर यांनी मोठ्या प्रेमाने व निरपेक्ष बुद्धीने गुरुसेवा म्हणून हा ग्रंथ मोठा विद्वत्ताप्रचुर असा लिहिलेला आहे. त्या ग्रंथाचे नामाभिधान स्वतः गुरुमहाराजांनीच 'श्रीगुरुंनी दिलेला योग तो श्रीगुरुदत्तयोग' असे सोलापुरीच प्राथमिक बैठकीत सुचविले होते. या ग्रंथाचे छपाईकार्य आमचे गुरुबंधू श्री. शंकरराव विद्वांस यांचे स्नेही नगर येथील मोहन मुद्रा मंदिराचे संचालक श्रीयुत शंकरराव जोगळेकर यांनी मोठ्या आत्मीयतेने सुबक असे केले. हा ग्रंथ हा हा म्हणता अखिल भारतात प्रसृत झाला.

## स्वामी कुवलयानन्दजी

'लोणावळा येथील कैवल्यधाम या योगिक संस्थेचे संस्थापक, संचालक व संवर्धक स्वामी कुवलयानन्दजी' यांनी या समारंभाचे अध्यक्षस्थान विभूषित केले होते. तसेच या समारंभास लोकनायक अणे, समर्थभक्त गोसेवक अनंतदासजी रामदास प्रभृति अनेक थोर थोर मंडळी उपस्थित होती. गुरुमहाराजांच्या नेहमी सेवेस हजर असलेले श्री. बाळासाहेब वाकडे, भाऊसाहेब काकडे, देव, पटवर्धन वगैरे मंडळींनी फारच परिश्रम घेतले.

हा लौकिक समारंभ होण्यापूर्वी वाडीस 'भैमरथी शांति' वगैरे धार्मिक विधी करून घेतला. त्या वेळी वाडी येथील पुजारी मंडळींनी महाराजांचा चांगला सत्कार करून श्रीप्रसाद दिला. वाडीचे प. आत्मारामशास्त्री जेरे, प. श्रीपादशास्त्री जेरे, प. वामनशास्त्री पुजारी प्रभृती मंडळींचे महाराजांवर चांगले प्रेम आहे.

## महाराजांचा आजार

अमृत महोत्सवानंतर महाराजांचे प्रकृतीस दुष्ट लागल्या

सारखे झाले. पहिल्यापासून त्यांची प्रकृति उत्तम व आदर्श अशी असे. पूर्वी वज्रोलीमुद्रेचा अभ्यास करीत असताना थोडासा त्रास झालेमुळे केव्हा तरी लघवीचा किंचित् त्रास होई, परंतु या वेळी अंगातील धारणाशक्ति थोडीशी वयोमाना प्रमाणे कमी होऊ लागल्यामुळे याच लघवीच्या विकाराने डोके वर काढले. महाराजांचे भक्त पुणे येथील जर्मन रिटर्न्ड डॉ. वैद्रे, डॉ. देशपांडे, सोनोपत मामांचे मुंबईचे डॉक्टर देशमुख, मिरजेचे डॉ. प्राणी प्रभृतींनी महाराजांची प्रकृति चांगली तपासली. त्यावर चटकन् व्याधिमुक्त होण्यास ऑपरेशन हा उत्तम उपाय आहे. परंतु गुरुमहाराज ऑपरेशन करून घेण्यास संमती देईनात. तेव्हा सर्वांचा नाईलाज झाला. पहिल्यापासून महाराजांची प्रकृतीच अशी गमतीदार आहे की, त्यांना कोणतेहि औषधच लागू पडत नाही. डॉ. वैद्रे, डॉ. देशपांडे, वैद्य काशीकरशास्त्री, वैद्य नानासाहेब कुलकर्णी, सोलापूरचे पराडकर वैद्य, दीक्षित वैद्य, प्रभृतींनी विविध औषधे देऊन पाहिली. परंतु उपयोग नेताचाच होई.

## निसर्गोपचार-तज्ज्ञ विष्णुपंत चितळे

नंतर डॉ. वैद्रे व श्री. नरवाते, वृत्तपत्रकार यांचे स्नेही व पुणे येथील एक थोर राजकीय व सामाजिक कार्यकर्ते, विधानसभेचे सभासद विष्णुपंत चितळे हे एक उत्तम निसर्गोपचार-तज्ज्ञ आहेत असे समजले. तेव्हा त्यांनी प्रकृती तपासली व त्यांचे सूचनेनुसार गुरु महाराजांनी पूर्वीचा अगदी अल्प असा असलेला अन्नाहारहि बंद केला व केवळ फळे व रस यावर दोन वर्षे काढून सर्व शरीराचा 'कायाकल्प' केला. शेवटी ८० पौंड वजन भरले होते व उघडे उभे राहिल्यावर लांबून छातीच्या बरगड्या मोजता येत होत्या इतके कृश झाले. परंतु याचा मात्र बराच उपयोग झाला व ऑपरेशन टळले.

## जबरदस्त आत्मविश्वास

एक दिवस फार मोठी वाती झाली. तेव्हा सर्व मंडळी घाबरली. एक रात्र सर्वांनी काळजीत काढली परंतु त्यावेळी गुरुमहाराजांनी स्वच्छ सांगितले की मी इतक्यातच जात नाही. तुम्ही काळजी करू नका. इतका त्यांना स्वतःच्या आयुष्याचा आत्मविश्वास होता.

## प्रवासी सेवक

अलिकडे काही वर्षे प्रकृतीमानानुसार एकट्यांनी प्रवास करणे योग्य नाही म्हणून कोणीतरी बरोबर घेत असतात त्याप्रमाणे श्री. देव, राजकोटचे श्री. देशपांडे, श्री. केशवराव जोशी प्रभृती गुरुभक्त सेवेस प्रवासामध्ये असतात.

## भगवान् श्रीधरस्वामी व वामनरावजी

गुरुमहाराजांचा व भगवान् श्रीधरस्वामींचा चांगला आत्मीयतेचा परिचय आहे. मधून मधून भेटी होतात. गुरुमहाराजांच्या प्रकृतीविषयी भगवान् श्रीधरस्वामींनी दैवी उपाय सुचविला. गुरुमहाराज यांची कुलस्वामिनी तुळजापूरची जगन्माता जगदंबा असून ज्या शक्तिपात सांप्रदायाचा गुरुमहाराज प्रचार करून आहेत त्यांची अधिष्ठात्री देवता ही शक्तिदेवी आहे. तेव्हा प्रतिवर्षी तिची महापूजन आणि सेवा होणे अत्यंत जरूर आहे व हीच प्रकृती चांगली राहण्याचे मुख्य साधन आहे.

## श्री तुळजाभवानी

भगवान् श्रीधरस्वामींनी सांगितल्याप्रमाणे अलिकडे काही वर्षे झाली प्रतिवर्षी गुरुमहाराज तुळजापूरला जाण्या करिता सोलापुरी येतात. महाराजांचे ऋणानुबंधीय हिंगोलीचे श्री. बाळाभाऊ शार्दूल हे हल्ली सोलापुरी इन्कम टॅक्स ऑफिसर आहेत. ते गुरुमहाराजांना तुळजापुरी पोहोचविण्याची व्यवस्था करीत असतात. गुरुमहाराजांचे बरोबर पुणे–मुंबई–सोलापूर–बार्शीकडील काही मंडळीही तुळजापुरी जात असतात. तुळजापूरचा व गुरुमहाराजांचा बराच जुना ऋणानुबंध आहे.

पूर्वी एकदा गुरुमहाराजांचे बार्शीस असताना प्लेगचे निमित्ताने तुळजापुरी काही दिवस जाऊन राहणे झाले होते. तुळजापुरी गुरुमहाराजांचे गुरुबंधू श्री. गोपाळराव महाराज बिलासपुरकर यांची शिष्य मंडळी बरीच आहेत. श्री. पंढरपुरकर, श्री. रंगनाथ कांडो प्रभृती मंडळीही तो जुना ऋणानुबंध जाणून अद्याप प्रतिवर्षी मोठ्या प्रेमाने भेटतात. व व्यवस्था ठेवतात वे. वासुदेवराव लसणे हे गुरुमहाराजांचे उपाध्याय असून व. रामभाऊ पाठक, लक्ष्मणराव पाठक, प्रयाग. वसंतराव कांडो वगैरे मंडळी सर्व व्यवस्था करतात.

गुरुमहाराज भगवान् श्रीधरस्वामींचे सूचनेनुसार 'धाकटी

देवी व थोरली देवी ' या दोन्ही देवींना महापूजा महावस्त्रादि सर्व योग्य ते करतात. तसेच ब्राह्मण, सुवासिनी, कुमारिकादि अन्नदानही मोठ्या प्रमाणात करतात. सारांश चांगलाच दानधर्म करतात.

हा दवी उपाय सुरू झाल्यापासून गुरुमहाराजांचे प्रकृतीस बराच आराम आहे. तुळजापुरी देवाचे मंदिरातील दत्त मंदिरात गुरुमहाराजांचा एक नातेवाईक (भाचा) श्रीधर कुलकर्णी हा सेवा करीत असतो.

## पानशेत-वाईटातून चांगले

सन १९६१ चे १२ जुलैस पानशेत पुण्यास झाले. तेव्हा दुसरे दिवशी १३ जुलैला श्रीटेंबे स्वामी महाराजांची पुण्यतिथी होती. पुण्यास या उत्सवास गुरुमहाराजाकडे आम्ही बरीच भक्त मंडळी जमलो होतो उत्सवाची सर्व तयारी झाली होती. २०, नारायण पेठ, गोखईकर बिल्डिंग ही नदीच्या नजीकच्या भागात असल्यामुळे या बिल्डिंगमध्ये पाणी शिरले. पहिला मजला व्यापून दुसऱ्या मजल्याचा पाच फूट भाग पाणी चढले होते. या दिवशी महाराजांची सप्ताह-समाप्ती असते. सकाळी ११ ला पोथी संपवून नैवेद्य व एकच आरती म्हणून तसेच नैवेद्याचे चांदीचे ताट आरती देवापुढे ठेवून नदीची सौ. माई क्षीरसागर यांचे हस्ते सगानाळ्यांनी ओटी भरून सर्व मंडळी व गुरुमहाराज यांचेसह आम्ही फक्त अंग वस्त्रावर बाहेर पडलो. सर्वत्र हाहा कार झाला. गुरुमहाराजांना लोकांची ही दुर्दशा पाहून हा केवढा ईश्वरी प्रकोप आहे, असे वाईट वाटले

## श्रीसिद्धमाता मंदिर व जगन्नाथशास्त्री पुजारी

प्रभुलीला अगाध आहे. अशा भयंकर संकटाचे व अडचणीचे वेळी सिद्धमातेला दया आली व त्या मंदिराचे व्यवस्थापक व गुरुमहाराजांचे उपाध्याय वे. शा. स. जगन्नाथशास्त्रींनी गुरुमहाराज यांना त्यांचे सर्व परिवारासह म्हणजे भालेराव कुटुंब व आम्ही भक्त मंडळी यांना आपले मंदिरात आश्रय दिला व घरच्यासारखी सर्व व्यवस्था केली. मंदिराचे दूर्शनादि महाराज तेथे आल्यामुळे समाधान लाभले व त्यांनी मोठ्या प्रेमाने महाराजांना चातुर्मास ठेवून घेतले. दुसरे दिवशी जरूर त्या धार्मिक विधीसह सिद्धमाता मंदिरात पुण्यतिथी झाली या वेळी जगन्नाथशास्त्रींची कार्यकुशलता खरोखरीच वाखाणण्यासारखी दिसून आली तेव्हा गुरुमहाराजांकडील कोणतेहि वैदिक धार्मिक कार्य गुरुजी जगन्नाथशास्त्री पुजारी यांचेच विचारे होत असते ते योग्यच आहे अशी आमची खात्री झाली.

## देव सापडले-प्रथभांडार भिजले

या दिवशी रात्री अमावास्या. पाणी उतरले तरी चिखल फार. तेव्हा सर्व भक्त व कार्यकर्ते एकत्र जमले व सर्वच मंडळींनी मिळून फारच परिश्रम घेऊन गुरुमहाराजांचे देव व पोथी वगैरे मिळवून आणली व इतर सर्व सामानही आणले आणि ग्रंथभांडार जिमखान्यावर श्री. क्षीरसागर यांचे बंगल्यावर नेऊन टाकला.

## गुरुमहाराजांचे विचारास कलाटणी

कित्येक दिवस-वर्षे झाली. विशेषत हैदराबादचे उत्सवापासून गुरुमहाराजांचे अनेक भक्तांच्या अंत करणात असा विचार आला होता की, कोठे तरी गुरुमहाराजांचे एखादे आश्रमवजा स्वत चे निवासस्थान असावे. परंतु या विचारास गुरुमहाराजांची संमति नव्हती. त्यांचे अंत करण प्रथमपासून वैराग्यशील असे होते व आहे. अमृत महोत्सवाचे वेळीहि या विचारास थोडीशी चालना मिळाली. आमच्यासारख्या जुन्या ऋणानुबंधीयांनी हा उपसर्गकारक उपक्रम नको असे मत दिले. नव्या मंडळींनी त्याची उपयुक्तता पटवून देण्याचा प्रयत्नही केला. परंतु

' तुका म्हणे नाही चालत तातडी ।
प्राप्त काळ घडी आल्या विना । '

या न्यायाने अनुकूल काळ पानशेतनी जवळ आणून दिला व गुरुमहाराजांना या वेळी मान्य असे वाटले की देवाची नीट व्यवस्था करण्यास आश्रम हाच एक उपाय आहे. तेव्हा श्रीगुरुमहाराजांनी अनुमति दिली व कार्यकर्त्यांना आनंद झाला व त्या दृष्टीने हालचाल सुरू झाली.

## ' श्रीवासुदेवनिवास योगाश्रम '

गुरुमहाराजांची तपश्चर्या जबरदस्त असल्यामुळे ' संकल्प आणि सिद्धी यामध्ये परमेश्वराची इच्छा उभी असते ' याची सुंदर प्रचीति आली. कार्यकर्ते सुंदर मिळाले. द्रव्य सहाय चारी बाजूनी जमू लागले. श्रीयुत वैद्य इंजिनिअर

शक्ति फक्त पाप नाश करण्याचे कार्य करीत असते, पाप नाश झाल्यानंतर क्रियाशील बनते, समाधि किंवा मोक्षावस्थेत शक्ति ब्रह्मात विलीन होते, ही तिसरी स्थावस्था. सुप्तावस्थेत ती कंदस्थानात असते क्रियारहित अवस्थेत, स्वाधिष्ठानस्थानात राहाते. क्रियाशील अवस्थेत विशुद्ध चक्रस्थानात राहून, मूलाधारापासून सहस्रारापर्यंत आरोहण–अवरोहण करीत राहाते स्थावस्थेमध्ये आज्ञाचक्रापासून ब्रह्मरंध्रापर्यंत राहाते. स्थूल, सूक्ष्म व कारण अशा तीन शरीराच्या क्रियाही भिन्न भिन्न असतात. शक्ति क्रियाशील अवस्थेत असताना, हठयोगातील विविध आसने, प्राणायाम, बन्ध, मुद्रा, भक्तीतील विविध अवस्था, नृत्य, गीत, सामगान, प्रणवोच्चारण, नामसंकीर्तन, मन योग, ज्ञानयोग इत्यादि अनेक क्रियांचा अनुभव साधकाला येऊ लागतो. या क्रियाही ज्याच्या त्याच्या प्रकृतीप्रमाणे, पूर्व सस्कारांप्रमाणे भिन्न भिन्न होत राहातात. सर्वांच्या सारख्या होत नाहीत यामुळेच शक्तिपात् योगाला सहज योग किंवा स्वाभाविकयोग असेही नाव पडले आहे या क्रिया सुरू झाल्या असता कोणतीही हानी होण्याचा संभव नाही कारण शक्तीच्या क्रियाशीलतेमुळे स्वाभाविक क्रियाच, त्या त्या साधकाच्या विकसित होतात आणि देश, काल, ऋतु याच्या अनुरोधानेच साधकाच्या शरीर, मन, प्राण इत्यादिकांना अनुकूलच राहात असतात.

जागृत झालेली शक्ति सुषुम्नेत प्रवेश करते आणि चक्रांचा वेध करते त्यामुळे सर्व नाड्यांची शुद्धि होते. सर्व नाड्यांचा संबंध सुषुम्नानाडीशी आहे. सुषुम्ना नाडीच्या शाखा उपशाखातून निघालेल्या सर्व नाड्या शरीराच्या सर्व भागात व्यापून राहिल्या आहेत. सुषुम्ना नाडीत प्रविष्ट झालेली शक्ति चक्रांचा वेध करून सर्वही नाड्यामधून वेगाने फैलावते उंच टाकीमध्ये भरलेले पाणी, सर्व नळातून वेगाने वाहाते. एखाद्या नळात कदाचित काही प्रतिबंध असेल तर तो ही त्या पाण्याच्या वेगामुळे आपोआप दूर होतो याप्रमाणे सर्वत्र पसरलेली ती शक्ति प्राणामयकोशामध्ये प्राणाचे संचालन करते, त्यामुळे प्राणायामाची सिद्धि प्राप्त होते प्राणाचा अपानाशी योग, अपानाचा प्राणाशी योग, दोघांचाही गतिनिरोध आणि केवल कुंभक अशा चारही प्रकारच्या प्राणायामाची सिद्धि, शक्ति जागृत होऊन क्रियाशील झाल्यावर आपो आप होते त्यामुळे सुषुम्ना मार्गाचा वेध होऊन चित्ताची लयावस्था प्राप्त होते. तसेच मातृकाशक्तीचा ही उद्बोध होऊन सिद्धमंत्राची प्राप्ति होते. मातृकाशक्तिही कुण्डलिनी शक्तीचेच एक रूप आहे, जिच्यामध्ये अकारापासून क्षकारापर्यंत सर्व वर्णमाला असून पद, वाक्य यांची रचनारूप वैखरी वाणी प्रकट होते. याकरिता कुण्डलिनीला सरस्वतीही म्हटले आहे ही सरस्वती सिद्ध झाली असता मंत्रादिकांचा विकास होऊ लागतो व योगी पुरुषामध्ये व्याख्यानशक्ति, कवित्वशक्ति इत्यादि शक्तींचा उद्भव होतो

'अनादिष्टस्य शास्त्रस्य स्वत एव प्रबोधनम्'

हे फल शास्त्रकारांनी दाखविले आहे. तसेच शक्तीच्या क्रियाशीलतेमुळे यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि ही योगाची आठही अंगे हळू हळू सिद्ध होऊ लागतात. शृंगार, वीर, करुण, अद्भुत, हास्य, भयानक, बीभत्स, रौद्र आणि प्रेमात्मकभक्ति अथवा शान्त, अशा नवविध भावांनी तो साधक संपन्न होतो सिद्धांचे दर्शन, इष्टदेवतेचे दर्शन त्याला घडते ऊर्ध्वरेतस्त्व, खेचरीमुद्रा, रागद्वेष, काम, क्रोधादि वासनांचा समूल नाश होणे इत्यादि महत्त्वाची फलेही साधकाला प्राप्त होतात तसेच, सूर्य, चंद्र, अग्नि, दीप, बीज, नक्षत्र इत्यादि तत्त्वांचे दर्शन साधकाला होऊ लागते. डोळे उघडे असताना, डोळे बंद करून ध्यानावस्थेत किंवा समाधि अवस्थेत याप्रमाणे तीन प्रकारांनी ज्योतिर्दर्शन घडते. हे दर्शन ब्रह्मदर्शनच आहे याबद्दल श्वेताश्वतरादि उपनिषदांतून वर्णन आले आहे. ब्रह्म अव्यक्त असले तरी चित्तोपाधीमुळे वरीलप्रमाणे त्याचे व्यक्त दर्शन घडते अभ्यासाने शक्तिविकास होऊन राहिला असता, आरंभ, घट, परिचय व निष्पत्ति या चार भूमिका प्राप्त होतात इंद्रिय, मन यांची बहिर्मुखता कमी होऊन ती अन्तर्मुख होणे ही आरंभ भूमिका सुषुम्ना नाडीतून प्राण ऊर्ध्वगामी होऊन नवशिखान्त त्याची स्थिरता होणे ही घटावस्था ब्रह्मरंध्रामध्ये जाऊन प्राण स्थिर होणे ही परिचयावस्था आणि जीवन्मुक्तिदशा प्राप्त होणे ही निष्पत्ति भूमिका याप्रमाणे नाना प्रकारच्या सिद्धांचीही प्राप्ति योगी पुरुषाला होते हे सर्व, ज्याचा अधिकार जसा असेल तसे घडून येते नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त असंग आत्मस्वरूपाला या फलाचा काहीच संबंध नाही. तो परमानंदरूप असून त्याच्याच आनंदलेशाचा अनुभव सर्व विश्वाला

मिळून राहिला आहे. वरील सर्व फलसिद्धि निरनिराळ्या चित्ताच्या भूमिका आहेत. समाधि अवस्थेच्या अभ्यासाने आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाल्यानंतर सर्वच द्वंद्वांची निवृत्ति म्हणजे मुक्तीची प्राप्ति होणारी आहे. हे मानव जीवनाचे शेवटचे मुख्य फल आहे. यासाठी श्रीमहाराजांनी,

'श्रेष्ठपुरुषगम्यस्य कार्ये योगचर्या श्रयात्। समाख्यात द्विसाहस्रीसहितासग्रदत्तनयम्'

याप्रमाणे योगरहस्याच्या आरंभ श्लोकात साधकाला करण्याचा स्पष्ट आदेश दिलेला आहे.

योगसाधन हे ज्ञानाचे अंतरंग साधन असून ते प्रारब्ध कर्मांचाही प्रतिबंध करू शकते. हे प्रत्यक्ष फलदायी प्रयोगशास्त्र आहे. याचे महत्त्व हठयोगप्रदीपिकेचे टीकाकार ब्रह्मानंद यांनी पुढीलप्रमाणे वर्णन केले आहे—

'यस्तु साधको याममात्रं प्रहरमात्रं नित्यमभ्यसेत्स तु कालं जित्वा कालं मृत्यु जयतीतिकालजिन्मृत्युजेता भवेत्। एतेन योगस्य प्रारब्धकर्म प्रतिबंधकत्वमपि सूचितम्। तदुक्तं विष्णुधर्मे—'

'स्वदेहारंभकस्यापि कर्मणः संक्षयावहः।

यो योगः पृथिवीपाल शृणुतस्यापि लक्षणम्' इति।

विद्यारण्यैरपि जीवन्मुक्तावुक्तम्—'यथा प्रारब्धकर्म तत्त्वज्ञानात्प्रबलं तथा तस्मादपि कर्मणो योगाभ्यासः प्रबलः। अतएव योगिनां मुद्दालकवीतहव्यादीनां स्वेच्छया देहत्याग उपपद्यते' इति। भागवतेऽप्युक्तं—'देहं जह्यात्समाधिना' इति। (हठयोगप्रदीपिका ३।८२)

असा सर्वश्रेष्ठ फलदाता योग असूनही इंद्रियांच्या विषयासक्तीमुळे हा अत्यंत कठीण वाटतो. त्यामुळे इकडे प्रवृत्ति सर्वांची होत नाही. याबद्दल श्रीज्ञानेश्वर महाराजांनी फार सुंदर विवेचन केले आहे. ते असे—

'आता तुझे मनोगत जाणोनी। काही एक आम्ही म्हणोनी। तं निके चित्त देवोनि। परिसावे गा ॥ ५९ ॥

तू मानसीनी चाड वाहसी। परी अभ्यासी दक्ष न होसी। तें सांग पां काय बिहसी। दुवाडपणें ॥ ३६० ॥

तरी पार्था हें झणें। सयास घेसी हो मन। वाया नागवल इयें दुर्जनें। इंद्रियें करिती ॥ ६१ ॥

पाहें पां आयुष्यातें अढळ करी। जे सरतें जीवित वारी। तया औषधातें वैरी। काय जिव्हा न म्हणे ॥ ६२ ॥

ऐसे हितासी जें जें निकें। तें समस्ताही या इंद्रिया दुखें। येऱ्हवी सोंप योगासारिखें। काय आहे ॥ ६३ ॥

(ज्ञानेश्वरी ६।१९)

तात्पर्य, पूर्ण वैराग्य बाणवून घेऊन योगाभ्यास करणाऱ्यास योगसाधन अत्यंत सोपे व महाफलप्रद आहे. हाच अभिप्राय श्रीमहाराजनी—

'तस्माद्वैराग्यतोऽभ्यासं गुरोश्चैव वितन्वत।

योगस्य प्राप्य नसिद्धिं विद्वान्मुक्तोभवेन्द्रुतम्॥'

या श्लोकात मोठ्या कळकळीने व्यक्त केला आहे.

आधिभौतिक विज्ञानाच्याच प्राधान्य देणाऱ्या पाश्चात्यांच्या संसर्गामुळे आध्यात्मिक शक्तीची कल्पना तरी भारत वर्षासारख्या अध्यात्मविद्याप्रधान देशात राहाते किंवा नाही अशी परिस्थिति आज निर्माण होऊन राहिली आहे. अर्थ आणि काम यांच्या पलीकडे काहीच नाही ही पाश्चात्यांची विचारसरणी भारतातही अधिकाधिक प्रसृत होऊ लागल्यामुळे धर्म, नीति, श्रद्धा, भक्ति, सदाचार इत्यादि ऐहिकपरलोक संपादक साधनांचा ऱ्हास होऊन राहिला आहे. अशा स्थितीत योगासारखी श्रद्धाधनसाध्य साधने दुर्मिळ होतील यात नवल ते काय? सर्वांचे कल्याण व्हावे या वात्सल्यपूर्ण दृष्टीने ज्या भगवतानी अर्जुनाला,

'लोकसंग्रहमेवापि संपश्यन् कर्तुमर्हसि'

असे आवर्जून सांगितले, त्यानाच शेवटी

'अवजानन्ति मां मूढा मानुषींतनुमाश्रितम्'

असे उद्गार काढण्याची पाळी आली. निरनिराळे दु:खांचा आघात सारखा होत आहे, त्यातून पूर्ण मुक्त होण्याची निश्चित साधनपद्धति प्रत्येकाच्या अधिकारानुरूप ईश्वराने शास्त्ररूपाने पुढे मांडलेली आहे. साधन मार्गातील उद्भवणारे अंतराय दूर करून अत्यंत आत्मीयतेने मार्गदर्शन करू इच्छिणारे सिद्ध पुरुष, ईश्वराच्या आदेशानुसार सर्व काळात ते कार्य करून राहिले आहेत. अशी सर्व प्रकारची अनुकूलता असूनही नास्तिक्य व उपेक्षा यांचेच प्राबल्य वाढते असलेले पाहूनच की काय 'अरतीर्जनसंसदि' या भगवद्वचनानुसार चिरंतन समाधिसुखात राहू इच्छिणारे श्रीज्ञानेश्वर महाराज शेवटी जी प्रार्थना करितात तीच प्रार्थना करून व बुद्धिप्रेरक दिव्य शक्तिसंपन्न सद्गुरुमूर्तीजवळ भक्तियाचना करून या लेखनाचा आम्ही समारोप करीत आहोत —

"चंद्रमे जे अलांछन। मार्तंड जे तापहीन। ते सर्वाही

सदा सज्जन । सोयरे होतू ॥ १ ॥

निंहुना सर्वसुखी । पूर्ण होवोनी निलोरी । भजि जो आदिपुर्षी । अखंडित ॥ २ ॥

त्वयि भक्तिमेवर्धयतुहृत्तमद्दर्शनाशय अशेषम् ।
यच्च तवेष्ट तत्कर मायि भो सर्वेन वक्तमसमश ॥ १ ॥
श्रीगुरुचरणारविन्दार्पणमस्तु

श्रीगुरुसवार्थी—
**वामन दत्तात्रेय गुळवणी**
अध्यक्ष
श्रीवासुदेवानंद सरस्वती ग्रंथ
प्रकाशन मंडळ, 'पुणे'



श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य

श्रीवासुदेवानंद-सरस्वती विरचित

# बोधरहस्य

श्रीगणेशाय नमः। श्रीमद्दत्तात्रेय श्रीपाद श्रीवल्लभ श्रीमन्नृसिंह-सरस्वती सद्गुरुचरणारविंदाभ्यां नमो नमः ।

ॐ नमो ब्रह्मादिभ्यो ब्रह्मविद्यासंप्रदाय कर्तृभ्यो गुरुभ्यो नमो नमः ।

## १ मनुष्यजन्माचे श्रेष्ठत्व

सर्वांना सुख अभिमान्या या भरत खंडातील अध्यात्म विद्याप्रवण सर्व शास्त्रकारांनी चतुर्दशभुवनयुक्त अशा या जगात चौऱ्याऐंशी लक्ष योनी फिरता फिरता मनुष्य योनी प्राप्त झालेल्या प्राण्याचे महद्भाग्य एकमुखाने वर्णिले आहे. परब्रह्म परमात्मा नारायणच मायेचा अंगीकार करून 'बहु स्याम्' असा संकल्प करून क्रीडा करण्यासाठी स्थावर-जंगमात्मक अनेक प्राणी, व प्राण्यांच्या स्थूल सूक्ष्म-कारणात्मक अनेक उपाधि, या रूपाने नटलेला आहे. म्हणूनच 'सर्वंखल्विदं ब्रह्म' असे सर्व प्रमाण मूर्धन्य असणारी श्रुती, तदनुकूलस्मृती व विद्वदनुभवनापर वाक्ये त्या परमात्म्याचे वर्णन करतात.

सर्वच प्राणी मूलतः नारायणरूपच असून, दुस्तर अविद्येचा अंगीकार करून जीवपणास प्राप्त झाले आहेत, व कामना आणि कर्म यांच्या आधीन होऊन उत्तम, मध्यम व कनिष्ठ अशी नाना प्रकारची शरीरे धारण करून सुख दुःखादि भोग भोगत आहेत. अविद्या काम-व कर्म यांची समाप्ती झाल्याशिवाय जीवास आपले परब्रह्म-परमात्मरूप, निज-नारायणस्वरूप प्राप्त होणे शक्य नाही व या अविद्यादित्रयाची समाप्ती म्हणजेच मुक्ती, आपल्या मूळ नारायण स्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाशिवाय शक्य नाही, असे 'ज्ञानादेव तु कैवल्यम्' अशा वाक्याने श्रुती वर्णन करीत आहे.

देहप्राप्ती झाल्यानंतर जीव इंद्रियाधीन होऊन अनादिकालापासून विषयेंद्रियसंबंधाच्या सुखात अत्यंत आसक्त झाला आहे. हे विषयेन्द्रिय सापेक्ष सुख या लोकातील म्हणजे ऐहलौकिक असो, किंवा स्वर्गादिकातील म्हणजे पारलौकिक असो, अत्यंत मोहक असे आहे. ते विनश्वर, क्षणिक व दुःखबहुल असे आहे, असे जरी विचार दृष्टीने सूज्ञ जीवास कळले, तरी या सुखाच्या क्षणिकत्वादिकाची प्रत्यक्ष प्रतीती नसल्याने जीव त्या सुखाचा त्याग करू शकत नाही.

**पण लक्षात घेतो कोण?**

सत्त्वगुणप्रधान देवादिकांच्या योनीत स्वभावतः च सारासार विचार करण्याची पात्रता असली, तरी इतर योनींपेक्षा त्यांच्या सुखात दुःखाचा अंश कमी प्रमाणात असून, सुखोपभोग घेण्यात विघ्नेही कमी आहेत, व

सुखोपभोगात इतर योनींपेक्षा स्वातंत्र्यही पुष्कळच आहे. त्यामुळे वैषयिक सुखाचे असारत्व व क्षणिकत्वादि त्याच्या लक्षात लवकर येतच नाही. म्हणून ते नित्यानंद–निरतिशय परमात्म स्वरूपास प्राप्त करून घेण्यास सुसाध्य असूनही मनुष्य योनीपेक्षाही खालच्या दर्जाचे झाले. देवादिकातील काही विचारी लोकांनी स्वानुभवाने मनुष्य जन्म धन्य आहे असे उद्गारसुद्धा अन्तःकरणपूर्वक काढले आहेत. ते मनुष्यांनी आपल्या जन्माची योग्यता किती आहे हे समजण्याकरता लक्षात ठेवण्यासारखे आहेत. पण लक्षात घेतो कोण? "साक्षात् पशुः पुच्छविषाणहीनः" अशासच या माणसाची गणना आहे.

पश्वादिकच मानवा या खालच्या योनीत तर 'मी कोण? कुठून आलो? कुठे पोचले पाहिजे?' याविषयी विचार करण्याचे सामर्थ्यच नाही. खावे, प्यावे, निजावे, रमावे व एक दिवस मरून जावे, एवढेच त्याचे या जगातील कार्य ते साधण्याकरता जी बरीवाईट खटपट करावी लागेल, तोच त्याचा पुरुषार्थ व जीवनाचे ध्येय. मग ते एका व्यक्तीकरता असो किंवा समाजाकरता असो पशुपक्ष्यादिकातही व्यक्ति व समाज या भावना दृष्टोत्पत्तीस येतात हे सूक्ष्म निरीक्षण केले असता कळून येण्यासारखे आहे.

त्रिगुणात्मक विश्वातील सर्व जीवांच्या विभागातील अत्यंत सत्त्वगुणी देवादिक व अत्यंत तमोगुणी पश्वादिक यांच्या योनींचा विचार केला असता या दोनीही योनी विचार दृष्टीने सारख्याच किंमतीच्या आहेत जरी 'सत्त्वात्संजायते ज्ञानम्' असे सत्त्वगुणाचे फळ ज्ञान म्हणून गीतेत वर्णिले आहे, व 'ऊर्ध्वं गच्छन्ति सत्त्वस्था' याप्रमाणे ऊर्ध्वगतिप्रापक सत्त्वगुण आहे असे ही सांगितले आहे, तरी पण विषयलंपट अशा देवादिकास निर्माण करणारा सत्त्वगुण दैवीसंपत्ति निर्माण करणाऱ्या सत्त्वगुणाहून थोडा वेगळाच मानला पाहिजे, व त्या सत्त्वगुणाने प्राप्त होणारे ज्ञान व ऊर्ध्वगती हे फळसुद्धा प्रपंचांतर्गत व कमी दर्जाचे मानले पाहिजे. त्याशिवाय वाक्याची संगती बरोबर लागत नाही.

मनुष्य योनीत मात्र देवादिकास निर्माण करणारा सत्त्वगुण, पश्वादिकास निर्माण करणारा तमोगुण व 'रजसो लोभ एव च" या वाक्याप्रमाणे लोभादिकास निर्माण करणारा रजोगुणही नाही. अशी सर्व मिश्रण ही मनुष्ययोनी आहे या योनीत निर्माण झालेल्या मानवास देवादिकात असलेली विषयलंपटताही नसते, पश्वादिक योनीत असलेला मूढ अज्ञानांधकारही नसतो व साधारण मानवात असलेले लोभादि रजोगुण दोषही नसतात अशा मानव जन्म फार श्रेष्ठ आहे व याचेच वर्णन विचारशील देव

'अहो अमीषां किमकारि शोभनं
प्रसन्न एषां स्विदुत स्वयं हरिः'

इत्यादि वाक्यांनी भागवतादि ग्रंथात करतात.

'दुर्लभ मानुष जन्म'

'जन्तूनां नरजन्म दुर्लभम्, 'दुर्लभं त्रयमेवैतद्देवानुग्रहहेतुकं। मनुष्यत्वं"

असे वर्णन भगवद्भक्त प्रल्हाद व ज्ञानिश्रेष्ठ परमपूज्य शंकराचार्यादि आचार्य व संत शिरोमणी करतात.

'शुचीनां श्रीमतां गेहे योगभ्रष्टोऽभिजायते। अथवा योगिनामेव कुले भवति धीमताम्।'

असे भगवंतांनीही, गीतेत एकाहून एक श्रेष्ठ असणाऱ्या मानव जन्माचे महत्त्व वर्णिले आहे अशा मानव जन्माची प्राप्ती पूर्व अनेक जन्म जन्मांतर संचित सुकृतानेच होते अशा अत्युत्कृष्ट मानव जन्मास आलेला जीव ऐहलौकिक किंवा पारलौकिक शरीरविषयेन्द्रियसापेक्ष सुख म्हणजेच 'अभ्युदय' किंवा 'प्रेयस्' शब्दवाच्य जे सुख त्याच्या संपादनाच्या खटपटीत न पडता शरीरविषयेन्द्रिय निरपेक्ष, निरन्तर, अविनाशी, स्वयंप्रकाश, स्वतःसिद्ध, निजात्मरूप स्वरूप सुखाच्या प्राप्तीविषयीच तो झटत असतो, व या प्रयत्नानेच मूळच्या नारायणाचा भ्रमाने नर झालेला मानव पुनः मूळ आपल्या नारायण स्वरूपाला प्राप्त होऊन कृतकृत्य होतो

'मनुष्याणां सहस्रेषु कश्चिद्यतति सिद्धये।
यततामपि सिद्धानां कश्चिन्मां वेत्ति तत्त्वतः॥

या श्लोकात पूर्वार्धातील 'कश्चित्' शब्दाने व उत्तरार्धातील 'कश्चित्' शब्दाने एकापेक्षा एक श्रेष्ठ असलेल्या अशा या मानवाचे वर्णन केले आहे मानव म्हणवून घेण्यास हेच लोक योग्य आहेत. बाकीचे नुसते नावाचे मानव आहेत. चित्रातील मानवापेक्षा यांच्यात सजीवता व निर्जीवता एवढाच भेद आहे. 'पश्वादिभिश्चाविशेषात्' असेच यांचे खरे वर्णन करता येईल तरी पण अशी पशुप्राय मानव योनि मिळणेसुद्धा कठीण आहे पुण्य व पाप यांचे

प्रमाण समान झाले म्हणजे ही मानव योनी प्राप्त होते. मग यथार्थ मानव होणे किती कठीण आहे व या मानवत्वाचे काय महत्त्व आहे हे लक्षात घेण्यासारखे आहे.

पुण्य व पाप समान प्रमाणाचे झाले म्हणजेच जर उत्तम, मध्यम व कनिष्ठ असे सर्वच मानव जन्मास येतात. तर सर्वांचा व्यवहार सारखाच का असू नये? काही मानव अधोगतीला उन्मुख व काही ऊर्ध्वगतीला उन्मुख, असा भेद का? अशी शंका करून संतशिरोमणि श्रीएकनाथ महाराजांनी या शंकेला उत्तर दिले आहे. ते म्हणतात—

दोन शेर वाळू एका ताजव्यात व दोन शेर सोन्याचा गोळा दुसऱ्या ताजव्यात घालून तराजू उचलला, तर काटा समच राहील. व चार शेराचे दोन भागही समानच राहतील. त्याप्रमाणे वाळूच्या कणाप्रमाणे क्षुद्र पापाचा समुदाय, व तितक्याच मापाचे एक प्रचंड पुण्य, असे ज्या मानव जन्माला कारण झाले असेल. त्या मानवाचे मुख्य पाप समानच परंतु त्याची प्रवृत्ती व व्यवहार सर्व उत्तम होऊन तो उत्तम गतीला प्राप्त होईल व ज्या मानवाची पुण्ये वाळूच्या कणाप्रमाणे क्षुद्र आहेत व तितक्याच मापाचे एक प्रचंड पाप आहे, त्याची प्रवृत्ती व्यवहार अधम होऊन तो अधोगतीस जाईल. याप्रमाणे इतरही भिन्नभिन्न प्रवृत्तीच्या मानवाची स्थिती जाणावी. म्हणजे सर्व मानव सारख्याच प्रवृत्तीचे का होत नाहीत ही शंका दूर होऊन शास्त्र सिद्धांत बरोबर लक्षात येईल.

अनेक योनी फिरता फिरता ज्या वेळी पुण्य व पाप समान होईल त्याच वेळी मानव योनी मिळते. म्हणून साधारण मानवताच किती कठीण आहे याचा विचार केला पाहिजे. मग उत्तम मानवतेबद्दल बोलण्याचेच कारण नाही. मानव जन्म हा चव्हाट्यासारखा आहे. म्हणजे चव्हाट्यावर उभा राहिले असता स्वेच्छेने जसे चारी रस्त्यांपैकी कोणत्याही रस्त्याने त्याला जाता येते, तसे मानवदेहजन्मरूप चव्हाट्यावरून जीवाला चारी ठिकाणी जाता येते. श्रीमद्भागवतात—

"स्वर्गापवर्गयोर्द्वारं तिरश्चां पुनरस्य च"

असे या ठिकाणचे वर्णन केले आहे. मनुष्य जन्म प्राप्त झाला असता मानवाने आपल्या इच्छेप्रमाणे स्वातंत्र्याने प्रयत्न करून वाटल्यास स्वर्गप्राप्ती करून घ्यावी मोक्षाची इच्छा असल्यास मोक्ष मिळवावा, नरकादिकांची व स्थावरात अधोगतीची मोहात्मक इच्छा असल्यास त्याची प्राप्ती करून घ्यावी. अथवा पुनः आपण मनुष्यच व्हावे अशी इच्छा असल्यास मनुष्ययोनीची प्राप्ती करून घ्यावी. ईश्वराने त्याला त्याविषयी स्वातंत्र्य व भरपूर साधनसामुग्री निर्माण करून ठेवली आहे.

विष, अमृत. पाणी व अग्नि, प्रेयस व श्रेयस, सुखदुःख अशी एक ना दोन हजारो द्वंद्वे याची साधने व याच्या कार्य कारणभावाला ज्ञापक शेकडो ग्रंथ ईश्वराने या जगात सर्व काळ सिद्ध करून ठेवले आहेत. "भिन्नरुचिर्हि लोकः" या न्यायाने आपापल्या आवडीप्रमाणे जीव ती ती साधने घेऊन त्या त्या फळाची प्राप्ती करून घेतो.

यात ईश्वराचा काहीच दोष नाही. ईश्वर हा पर्जन्याप्रमाणे सर्वांवर प्रेम करणारा आहे. उडीद, मूग, ज्वारी या धान्याच्या विषमतेनेच त्याच्या त्याच्या फळात विषमता येते. पर्जन्य हा उदासीन व सर्वांशीच सम आहे. तसाच ईश्वरही सर्वांशी समान आहे. "समोऽहं सर्वभूतेषु" अशी त्याची प्रतिज्ञा आहे. उत्कट पुण्याने देवयोन्यादि ऊर्ध्वगति उत्कट पापाने नरकादि स्थावरात अधोगति व समान पापपुण्याने मानवजन्मरूप मध्यगती देणारा ईश्वर. वैषम्य व निष्ठुरता हा दोष मानवाच्याच डोक्यावर आहे. तरी अत्यंत श्रेष्ठ व दुर्लभ असणाऱ्या मानव देहाची प्राप्ती झाली असता त्याचे महत्त्व व किंमत जाणून सर्वथा त्याचे सार्थक करावे असा शास्त्राचा उपदेश आहे.

## २ मानवाचे कर्तव्य

"कौमार आचरेत्प्राज्ञो धर्मान्भागवतानिह"

असे भागवतात भगवद्भक्तशिरोमणि प्रल्हादाने व

"अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्"

असे भगवद्गीतेत भगवंताने सांगितले आहे. भगवान सर्वज्ञ आहे व भगवद्भक्तही भगवत्कृपेने सर्वज्ञकल्प आहेत. याहून दुसरे जगामध्ये हितोपदेश करणारे श्रेष्ठ कोणीच नाहीत. दोघांचेही म्हणणे सुखरहित क्षणिक व दुर्लभ पण सर्व पुरुषार्थप्रद अशा मनुष्य देहाची प्राप्ती झाली असता सर्व इतर उद्योग दूर सारून लहानपणापासूनच भगवद्भजन रूप भागवत धर्मांचे आचरण करावे. म्हणजे मानवाचे खरे कल्याण होऊन त्याच्या जन्माचे साफल्य होते, असे आहे. म्हणजे कौमारावस्थेपासून मरेपर्यंत भागवत धर्माचरण करणे हे मानवाचे कर्तव्य ठरते. प्रल्हादाने विशेषत कौमारावस्थेत

भागवत धर्माचरणाविषयी 'कौमारे' या शब्दाचा प्रयोग करून कटाक्षाने लिहिले आहे. 'प्राज्ञ' शब्द देऊन कौमारावस्थेतच शहाण्या असणाऱ्या मानवाने भागवत धर्माचरणास आरंभ करावा मग ते शहाणपण उपजत असो, किंवा भाग्यवशात् मिळालेल्या सत्संगतीने आलेले असो, कसेही चालेल.

शहाणपणामुळेच मात्र लहानपणापासून भागवत धर्माचरण घडते. एरवी नाही प्रल्हादास गर्भातच संतशिरोमणि परम भागवत श्रीनारदांची संगती व उपदेश घडून शहाणपण प्राप्त झाले व बाल्यावस्थेपासूनच त्याने भागवत धर्माचे अनुष्ठान सुरू केले व आमरण ते अखंड चालविले. अनेक जन्मार्जित पुण्यवशात् प्रल्हादाची संगति ज्या बालकांना घडली, त्यानीसुद्धा भागवत धर्मानुष्ठानाचा क्रम बालपणापासूनच सुरू केला, व आमरण तो तसाच चालविला. हे 'जगद्दुर्निरवग्रत्वात्' या वाक्यावरून सिद्ध होते प्रल्हाद किंवा त्याच्या संगतीला लागलेले त्याचे मित्र हे दोघेही दैत्य कुळामध्ये उपजूनसुद्धा भागवतधर्माचरण व तत्प्रचरणशील झाले, याचे कारण सत्संगति व भागवत धर्म याचेच वैशिष्ट्य हे आहे, हे 'निरवग्रत्वात्' या पदानी प्रदर्शित केले आहे. या सर्व विचारावरून मनुष्याने भागवत धर्माचे अनुष्ठान करणे हे त्याचे आद्य कर्तव्य, व ते सिद्ध होण्याकरता सत्संगति करणे हे त्याचे दुसरे कर्तव्य, असे सिद्ध होते.

संताची संगती करणाऱ्याला प्रथम संत कोण हे कळले पाहिजे लक्षणानी म्हणजे चिन्हानी कोणत्याही वस्तूचे ज्ञान होते बाह्य व अंतरंग अशी दोन प्रकारची चिन्हे असतात माळा धारण करणे, जटा वाढविणे, भस्म धारण करणे, इत्यादि बाह्य चिन्हे नेमकी संताची ओळख करून देतीलच असे नाही संताचा आव आणणाऱ्या ढोंग्याजवळसुद्धा अशी लक्षणे सहज सापडतील म्हणून या लक्षणाकडे विशेष लक्ष न देता अंतरंग लक्षणानीच संताची ओळख करून घ्यावी. ही लक्षणे ढोंग्याला दाखविता येणे शक्य नाही तुकाराम महाराजानी बाह्य लक्षणे निरुपयोगी ठरवून संताची अंतरंग लक्षणे दाखविणारा एक अभंग लिहिला आहे त्यावरून संताचा शोध होईल.

"अंतरी निर्मळ वाचेचा रसाळ ।
त्याचे गळा माळ असो नसो ॥ १ ॥
वी चोंगाळिल्या वाग ॥
त्याचे माथा जरा असो नसो ॥ २ ॥
परस्त्रिये ठायी जोरा नपुसक ।
त्याचे अंगा राख असो नसो ॥ ३ ॥
परद्रव्य अंध निर्मी जो मुका ।
तुका म्हणे देवा तोचि संत ॥ ४ ॥

असा तो अभंग आहे
श्रीमद्भागवतात—

"सतोऽनपेक्षा मच्चित्ता प्रशान्ता समदर्शिना"

असे संताचे लक्षण केले आहे, हेही अन्तरंग लक्षणच आहे संत निरिच्छ असतात, व सर्वदा भगवचिन्तनात मग्न असतात. रागद्वेषादि दोषारहित असल्याने अतिशय शान्त असतात, व 'सर्वखल्विदं ब्रह्म' अशी सर्वत्र ब्रह्मदृष्टि ठेवणारे असतात मग त्याचे बाहेरचे वर्तन गृहस्थासारखे, ब्रह्मचाऱ्यासारखे, सन्याशासारखे, किंवा एखाद्या वेड्यासारखे असो, तिकडे न पाहता अन्तरंगाकडे दृष्टि ठेवली पाहिजे, व अशा संताजवळ सदासर्वदा गेले पाहिजे शिष्याची योग्यता पाहण्याकरता त्यानी लवकर उपदेश वगैरे जरी दिला नाही, तरी न कटाळता नेहमी त्याच्या संगतीत रहावे साधकाला त्याच्या सहज चालल्लेल्या गोष्टीमधूनच बहुत मोलाचा उपदेश मिळतो, व त्या योगाने त्याचे सर्व दु ख व कष्ट नाहीसे होऊन तो परम कल्याणभाजन होतो संत आपल्या संगतीने पामर जीवाला नारायणस्वरूप बनवितात याबद्दल परमपूज्य प्रात स्मरणीय व दत्तावतारच असणाऱ्या श्रीमद्वासुदेवानंद-सरस्वती स्वामि महाराजानी एक मराठी अभंग लिहिलेला आहे ते म्हणतात—

'सदा संतापाशी जावे । त्याचे जवळी बैसावे ॥
उपदेश ते न देती । तरी ऐकाव्या त्या गोष्टी ॥
तचि उपदेश होती । त्याही कष्ट नष्ट होती ॥
वासुदेव म्हणे संत । संग करिती पमत ॥'

अनेक जन्मात केलेल्या महत्प्रयासानेसुद्धा केव्हातरी व कसेतरी कष्टाने साध्य हाणारे म्हणूनच दुष्प्राप्य असणारे आत्मस्वरूप साक्षात्काररूप तत्त्वज्ञान संतसंगतीने एकाच जन्मात व सहज लीलेने प्राप्त होते असा सत्संगतीचा महिमा आहे सतसंगती तर मोठीच आहे तिचे वर्णन काय करावे? संताच्या चरण धूलीचा महिमाही फार मोठा आहे त्या धूलीची प्राप्तीसुद्धा बहुत सुकृताच्या जोडीशिवाय होत नाही असे साधुवर्य तुकाराम महाराज

वर्णन करतात.

" तुका म्हणे साधन सुलभ गोमटें ।
परी उप तिष्ठे पूर्व पुण्य ॥ "

असे स्पष्ट त्यांनी चरणरजस्पर्शाबद्दल लिहिले आहे.

" रहूगैनत्र पसानयाति न चेज्यया निर्वपणा गृहाद्वा ।
न च्छदसानैव जलाग्नि सूर्यैर्विनामहत्पादरजोभिषेकम् ॥ "

असे भागवतात रहूगणराजाला जडभरतानी इतर सर्व साधन निषेधपूर्वक महत्पाद रजोभिषेकच तत्वज्ञानाला साधन आहे असे सांगितले आहे. म्हणून सतसंगती किंवा त्यांच्या चरणाची धूली मिळण्याकरता सदिच्छा व प्रयत्न करणे मानवाचे आद्य कर्तव्यच आहे. पूर्व पुण्याईने सहज या गोष्टी लाभल्या तर भाग्योदयच समजायचा. तसे न झाल्यास त्याकरता शास्त्रदर्शित मार्गाने त्याविषयी प्रयत्न करीत रहावे. शास्त्र ईश्वरार्पण बुद्धीने, निष्कामपणाने स्ववर्णाश्रमधर्मानुष्ठान यथाशक्ति करणे हे सतसंगति मिळण्याचे साधन आहे, असे सांगते. निष्काम कर्म मान वाच्या हातून कसे घडेल ? कारण –

' प्रयोजनमनुद्दिश्य न मन्दोऽपि प्रवर्तते '

असे सार्वलौकिक अनुभव प्रकट करणारे सुभाषित आहे. जगती मन्दमती मनुष्यसुद्धा प्रयोजनावाचून कोण तेही कर्म करीत नाही. मग निष्प्रयोजन म्हणजे निरिच्छ होऊन शास्त्रीय कर्म शहाणी माणसे कसे करतील ? आणि शास्त्रे तर निष्काम कर्मानुष्ठान करा असे

' एतान्यपि तु कर्माणि सङ्गं त्यक्त्वा फलानि च ।
कर्तव्यानीति मे पार्थ निश्चितं मतमुत्तमम् ॥१॥ '

इत्यादि वाक्याने वर्णन करतात. तरी लोकानुभव व शास्त्र याची एकवाक्यता कशी व्हावी असे वाटणे महाजिक आहे. परतु थोडा विचार केल्यास या प्रश्नाचे उत्तर मिळ ण्यासारखे आहे शास्त्रातील 'निष्काम' शब्दाचा अर्थ कोणत्याच फळाची कामना नसणे असा केला तर वर सागवि ल्याप्रमाणे लोकानुभव व शास्त्र याचा विरोध होतो. परतु निष्काम शब्द लिहिणाऱ्या शास्त्रकारानी कोणतीच कामना नसणे असा 'निष्काम' शब्दाचा अर्थ गृहीत धरला नाही. तर ज्या फळाची इच्छा मनात धरून मानव लौकिक किंवा वैदिक कर्म करीत असता अधिकाधिक ससाराच्या जाळ्यात गुरफटून जन्ममरणाचे फेरे वारवार भोगत राहील, अशा फळाची किंवा प्रयोजनाची इच्छा टाकणे, हा निष्काम शब्दाचा अर्थ आहे. अशा फळाच्या इच्छा म्हणजे मुक्ति किंवा तत्साधनरूप फळाच्या इच्छेहून भिन्न.

पुत्रैषणा, दारैषणा, वित्तैषणा, लोकैषणा

वगैरे शब्दानी सांगितलेल्या इच्छाच आहेत. व निष्काम शब्दातील 'काम' शब्दानी या इच्छाच विवक्षित आहेत. अन्त करणशुद्धि–पापनाश–ईश्वरप्रीती–सतसगती वगैरे मुक्तिसाधनरूप फळे व मुक्तिरूप सर्वश्रेष्ठ जे फळ याच्या इच्छेला 'काम' ही संज्ञाच नाही. कारण या कामनेपासून परमदु खद संसारवृक्षाच्या अंकुरच निर्माण होत नाही. उलट दग्धबीजे भक्षणाला साधन होऊन जशी भोक्त्याला तृप्तिरूप आनद देतात, त्याचप्रमाणे अन्त करण शुध्यादि व मुक्ति वगैरे फळाच्या कामना निजसहजसिद्ध परमानद प्राप्तिरूप तृप्तीलाच देणारी होत असल्याने या कामना 'त्याज्य' नसून 'ग्राह्य'च आहेत

'बहुत सुकृताची जोडी म्हणुनि विठ्ठलि आवडी'

अशा वाक्याने ज्ञानेश्वर 'महाराज विठ्ठलि आवडी' या शब्दाने या सर्व सदिच्छाच दाखवीत आहेत.

' यत्तदग्रे विषमिव परिणामे ऽमृतोपमम् '

या वाक्याने भगवतानी वर्णन केलेले सात्विक सुख वरवर विषासारखे दिसते परतु परिणामी ते अमृतासारखे आहे. त्याचप्रमाणे मुक्ति व तत्साधनरूप फळाच्या इच्छा जरी वरवर कामनेप्रमाणे दिसल्या तरी त्या निष्कामरूप आमृताप्रमाणे आहेत. म्हणून लोकानुभव व शास्त्र याचा विरोध नसून त्याची एकवाक्यताच आहे. हे सिद्ध झाले.

' कर्मनिर्हार मुद्दिश्य परस्मिन तदर्पणम् ।
यजेद्यष्टव्य मिती वा पृथग्भाव स सात्विक ॥ '

असे तीन प्रकार निष्काम कर्म करण्याचे भगवान् कपिलानी सांगितले आहेत, व याना सात्विक भक्ति असे म्हटले आहे. श्रीधरस्वामींनी याल यथोत्तर श्रेष्ठ अशा पायऱ्या लावविल्या आहेत म्हणजे पाप नाशाच्या उद्देशाने कर्म करणाऱ्यापेक्षा परमेश्वरार्पण बुद्धीने कर्म करणारा श्रेष्ठ व त्याहूनही 'यष्टव्य' अशी भगवताची आज्ञा सिद्ध होण्याकरता कर्म करणारा श्रेष्ठ असे उत्तरोत्तर श्रेष्ठ आहे पहिली पायरी सापडल्यास शेवटची पायरी मिळणारच व अखेर तो मदिरात पोचेल यात शका नाही वसेही असो अशा प्रकारची निष्काम कर्मे करणारा अखेर बधविमुक्तिरूप निजस्वरूपप्राप्ती करून

धेणाच्च यात शंका नाही. म्हणून ईश्वराच्या आज्ञेप्रमाणे निष्कामपणे स्वस्ववर्णाश्रमधर्मांचे अनुष्ठान करणे हे मानवाचे आद्य व श्रेष्ठ कर्तव्य आहे, असे सिद्ध झाले.

म्हणूनच या मतानें वेदांनी मनुष्याच्या कल्याणासाठी कर्म, उपासना व तत्त्वज्ञान असे तीन मार्ग अधिकारानुरूप सांगितले आहेत. सर्व वेदांचे सार समग्र करणारी अठरा अध्यायात्मक भगवद्गीतासुद्धा सहा सहा अध्यायांच्या विभागानें म्हणजे तीन षट्कानें हेच तीन मार्ग दाखवीत आहे. भागवतातही भगवताने

' योगास्त्रयो मयाप्रोक्ता नृणां श्रेयोविधित्सया ।
ज्ञानं कर्म च भक्तिश्च नोपायोऽन्योऽस्ति कुत्रचित् ॥ '

असे श्रीमुखाने तीनच मार्ग कल्याणाचे आहेत असे सांगून चौथा उपाय नाही, असे स्पष्ट म्हटले आहे. अर्थात इतर जे उपाय शास्त्रात वर्णन केले असतील, त्या सर्वांचा अंतर्भाव या तीनींतच होतो. जसे नैय्यायिकांनी वर्णिलेल्या षोडश पदार्थांचा अन्तर्भाव वैशेषिकांच्या सप्त पदार्थांत होतो, तद्वतच येथे समजले पाहिजे. म्हणजे प्रमाणमूर्धन्य असणारे वेद व वेदार्थांचाच विस्तार करणारी सर्व शास्त्रे यांची फलात म्हणजे प्रयोजनात व साधनात एकवाक्यता सिद्ध होऊन कल्याणेच्छु मानव निःशंकपणे स्वाधिकारानुरूप साधनानुष्ठान करून परम कल्याण संपादन करील, व याकरताच सर्वश्रेष्ठ असा मानव देह परमेश्वरानी मनुष्याला दिला आहे. प्रातःस्मरणीय व प्रत्यक्ष दत्तावतार असणाऱ्या श्रीमत्परमहंस परिव्राजकाचार्य श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती स्वामीमहाराजांनी, भगवतांनी भागवतात सांगितलेल्या ' ज्ञानं कर्म च भक्तिश्च ' या क्रमाप्रमाणे ज्ञान, कर्म व भक्ति प्रतिपादक असे अनन्तकोटिब्रह्माण्डनायक श्रीमन्नृसिंह सरस्वती दत्तमहाराजांच्या आज्ञेने सरस्वती गंगाधर नावाच्या नामधारक भक्ताने प्राकृत महाराष्ट्रभाषेत रचलेल्या गुरुचरित्राचे दत्तमहाराजांचे आज्ञेनेच गीर्वाण भाषेत द्विसाहस्री नावाचे दोन हजार श्लोकात्मक गुरुचरित्र निर्माण केले व त्यानंतर तदंग म्हणून **'योगरहस्य'** व **' ज्ञानरहस्य '** म्हणजेच बोधरहस्य असे दोन प्रकारणे गीर्वाण भाषेतच लिहिली आहेत. त्यात योगरहस्यात संपूर्ण अष्टांग योगाचे संक्षेपत साङ्गोपाङ्ग वर्णन व बोधरहस्यात श्रीमद्भगवत्पूज्यपाद शंकराचार्योक्त अद्वैत संप्रदाय परंपरा संमत अद्वैत वेदान्ताचे साङ्गोपाङ्ग वर्णन केले आहे. अष्टांग योगाची अत्यन्त धर्म, उपासना व ज्ञान असा तीनी काण्डांना आहे. ' आत्मस्य ' प्राणायामस्य असे सांगून प्रत्येक कर्माचा आरंभ आहे. संध्यावंदनाशिवाय कोणत्याही वैदिक कर्मात अधिकार नाही.

' विनासंध्यावन्दनेन नाधिकारोऽन्यकर्मसु '

असे स्मृतिग्रंथ वर्णन करतात, व प्राणायामाशिवाय संध्या होत नाही, यम-नियम-च आसनाशिवाय प्राणायाम होत नाही. म्हणजे संध्येत यमनियम, आसन व प्राणायाम अशी अष्टांग योगापैकी चार अंगे आरंभालाच लागतात आता ' संध्या ' हा शब्दच ध्यान प्रधानकर्माचा वाचक असल्याने. व प्रत्याहाराशिवाय व धारणेशिवाय ध्यान होत नसल्याने व ध्यानानंतर सविकल्प व निर्विकल्प असा भेद मानून समाधीचा अंतर्भाव होत असल्याने, संध्या हे कर्मच प्रथम अष्टांग योगात्मक आहे. अर्थात् तत्पूर्वक केली जाणारी सर्व कर्मे म्हणजेच कर्मकाण्डात अष्टांग योगाचा अन्तर्भाव असून अष्टांग योगाची कर्मकाण्डाला आवश्यकताही आहे. उपासनाकाण्ड तर विजातीय प्रत्ययरहित सजातीय प्रत्ययानुवृत्तीरूप योगात्मकच असल्याने पूजा प्रधान असणारे उपासनाकाण्डही अष्टांग योगसापेक्षच आहे. ज्ञानकाण्डात ' निदिध्यासितव्य ' असा प्रत्यक्षच योगाचा उपदेश असल्याने, व निदिध्यासनाशिवाय ब्रह्मात्मैक्य साक्षात्कार होत नसल्याने, ज्ञानकाण्डही अष्टांगयोगसापेक्ष आहे. स्वात्माराम योगींद्र विरचित ' हठप्रदीपिकेत ' जोपर्यंत प्राणवायूचा प्रवेश ब्रह्मरन्ध्रापर्यंत होत नाही, प्राणवायूचे कुंभक प्राणायामाने स्थैर्य करून जोपर्यंत वीर्यबिंदु स्थिर होत नाही, चित्तात ध्येयाकारवृत्तीचा प्रवाह सहजरीत्या जोपर्यंत होत नाही तोपर्यंत ज्ञान झाले असे म्हणणे म्हणजे केवळ दंभ किंवा मिथ्या बडबड आहे असे म्हटले आहे. यावरून ज्ञानकाण्डास योगाची किती आवश्यकता आहे हे लक्षात घेण्याजोगे आहे. म्हणून गुरुचरित्र प्रतिपाद्य तीनी काण्डांचे शेष किंवा अंगभूत असे योगरहस्य महाराजांनी गुरुचरित्रसहितनंतर लिहिले, व या अष्टांग योगाचे व सर्व साधनांचे फलभूत व सर्वमूर्धन्य असणारे जे ब्रह्मात्मैक्य ज्ञान तत्प्रतिपादक ' ज्ञानरहस्य ' (म्हणजेच बोधरहस्य) हे प्रकरण नंतर लिहून गुरुचरित्र ग्रंथस्वरूपी श्रीगुरुमहाराजांच्या दिव्य शरीराला एक अमूल्य व प्रकाशमय सुंदर अलंकार घालून श्रीदत्तस्वरूप असणाऱ्या श्रीमद्वासुदेवानंद-सरस्वती

स्वामिमहाराजानी अभेदरूपाने गुरुमहाराजाची वाङ्मय सेवा केली आहे. योगरहस्याच्या आरंभी महाराजानी—

' श्रेष्ठपुजन्मसाफल्य कार्यं योगत्रयाश्रयात् ।
ममाग्व्यातद्विसाहस्रीसहितासग्रहस्त्वयम् ॥

असे म्हटले आहे. म्हणजे अष्टाग योगाने आमूलाग्र व्याप्त असलेल्या ज्ञान, कर्म व उपासना या योगत्रयाचा आपापल्या अधिकाराप्रमाणे आश्रय घेऊन मिळालेल्या श्रेष्ठ मानव देहाने सार्थक करावे एवढाच या संपूर्ण द्विसाहस्रीसहितेचा संक्षिप्त अर्थ आहे. असे महाराज म्हणतात, व संपूर्ण वाङ्‌-मयात व्यापून असणारे व त्याला अत्यावश्यक असणारे अष्टाग-योग प्रतिपादक-योगरहस्य लिहितात, यावरून त्याचीं योग्यता किती आहे, हे लक्षात येईल, व अशा योगाने साध्य होणारे ज्ञान किती महत्त्वाचे आहे हेही लक्षात येईल. म्हणूनच योगरहस्यानतर ज्ञानरहस्यही ( म्हणजेच बोधरहस्य ) महाराजानी लिहिले आहे.

अनेक जन्मात केलेल्या निष्काम कर्मानुष्ठानाने ज्याना अशा दत्तस्वरूप असलेल्या महाराजाची प्रत्यक्ष सगती लाभली असेल, त्याना महाराजाच्या प्रत्यक्ष श्रीमुखातूनच आपापल्या अधिकाराप्रमाणे सन्मार्गाचे दर्शन झालेच आहे. त्याचे भाग्य कोण वर्णन करणार? परंतु परमकृपाळु महाराजानी आपली प्रत्यक्ष सगती न लाभणाऱ्या साधकाकरता अजरामर असे ग्रंथरूप शरीर येथे ठेवले आहे. त्याची अखंड सेवा अनन्य भावाने केली असता सन्मार्गाचा लाभ होऊन साधकाचे परम कल्याण होईल.

परमपूज्य व महाराजाचे एकनिष्ठ भक्त श्रीवामनराव गुळवणी महाराज व श्रीयुत गुरुभक्त शकरराव आजेगावकर प्रभृती भक्तमडळीनी महाराजाच्या या परमदिव्य असणाऱ्या वाङ्मय-शरीराचे प्रकाशन व प्रसार करून साधक लोकावर फारच मोठे उपकार केले आहेत., व पुण्यासारख्या शहरातही साधकाना अभ्यास करता यावा म्हणून ' श्रीवासुदेवनिवास योगाश्रम ' या नावाचे एक महाराजाचे स्थानही सर्व भक्त-मंडळींच्या सहायाने निर्माण केले आहे. हा साधकावर मोठाच उपकार झाला आहे. महाराजाचा प्रत्यक्ष सग जरी घडला. नाही, तरी त्याच्या वाङ्मयशरीराचा व महाराजाच्या सगतीत असणाऱ्या व्यक्तींचा सग योगाश्रमात घडून साध काचे समाधान होईल यात शकाच नाही. महाराजाचे बरेच वाङ्मय सस्कृत भाषेत आहे. त्याचा लाभ प्राकृत लोकास व्हावा म्हणून ' श्रीवासुदेवानद सरस्वती वाङ्मय प्रकाशन ' मडळाने महाराजाच्या संस्कृत ग्रंथापैकी कित्येक ग्रंथाचे मराठी भाषातर केले आहे, व आणखीही करण्याचा प्रयत्न चालू आहे. त्यातीलच योगरहस्य व ज्ञानरहस्य म्हणजे बोध रहस्य या ग्रथाच्या भाषान्तराचा हा प्रयत्न आहे. ग्रथातील अर्थाचा प्रत्यक्ष अनुभव येण्याकरता साधकाची दिनचर्या व अभ्यास याचे मार्गदर्शन पूज्य गुळवणीमहाराजाकडून स्वाचरणाने योगाश्रमात होतच असते. साधक त्याचा लाभ घेतीलच, असे प्रसगवशात् येथे सुचवून आता महाराजाच्या ज्ञानरहस्याच्या म्हणजेच बोधरहस्याच्या मराठी भाषातरास सुरुवात करीत आहे., ते निर्विघ्नपणे पार पाडण्यास महाराज समर्थ आहेतच.

श्रीगणेशायनमः । श्रीगुरुभ्योनमः ।

## अथ बोधरहस्यम्

श्लोकः—

**संतप्त धन्य संन्यासिन्गुरुभक्त गतागतात् ।**
**मुक्त्या आत्माप्तये तत्त्वंजडचैतन्यविद्भव ॥१॥**

अन्वय:— संतप्त धन्य सन्यासिन गुरुभक्त गतागतात् आत्माप्तये मुक्त्यै तत्त्वजड चैतन्यवित् भव ॥ १ ॥

अर्थः— आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक अशा तापत्रयाने तापलेल्या पुण्यशाली संन्यासी गुरुभक्ता ! ( तू ) या जन्ममरणाच्या फेऱ्यातून आत्मप्राप्तीरूप मुक्ती करता साख्यशास्त्रात सागितलेली तत्त्वे, आणि जड व चैतन्य याचे ज्ञान सपादन करून घे ( १ )

विवरण.— कठोपनिषदातील प्रथमाध्यायातील तृतीय वल्लीच्या बाराव्या मत्रात

' एषसर्वेषुभूतेषु गूढोऽत्मा न प्रकाशते ।
दृश्यते त्वग्र्यया बुद्ध्या सूक्ष्मया सूक्ष्मदर्शिभिः ॥'

म्हणजे ब्रह्मादि स्थावरान्त शरीरामध्ये स्वप्रकाश चैतन्यरूपाने व्यापून असलेला आत्मा अविद्यारूप मायेने आवृत झाल्यामुळे असल्याने, पहणे, ऐकणे, बोलणे, चालणे इत्यादि कर्मे करीत असलेलाच सर्वांच्या अनुभवाला येतो. एक अखंड अद्वितीय ब्रह्मस्वरूपाने तो कोणालाच कळत नाही. ही माया मोठी विचित्र, गंभीर व कळण्याला अत्यंत कठीण अशी आहे. जिच्या प्रभावाच्या तडाख्यात सापडलेले जीव, तू अद्वितीय ब्रह्मरूप आहेस देहेन्द्रियादिकाही तुझा काही

मग्न नाही, असे परमकृपाळु तत्त्वज्ञ सद्गुरूंनी सांगितले असतासुद्धा ते खरे आहे असे मानत नाहीत, व कोणीही न सांगतासुद्धा अनात्मरूप देहेन्द्रियादिस्वरूप मी आहे, असे मानतात. अर्थात् ही परमात्म्याची मायाच यथार्थ आत्मरूपाच्या ज्ञानास प्रतिबंधक आहे. म्हणूनच सदासर्वदा ब्रह्मस्वरूपाने प्रकाशमान असणारा आत्माच कोणालाही यथार्थ स्वरूपाने प्रकाशत नाही असे झाले आहे. आता आत्मा ब्रह्मस्वरूपाने प्रकाशतो व प्रकाशत नाही, अशी दोन परस्परविरुद्ध विधाने येथे केल्यासारखी दिसतात. परंतु ती वस्तुत: विरुद्ध नाहीत, असे या मंत्राच्या उत्तरार्धात श्रुती प्रतिपादन करते. श्रुतीचा अभिप्राय असा आहे की योगाभ्यासाने संस्कृत म्हणजे एकाग्र व सूक्ष्म झालेली ज्याची बुद्धी आहे, अशा लोकांना हा सर्वत्र गुप्त असलेला आत्मा प्रकाशतो व ज्याची बुद्धी योगाभ्यासा कित्यानी संस्कृत म्हणजे एकाग्र नाही, विषयाच्या ठिकाणीच आसक्त आहे, त्यांना हा आत्मा प्रकाशमान असूनही प्रकाशत नाही. ज्याप्रमाणे दुपारी बारा वाजता सूर्य प्रकाशत असूनही घुबडाला तो प्रकाशत नाही, तशीच येथेही स्थिती आहे. यासाठी ब्रह्मात्मैक्यरूप परमानंद प्राप्ती करता जीवाने आपली बुद्धी संस्कृत म्हणजे एकाग्र केली पाहिजे व त्याकरता 'यच्छेद्वाङ्मनसी' या पुढील मंत्राने श्रुतीने योगाभ्यासरूप साधनानुष्ठान करण्यासाठी मोठ्या कळकळीने उपदेश केला आहे. कठोपनिषदातील द्वितीयाध्यायाच्या प्रथमवल्लीतील—

" पराञ्चि खानि व्यतृणत्स्वयंभू-
स्तस्मात्पराङ् पश्यति नान्तरात्मन् ।
कश्चिद्धीरः प्रत्यगात्मानमैक्षत्
आवृत्तचक्षुरमृतत्वमिच्छन् ॥ १ ॥ "

या प्रथम मंत्राने स्व म्हणजे स्वतंत्र असलेल्या ईश्वराने जीवाची सर्व इन्द्रिये स्वभावत:च अनात्मरूप विषयाकडे धावत जावे अशा स्वभावाची निर्माण केली आहेत. ही एक प्रकारची इंद्रियांची हिंसाच ईश्वराने केली आहे असे श्रुती म्हणते. म्हणूनच इन्द्रियाधीन असणारे सर्वच जीव इंद्रियांबरोबर विषयोन्मुख होऊन त्यातच मग्न होतात, व नदीच्या जोरदार प्रवाहात सापडलेले प्राणी त्या प्रवाहाबरोबर वहात जाऊन तीरावर न येता जसे त्यातच बुडून मरतात, त्याप्रमाणे हे जीवसुद्धा अमृतस्वरूप असणाऱ्या आत्मरूप-तीरावर न येता संसाररूप मृत्यूनीच ग्रासले जातात. क्वचितच जीवांनी अशीच अवस्था प्राप्त होते. यातील प्रवादात भाग्यवान जीव आत्मरूप तीराकडे येण्याच्या उलट इच्छेने 'आवृत्तचक्षु' म्हणजे इंद्रियांच्या ताब्यात न जाता त्यांनाच आपल्या ताब्यात ठेवून विषय समुद्ररूप प्रवाहाच्या उलट म्हणजे विपर्यये मुख्यशील होऊन पराङ्मार्गाने नदीच्या प्रवाहाच्या उलट जाऊन प्रयत्न करणारा मनुष्य ज्याप्रमाणे तीरावर येऊन मरणापासून वाचतो, त्याप्रमाणे विषयविमुख जीवही आत्मरूप तीरावर येऊन अमरणधर्मा होतो, म्हणून असा पुरुष फारच विरळा आहे. असे.

'कश्चिद्धीः प्रत्यगात्मानमैक्षत'

अशा वाक्याने श्रुतीने दाखविले आहे, व असा आत्मदर्शनाचा लोकोत्तर अधिकार संपादन करण्याकरता श्रुतींनी त्याला 'आवृत्तचक्षु' होण्यास सांगितले आहे, असे या विशेषणावरून समजण्यास हरकत नाही. 'आवृत्तचक्षु' हे विशेषण आपल्या ठिकाणी सिद्ध होण्याकरता अष्टांगयोगाभ्यास पुरुषाने केला पाहिजे व तो कसा करावा हे सर्व महाराजांनी 'योगरहस्य' या पूर्वीच्या प्रकरणात सांगोपांग सांगितले आहे.

श्रुतीच्या 'आवृत्तचक्षु' या पदाने सांगितलेला अधिकार अष्टांगयोगाभ्यास करून पुरुषाने जरी संपादन केला तरी तेवढ्यानेच सद्गुरूंची अपेक्षा न ठेवता स्वतंत्रपणे पुरुष आत्मज्ञान संपादन करील असे मात्र म्हणता येणार नाही. कारण हे आत्मतत्त्व फार सूक्ष्म आहे. 'अणोरणीयान्' म्हणजे 'अणुप्रमाणादणीमान्' असे श्रुती याचे वर्णन करते व केवळ तर्कानेही याचे ज्ञान प्राप्त करून घेता येणार नाही, असे 'नैषा तर्केण मतिरापनेया' या वाक्याने ती सांगते, व लगेच पुढच्याच वाक्यात 'प्रोक्तान्येनैव सुज्ञानाय' असे म्हणते. म्हणजे दुसऱ्याने सांगितलेले तरच हे आत्मतत्त्व स्पष्टपणे कळू शकेल, असा श्रुतीचा अभिप्राय आहे. हे आत्मतत्त्व सांगणारा मनुष्य 'अवर' म्हणजे कनिष्ठ असेल तर शिष्याला त्याचा बोध होणार नाही असे.

'न नरेणावरेण प्रोक्त एष सुविज्ञेय '

या वाक्याने ती दाखवते, व

'प्राप्य वरान् निबोधत

म्हणजे श्रेष्ठ माणसाकडे जाऊन आत्मतत्त्व समजून घ्या असे

आग्रहाने मागतें. ही श्रेष्ठ माणसें म्हणजे ब्रह्मसाक्षात्कार होऊन ब्रह्माशी एकात्मता पावलेले पुरुषच होत.

“ शब्दे परे च निष्णात ब्रह्मण्युपशमाश्रयम् ”

म्हणजे शब्दब्रह्मात अर्थात आत्मप्रतिपादक सर्व शास्त्रात निष्णात् असून ‘ उपशमाश्रयम ’ म्हणजे निर्विकल्प समाधिशील व ब्रह्मसाक्षात्कार झालेले जे भगवद्भक्त शुकसनकादिकांसारखे असतील. तेच पुरुष ‘ वर ’ या शब्दाने श्रुतीला सांगावयाचे आहेत. असा वर दाखविलेल्या भागवतातील वाक्याचा अभिप्राय आहे. ब्रह्मस्वरूप आत्मतत्त्व समजण्याच आत्मतत्त्वजिज्ञासु पुरुषाने गुरुकडेच जावे. असे

*‘ तद्विज्ञानार्थं स गुरुमेवाभिगच्छेत ’*

या श्रुति वाक्याने दर्शविले आहे, व हे गुरु म्हणजेच पूर्वीच्या वाक्यात ‘ वरान ’ या शब्दाने व ‘ प्रोक्तान्येनैव ’ या वाक्यात ‘ अन्य ’ शब्दाने श्रुतीने दर्शविले आहेत. महापुरात नावाड्याशिवायच नाव चालविणाराची जी दुर्दशा होते. त्याचप्रमाणे गुरुशिवायच आत्मतत्त्वज्ञानाविषयी प्रयत्न करणाराची दुर्दशा होते, असे ‘ अकृतकर्णधरा ’ अशा शब्दाने वेदस्तुतीत वर्णन केले आहे. म्हणून सद्गुरूंनी उपदेश केला तरच आत्मतत्त्व स्पष्ट कळते, हा श्रुतीचा व सर्वशास्त्राचा अभिप्राय स्पष्ट करण्याकरिता पूर्वी वर्णन केलेल्या सद्गुरूंच्या सर्व लक्षणांनी संपन्न असलेल्या दत्तगुरुस्वरूप महाराजांनी गुरुशिष्य संवादरूपाने ‘ बोधरहस्य ’ नावाचे हे दुसरे प्रकरण आरंभ केले आहे.

म्हणजे जोपर्यंत चित्तात प्रपंचाविषयी वैराग्य निर्माण होत नाही. तोपर्यंत ईश्वरार्पण बुद्धीने तत्तदाश्रमोचित कर्मे करीतच राहिले पाहिजे. असे भगवद्वचन आहे. त्यास अनुसरून गृहस्थ, वानप्रस्थ वगैरे पायऱ्या क्रमाक्रमाने ओलांडून मग मुख्य असलेल्या वैराग्यपूर्वक ज्ञानमार्गाच्या आश्रयास जावे. नाहीतर इतो भ्रष्टस्ततो भ्रष्टः अशी अवस्था होईल. असा विचार करून गुरूंच्या प्रसन्नतेकरिता यथाशक्ति गुरुदक्षिणा गुरूंना समर्पण करून त्यांची आज्ञा घेऊन समावर्तन संस्कार ‘ अधीत्यस्नायात ’ या वचनाप्रमाणे करून तो घरी आला व बुद्धिलक्षण शीलसंपन्न अशा सत्कुलोत्पन्न कन्येचे पाणिग्रहण त्याने केले. व ‘ *पाणिग्रहणादि गृह्यंपरि*

वाटू लागले. या देहादिकांचा तो अत्यंत वैतागला. परंतु हे सर्व देहादि दृश्य काम, धर्म अविद्याधीन असल्याने मला सुचत नाही वाटते म्हणून ते कसे नाहीसे होईल?

याचे मूळ कारण अज्ञान गेल्याशिवाय हे जाणार नाही, व अज्ञाननाश सद्गुरूंच्या उपदेशानीं होणाऱ्या तत्त्वज्ञानाशिवाय नाही. तरी आता सद्गुरूंनाच शरण गेले पाहिजे. सद्गुरु हे करुणासागर, भक्तवत्सल, कर्तुमकर्तुं अन्यथाकर्तुं समर्थ, व ईश्वराचेही ईश्वर आहेत, ते माझी सर्व पीडा दूर करतील व पूर्ण समाधान ज्ञानोपदेशाने देतील, असा निश्चय करून पूर्ण वैराग्याने पूर्वी केलेल्या सर्व संगाचा परित्याग करून सद्गुरूंच्या भेटी करता तो पर्यटन करू लागला. पूर्वी केलेल्या निष्काम कर्मानुष्ठानाने प्रसन्न झालेल्या ईश्वराच्या कृपेने याला श्रीगुरुमहाराजांची भेट झाली. त्यांना पाहिल्याबरोबरच याच्या चित्ताला समाधान वाटले. भक्तिभावाने अत्यंत नम्रपणे साष्टांग नमस्कार करून श्रीगुरुमहाराजांच्या चरणारविंदावर आपले मस्तक या शिष्यश्रेष्ठाने ठेवले, व प्रेमाश्रूने त्यांच्या चरण-कमलावर अभिषेक केला. सर्वज्ञ असणाऱ्या गुरुमहाराजांनी चरणावर पडलेल्या शिष्याला उठवून कृपेने त्याच्या मस्तकावर आपला वरदहस्त ठेवला व शिष्याने विनंती करण्याच्या पूर्वीच अंतरज्ञानाने त्याची सर्व परिस्थिती जाणून त्याच्या मनातील इष्ट ओळखून ते त्याच्याशी बोलू लागले.

श्रीगुरु म्हणतात—

प्रखर सूर्यकिरणांनी संतप्त झालेला प्राणी ज्याप्रमाणे थंडगार असलेल्या गंगा प्रवाहाकडे इतर सर्व उद्योग सोडून धावतो, त्याप्रमाणे आध्यात्मिकादि तापत्रयाने पोळलेल्या शिष्यवरा! तू इतर सर्व सोडून इकडे आलास. तुझ्या चित्तात उत्कट वैराग्य निर्माण झाले व तुला माझी भेट झाली हे फार चांगले झाले. पूर्वी आचरलेला निष्काम कर्मयोग व ईश्वरोपासना ही तुझी साधने आज फलद्रूप झाली. त्यामुळे तू धन्य आहेस. तू आत्मज्ञानाकरता सर्व परित्यागरूप संन्यास केला आहेस, व गुरुकृपेशिवाय आपले क्लेश दूर होणार नाहीत असा गुरुविषयी तुझ्या चित्तात दृढनिश्चय आहे. म्हणून तू गुरुभक्त आहेस. सर्व परित्यागरूप संन्यास व गुरुभक्ति ही साधने ज्याच्याजवळ असतील तोच सर्व विद्येमध्ये श्रेष्ठ असलेल्या अध्यात्मविद्येचा अधिकारी आहे. जोपर्यंत लौकिक वैदिक फलोद्देशाने मनुष्य तत्साधनभूत कर्मकाण्डात व्यग्र असतो, तोपर्यंत निर्विघ्नपणे ज्ञानसाधना नुष्ठान करता येत नाही. म्हणूनच

'संन्यस्य श्रवणं कुर्यात'

म्हणजे इतर सर्व साधनांचा परित्यागरूप संन्यास करूनच ज्ञानसाधनभूत श्रवणादिकांचे अनुष्ठान करावे असे संन्यासाचे विधान शास्त्रात सांगितले आहे. गुरु वचनावर नितान्त श्रद्धा गुरुभक्ताचीच असते. ही श्रद्धा असल्याशिवाय गुरुपदेशाचे काही फळ होत नाही. देवावर जशी भक्ती व श्रद्धा असते, तशी श्रद्धाभक्ती गुरूचे ठिकाणी ज्याची असते, त्याच परमश्रेष्ठ शिष्याला उपनिषत्प्रतिपाद्य अर्थ प्रकाशित होतात, असे श्रुतीसुद्धा वर्णन करते. तू संन्यास व गुरुभक्ती या दोनीही तत्त्वज्ञानाच्या साधनांनी युक्त आहेस. तरी तुला ज्ञान प्राप्ती खास होईल. तू भिऊ नको. तुला अभयदान दिले आहे. आजपर्यंत तू या जन्म-मरणाच्या फेऱ्यात सापडला होतास. त्यामुळे हे अध्यात्मिकादि तापत्रय तुझ्या पाठीमागे लागले होते जोपर्यंत जन्ममरण जीवाला भासते, तोपर्यंत हे तापत्रय भासत राहणारच, व जोपर्यंत अविद्येने देहादिकांचे ठिकाणी आत्मभावना आहे, तोपर्यंत देहाच्या जन्ममरणाबरोबर जीवाला जन्ममरण असणारच

तरी देहादि अनात्मरूप पदार्थांचे ठिकाणी आत्मबुद्धिरूप अनात्मप्राप्तीचा परित्याग करून, परब्रह्मरूप स्वात्म स्वरूपाचे ठिकाणी आत्मबुद्धिरूप आत्मप्राप्ति, म्हणजेच मुक्ति, तिच्याकरता तुला सांख्य शास्त्रात सांगितलेली प्रकृती–महत्तत्त्व–अहंकार–पंचतन्मात्रा नावाची पांच सूक्ष्म भूते, श्रोत्र-त्वक्-चक्षु जिव्हा व घ्राण ही पांच ज्ञानेंद्रिये, वाक्-हस्त-पाद-गुद-व उपस्थ ही पांच कर्मेंद्रिये, व मन, अशी अकरा इंद्रिये पंच आकाश वायु-तेज-जल व पृथ्वी अशी पांच स्थूल भूते, व चेतनरूप जीवात्मा अशी पंचवीस तत्त्वे किंवा योगशास्त्राप्रमाणे चेतन वर्गात जीव ईश्वर असे दोन भाग मानून दोन प्रकारचा चेतन वर्ग म्हणजे सव्वीस तत्त्वे समजून घेतली पाहिजेत. त्यात चेतनाचे स्वरूप काय, व जडाचे स्वरूप काय, हेही तुला बरोबर कळले पाहिजे म्हणजे तुला तत्त्वज्ञानरूप स्वात्मप्राप्ती होऊन तू जन्ममरणाच्या फेऱ्यातून सुटशील, व आध्यात्मिकादितापत्रयातून अत्यंत मुक्त होशील. तत्त्वज्ञानाशिवाय मात्र या भवातून मुक्त होण्यास दुसरे साधन नाही.

'ज्ञानादेव तु कैवल्यम्'

म्हणजे ज्ञानानेच आपले खरे बंधनिर्मुक्त एक-अद्वितीय स्वप्रकाश परमानंदरूप कैवल्य प्राप्त होते, असे श्रुती 'एव' काराचा प्रयोग करून दाखविते ॥ १ ॥

श्लोकः—

**स्वान्यज्ञं जडमन्याचिन्नामरूपात्मकं जडं ।**
**रोमत्वङ्मांसनाड्यस्थि भुवोद्भ्योमूत्ररेतसी ॥**

अन्वयः— स्वान्यज्ञ जडं (ज्ञेयम्) अन्याचित् (ज्ञेया) नामरूपात्मकं जडम्। रोमत्वङ्मांसास्थि भुवः (भवन्ति) मूत्ररेतसी स्वेदः अस्रलालेच अद्भ्यः (भवन्ति) ॥२॥

अर्थः— स्वतःला व दुसऱ्याला न जाणणाऱ्या घटपटादि पदार्थाला जड असे म्हणतात; व त्याहून दुसऱ्याला म्हणजे स्वतःहा व दुसऱ्याला जाणणाऱ्याला चित् असे नाव आहे. जड पदार्थ सर्वही नामरूपात्मक आहे. अर्थातच चित् म्हणजे चेतन पदार्थ नामरूपरहित आहे. जड किंवा अचेतन असलेला हा देह पंचभूतात्मक आहे. यात असणारे लोम, त्वचा, मास, नाड्या व हाडे, हे सर्व पृथ्वीपासून झाले. मूत्र-रेत-घाम-रक्त व लाळ. हे पदार्थ जलापासून झाले (२)

विवरणः—श्रीगुरुमहाराजानी साख्य शास्त्रात सागितलेली तत्त्वे व त्यातील जडाचे व चेतनाचे स्वरूप समजून घेणे हे मुक्तीचे साधन आहे असे सागितले. ते ऐकून नम्रपणे, मोठ्या आदराने, जड व चेतन याच्या स्वरूपाचा खुलासा करून सागण्याविषयी शिष्याने महाराजाची प्रार्थना केल्यावर दयाळु गुरुमहाराज जड व चेतन यांच्या स्वरूपाचे निरूपण करू लागले. ते म्हणाले—

हा शिष्यवरा! सावधान चित्ताने ऐक. या जगात जड व चेतन असे दोनच पदार्थ आहेत. सर्व शास्त्रात प्रतिपादन केलेल्या पदार्थांचा या दोन पदार्थांतच अंतर्भाव होतो. यानाच दृश्य वा दृक् असे दुसरेही नाव आहे. युष्मदस्मत्प्रत्यय गोचर, विषय-विषयी तमः प्रकाशाप्रमाणे अत्यंत विरुद्ध स्वभाव, असे भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्यांनी याचेच वर्णन शारीरभाष्यात प्रथमच केले आहे. यानाच अनात्मा व आत्मा अशी संज्ञा आहे. साख्यशास्त्रकार व योगसूत्रकार कपिल, पतंजली, यानाच प्रकृती व पुरुष असे म्हणतात. यावरून जड व चैतन्य याचे ज्ञान झाले, म्हणजे जाणण्याचे काही शिल्लक रहात नाही. तो पुरुष 'ज्ञातज्ञेय' या अधिकारास प्राप्त होतो, असे यांच्या ज्ञानाचे महत्त्व आहे. तरी तुला याचे स्वरूप सागतो.

आपल्या स्वतःला किंवा आपल्याहून भिन्न असलेल्या कोणत्याही जड किंवा चेतन पदार्थाला जो केव्हाही व कोठेही जाणत नाही, व जाणण्यास लायकही नाही, त्याला 'जड' असे म्हणतात. याच्या उलट, आपल्या स्वतःला, किंवा आपल्याहून भिन्न, कोणत्याही पदार्थाला जो जाणतो किंवा जाणण्यास समर्थ असतो, त्याला 'चित्' किंवा चैतन्य अथवा चेतन असे म्हणतात. असे सामान्यरूपाने संक्षेपतः तुला सागितले आहे. यांतील चेतन पदार्थ हा मुख्य असून जड पदार्थ गौण आहे व तो चेतनाकरता व त्याचे अंग असा आहे. चेतनाला 'स्वार्थ' व जडाला 'परार्थ' असे म्हणतात. म्हणजे चेतन, जड पदार्थाकरता जगात विद्यमान नसून, तो स्वतःकरताच आहे, व जड पदार्थ स्वतःकरता जगात रहात नसून तो चेतना करताच विद्यमान आहे. ज्याप्रमाणे घर हे घरमालकाकरता आहे, मालक घराकरता नाही, किंवा सेवक स्वामीकरता आहे, स्वामी सेवकाकरता नाही. तसेच जड हे चेतनाकरिता आहे; चेतन हे जडाकरिता नाही, याप्रमाणे सामान्यतः जड व चेतन याचे स्वरूप तुला सागितले.

आता विशेषरूपाने जर सागायचे झाले, तर जड हे नामरूपात्मक आहे, व चैतन्य नामरूपातीत आहे. नाम म्हणजे शब्द. कोणताही शब्द उत्पन्न होण्याकरता वागिंद्रियाची आवश्यकता आहे. वागिन्द्रियाचा परिणामच शब्द आहे. वागिंद्रिय नसेल तर वर्णात्मक शब्दच नाही, असे होईल, व नाम हे वर्णघटित आहे. आता या नामाची प्रवृत्ती वागिंद्रियानतर व जड पदार्थामध्येच आहे. कारण जातिगुण-क्रिया-संबधादि प्रकारद्वाराच शब्द पदार्थांचे प्रतिपादन करतो. हे सर्व प्रकार म्हणजेच 'रूप' हे सर्व जडातच असते. चेतन पदार्थात जाति-गुण-क्रिया-संबंध वगैरे काही नाहीत. नामाशी व रूपाशी जड पदार्थांचा अत्यंत भेद किंवा अत्यंत अभेद नसल्याने भेदाभेद संबंध आहे. अत्यंत भेद किंवा अत्यंत अभेद हे संबंधाला विरुद्ध आहेत; अत्यंत भिन्न असणारे घट किंवा पट परस्पराचे धर्म होऊ शकत नाहीत, व आपल्याशी अत्यंत अभिन्न असणारा घट हा आपलाच धर्म होत नाही.

म्हणून जेथे धर्मधर्मिभावाचा व्यवहार असेल, तेथे

भेदाभेद संबंध असतो. म्हणून जड हे नामरूपाशी अभिन्न वा भिन्न म्हणजे नामरूपात्मक आहे, व चैतन्य हे नामरूपाशी भिन्न किंवा अभिन्न नसल्याने ते नामरूपातीत आहे. चैतन्याचे ठिकाणी नामरूप–सापेक्ष असणारा भेद व तत्सापेक्ष असणारा भेदाभावरूप अभेद, हे दोनी कल्पित असल्याने, नामरूपाशी चैतन्याचा भेदाभेद संबंध जमत नसल्याने, ते नामरूपातीत आहे. अविद्या व तिचा विकार असे सर्व दृश्य रूप जड हे नामरूपात्मक आहे, व या दृश्याहून अत्यंत विलक्षण व याच्याशी कोणत्याही प्रकारचा वास्तविक संबंध न ठेवणारे चैतन्य हे नामरूपातीत आहे. असे जड व चैतन्य याचे विशेषरूपाने तुला त्यांचे स्वरूप सांगितले आहे, हे पूर्ण लक्षात घे.

आता तुला अगदी आपल्या स्वरूपाप्रमाणे चेतन असा वाटणारा हा तुझा देहसुद्धा वास्तविक जड असल्याने घटपटादि जड पदार्थांप्रमाणे अचेतन व नामरूपात्मक आहे, असे तुला पटवून देतो. युक्ति जर बरोबर असली, तर आपला नित्याचा अनुभवसुद्धा भ्रमात्मक किंवा चुकीचा आहे असे मानावे लागते. असे पहा की आकाशातील चंद्र हा आपणाला वीतभर आहे असे प्रत्यक्ष दिसते. परंतु त्याचे मंडल फारच मोठ्या परिमाणाचे आहे, असे शास्त्र व युक्तीने सिद्ध झाले आहे. फार दूरचे पदार्थ मोठे असूनसुद्धा लहान दिसतात. म्हणून चंद्र वीतभर आहे हे आपले प्रत्यक्ष भ्रमात्मक म्हणजे चुकीचे किंवा बाधित म्हणजे खोटे असे मानावे लागते. त्याचप्रमाणे देह चेतनासारखा दिसत असला तरी युक्तीने तो अचेतन किंवा जडच आहे असे मानले पाहिजे. कारण तो जड असलेल्या पृथिव्यादि पंच भूतापासून उत्पन्न झाला असल्याने पांचभौतिक आहे. म्हणून पंचभूताप्रमाणे जडच आहे. जडापासून झालेले कार्य जडच असणार.

देह पांचभौतिक कसा आहे हे तुला आता सांगतो, ते ऐक. देह हा पृथ्वी–जल–तेज–वायु व आकाश या पंच स्थूलभूतापासून निर्माण झाला आहे. व या प्रत्येक भूतापासून त्याने पाच पाच अंश आपल्या ठिकाणी संगृहीत केले आहेत. हा देह म्हणजे पंचवीस पदार्थांचे एक गाठोडेच आहे, असे म्हणण्यास हरकत नाही. गारोड्याच्या पोतडीत जसे नाना पदार्थ भरलेले असतात, तसे चेतन असणाऱ्या जीवरूप गारोड्याच्या शरीररूप पोतडीत पंचवीस पदार्थ भरले आहेत. गारोडी आपल्या पोतडीस जसा सोडीत नाही, तसा हा जीवसुद्धा शरीररूप पोतडी कधी सोडीत नाही. त्या पोतडीतून नाना प्रकारचे पदार्थ काढून दारोदार तो भीक मागत फिरतो, तद्वतच हा चेतनरूपजीव या शरीररूप पोतडीस घेऊन अनेक जन्मरूप वेगवेगळ्या घरी सुखदुःखरूप भीक मागत फिरतो, असे म्हणण्यास हरकत नाही. असो.

या देहात पृथ्वीपासून केस–कातडे–मांस–नाड्या–व हाडे असे कठीण भाग आले आहेत. कारण पृथ्वी ही कठीण आहे. म्हणून हे भाग तिचेच यात आले आहेत. कारणासारखेच कार्यही असते. मूत्र–रेत–घाम–रक्त व लाळ असे पातळ पदार्थ जलापासून यात आले आहेत. (२)

श्लोक—

स्वेदोऽस्रलालेऽग्नेः क्षुत्तृण्निद्रा तंद्रा रतिर्गति
लौल्यं निरोधः प्रसाराकुंचने मरुतोऽथ ग्वात् ॥३॥
कामकुड्लोभमोहा भीस्तदाढ्येयं जडा तनुः ।
वर्णाश्रमादिद्वंद्वादिसंबन्धादिपरो भवान् ॥ ४ ॥

अन्वयः— अद्भ्यो मूत्ररेतसी स्वेद. अस्रलाले (भवति) अग्ने (सकाशात्) क्षुत्–तृट्–निद्रा–तंद्रा–अत्यंत श्रमादिना सर्वेंद्रिया सामर्थ्ये प्रमीलापर्यायम्। आलस्यमितियावत्–रतिः (भवति) मरुत (सकाशात्) गति–लौल्य–निरोधः प्रसाराकुंचने (भवति)। अथखात् ॥ ३ ॥ काम–क्रुड्–लोभ–मोहाभी (भवति) तदाढ्या इयं जडातनु. (अस्ति) भवान वर्णाश्रमादि द्वंद्वादि संबन्धादि परो (अस्ति) ॥ ४ ॥

अर्थ — अग्नीपासून भूक, तहान, झोप, अनुत्साह अथवा आळस व मैथुन असे पाच पदार्थ झाले. वायूपासून हालचाल, चंचलता, स्तब्ध राहणे, हातपाय वगैरे पसरणे, पुन आवरून घेणे, वगैरे प्रकार होतात. आकाशापासून काम, क्रोध, लोभ, मोह व भीति असे पाच विकार होतात. याप्रमाणे पंचवीस विकाराने युक्त असलेले हे शरीर जड आहे. ब्राह्मणादिवर्ण, ब्रह्मचर्यादि आश्रम, सुखदुःखादि द्वंद्वे, व पितापुत्रादि संबंध, इत्यादिकांनी युक्त हे शरीरच आहे. याहून तू अगदी वेगळा आहेस. (४)

विवरण — जलमूत्रादि या पाच पदार्थस्वरूपाने शरीरात विद्यमान आहे. जोपर्यंत या शरीरात जलाचा साठा राहील, तोपर्यंत मूत्रादि पदार्थ राहणारच, व प्राण हा जलातील सूक्ष्मसार

भागाच्या आधारावरच शरीरात रहात असल्याने, जोपर्यंत जल प्राशन सुरू आहे तोपर्यंत प्राणवायु नष्ट होत नाही.

'आपोमयः प्राणो न पिबतो विच्छेत्स्यते'

म्हणजे प्राण हा जलाचाच विकार असल्याने जल पिणा त्याचा प्राण नष्ट होत नाही, असे छांदोग्यात म्हटले आहे.

अग्नीपासून भूक, तहान, झोप, आलस्य व मैथुन किंवा मतान्तराने कान्ति असे पदार्थ शरीरात निर्माण होतात यातील भूक व तहान हे प्राणाचे धर्म व झोप व आलस्य हे पित्ताचे धर्म आहेत. तरी याचे परिणाम स्थूल देहावर होतात. म्हणून भूक, तहान, झोप, आलस्य या शब्दाने याचे परिणाम अभिप्रेत आहेत असे समजावे. तेल, तूप वगैरे तैजस पदार्थ भक्षण केले असता भूक, तहान वगैरे विकार शरीरात होणारच. ते जितके कमी प्रमाणात खाल्ले जातील तितके हे विकारही कमी होतील असे अर्थातच सिद्ध झाले. म्हणूनच साधक लोकात तैजस पदार्थ बिलकूल कमी खाण्याची परिपाठी आहे.

वायूपासून शरीरातील हालचाल, चंचलता, स्तब्ध राहणे, हातपाय वगैरे शरीराचे भाग पसरणे व पुनः आवरून घेणे हे सर्व विकार वायूचे आहेत. कुंभकादिकाच्या अभ्यासाने शरीरातील वायूच जर स्तब्ध केला, तर हे सर्व विकार सहजच थांबतील व 'निश्चले निश्चल' म्हणजे प्राण निश्चल झाले म्हणजे चित्तही निश्चल होते, असे जे योगरहस्यात म्हटले आहे, त्याप्रमाणे सर्वांत श्रेष्ठ असणारी व ज्ञानाचे अंतरंग साधन जी चित्ताची निश्चलता, तीही प्राप्त होईल. म्हणजे कुंभकादिकाचा अभ्यास नसणे हेच शरीराचे व मनाचे चांचल्यादि वाढविणारे आहे व हे चांचल्यादि ज्ञानास प्रतिबंधकही आहे. हे सर्व वायूचे खेळ शरीरात स्वाभाविकच आहेत, व याच्यावर विजय करणे म्हणजेच शौर्य आहे.

'स्वभाव विजय शौर्य'

स्वाभाविक अवस्थेवर विजय करणे म्हणजेच शौर्य, अशी शौर्याची व्याख्या एकादशस्कंधात भगवंतानी उद्धवाला सांगितली आहे.

आता पाचवे महाभूत जे आकाश, त्यापासून काम, क्रोध, लोभ, मोह व भीति असे पाच विकार शरीरात निर्माण होतात. हा सर्व मनाच्या वृत्ति स्वाभाविकच थोड्याफार प्रमाणाने प्राण्याच्या ठिकाणी असतातच. कामक्रोधादिक जरी मनाच्या म्हणजे सूक्ष्म शरीराच्या वृत्ति आहेत, तरी पण त्या प्रत्येक व्यक्तीचे वेगवेगळाले परिणाम स्थूल शरीरावर होतात. म्हणून त्या परिणामाच्या दृष्टीनेच कामक्रोधादी स्थूल शरीरात आहेत, असे म्हटले आहे म्हणजे येथे कामक्रोधादि शब्दाने कामक्रोधादिकापासून झालेले स्थूल शरीरावरचे परिणामच विवक्षित आहेत. कारण आतापर्यंत प्रत्येक भूताचे विकार स्थूल शरीरातच दाखविले आहेत व स्थूल शरीराचेच निरूपण हल्ली सुरू आहे व आणखीही थोडे होईल

'यन्निर्विकल्प स्फुरति'

या श्लोकापासून सूक्ष्म शरीर निरूपणाला प्रारंभ होणार आहे. पुढील अर्ध्या श्लोकातील सुखदुःखादिद्वंद्वेसुद्धा मनातच होणार परंतु त्याचे विकार मात्र स्थूल देहात होतात. म्हणून सुखदुःखादि शब्दानेसुद्धा त्याचे परिणामच स्थूल शरीरातील विवक्षित आहेत असे समजले पाहिजे. असो

याप्रमाणे प्रत्येक भूताचे पाचपाच या हिशोबाने पंचवीस विकार या स्थूल शरीरात आहेत, व या विकारानीच या शरीराला एक प्रकारची शोभा आली आहे. सुवर्णाला ज्याप्रमाणे अलंकारानी शोभा यावी, त्याप्रमाणे या विकारानी हे स्थूल शरीर शोभायमान आहे. भागवत चतुर्थ स्कंधात पुरंजनाख्यानात या शरीररूप नगरीचे बहारीचे वर्णन आहे. या पाच भूताच्या सर्व मिळून पंचवीस विकाराने रचलेले व जीवाचे भोगमोक्षादि प्रयोजनास अत्यंत साधक असलेले राजाचे सर्व कार्य ज्याप्रमाणे प्रधान करतो, त्याप्रमाणे आत्म्याचे सर्व कार्य करणारे म्हणूनच अगदी आत्म्याप्रमाणे चेतन असे भासणारे हे शरीर स्थूल व जड आहे. त्यामुळे अत्यंत सूक्ष्म व चेतन असणाऱ्या आत्म्याहून अत्यंत विलक्षण आहे. या स्थूल शरीरावरच ब्राह्मणत्व, क्षत्रियत्व, वैश्यत्व, शूद्रत्वादि शुद्ध व संस्कारात्मक नाना प्रकारच्या जाती म्हणजेच वर्ण राहतात व त्या देहाच्या जन्माबरोबरच त्यात प्रगट होतात. या अवांतर जाति मनुष्यत्व जातीप्रमाणे हस्तपादादि आकृतीने प्रकट होत नसल्या तरी, आईबापाच्या उपदेशावरून स्पष्ट होतात विशेषत परंपरेने मातेलाच मुलाच्या जातीचा साक्षात्कार होतो, वगैरे सुंदर निर्णय शास्त्रकारानी केला आहे. तो जिज्ञासूने शास्त्रातच पहावा. ब्रह्मचर्य, गार्हस्थ्य, वानप्रस्थ व संन्यास हे आश्रम या स्थूल देहाच्या आधारानेच असतात, व त्या त्या

आश्रमाच्या देहावरील आरोप चित्तानेच ते भोगले जातात. त्याचप्रमाणे अन्तःकरणात निर्माण होणाऱ्या सुख दुःखादि द्वंद्वांचे परिणाम हेच सुखदुःखादि द्वंद्व या शब्दाने विवक्षित आहेत, तेही स्थूलदेहावरच आहेत. शीतोष्णादि द्वंद्वे प्रत्यक्षच देहावर दिसतात. आई, बाप, पुत्र, मित्रादि यांचा संबंधही या स्थूल देहावरच आहे.

अशा या देहाशी अन्तःकरणाचा तादात्म्य संबंध व अन्तःकरणाशी आपल्या स्वतःचा नसतानाही तादात्म्य संबंध कल्पून तू या देहाचा व त्याच्या जात्यादि धर्मांचा आपल्याशी लोकांचा संबंध खरा मानून उगीच त्या भागाला बाहेर झाला आहेस, वास्तविक दृष्टीने विचार केला असता, सूर्याला पाहणारा मनुष्य सूर्य नसून सूर्याहून जसा वेगळा, व सूर्याचा धर्म जो उष्णता, प्रकाश वगैरे आहे, त्या धर्माने जसा तो रहित आहे, त्याप्रमाणे तू सुद्धा देहाहून वेगळा व देहधर्म असणाऱ्या वर्णाश्रमादिकाने रहित आहेस, असे समज (३-४)

श्लोक:—

**यन्निर्विकल्पं स्फुरति तदन्तःकरणं मनः ।**
**तत्संकल्पविकल्पाभ्यां तत्तु धीर्निश्चयात्मकं ॥५॥**
**अनुसंधानकं चित्तमहंकारस्त्वहंकृतिः ।**

अन्वय.— यन्निर्विकल्पस्फुरतितदन्तःकरणम् । यत् संकल्पविकल्पाभ्यां (उपलक्षित) तन्मन । यन्निश्चयात्मक तत्तुधी । यदनुसंधानात्मकं तच्चित्तम् । यदहंकृतिः तदहंकार (उच्यते) ॥५३॥

अर्थ —जे निर्विकल्प अशा स्वरूपाने भासते, ते अन्तःकरण समजावे. जे संकल्प व विकल्प या वृत्तींनी युक्त असते, त्याला मन म्हणावे. जे पूर्वोत्तर विषयाचे अनुसंधान करते, त्याला चित्त असे नाव आहे व जे 'मी' अशा वृत्तीने युक्त आहे, त्याला अहंकार असे जाणावे. (५३)

विवरण—शिष्य म्हणतो, गुरु महाराज! आपण पूर्वी वर्णन केलेले पन्नास धर्म स्थूल शरीराचेच भाग आहेत हे कळले. वर्णाश्रम, सुखदुःखादि द्वंद्वे व पुत्रमित्रादि संबंध हे जर स्थूल शरीराचेच धर्म असतील, व मी जर स्थूल शरीराहून वेगळा व याच्या धर्माने रहित असेन, तर हे सर्व माझे आहे असा मला अनुभव कसा येतो? बरे, माझा या देहाशी संयोग संबन्ध आहे, व देहधर्मांशी संयुक्त समवाय, किंवा मीमांसक मताप्रमाणे संयुक्त तादात्म्य, असा संबंध आहे, म्हणून मला याचा अनुभव येतो, असे जर म्हटले, तर मी देह व देहाचे धर्म यांनी रहित असा शुद्ध कसा असू शकेन? कारण दोन पदार्थांचा संबन्ध झाला म्हणजेच विशिष्ट बुद्धी होते, व ती बुद्धी खरी असते. उदाहरण. देवळातील सिंहासनावर जर देवाची मूर्ती बसविली असेल, म्हणजे सिंहासन व मूर्ती यांचा संयोगसंबंध असेल, तर मूर्ती सिंहासनावर नाही, नुसते सिंहासनच आहे, असे कसे म्हणता येईल? म्हणजे दुसऱ्या पदार्थांशी संबंध झाला असता, संबंधयुक्त पदार्थ शुद्ध म्हणजे दुसऱ्या पदार्थांनी रहित आहे, असे म्हणता येणार नाही.

गुरु महाराज म्हणतात, बा शिष्यवरा! तू चांगली शंका केली आहेस. आता या शंकेचे समाधान तुला सांगतो, ते ऐक.

देहाशी आत्म्याचा काही विशिष्ट संबंध असल्याशिवाय देहाला 'मी' व देह धर्मांना 'माझे' असा प्रत्यय येणे शक्य नाही. परंतु तू म्हणतोस त्याप्रमाणे आत्म्याचा देहाशी संयोगसंबंध होऊ शकत नाही. कारण संयोगसंबंध हा ज्या दोन पदार्थांत होतो, ते दोनी पदार्थ सावयव असले पाहिजेत. कारण संयोग हा संबन्ध मुळी 'अव्याप्यवृत्ति', म्हणजे जेथे तो होतो त्या सर्व भागास व्यापून न राहणारा, असाच होतो. दोनी सावयव पदार्थांशी जरी संयोग घडला—उदाहरणार्थ, हातात पुस्तक घेतले म्हणजे पुस्तक, हात व शरीर यांचा संयोग होतो, याचा अर्थ असा नाही की पुस्तकाच्या आत बाहेर, हाताच्या व शरिराच्या आत बाहेर सर्वत्रच संयोग झाला आहे; व तसे मानल्यास सर्व शरीरास व हातास पुस्तकाच्या स्पर्शाचा व सर्व पुस्तकाच्या स्पर्शाचा अनुभव आला पाहिजे, व तसे तर वाटत नाही.

म्हणून सावयव वस्तूचा संबंधसुद्धा देशाला अवच्छेद करून, म्हणजे मर्यादित जागेतच होतो, व हे देश त्या त्या पदार्थांचे भागच आहेत, व असावे लागतात. मग निरवयव म्हणजे भागरहित असणाऱ्या आत्म्याशी, भागसहित जरी शरीर असले तरी त्याचा संयोग कसा होईल? म्हणून आत्म्याचा देहाशी संयोगसंबंध होत नाही. समवाय वगैरे अन्य संबंधही होण्यास आत्मा व देह योग्य नाहीत. त्यामुळे संयोगादि संबंधाच्या द्वाराने होणारे देह धर्मांशीही आत्म्याचे संयुक्त तादात्म्यादि

संबंध घडत नाहीत; व हे संबंध जरी देह व देहधर्म यांच्याशी आत्म्याचे मानले, तरी ते संबंध 'मी' व 'माझे' या प्रतीतीला कारणही पण नाहीत. तसे जर असते, तर आत्म्याचा सर्व देहाशी व सर्व देहधर्मांशी संबंध असल्याने सर्व देहाचे ठिकाणी प्रत्येकाची 'मी' बुद्धि व सर्व देहधर्मांविषयी 'माझे' अशी बुद्धि झाली पाहिजे. परंतु तशी कोणालाच होत नाही.

संयोग-संयुक्त-समवायादि संबंधच 'मी' व 'माझ' अशा बुद्धीस कारण मानले, तर मी घर आहे व कावळा घरावर असल्यास माझ्या अंगावर कावळा बसला आहे इत्यादि प्रतीती आत्म्याला होऊ लागेल. परंतु असे कोणालाच वाटत नाही. म्हणून विशिष्ट देहालाच 'मी' व त्या देहधर्मांना 'माझे' असे म्हणण्याकरता काही वेगळाच संबंध, आत्म्याचा, देह व देहधर्मांशी मानणे भाग आहे, व तो संबंध अन्तःकरणमूलक आहे.

म्हणून प्रथम अंतःकरणाचे निरूपण केले पाहिजे. हे अंतःकरण म्हणजे आत्म्याच्या प्रतिबिंबालासुद्धा न घेणाऱ्या देहाप्रमाणे अत्यंत जडही नाही, व आत्म्याप्रमाणे स्वयंप्रकाशमानही नाही. दोहोंपेक्षा विलक्षण आहे, व दोघांचा संबंध जुळवून आणणारे असे आहे. आत्म्याच्या बंधमोक्षादि सर्व व्यवहाराला हेच कारण आहे. झोपेत या अन्तःकरणाचा आत्म्याशी संबंध नसतो. त्यामुळे आत्मा तेवढा वेळ (झोपेत) कसा अगदी मुक्तासारखा आपल्या स्वरूपानंदात मग्न असतो.

त्या वेळी तो अगदी कशाचीच गरज नाही असा, आप्तकामाप्रमाणे कर्तव्यरहित, कृतकृत्य, असा असतो; व जागा झाला, म्हणजे अंतःकरणाशी संबद्ध झाला, की सर्व प्रपंचाचे लटांबर त्याच्या पाठीमागे लागलेच. राजाचा प्रधानावर जसा सर्व राज्याचा भार असतो, व तो जे जे बरे वाईट करील त्याचे सर्व परिणाम राजाला भोगावे लागतात; स्वतः राजा काहीच करीत नाही. तसेच अन्तःकरण जे जे करील त्याची त्याची फळे अकर्ता अशा आत्म्याला भोगावी लागतात. असे हे अन्तःकरण मोठे जहांबाज आहे. त्याने आपल्या अंगच्या गुणांनी आत्म्यास अगदी वश करून टाकले आहे.

आत्म्याने या अन्तःकरणाशी अगदी निकट संबंध ठेवला आहे. म्हणून त्याची अशी पराधीन अवस्था झाली आहे, व तो संबंध म्हणजे 'आध्यासिक तादात्म्य' या नावाने वेदान्तशास्त्रात प्रसिद्ध आहे. या संबंधाला नुसते तादात्म्य न म्हणता आध्यासिक तादात्म्य असे का म्हणावे, याबद्दलही थोडा विचार करू.

अवयव व अवयवी, गुण व गुणी, जाति व व्यक्ती, क्रिया व क्रियावान्, विशिष्ट व शुद्ध, अंश व अंशी, समुदाय व समुदायी, यांच्यामध्ये भेद व अभेद दोन्ही आहेत. कारण

नीलो घटः, चलो घटः, सन् घटः, मृत् घटः,

इत्यादि प्रथमान्तः दोन्ही नामांनी यांच्या तादात्म्याला बोधक व्यवहार लोकात प्रसिद्ध आहे. केवळ अभेद असल्यास घटो घटः असा तादात्म्यदर्शक व्यवहार नाही, व केवळ भेद असल्यासही गौरश्वः असाही तादात्म्यदर्शक व्यवहार नाही. म्हणून भेद व अभेद दोन्ही ज्या ठिकाणी असतील, त्याच ठिकाणी तादात्म्यदर्शक सामानाधिकरण्यरूप व्यवहार नीलो घटः इत्यादि ठिकाणी वेदान्त्यांनी स्वीकार केला आहे; व

*गुणादिकं गुण्यादिनाभिन्नाभिन्नं समानाधिकृतत्वात्*

असे अनुमान मांडून, या परस्परांचा संबंध भेदाभेद म्हणजेच तादात्म्य आहे, असे सिद्ध केले आहे. नैयायिकांनी ज्या ठिकाणी समवाय संबंध मानला आहे, तेथे सर्वत्र वेदान्ती हे भेदाभेदरूप तादात्म्य मानतात.

समवायस्थानी स्वीकारलेल्या या तादात्म्याच्या दोन संबंधीपैकी एक दुसऱ्यावर अवलंबून असतो. उदाहरणार्थ घट हा अवयवी मृत्तिकारूप आपल्या अवयवावर अवलंबून असतो. मृत्तिका नष्ट झाल्यास तो रहात नाही. याप्रमाणे गुणक्रियादिकाबद्दलही समजावे. या तादात्म्यातील अभेद म्हणजे ऐक्य, निरपेक्ष असल्याने वास्तविक, व भेद हा सापेक्ष असल्याने काल्पनिक मानून, दोघांची सत्ता भिन्न असल्याने, भेद व अभेद यांचा विरोधही नाही असे मानले आहे. काल्पनिक रजत व वास्तविक शुक्ति यांचा विरोध नाही, त्याप्रमाणे येथे समजावे, असे वेदान्त्यांचे या तादात्म्यरूप भेदाभेदाबद्दल मत आहे.

आता अन्तःकरण व आत्मा, अन्तःकरण व शरीर, यांचा संबंध भेदाभेद रूप तादात्म्यात्मक जरी सामानाधिकरण्य प्रत्ययावरून सिद्ध होत असला तरी, हे तादात्म्य समवाय स्थानापन्न तादात्म्यरूप नाही. कारण आत्मा व अन्तःकरण या जोडीत किंवा अन्तःकरण व शरीर य

जोडीत अवयव व अवयवी इत्यादिकाप्रमाणे एक दुसऱ्यावर अवलंबून नाही, व एक दुसऱ्याचा परिणाम नाही. आत्म्याचा परिणाम अन्त करण नव्हे. कारण आत्मा अपरिणामी आहे, व अन्त करणाचा परिणामही शरीर नाही कारण ते महा भूताचा परिणाम आहे अन्त करण व शरीर दोन्हीही द्रव्य रूप असल्याने, आत्म्याशी अथवा शरीराशी अन्त करणाचा संबंध जातिव्यक्त्यादिकासारखा नवून परिणाम परिणामी भावात्मकच मानावा लागेल, व तो तर येथे जमत नाही म्हणून अन्त करणाचे आत्म्याशी व शरीराशी जे तादात्म्य आहे ते अवयवावयवी इत्यादि तादात्म्यापेक्षा विलक्षण आहे म्हणून याला आध्यासिक तादात्म्य असे नाव आहे लौकिक विचाराच्या दृष्टीने ही दोनी तादात्म्ये वेगवेगळी आहेत, असे आम्ही दाखविले वास्तविक दृष्टीने, सर्वच भेद काल्पनिक असल्याने, त्या भेदाचा अभावरूप अभेदही काल्पनिकच असल्याने, निर्भेद एक अखंड ब्रह्मवस्तूच पारमार्थिक व द्वैतरहित आहे त्यामुळे हे सर्वच विचार फोल आहेत. परंतु भेदाचा अंगीकार करून आम्ही या दोन तादात्म्यात वैलक्षण्य दाखविले आहे.

जड पदार्थामध्ये आत्म्याचे प्रतिबिंब घेण्यास अन्त करण व त्याचे कारण माया किंवा अज्ञान हेच समर्थ आहेत जलादि पदार्थ सूर्याचे प्रतिबिंब घेतील. परंतु आत्म्याचे प्रतिबिंब घेण्याचे सामर्थ्य त्याना नाही म्हणूनच परब्रह्माला अन्त करण किंवा माया उपाधी स्वीकारूनच जीव व ईश्वर भाव आला आहे घटादि किंवा पृथिव्यादि उपाधीने जीवेश्वर भाव नाही, ही गोष्टही लक्षात घेण्या सारखी आहे स्थूल शरीराची उपाधीसुद्धा अन्त करण मूलकच आहे, हे विसरता कामा नये या अन्त करणाला जड, विलक्षण म्हणण्याचे कारणसुद्धा आत्मप्रतिबिंबग्राहित्व हेच आहे. ते इतर भूताप्रमाणे जड असल्याने चेतनाहूनही विलक्षण आहे म्हणूनच याला जड, चेतन, विलक्षण असे म्हणतात एकदरीत विचारावरून, जड असणाऱ्या देहाशी व चेतन असणाऱ्या आत्म्याशी पूर्वी सांगितलेले तादात्म्य स्वीकारून आत्म्याला परंपरेने सुखदु खमसुख सर्व प्रपंचाची भ्रांति, म्हणजे मीच सुखदु खादि प्रपंचाने युक्त आहे, असे ज्ञान करून देणारे हे अंत करणच आहे, असे दाखविण्या करता वृत्तिसहित या अन्त करणाचे आता दीड श्लोकाने तुला निरूपण करतो, ते ऐक

श्लोक —

**यन्निर्विकल्प स्फुरति तदन्त करणं मन ।**
**तत्सकल्पविकल्पाभ्या तत्तु धीर्निश्चयात्मक ॥५॥**
**अनुसंधानक चित्तमहकारस्त्वहकृति ॥ ५३ ॥**

अन्वय — यन्निर्विकल्प स्फुरतितदन्त करणम्। यत् सकल्पविकल्पाभ्या (उपलक्षित) तत मन । यत् निश्चया त्मक तत् तु (एव) धी । यत अनुसंधानक तत् चित्तम् यत् अहकृति तत् अहकार (इति शेष)

अर्थ — जे तटस्थावस्थेत किंवा सभाव्यवस्थेत विकल्प रहित असते, त्याला अन्त करण असे नाव आहे, जे सकल्प व विकल्प यानी युक्त असते, त्याला मन असे नाव आहे ज्यावेळी निश्चयात्मक वृत्तीने ते युक्त असते त्यावेळी त्याला बुद्धि म्हणावे जे पूर्वापर गोष्टीचे वगैरे अनुसंधान करते, त्याला चित्त असा सज्ञा आहे व तेच ज्यावेळी मी असे प्रगट होते, त्या वेळी त्याला अहकार असे नाव प्राप्त होते एकाच पदार्थाला वेगवेगळ्या धर्मांने वेगवेगळी नावे प्राप्त झाली आहेत (५३)

विवरण — अन्त करण नावाचा पदार्थ जीवाचा उपाधी आहे. हा महत्त्वाचा विकार जो अहकार, त्यातील सत्त्व गुणापासून उत्पन्न झाला आहे, हे पुढे २९ व्या श्लोकात आम्ही निरूपण करू अन्त करण हे एक तैजस द्रव्य पाण्याप्रमाणे द्रवीभूत आहे शरीरात असणाऱ्या असख्य म्हणजे बहात्तर कोटी बहात्तर लक्ष दहा हजार दोनशे एक नाड्यामधे ते भरले आहे पाण्यावर ज्याप्रमाणे तरग यावे, त्याप्रमाणे या अन्त करणावर नाना प्रकारचे तरंग येतात. या तरगाचे नाव 'वृत्ति' असे आहे या वृत्तीसुद्धा अनंत आहेत योगसूत्रात प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा, व स्मृति अशा पाच प्रकारात अन्त कर णाच्या सर्व वृत्तींचा सग्रह केला आहे. व एका शास्त्र काराचे मत दुसऱ्या शास्त्रकारानी खडन केले नसेल, तर ते त्याना समत आहे असे समजतात त्याप्रमाणे वेदान्त्यानाही या पाच वृत्ती अन्त करणाच्या आहेत, असे समत आहे, असे मानण्यास हरकत नाही

'पचवृत्तिर्मनोवद्व्यपदिश्यते'

या ब्रह्मसूत्रावरील भाष्यात, योगसूत्र समतवृत्ती पच शब्दाने घेण्यास हरकत नाही, असे म्हटले याहून वेगळ्याही वृत्ती सुख, दु ख, इच्छा, द्वेष, वगैरे, अन्त करणाच्या आहेतच

त्याचा अन्तर्भाव या पाच मध्ये होऊ शकत नाही तात्पर्य, कोणताही तरग नसताना पाणी जसे प्रशान्त व स्तब्ध अशा अवस्थेत असते, त्याप्रमाणे जागृतीत ज्या वेळेस प्राण्याला तटस्थ अवस्था प्राप्त होते, किंवा निर्विकल्प समाधी ज्या वेळेस लागते, त्या वेळीही हे अन्त करण सर्व प्रकारच्या वृत्तींनी रहित असे असते म्हणजे या अवस्थेत प्रमाण विपर्ययादि वर सागितलेल्या कोणत्याहि वृत्ती अत करणात नसतात म्हणून त्या अवस्थेला निर्विकल्प म्हणजे निस्तरग अशी अवस्था म्हटले आहे असे निर्विकल्प असे जे स्फुरते, त्याचे नाव अत करण आहे

सकल्प व विकल्प या दोन वृत्तींने युक्त किंवा या वृत्ती नसताही या वृत्तीने उपलक्षित, म्हणजे व्यावृत्त झालेले जे अन्त करण, त्याला 'मन' अशी सज्ञा आहे येथे सकल्प या शब्दाने सम्यक् कल्पना या अर्थाने हा पदार्थ चागला आहे, असे जे ज्ञान, त्याला सकल्प म्हणावे

'काम जानामिते मूल सकल्पात्किल जायसे'

असे वचन आहे म्हणजे इच्छा ही सकल्प मूलक आहे हा पदार्थ चागला आहे, असे ज्ञान झाल्याशिवाय त्या पदार्थाची इच्छा होत नाही या वरून शोभनाध्यास म्हणजे सकल्प, 'हे कामा तुझे मूल म्हणजे कारण मी जाणते आहे चागले आहे अशा बुद्धीने तू उत्पन्न होतोस मी कोणत्याही पदार्थास चागला अशी बुद्धीच ठेवीत नाही मग तू कसा निर्माण होशील?' असा या सपूर्ण वचनाचा भावार्थ आहे यावरून सकल्प शब्दाचा अर्थ, हे चागले आहे अशी बुद्धी, असा अर्थ घेतला पाहिजे

'सकल्पो मानसी क्रिया'

असे अमरकोशात साधारणरूपाने सकल्प शब्दाचे वर्णन आहे परतु या श्लोकावरून विशेषरूपाने सकल्प शब्दाचा अर्थ निर्णीत होतो 'विकल्प' शब्दाचा अर्थ पूर्वकल्पनासापेक्ष, पूर्वकल्पनेपक्षा विलक्षण कल्पना असा 'विकल्प' अशा व्युत्पत्तीने करता येतो

उदाहरणार्थ—

'अथातो ब्रह्म जिज्ञासा'

या सूत्रातील 'अथ' शब्द मगलार्थक आहे, की आनतर्यार्थक आहे? या वाक्यात विकल्प प्रतीयमान होतो अर्थात् मगलार्थक आहे या पूर्वीच्या कल्पनेपक्षा आनतर्यार्थक आहे ही कल्पना विलक्षण आहे, व ती पूर्वकल्पना सापेक्ष आहे अर्थात् 'सकल्प' व 'विकल्प' या वृत्तीने उपलक्षित अत करण मन या सज्ञेस पात्र होते 'अय स्थाणुर्वा पुरुषो वा' अशा सशयात्म वृत्तीने युक्त असणाऱ्या अत करणाला मन म्हणण्यास हरकत नाही ज्या वेळेस हा पदार्थ असाच आहे, म्हणजे सूर्य हा उष्ण व प्रकाशमानच आहे, अशा रीतीने पदार्थांचे जे अवधारण रूप निश्चयात्मक ज्ञान किंवा वृत्ती यांनी युक्त असणाऱ्या अन्तकरणास बुद्धी असे नाव आहे (५)

तेच अन्तकरण, जेव्हा पूर्व व अपर पदार्थांचे अनुसधान, 'अनु' म्हणजे अनुभवानतर, सधान म्हणजे जोडण, अर्थात स्मरण करू लागेल, तेव्हा त्याला चित्त अशी सज्ञा आहे तेच अन्त करण, जेव्हा 'मी' अशा वृत्तीने युक्त असेल, तेव्हा त्याला 'अहकार' अशी सज्ञा येते तात्पर्य, एकच अन्त करण वरील निरनिराळ्या वृत्तींने मन, बुद्धि चित्त व अहकार अशा सज्ञेला तें प्राप्त होते व ज्या वेळी त्यात कोणतीही वृत्ती नसते, त्या वेळी त्याला अन्त करण अशी सज्ञा असते जसे—देवदत्त नावाचा मनुष्य आपल्या बापाच्या अपेक्षेने मुलगा, मुलाच्या अपेक्षेने बाप पत्नीच्या अपेक्षेने पति व व नातवाच्य अपेक्षेने आजोबा इत्यादि सज्ञेस प्राप्त होता व याची अपेक्षा नसता स्वत च्या स्वरूपाने तो 'देवदत्त' या सज्ञेस पात्र होतो, त्याप्रमाणेच येथे अन्त करणाच्या सर्व नावाचा व्यवहार जाणावा हे अन्त करण पृथिवी, आप इत्यादि पच सूक्ष्म भूताचे पाचही सत्वगुण एकत्र करून ईश्वराने निर्माण केले आहे त एकेक भूताच्या सत्वगुणापासून निर्माण झालेली जी चक्षु, श्रोत्र इत्यादि ज्ञानेंद्रिये प्रत्येक भूताच्याच रजोगुणापासून निर्माण केलेली वाक् पाणिपादेत्यादि कर्मेंद्रिये व सर्व भूताच्या रजो गुणापासून निर्माण केलेले जे पचप्राण, या सर्वांनी युक्त होऊन, हे शिष्या! चेतन स्वरूप असणारा जो तू, त्या तुझ्या सान्निध्याने, म्हणजे तुझ्याशी सपादन केलेल्या आध्यासिक तादात्म्य सबधाच्या प्रभावाने स्वत त जड असून सुद्धा चेतनासारखे भासत, व व्यवहारही करते म्हणून असग एकमेव अद्वितीय परब्रह्मरूप असणाऱ्या तुला भवमोहाच्या फेऱ्यात पाडत हे कसे त तुला सागतो, ऐक (५१)

श्लोक —

**व्यानाधाराच्च श्रुतेस्तु शब्दभुग्वाक्ति वाक्सखं ॥**

अन्वय — आत्मुव्यानाधारे श्रुते शब्दभुक् वाक् सग वर्ति ॥६॥

अर्थ —मन, बुद्धि इत्यादिकापेक्षा पहिले जे अन्तःकरण, ते व्यान वायूचा आश्रय घेऊन श्रोत्रेंद्रियद्वारा नाना वर्ण व नाना प्रकारच्या स्वरांनी युक्त असलेले जे शब्द त्याचा उपभोग घेते, व वागिंद्रियाला सहकारी होऊन, त्याला शब्दोत्पत्ती करावयास लावते. ( ६ )

विवरण —सूक्ष्म पंचभूतांच्या पाचही रजोगुणाने निर्माण केलेले प्राण, अपान, व्यान, उदान व समान अशा पाच भेदांनी युक्त असलेला प्राणवायु, मनानी घेतलेल्या सकल्प व कामनापूर्वक कर्मांच्या योगाने या स्थूल शरीरात प्रविष्ट होतो, व ज्याप्रमाणे एखादा सम्राट राजा आपल्या हाताखाली असलेल्या अधिकाऱ्यांना 'या गावाची व्यवस्था तू पहा,' 'त्या गावाची व्यवस्था तू पहा,' असा आदेश अथवा हुकूम देऊन, त्याच्या त्याच्या ताब्यात ती ती गावे देऊन त्या त्या गावाची व्यवस्था करतो, व आपण सर्वांवर देखरेख ठेवतो, त्याप्रमाणे पंचवृत्ति मुख्य प्राण—चक्षुरादि इन्द्रिये व अपान, व्यान, उदान, समान वगैरे आपले वायुभेद यांना शरीरातील त्या त्या स्थानांचे ठिकाणी नियुक्त करून आपणही विशिष्ट स्थानात, राजधानीत राजा राहतो त्याप्रमाणे, राहतो

प्राणवायूने, जननेन्द्रिय व गुद या ठिकाणी अपान वायूची योजना करून शरीरातील मूत्र व पुरीष या मलाला बाहेर टाकण्याचे काम त्याच्याकडे दिले आहे. चक्षु व श्रोत्र यांनी उपलक्षित हृदयाचे ठिकाणी स्वतः प्राणवायु राहून मुख व नासिका या द्वारांनी बाहेर जाण्यायेण्याची क्रिया करीत तो राहतो याच्याकडे इतर वायूप्रमाणे दुसरे काही काम नाही. परंतु हा सम्राट् राजाप्रमाणे असल्याने, याच्या बाहेर जाण्यायेण्याच्या क्रियेवरच शरीराचे व तदभिमानी जीवाचे अस्तित्व अवलंबून आहे. त्यामुळे सर्व प्राणापेक्षा याचे महत्त्व अधिक आहे

प्राण व अपान यांच्या स्थानाच्या मध्यभागी, म्हणजे नाभिस्थानात, या प्राणाने समान नामक वायूची योजना केली आहे, व खाल्लेल्या किंवा प्राशन केलेल्या अन्नाची बरोबर वाटणी करून देण्याचे काम याच्याकडे दिले आहे.

शरीरात कमलाकार एक मांसपिंड आहे. त्यात प्राणवायु व अन्तःकरण या उपाधीने युक्त जीवात्मा राहात असतो या पिंडाला हृदय असे नाव आहे या हृदयातून एकशे एक मुख्य नाड्या शरीरात पसरल्या आहेत. त्या प्रत्येक मुख्य नाडीला प्रत्येकी शंभर शंभर दुसऱ्या नाड्या आहेत, व त्या नाड्यांना प्रत्येकी बहात्तर बहात्तर हजार नाड्या आहेत या सर्व नाड्यांच्या जाळ्याने हे शरीर व्यापले आहे, व या सर्व नाड्यांनी शरीर धारण केले आहे. या एकंदर नाड्या बहात्तर कोटी, बहात्तर लक्ष दहा हजार दोनशे एक इतक्या संख्येच्या आहेत.

या सर्व नाड्यांमध्ये व्यान वायूची योजना प्राणाने केली आहे. सूर्य मंडलातून किरणे जशी चहूकडे पसरतात, त्याप्रमाणे या हृदयातून इतक्या नाड्या सर्व शरीरात पसरल्या आहेत. म्हणून या सर्व नाड्यात संचार करणारा वायू सर्व शरीरभर असतो म्हणूनच

'व्यान सर्व शरीरग '

असे शास्त्रवचन आहे. व्यानवायू जरी सर्व शरीर भरून असला, तरी सर्व सांधे, सांदे व मर्मस्थाने ही व्यानाची विशेष स्थाने आहेत, व प्राण व अपान यांचा उद्योग बंद असेल त्या वेळी व्यानवायूचे काम सुरू असते. ती कामे म्हणजे, बलवान् पुरुष जी, मोठा बोझा उचलणे, धनुष्य वाकविणे, वगैरे शक्तीची कामे करतो, ती आहेत, व ही कामे प्राणवायूनी व्यानवायूकडे सोपविली आहेत

आता एकशे एक ज्या मुख्य नाड्या सांगितल्या, त्यापैकी हृदयातून ब्रह्मरंध्रात जाणारी जी सुषुम्ना नावाची नाडी, तीत उदानवायूची योजना प्राणाने केली आहे. तो शरीरात पायाच्या तळव्यापासून तो मस्तकापर्यंत संचार करतो परंतु याचे मुख्य स्थान कंठ देश हे आहे अधिक पुण्य असल्यास लिंग-शरीरोपाधिक जीवात्म्याला स्वर्गादि जी देवादिकांची स्थाने, तेथे पोचविणे, पापाधिक्य असल्यास नरक व पशु पक्ष्यादि योनीत जीवास पोचविणे, व पुण्यपाप समान असल्यास मनुष्य योनीत पोचविणे, ही कामे याचेकडे सोपविली आहेत

वायु जसा नाड्यांच्या द्वारा सर्व शरीरात भरला आहे, त्याप्रमाणे अंतःकरणही सर्व शरीरात भरलेले आहे अर्थात् अंतःकरण ज्ञानशक्ति व वायु क्रियाशक्ती. या दोनी जीवाच्या उपाधी असल्याने यांच्याद्वारा जीवही सर्व शरीरात भरून आहे

असे समजावे 'यान्निर्विकल्प' या लक्षणानी वर्णन केलेले जे अंत:करण ते सर्व नाड्यामध्ये भरून असलेला जो व्यान वायु, त्याचा आधार घेऊन श्रोत्रेंद्रियाच्या द्वारा नाना वर्ण व उदात्तानुदात्त व स्वरितादि स्वरानी अनेक प्रकारयुक्त जे शब्द याचा उपभोग घेत व वागिंद्रियरूप कर्मेंद्रिय याला शब्दोत्पत्ति करण्यासाठी प्रवृत्त करते. (६)

श्लोक:—

**समानाधारि त्वचान्यत्स्पर्शाद्यदात् दात् च ।**
**उदानाधारा धीर्नेत्राद्रूपभुक्सगमागमा ॥ ७ ॥**

अन्वयः— अन्यत् समाधानारि त्वचा स्पर्शादि आदातृ दातृ च उदानाधारा धीः नेत्रात् रूपभुक् सगमागमा (भवति) ॥ ७ ॥

अर्थः— मन समान वायूचा आश्रय घेऊन स्पर्शाची इच्छा करून स्पर्शाचा उपभोग घेते, व हाताने देणे घेणे हा व्यवहार करते. बुद्धी उदान वायूचा आश्रय घेऊन नेत्रेन्द्रियाने रूपाचा उपभोग घेते, व पायाने गमन व आगमन करते. (७)

विवरणः— प्राण व अपान वायूच्यामध्ये नाभिमंडलात राहणाऱ्या समान नामाच्या वायूवर आरूढ होऊन संकल्प विकल्पात्मक मन हे त्वगिंद्रियाच्या द्वारा स्पर्शाची इच्छा करते व त्याचा उपभोग घेते व हातानी घेणे देणे हा हातरूप कर्मेंद्रियाचाही व्यवहार करते. अंतःकरणाचा बुद्धिरूप जो भाग, तो उदान वायूच्या आश्रयाने नेत्रेंद्रियद्वारा नीलपीतादि रूपाचा उपभोग घेतो, व कर्मेंद्रियापैकी पायरूप इन्द्रियाने गमन व आगमन हे कर्मेंद्रियाचेही व्यवहार करीत असतो. (७)

श्लोक:—

**जिव्हया प्राणवच्चित्त रसभुग्रतिमूत्रकृत् ।**
**सापानाहंकृतिर्घ्राणादूगंधभुग्विड्विसर्गकृत् ॥८॥**

अन्वयः—प्राणवच्चित्त जिव्हया रसभुक् रतिमूत्रकृत् (भवति) सापानाहङ्कृतिः घ्राणात् गंधभुक् विड्विसर्गकृत् (भवति) ॥ ८ ॥

अर्थ —अनुसंधानात्मक चित्तरूप अंतःकरणाचा भाग प्राण वायूचा आश्रय घेऊन जिभेने रसाचा उपभोग घेतो व उपस्थरूप कर्मेंद्रियाने रति म्हणजे कामसुख व मूत्रोत्सर्ग अशी दोन कामे करतो, आणि अहंकाररूप अंतःकरणाचा जो भाग, तो अपान वायूला सहकारी घेऊन घ्राणेन्द्रियाने गंध नामक विषयाचा उपभोग घेतो, व गुदेन्द्रियरूप कर्मेंद्रियाने मलविसर्गरूप कार्य करतो. (८)

विवरणः—मन, बुद्धि, चित्त, अहंकार व अन्तःकरण असे ज्ञानशक्तिप्रधान सात्विक अन्तःकरणाचे पाच भेद आहेत, व व्यान, समान, उदान, प्राण व अपान असे क्रियाशक्ति प्रधान राजस प्राण वायूचे पाच भेद आहेत. पाच प्रकारचे अन्तःकरण वर दाखविलेल्या क्रमाने श्रोत्र, त्वक्, चक्षु, जिव्हा व घ्राण या पाच ज्ञानेंद्रियानें शब्द, स्पर्श, रूप, रस व गंध अशा पाच विषयाची ज्ञाने म्हणजेच वृत्ति आपल्या ठिकाणी निर्माण करते, म्हणजेच त्याचा उपभोग ते घेते, व वाक्, हस्त, पाद, उपस्थ व गुद या पाच कर्मेंद्रियाने शब्दोत्पत्ति, घेणे-देणे, येणे-जाणे, रति व मूत्र करणे व मलविसर्जन करणे अशी कामे अंतःकरणच करीत असते.

ही पाच ज्ञाने व पाच प्रकारची कर्मे करण्याकरता अंतःकरणाला व्यान, समान वगैरे पाच प्रकारच्या वायूचा आश्रय अवश्य घ्यावा लागतो. त्या वायूच्या आश्रयाशिवाय अन्तःकरणाला काहीच कार्य करता येत नाही, व अन्तःकरणाशिवाय नुसता वायूही वरील कोणतीही कामे करू शकत नाही. क्रियाशक्ति वायू व ज्ञानशक्ति अन्तःकरण ज्या वेळी परस्पर सहायक होतील, त्या वेळेसच अंध-पंगू या न्यायाने सर्व कार्ये शरीराची चालतात, हे तात्पर्य आहे. इतर अर्थ स्पष्टच आहेत.

श्लोकः—

**कर्मज्ञानेंद्रियैः पुण्यपापयोः सुखदुःखयोः ।**
**भौतिके पंचके कर्तृभोक्तृत्वे द्वंद्वतापि च ॥९॥**

अन्वयः– भौतिके पंचके कर्मज्ञानेंद्रियैः पुण्य पापयोः सुखदुःखयोः कर्तृत्व भोक्तृत्वे (भवतः) च द्वंद्व तापि (भवति) ॥९॥

अर्थः– सूक्ष्म पंचभूतापासून निर्माण झालेल्या या लिंगदेहात म्हणजे अंतःकरणादि पंचकात ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये याच्या द्वारा पुण्य व पाप निर्माण होते, व त्याचे फल, सुख व दुःख, हही तेथेच निर्माण होते. त्यामुळे पुण्यपापचे कर्तृत्व व त्याचे फळ जे सुखदुःख, याचे भोक्तृत्व आणि शीतोष्णादि ज्ञान, क्षुधापिपासादि द्वंद्वेही लिंगदेहातच होतात (९)

विवरणः— सूक्ष्म पंचभूताच्या म्हणजेच तन्मात्राच्या

किंवा त्रिविधाहंकाराच्या सत्वगुण समूहापासून अंतःकरण पंचक व त्याच्याच रजोगुण समुदायापासून पंचविध प्राण निर्माण झाले. ही दोन पंचके परस्परास सोडून कधी रहात नाहीत. या दोघास मिळून लिंगदेह अशी संज्ञा आहे. यालाच सूक्ष्मदेह असेही म्हणतात. पाच ज्ञानेंद्रिये व पाच कर्मेंद्रिये यांचाही या लिंगदेहातच समावेश आहे. हा लिंगदेह ज्ञानेंद्रिये व कर्मेंद्रिये यांच्या द्वारा अन्नमय स्थूल शरीरा कडून विहित किंवा निषिद्ध क्रिया घडवितो, व त्यामुळे पुण्य व पाप असे क्रमाने त्या क्रियांची सूक्ष्म रूपे बनून लिंग देहातच ते राहतात, व योग्य काल प्राप्त झाल्यावर त्यापासून झालेली सुखदु.खेही लिंगदेहालाच होतात. सुखदु खेसुद्धा लिंगदेहाच्या वृत्तीच आहेत. क्षुधा–तृषा, राग द्वेष, मान–अपमान इत्यादि द्वंद्वेसुद्धा लिंगदेहातच उत्पन्न होतात. म्हणून पुण्य–पापादिकाचे कर्तृत्व व सुखदुःखा दिकाचे भोक्तृत्व लिंगदेहासच आहे.

अन्नमय शरीररूप स्थूल देहाला कर्तृत्व व भोक्तृत्व हे दोनीही नाहीत कारण स्थूलदेहातील लिंगदेह त्याला सोडून दुसरीकडे गेल्यावर त्या प्रेतदेहात कर्तृत्व व भोक्तृत्व दिसत नाही. ज्याप्रमाणे अग्नीचा संबंध पाण्याशी असला म्हणजे पाणी गरम आहे असे वाटते, व अग्नीचा संबंध नाहीसा झाला म्हणजे ते उष्ण नाही असे भासते, परंतु उष्णता हा जसा अग्नीचाच धर्म आहे असे जसे अन्वय व्यतिरेकाने निश्चित आहे, त्याप्रमाणे लिंगदेह आत असल्यास स्थूल देहास कर्तृत्व भोक्तृत्व दिसते व लिंगदेह आतून निघून गेल्यास कर्तृत्व भोक्तृत्व नाही, असे दिसत, ते कर्तृत्व व भोक्तृत्व अन्वय व्यतिरकाने लिंगदेहाचेच आहे ते स्थूल देहाचेही नाही, व चैतनस्वरूप जो तू. त्या तुझेही नाही. फक्त स्थूल देहाशी व तुझ्याशी या लिंगदेहाचे खोटेच तादात्म्य अविद्येने निर्माण केले असल्याने, देहाला व तुला उगीचच कर्तृत्व व भोक्तृत्वाचा भास होतो असे समज. (९)

श्लोक.—

तल्लिंगदेहतादात्म्यात्कर्तृत्वादि वृथार्जितं ।
हेतुदेहपरस्वात्मज्ञानान्मुक्तिर्भवाऽचिरात् ॥१०॥

अन्वय — तत् लिंगदेहतादात्म्यात् (त्वया) कर्तृत्वादि वृथा अर्जितम् । हेतुदेहपरस्वात्मज्ञानात् अचिरात् मुक्तिर्भवा (अस्ति) ॥१०॥

अर्थः— म्हणून लिंगदेहाशी तादात्म्य मानून तू कर्तृत्व व भोक्तृत्व खोटेच आपल्यावर ओढून घेतले आहेस ज्या अज्ञानरूप कारणाने हे लिंगदेहतादात्म्य स्विकारून तू हे कर्तृत्व भोक्तृत्व संपादन केले आहेस, त्या अज्ञानाहून पलीकडे असणाऱ्या आपल्या आत्म्याच्या ज्ञानाने, तुला शीघ्रच म्हणजे ज्ञान होताक्षणीच, पुनर्जन्मरहित अशी मुक्ती तुला होईल (१०)

विवरणः— ज्या अर्थी शीतोष्णानुभवादि द्वंद्वे व कर्तृत्व भोक्तृत्वादि सर्व प्रपंच लिंगदेहाचाच धर्म आहे, त्या अर्थी तुझा व त्यांचा वास्तविक काही संबंध नाही. परंतु स्वतःच्या स्वरूपाचे अज्ञानरूप जो कारण देह, त्याचा आश्रय घेऊन या लिंगदेहाशी खोटेच तादात्म्य तू आपल्या ठिकाणी मानतोस, व त्यामुळे सर्व अनर्थांचे बीज जे कर्तृत्व भोक्तृत्वादि, तेही आपल्या ठिकाणी आहे, असे तू समजतोस. वास्तविक हिमालय व विंध्य पर्वताचा जसा काहीच संबंध नाही, तसा तुझ्याशी अंत करण म्हणजे लिंगदेह व त्याच्या धर्मांचा तुझ्याशी काहीच संबंध नाही.

हे ऐकून शिष्य म्हणतो, गुरुमहाराज या लिंगदेहाशी माझा जर आध्यासिक म्हणजे खोटाच संबंध असेल, तर मग तो निवृत्त होणेही संभवनीय आहे. तो संबंध जर वास्तविकच माझे स्वरूप असेल, तर तो निवृत्त करणे शक्य नाही कारण वास्तविक संबंध, संबंधी निवृत्त झाल्याशिवाय निवृत्त होणे शक्य नाही. तरी लिंगदेहाशी माझा झालेला मिथ्या संबंध कसा नष्ट होईल, ते कृपा करून आपण सांगा म्हणजे सर्व अनर्थांचे मूळ असणारा हा लिंगदेहसंबंध नष्ट करण्या करिता मी प्रयत्न करीन.

शिष्याचा प्रश्न ऐकून गुरुमहाराज म्हणतात,

बा शिष्या! फार चांगले विचारलेस. तुला आता सविस्तर सांगतो. ऐक. कोणत्याही संबंधाचा नाश करणे असल्यास त्या संबंधाच्या दोनीही संबंधी पदार्थांचा किंवा निदान दोहोंपैकी एकाचा तरी नाश किंवा नाश न झाला तरी त्या स्थानातून दुसरीकडे गेल्यास संबंध नष्ट होतो, असे दृष्टोत्पत्तीस येते येथे आत्मा व लिंगदेह यांचा तादात्म्य संबंध नष्ट करणे आहे. त्यांपैकी आत्म्याचा नाश, किंवा

लिंगदेहाहून दुसरीकडे त्याने जाणे, हे संभवनीय नाही कारण आत्मा हा अविनाशी व सर्वव्यापक असा आहे. अर्थातच लिंगदेहाचाच नाश किंवा आत्म्याहून दुसरीकडे कोठे तरी त्याला घालविले पाहिजे म्हणजे आत्म्याचा व त्याचा संबंध सुटेल. त्यापैकी लिंगदेहाला दुसरीकडे, म्हणजे आत्मा जेथे नसेल तेथे, घालविणे शक्य नाही, कारण आत्मा नाही असे कोणतेही स्थान नाही. अर्थात् लिंग देहाचा नाशच झाला पाहिजे म्हणजेच त्याचा आत्म्याशी झालेला, खोटा का असेना, संबंध नष्ट होईल.

लिंगदेह हा परिच्छिन्न म्हणजे अव्यापक, जड व विकाररूप असल्याने, सत्य नाही म्हणजे तो कोणत्या तरी अधिष्ठानावर शुक्तीवर जसे रजत कल्पित आहे तसा, कल्पित मानला पाहिजे. लिंगदेह प्रातिभासिक नसून व्याव हारिक म्हणजे ब्रह्मज्ञानानेच बाध्य आहे अर्थात त्याच्या कल्पनेचे अधिष्ठान पारमार्थिक असले पाहिजे समान सत्ताक दोन पदार्थांत अधिष्ठान अध्यस्त भाव होऊ शकत नाही. आत्म्याहून दुसरे कोणी या जगात पारमार्थिक नाही अर्थात् आत्मा हाच लिंगदेहाचे अधिष्ठान होण्यास योग्य आहे त्याच्या अज्ञानाने अन्य पदार्थाचा अध्यास त्यावर होतो, त्यास अधिष्ठान असे म्हणतात पारमार्थिक असणाऱ्या आत्म्याच्या अज्ञानामुळे लिंगदेहाचा अध्यास आत्म्यावर झाला आहे

अर्थातच लिंगदेहाच्या अध्यासाला आत्मस्वरूपाचे अज्ञान हे कारण आहे. म्हणून या अज्ञानाला कारण देह असे नाव आहे तुझे निजस्वरूप कारण देहाहूनही पलीकडे आहे त्याचे यथार्थ ज्ञान झाल्याबरोबर हे सर्वानर्थ मूळ अज्ञान नष्ट होते, व लिंगदेहाशी झालेले तादात्म्यही नष्ट होते

ज्ञान व मुक्ति हे दोनी समान कालीनच आहेत एकदा मुक्ति झाल्यावर पुन. बंध होत नाही कारण बंधाचे मूळ कारण जे अज्ञान, तेच ज्ञानाने नष्ट झाले असते, व बंधाला दुसरे काही कारण नाहीच म्हणून कर्तृत्व भोक्तृत्वादि व तन्मूलक जन्ममरणादि रहित असे आपल्या स्वरूपाने जे राहणे यालाच मुक्ति म्हणतात ही मुक्ति ध्रुव म्हणजे नित्य आहे. ही मुक्ति आत्म्याचे स्वरूपच आहे अज्ञान कल्पित अन्यरूप टाकून आपल्या निजरूपाने अखंड राहणे म्हणजेच मुक्ति, असे.

'मुक्तिर्हित्वाऽन्यथारूपं स्वरूपेणाव्यवस्थितिः'

असे भागवतात मुक्तीचे लक्षण सांगितले आहे. ते अगदी यथायोग्य आहे आत्मस्वरूप नित्य मुक्तच आहे.

शिष्य म्हणतो, गुरु महाराज! आपण फार चांगले निरूपण केले. या निरूपणावरून, सर्व अनर्थाला मूळ, स्वरूपाचे अज्ञानच आहे, हे मला अगदी पक्के समजले. आता या अज्ञानाचा नाश केल्याशिवाय मला भासत असलेला अनर्थ नाहीसा होणार नाही तरी याचे स्वरूप मला समजावून सांगा, व मी या अज्ञानाच्या पलीकडे कसा आहे, म्हणजे त्याच्याहून अत्यंत विलक्षण कसा आहे, हे ही सांगा. कारण मी अज्ञ आहे, असा मला अनुभव आहे यावरून मी अज्ञानरूपच आहे असे मला वाटते.

हे ऐकून गुरुमहाराज म्हणाले, ना शिष्या! तुला हे सविस्तर सांगतो ऐक.

श्लोक —

**स्वदिदृक्षुवराज्ञानहेतुसाक्षी परो भवान्।**
**निराकारस्वात्मबुद्धिमहाकारणसाक्ष्यपि॥११॥**

अन्वय — भवान्स्वदिदृक्षुवराज्ञान हेतुसाक्षीपर असि निराकार स्वात्म बुद्धिमहाकारण साक्ष्यपि (असि) ॥११॥

अर्थ — आपल्या स्वरूपाला पाहण्याची इच्छा करणाऱ्याला बंद केलेल्या दाराप्रमाणे स्वरूपज्ञानास प्रतिबंधक असणारे जे अज्ञान, यालाच कारणदेह असेहि म्हणतात याचा साक्षी तू असून याच्याहून पलीकडे आहेस तू निराकार आहेस, म्हणून निराकार असणाऱ्या निजस्वरूपाचे जे तत्त्वज्ञान याला महाकारण देह असे म्हणतात, यानाही तू साक्षी आहेस. यामुळे या महाकारण देहाच्याही पलीकडे तू आहेस. (११)

विवरण – आपल्या स्वरूपाला पहाण्याची इच्छा करणाऱ्या जिज्ञासूला, घरातील वस्तू पाहण्याची इच्छा करणाऱ्याला जसे बंद केलेले घराचे दार वस्तुज्ञानात प्रतिबंध करते त्याप्रमाणे स्वरूपज्ञानात प्रतिबंध करणारे जे अज्ञान, त्यालाच कारणदेह असे म्हणतात ज्ञेय, जे शुद्ध ब्रह्मात्मैक्य, व ज्ञाता जो प्रमाता जीव, या दोहों मध्ये बंद केलेल्या दाराप्रमाणे हे अज्ञान आहे. या अज्ञानामुळे आत्मस्वरूप असणारे ब्रह्मच जीवाला दिसत नाहीसे झाले आहे.

हे अज्ञान पूर्वी वर्णन केलेल्या स्थूल व सूक्ष्म देहाचे बीजरूप आहे या अज्ञानरूप बीजापासूनच सूक्ष्म देहरूप अंकुर व स्थूल देहरूप वृक्ष निर्माण होतो परंतु इतर वृक्षाचे बीज जसे अंकुर व वृक्ष निर्माण झाल्यावर नष्ट होते, तसे हे बीज मात्र अंकुर व वृक्ष याच्या उत्पत्तीने नष्ट होत नाही हे इतर बीजापेक्षा या बीजात वैलक्षण्य आहे आपल्या स्वरूपाच्या यथार्थ ज्ञानाशिवाय या अज्ञानरूप बीजाचा नाश दुसऱ्या कशानेही होत नाही, व ज्ञान झाल्याबरोबर आपला नाश होणार, म्हणून जीवाला स्व स्वरूपाचे ज्ञान न होण्याबद्दल हे अज्ञान अगदी रात्रंदिवस झटत असते

म्हणून आपल्या स्वरूपाचे तत्त्वज्ञान अगदी दुर्घट असे झाले आहे हे अज्ञानरूप बीज, अंकुररूप असणारा सूक्ष्मदेहच वृक्षरूप असणारा स्थूलदेह, या दोहोंचाही झोपेत व प्रलयकाली आपल्या स्वरूपामध्ये लय करते, व जागृती व स्वप्नकाली पुन त्याना उत्पन्न करते तत्त्वज्ञान होईपर्यंत हा असा याचा उद्योग सारखा सुरूच असतो झोपेत व प्रलयकाली सर्व व्यवहाराला कारण असणारी बुद्धी सवज्ञानरहित होऊन या अज्ञान बीजामध्ये लीन झालेली असते त्या वेळी ती आपणाला किंवा दुसऱ्या कोणाला जाणत नसते

या अवस्थेलाच सर्व–ज्ञान–उपसहारपूर्वक बुद्धीची कारणावस्था असे म्हणतात कारण देहातील तीन गुणापैकी तमोगुण वाढला, म्हणजे ही अशी अवस्था होते हे अज्ञान बुद्धीहून वेगळे आहे कारण ते बुद्धीचेही कारण आहे परतु बुद्धीच्याही पलीकडे ते आहे एवढ्या वरूनच 'यो बुद्धे परतस्तुस' या गीतावचनावरून तू याला आत्मा मान समजू नकोस कारण आत्मा हा स्वयप्रकाश असल्याने तमो गुणाने कधी अभिभूत होत नाही ज्याप्रमाणे सूर्य अधाराने कधीच आवृत होत नाही, त्याप्रमाणेच हा आत्मादेखील अधारासारख्या असलेल्या या तमोगुणानी आवृत होत नाही

कारणरूप अज्ञान मात्र तमोगुणाने अभिभूत होते म्हणून याला बुद्धीचा लय करता येतो तू जर या अवस्थेत तमोगुणाने अभिभूत म्हणजे आवृत झाला असतास, तर हा तमोगुण कोणाला समजला असता ? कारण आत्म्याहून इतर सर्व पदार्थ स्वत ला व दुसऱ्याला न जाणणारे आहेत बरे, आत्मा जाणतो म्हणावे, तर तो तमो गुणान आवृत, अर्थात कोणालाही न जाणणारा मग हे आवरण कोण जाणणार ? व त्याचे तर ज्ञान तुला आहे कारण 'मी इतका वळ गाढ झोपेत किंवा अज्ञात अवस्थेत होतो,' असा प्रत्यय येतो त्यामुळे आत्मा आवृत्त नाही, परतु या आवरणाचाही साक्षी आहे, असे मानाव लागते

म्हणून 'मी अज्ञ आहे' असा अनुभव जरी तुला येत असला, तरी तू अज्ञान किंवा अज्ञानी नसून याचा साक्षी म्हणजे याना साक्षात् पहाणारा असा आहेस व्याकरणात साक्षात् शब्दाहून इन् प्रत्यय करून 'साक्षी' हा शब्द तयार झाला आहे याचा अर्थ 'वस्तूला साक्षात् पहाणारा' असा आहे, व साक्षीही एक सज्ञा आहे ही सज्ञा साक्षात् पहाणाऱ्यालाच आहे कानाने ऐकणारा किंवा अनुमान करणारा, अथवा देण्या घेण्याची क्रिया करणाऱ्याला ही सज्ञा नाही म्हणजे उदासीन व बोध या धर्मानेच 'साक्षी' शब्दाला तो योग्य होतो म्हणजे आवरणाच्या साक्षीला आवरणाचे कोणतेही धर्म लागू नाहीत, असे साक्षी या शब्दाचे महत्व आहे

म्हणूनच तू या स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चार देहाचा, व क्रमाने या चार देहाचे अभिमानी जे विश्व, तैजस, प्राज्ञ व प्रत्यक्, याचाही साक्षी आहेस म्हणून याच्याहून भिन्न, याना प्रत्यक्ष पहाणारा व याच्या कोणत्याही धर्माशी सबध नसलेला असा उदासीन, व याच्याहून अत्यत वगळा व पलीकडचा आहेस, असे सिद्ध झाले

गुरुमहाराज, मी जर असा आहे, तर माझे स्वरूप कसे आहे ?

बा शिष्या ! तुझे स्वरूप अगदी निराकार असे आहे मग त्या निराकार स्वरूपाच वर्णन कसे करावे ? कारण कोणताही शब्द, वस्तूचा काही जातीगुणक्रियासबध वगैरे आकार घेऊन वस्तूचे प्रतिपादन करीत असतो तू निराकार आहेस त्यामुळे विधिमुखान, म्हणजे तू असा किंवा तसा या रूपाने, तुझे स्वरूप दाखविता येणार म्हणून असा नाहीस तसा नाहीस, इत्यादि निषेध मुखाने, कस तरी, लक्षणेने तो पयान तुझे स्वरूप तू समजून घेतले पाहिजेस श्रुती सर्वच आकाराचा निषेध करत, व निषेध एक अधिष्ठान सत्य असल्या शिवाय होऊ शकत नाही निषेध करणारा आपल्याहून भिन्न

पदार्थांचा निषेध करू शकेल परंतु आपलाच निषेध त्याला करता येणार नाही व तो त्याला समजणारही नाही कारण ज्या वेळी निषेध करणाऱ्याचा निषेध असेल, त्यावेळी निषेधाला जाणणारा निषेधकर्ता नाही व ज्या वेळी निषेध कर्ता असेल, त्या वेळी त्याचा निषेध नाही कारण, भाव व अभाव, एका वस्तूचे, एके वेळी रहात नाहीत यामुळे सर्वांचा निषेध करून शिल्लक राहिलेले निषेधशेष असे निराकार स्वात्मस्वरूप तुझे आहे, असे तू समज

या ज्ञानालाच स्वात्माकार-वृद्धि असे म्हणतात या वेळीच 'सच्चिदानन्दरूप ब्रह्म मी आहे,' असे आपल्या स्वरूपाचे खरे भान होते परंतु या वृत्तीचाही तू साक्षी आहेस ही वृत्ति तुझे स्वरूप नव्हे या वृत्तीलाच महाकारण-देह असे म्हणतात कारण यात शिल्लक राहिलेल्या थोड्या अहंकाराचा 'मी' असा उल्लेख असतोच मग मीपणाच जेथे नाही, तेथे आम्हाही नाही कारण 'मी' शब्दच आत्म्याचा वाचक आहे म्हणजे मी नाही तर आम्हाही नाही अर्थात् अभाव हेच माझे स्वरूप आहे, असे मात्र समजू नको कारण या उरलेल्या अहंकाराचाही तू साक्षी आहेस तू स्वयंप्रकाशमान असल्याने, जड-स्वरूप जो अभाव, हे तुझे रूप नाही तू महाकारण देहाच्याही पलीकडचा एक अद्वितीय परब्रह्मरूप आहेस. (११)

श्लोक —

**स्थाणुरन्तर्बहिर्भास्वानात्मारामो निराकृति ।**
**चतुर्देहपर साक्षी प्रत्यगीशोसि विद्धियद ॥१२॥**

अन्वय — स्थाणु अन्तर्बहिर्भास्वान् प्रत्यगीशोसि अद (मयोक्त) विद्धि (येन) निराकृति निरभिमान चतुर्देहपर आत्मारामश्च भविष्यसि (१२)

अर्थ — तू सोनाराच्या ऐरणीप्रमाणे निर्विकार स्थाणू सारखा देहाच्या आत व बाहेर सर्वदा प्रकाशमान प्रत्यग भिन्न ब्रह्मरूप आहेस मी सांगितलेले हे तुझे स्वरूप तू जाणून घे म्हणजे त्यामुळे आकृतिरहित, अभिमानरहित, चारी देहाच्या पलीकडचा व स्वात्मस्वरूपातच रममाण होणारा असा होशील ॥ १२ ॥

विवरण — ज्याप्रमाणे दगडाचा किंवा लोखंडाचा खांब, उन्हाळा, पावसाळा व हिवाळा यानी होणाऱ्या परिणामाने रहित तीनीही काळात एकसारखाच असतो, म्हणून त्याला स्थाणु असे म्हणतात यालाच दुसरा कूटस्थ असाही शब्द लावता येतो कूट म्हणजे सोनाराची ऐरण तिच्यावर सोनार अनेक अलंकार बनवितो परंतु त्या अलंकाराचा त्या ऐरणीशी काहीच संबंध नाही ते अलंकार सोन्याचे किंवा चांदीचे विकार आहेत सर्व अलंकार बनले तरी ऐरण निर्विकारच आहे त्याप्रमाणे ऐरणीप्रमाणे म्हणजे कूटाप्रमाणे जो निर्विकार राहतो, त्याला 'कूटवत्तिष्ठति' या व्युत्पत्तीप्रमाणे कूटस्थ असे म्हणतात

कूटस्थ व स्थाणु या शब्दाचा एकच अर्थ आहे तू स्थाणु म्हणजे कूटस्थ आहेस सर्व प्रपंच उत्पन्न झाला, काही वेळ राहिला व पुन लयाला गेला, तरी त्याच्या उत्पत्ति स्थिती-लयाने तुला काहीच विकार झाला नाही तू सृष्टि स्थिति-लय, तिन्ही काळी निर्विकार आहेस 'मी ऐरणी प्रमाणे जर कूटस्थ असेन, तर तिच्याप्रमाणे देश-काल व वस्तूच्या मर्यादेनेही युक्त असा आहे' असे मात्र समजू नकोस दृष्टान्तातील सर्व अंश दार्ष्टान्तात घेण्याचे नसून विवक्षित अंशच घेण्याचा असतो तो अंश म्हणजे त्यावर बनलेल्या पदार्थांच्या विकाराने विकारी न होणे, एवढाच अर्थ येथे आहे स्थाणूची देश-काल वस्तुपरिच्छिन्नता घ्यावयाची नाही

कारण तू देशकाल वस्तुपरिच्छेदरहित शरीराच्या आत व बाहेर सर्वत्र प्रकाशमान होणारे जे स्वयंप्रकाशमान ज्ञान, तत्स्वरूप तू आहेस देश-काल-वस्तूची सत्ता व भान ज्ञानावरच अवलंबून असल्याने, ते शुक्तीवर रजताप्रमाणे कल्पित आहेत शुक्ती ज्याप्रमाणे कालत्रयात रजत होऊ शकत नाही, त्याप्रमाणे कल्पित असलेल्या देश काल-वस्तूने अधि ष्ठानभूत ज्ञानाला परिच्छेद म्हणजे संकोचितता येऊ शकत नाही तू देश-काल-वस्तूच्या कल्पनेचे अधिष्ठान जे स्वयंप्रकाशमान ज्ञान, तत्स्वरूप आहेस

म्हणून प्रत्यक् म्हणजे सर्वान्तर्यामी व सर्वांच्या आत असणारे जे तुझे निज परमात्मस्वरूप, तत्स्वरूप तू आहेस, हे तुझ्या स्वरूपाचे खरे वर्णन मी सांगितलेले तू प्रत्यक्ष जाणून घे म्हणजे तू मायामय, सर्व आकार रहित म्हणूनच त्या आकाराच्या अभिमानानेही रहित, स्थूल-सूक्ष्म-कारण व महाकारण, असे जे चार देह पूर्वी वर्णन केले, त्याहून वेगळा व त्याच्या पलीकडचा, आपल्याच प्रत्यगभिन्न सच्चिदानन्द ब्रह्म परमात्मस्वरूपात निरंतर रम माण होणारा, अर्थातच सर्वानर्थ व दु खानीरहित असा,

होईल, एवढा या यथार्थ स्वरूप ज्ञानाचा महिमा आहे

म्हणून तुझ्या वास्तविक स्वरुपाचे यथार्थ ज्ञान तू करून घे यालाच कैवल्य–मोक्ष असे म्हणतात. 'ज्ञानादेव तू कैवल्य' या वाक्याने श्रुती या ज्ञानाचे महत्व नेहमी वर्णन करतात. म्हणून तू हे ज्ञान सपादन कर. ( १२ )

श्लोक.—

**अन्नासुहृद्ध्यहकारमयतादात्म्यतो भ्रम. ॥ १२३॥**

अन्वय — अन्नासुहृद्ध्यहकारमय तादात्म्यतो भ्रम (भवति) ॥ १२३ ॥

अर्थ — अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनदमय अशा पाच कोशाचे तादात्म्य झाल्यामुळे मी जन्ममरणादि धर्मवान् आहे, असा तुला भ्रम झाला आहे, म्हणून तू सच्चिदानद ब्रह्मरूप असूनही तुझा अनर्थ दूर झाला नाही ( १२१ )

विवरण — गुरुमहाराज ! 'मी सागितलेले आत्म स्वरूप तू जाण,' असे आपण म्हणता, परतु फार अनादि कालापासून चालत आलेल्या 'मी कर्ता-भोक्ता, सुखी –दुखी' इत्यादि भ्रमानी माझी बुद्धी व्याप्त झाली आहे हा भ्रम माझ्या बुद्धीत अगदी दृढमूल होऊन बसला आहे तरी आपण म्हणता तसे माझे जरी आत्मस्वरूप असले तरी या भ्रमरूप प्रतिबधाच्या प्राबल्याने मी ते कसे जाणू शकेन ? मला हे ज्ञान होणे अशक्य आहे असे वाटते

गुरुमहाराज म्हणाले, बा शिष्या! घाबरू नकोस या भ्रमाच्या नाशाची एक सुलभ युक्ती तुला सागतो. ऐक स्फटिकमणि जातीनेच शुभ्र व स्वच्छ असा आहे. परतु तो जर जास्वदीच्या फुलावर ठेवला, तर अगदी लाल भडक असा दिसतो परतु तो खरोखर लाल झाला नाही कारण फूल दूर केल्यावर तो जसाचा तसाच पाढरा व स्वच्छ दिसतो अर्थात् अन्वय व व्यतिरेकाने विचार करून पाहिले असता त्यावर दिसणारा लालपणा त्याचा धर्म नसून जास्वदीच्या सबधाने तो भासतो, व संबंध नष्ट झाल्यावर तो दिसेनासा होतो यावरून फुलाचा संबंध असणे म्हणजे अन्वय, व सबध नष्ट होणे म्हणजे व्यतिरेक या अन्वय व्यतिरेकाच्या युक्तीने स्फटिक मण्याचा लालपणा हा मिथ्या म्हणजे त्याचा स्वत चा नसून दुसऱ्याचा त्याच्यावर भासतो त्या वेळी स्फटिक मणी लाल दिसतो, त्या वेळीही तो पाढरा स्वच्छ असाच आहे असा निश्चय अन्वय व्यतिरेक करणाऱ्या विचारी माणसाला होतो, व फुलाच्या सबधाने त्याला जरी तो पुन लाल दिसला, तरी हा भ्रम आहे असे तो ठाम समजून, त्यापासून होणाऱ्या अनर्थाचा वाटेकरी तो विचारी माणूस होत नाही

हा दृष्टान्त बरोबर जर लक्षात आला तर तुला होत असणारे कर्तृत्व भोक्तृत्वाचे व सुखदु खाचे ज्ञान हेसुद्धा स्फटिक मण्याच्या लालपणाच्या ज्ञानाप्रमाणे भ्रांतिरूप आहे, असा तुला पक्का निश्चय होईल, व त्याचे परिणाम तुला कालत्रयीही बाधू शकणार नहीत, व प्रपच भासत असतानाही नित्याकर्तात्म बोधरूप मुक्ती तुला सर्वदा लाभेल ज्याप्रमाणे स्वच्छ व पाढरा शुभ्र असणारा स्फटिक मणि दृष्टातात तुला दाखविला, त्या प्रमाणे दार्ष्टांतातही स्वयप्रकाशमान सच्चिदानदघन व सर्वव्यापक आत्मा तू स्फटिक स्थानी समज, व स्फटिकाला जसे जास्वदीचे फूल उपाधी आहे, तसे या आत्म्याला अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनदमय असे पाच कोश उपाधी आहेत, असेही समज

जास्वदीचे फूल व स्फटिक, दोनीही द्रव्ये असल्याने त्याचा संयोग सबध होतो परतु आत्मा गुणरहित असल्याने द्रव्य नाही, व असंग असल्याने त्याच्याशी कोणाचाही वास्तविक संबंध होत नाही म्हणून उपाधीचा व आत्म्याचा आध्यासिक म्हणजे काल्पनिक, खोटा, तादात्म्यसंबंध मानला आहे, हे दृष्टात व दार्ष्टांतातील स्वरूप व संबध यातील वैलक्षण्यही लक्षात घेतले पाहिजे, म्हणजे तुला या दृष्टान्त व दार्ष्टांतातील स्वारस्य लक्षात येईल.

स्फटिक व जास्वदीचे फूल या दोघाची व याच्या सयोगसबधाची सत्ता व्यावहारिक आहे म्हणजे हे सबध व सबधी दोन्ही एक सत्तेचे आहेत तरी जास्वदीच्या उपाधी काली स्फटिकावर लालपणा येऊ शकत नाही. मग आत्मा पारमार्थिक सत्तावान् व पचकोश व त्याचा सबध व्याव हारिक, अर्थातच मिथ्या, असा आहे. मग या पचकोशावर असणारे कर्तृत्वभोक्तृत्वादि धर्म आत्म्यावर कालत्रयीही येणे अगदीच असभवनीय आहे, हे सूर्यप्रकाशाप्रमाणे अगदी स्पष्टपणे लक्षात येण्यास हरकत नाही या पचकोशाचा आत्म्याशी अन्वय व व्यतिरेक करण्यास पाठक श्रुतीन

सांगितले आहे.

ज्याप्रमाणे मुंज नावाच्या गवतातील काडी, सभोवती असलेल्या पानांनी आच्छादित असते, ती काडी घेणाऱ्याला सभोवती असणारी पाने हळूहळू दूर करून ती सूक्ष्म काडी त्यातून काढून घ्यावी लागते, त्याप्रमाणे पंचकोशरूप पानांनी आवृत असलेला हा स्थाणुरूप आत्मा पंचकोशाला अन्वय व्यतिरेकरूप युक्तीने दूर सारून वेगळा करून घ्यावा लागतो, म्हणजे वेगळा आहे, सच्चिदानंद ब्रह्मस्वरूप आहे, असे समजावे लागते. म्हणजे मग तो आत्माच ब्रह्मरूप होतो. प्रथमपासूनच हा आत्मा ब्रह्मरूप आहे. परंतु या पंचकोश उपाधीने तो भलत्याच रूपाचा झाला आहे. ते मायिक रूप टाकून दिले, की मूळच्या ब्रह्मस्वरूपानेच तो अगड नांदतो.

श्रुती म्हणते-प्रत्येक जीव सर्व प्राणिमात्राच्या आत राहणारा म्हणजे सर्वाधिष्ठान, स्वयंप्रकाश, व्यापक ब्रह्मरूप असून लिंगदेहाच्या उपाधीने अंगुष्ठ परिणाम झाला व तो लिंगदेह, लोकांच्या म्हणजे स्थूल शरीरातील मांस पिंडरूप हृदयाच्या आतच राहू लागला. कारण याची उपाधी लिंग देह हृदयात राहतो. म्हणून त्याच्या आधीन होऊन तोही परिच्छिन्न होऊन हृदयात राहू लागला. मी एवढासा आहे, असे मानू लागला. सर्वव्यापक असून अणू झाला व सर्व अनर्थाला पात्र झाला. त्याला त्या उपाधीतून काढून मूळच्या ब्रह्मरूपात ठेवण्यास व तसे करण्याकरिता युक्ति करता युक्ति म्हणून श्रुतीने मुंज, तृण व इषीका यांचा दृष्टान्त दाखविला आहे या श्रुत्युक्त युक्तीने पंचकोशाहून वेगळा आत्मा तू जाणला पाहिजेस व त्याकरता तुला प्रथम पंचकोश म्हणजे काय, हे सांगितले पाहिजे, ते पंचकोश तुला सांगतो, त ऐक. ( १२½ )

श्लोक —

**स्थूल. पंचीकृतैर्भूतै सूक्ष्म कर्मेंद्रियासुभि ॥१३॥**
**धीन्द्रियैर्हेतुर्महांश्च तद्विदात्मन्यथोध्दृते ।**
**अन्वयव्यतिरेकाभ्यां परं ब्रह्मैव शिष्यते ॥ १४ ॥**

अन्वय.— पंचीकृतैर्भूतैः स्थूल कर्मेन्द्रियासुभि सूक्ष्म. धीन्द्रियैर्हेतु महांश्च ( अस्ति ) अथ तद्विदा अन्वयव्यतिरेकाभ्या आत्मनि उध्दृते परब्रह्मैवशिष्यते ॥ १३–१४ ॥

अर्थ — पंचीकृत भूतापासून स्थूलदेह होतो कर्मेन्द्रिये व प्राण मिळून प्राणमय नावाचा कोश होतो. ज्ञानेन्द्रिये व मन मिळून मनोमय कोश होतो व ज्ञानेंद्रिय व बुद्धि मिळून विज्ञानमय कोश होतो. हा कोश या शरीरात कर्ता आहे. महान् या नावाचा आनंदमय कोश जाण या कोशांना जाणणाऱ्याने अन्वय व व्यतिरेकाने या कोशांतून आत्म्याला वेगळे केल्यावर आत्मा परब्रह्मरूप होऊनच शिल्लक राहतो. ( १३–१४ )

विवरण — परब्रह्मरूप असणाऱ्या जीवात्म्याला अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय व आनंदमय असे पांच कोश आवरण करणारे आहेत. ज्याप्रमाणे तरवारीला म्यान हे आवृत करते व त्यामुळे तरवार दिसत नाही, त्याप्रमाणेच हे पांच कोश आत्म्याला आवृत करणारे आहेत. म्यान ज्याप्रमाणे तरवारीचे सर्वस्व आवरण करते, कारण ते चामडे फार जाड आहे, तसे हे कोश सर्वस्वी आवरण करीत नाहीत. हे झिरझिरीत कपड्याप्रमाणे विरल आहेत. त्यामुळे आत्मा सर्वस्वी आवृत नाही. त्याचे थोडेसे भान आहे. परंतु स्पष्ट भान नाही. त्यामुळे आत्मा विपरीत रूपाने का होईना, भासतो आहे. नाही तर सर्वच व्यवहार लुप्त झाला असता.

या पांच कोशांत शेवटचा कोश अन्नमय आहे व पहिला कोश आनंदमय आहे. जीवाला स्थूल, सूक्ष्म व कारण असे तीन देह आहेत. त्यातील स्थूल देह किंवा पांच भौतिक शरीर हा अन्नमय कोश आहे. जन्म, जरा व मृत्यु असे याचे धर्म आहेत व अज्ञान हा कारणदेह आहे. यात आनंदमय कोश आहे. झोपेत या कोशाचे भान स्पष्टपणे असते. आनंद व भोक्तृत्व हे या आनंदमय कोशाचे धर्म आहेत.

मधला जो सूक्ष्म देह म्हणजे लिंग देह त्याचे सतरा भाग आहेत. मतांतराने एकोणीस भागही मानतात पांच कर्मेन्द्रिये, पांच ज्ञानेन्द्रिये, पांच प्राणादिवायु, मन व बुद्धि यात चित्त व अहंकार यांचा अंतर्भाव केला, तर मन व बुद्धि असे दोन भाग मिळून सतरा भाग ( चित्त अहंकार वेगळे धरल्यास एकोणीस भाग होतात. तूर्त आम्ही सतरा भागांचे मत घेतले आहे. अशा सतरा भागांचे गाठोडे म्हणजे सूक्ष्म किंवा लिंगदेह आहे.

या लिंगदेहात प्राणमय, मनोमय व विज्ञानमय असे तीन कोश राहतात. रजोगुणापासून निर्माण झालेले पंचप्राण व पंच कर्मेन्द्रिये, मिळून प्राणमय कोश होतो भूक व तहान असे या कोशाचे धर्म आहेत. सत्वगुणापासून निर्माण झालेली

पाच ज्ञानेंद्रिये व मन मिळून मनोमय कोश होतो. सकल्प, विकल्प वगैरे याचे धर्म आहेत व तोडण्याच्या क्रियेत कुऱ्हाड जसे करण म्हणजे साधन आहे. तसे हा विज्ञानमय सज्ञान क्रिया वगैरे करण्यास साधन आहे. म्हणून हा कर्ता जो विज्ञानमय कोश, त्याला साधन अथवा करणस्थानी आहे.

पचज्ञानेन्द्रिये व बुद्धि मिळून विज्ञानमय कोश होतो. निश्चय व कर्तृत्वादि याचे धर्म आहेत. या पाच कोशाशी किंवा तीन देहाशी तादात्म्यभ्रम, म्हणजे 'मीच हे पाच कोश किंवा तीन देह आहे' असा भ्रम तुला झाल्याने, 'मला जन्ममरण जरादि आहेत,' 'मलाच भूक, तहान वगैरे आहे,' 'मीच सकल्प विकल्पादि करतो,' 'निश्चय करणारा व बरी वाईट कर्मे करणारा कर्ता मीच आहे,' 'व या कर्तृत्वामुळे सपादन केलेल्या पाप पुण्याची सुख-दुःखादि फले भोगणारा मीच आहे,' 'स्वर्ग-नरक मनुष्यादि योनीमध्ये फिरणारा मीच आहे,' असा तुला भ्रम झाला आहे.

वास्तविक या पचकोशाचा किंवा तीन देहाचा व याच्या धर्माचा तुझ्याशी अर्थाअर्थी काहीच सबध नाही. परतु या पचकोशाचे किंवा तीन देहाचे, ज्ञान सपादन करून, अन्वय व्यतिरेके करून, आत्म्याहून पृथक्करण बुद्धीने केले पाहिजे. तरच हा आत्मा पचकोशाच्या व तीन देहाच्या जाळ्यातून सुटून आपल्या निज, नित्यशुद्ध, नित्यमुक्त, नित्यबुद्ध अशा मूळच्या परब्रह्मरूपाने सर्वार्थ विमुक्त परमानदस्वरूपाने अखड, अद्वितीय, असा राहील, असे या अन्वयव्यतिरेकाचे माहात्म्य आहे (१३–१४)

श्लोकः—

**भानं स्वप्नेऽस्योर्वभानेऽन्वय. प्राग्विस्मृतिः परः।**
**लिंगाभानेन्वयः स्वापभानं प्राग्विस्मृतिः परः॥**

अन्वयः— स्वप्ने उर्वभाने अस्यभान अन्वयः प्राग्वि-स्मृति. परः। लिङ्गाभाने स्वापभान अन्वयः प्राग्विस्मृति पर ॥ १५ ॥

अर्थ·— स्वप्नावस्थेत स्थूल देहाचे भान न होता या आत्म्याचे भान असते याला (आत्म्याचा) अन्वय म्हणतात. व स्थूलदेहाचे भान न होणे याला व्यतिरेक (देहाचा) व्यतिरेक, म्हणतात. (१५)

विवरण·— अन्वय व्यतिरेकाने पचकोशाहून आत्म-स्वरूप मुज इषीकान्यायाने करावे असे सागितले, ते अन्वय व्यतिरेक कोणते, ते तुला सागतो ऐक.

या प्रकरणात अन्वय व व्यतिरेक या शब्दाने अनुवृत्ति व व्यावृत्ती हा अर्थ घ्यावयाचा आहे. जसे माळेत सुताची 'अनुवृत्ति' म्हणजे प्रत्येक मण्यामध्ये सूत एकच प्रविष्ट असते व मणि मात्र दुसऱ्या मण्यामध्ये प्रविष्ट नसून आपापल्या ठिकाणीच असतात, अर्थात् दुसऱ्या मण्यात सूत जसे असते, तसे ते मणी असत नाहीत, याला 'व्यावृत्ति' असे म्हणतात. हे दोन प्रकार येथे अन्वय व व्यतिरेक या पदाने ग्रहण करणेचे आहेत.

वास्तविक न्यायशास्त्रामध्ये अन्वय व व्यतिरेक या शब्दाने 'यत्रधूमस्तत्राग्नि' म्हणजे जेथे धूर आहे तेथे अग्नि असतो. या व्याप्तीने होणाऱ्या अनुमानाला अन्वयि अनुमान व जेथे अग्नि नाही तेथे धूर नाही, या अभावाच्या व्याप्तीने होणाऱ्या अनुमानाला व्यतिरेकि अनुमान, म्हणजे अभावाच्या व्याप्तीने होणारे अनुमान, असे म्हटले आहे. परतु वेदान्त शास्त्रात अर्थापत्तिप्रमाणाचा स्वीकार केला असल्याने व व्यतिरेक व्याप्तीच्या जोगवरच अर्थापत्ति होत असल्याने व्यतिरेकि अनुमान वेदान्ती मानीत नाहीत. त्यामुळे अन्वय व व्यतिरेक या शब्दाने अन्वय व्यतिरेकि व्याप्ति किंवा तिने होणारे अनुमान न घेता अनुवृत्ति व व्यावृत्ति हेच अर्थ अन्वय व्यतिरेक शब्दाने येथे विवक्षित आहेत. व त्या अनुरोधाने स्थूल शरीराची व्यावृत्ति व आत्म्याची अनुवृत्ति तुला सागतो. ऐक

जागृत्ति, स्वप्न, सुषुप्ती, समाधी, मूर्च्छा व मरण अशा जीवाच्या सहा अवस्था आहेत. त्यापैकी पहिल्या तीन रोजच्या असल्याने त्याचा अनुभव सर्व जीवाना आहे. पुढच्या तीन अवस्था केव्हा केव्हा होणाऱ्या आहेत. रोजच्या नाहीत.

अनुभवसिद्ध पहिल्या तीन अवस्थेपैकी जागृती या अवस्थेत स्थूल शरीराचे भान असते, हे स्पष्टच आहे.

मनुष्याला किंवा प्राण्याला झोप लागली, म्हणजे झोपेत स्थूल शरीराचे किंवा दुसऱ्या कोणत्याही बाह्य पदार्थाचे ज्ञान नसते. अज्ञानरूप कारणात असलेला तमोगुण वाढला, म्हणजे त्यायोगे स्थूल शरीर किंवा तदवच्छिन्न चैतन्य आवृत होते. म्हणून स्थूल शरीराचे भान बद होते.

परतु प्राणी जागा झाल्यावर त्याला, 'मी निजलो

होतो' किंवा 'मला असे स्वप्न पडले' अशी त्याला आठवण होते. अनुभव घेतल्याशिवाय आठवण कधीच होत नसते. म्हणून झोपेत झोपेचे किंवा स्वप्नाचे भान मानले पाहिजे. झोपेत इन्द्रियादि ज्ञान साधनाचा लोप झालेला असतो, म्हणून झोपेचे किंवा स्वप्नाचे ज्ञान इन्द्रियादिक साधनाने झाले असे म्हणता येत नाही. अर्थात् स्वय प्रकाशमान ज्ञानस्वरूप असणाऱ्या आत्म्यानेच झोपेचे व स्वप्नाचे, तसेच समाधी, मरण, मूर्च्छा इत्यादिकाचेही ज्ञान होते, असे अवश्य मानले पाहिजे. नाहीतर जागृती नतर त्या त्या अवस्थेचे स्मरण होणार नाही.

आत्म्याने या अवस्थाचे भान होते असे निश्चित झाल्यावर त्या त्या अवस्थेत आत्मा आहे, असे मानणे भाग आहे. तो तेथे नसता तर अवस्थेचे भान त्याला कसे होणार! यावरून जागृत, स्वप्न, सुषुप्त्यादि सर्व अवस्थेत आत्म्याची अनुवृत्ति व स्थूल देहाचे भान नसल्याने त्याची व्यावृत्ती म्हणजे त्या अवस्थेत त्याचा अभाव हेही मानले पाहिजे. स्थूल देह त्या अवस्थेत भासत नसून त्यावेळी त्याची सत्ता तेथे आहे असे जर मानले, तर नष्ट झालेल्या किंवा उत्पन्न न झालेल्या पदार्थांचीही सत्ता सर्वदा आहे, असेही मानावे लागेल. मग नष्ट, अनुत्पन्न व विद्यमान या शब्दाना काही अर्थच राहणार नाही. या सर्व शब्दाचा एकच अर्थ आहे, असे मानावे लागेल. म्हणजे भान होते त्यावेळीच पदार्थ असतो, एरवी तो नसतो व त्यावेळी त्याची अज्ञात सत्ता मानल्यास तो असून नसल्यासारखाच असतो, हे सर्व लक्षात घेऊनच झोपेत आत्म्याचे भान असून देहाचे भान नसल्याने आत्म्याची अनुवृत्ती व स्थूल देहाची व्यावृत्ती म्हणजे अभाव दाखविला.

आता श्लोकात स्वप्नामध्ये आत्म्याची अनुवृत्ती व स्थूल शरीराची व्यावृत्ती दाखविली आहे. तरी पण स्वप्न हा झोपेचाच एक परिणाम असल्याने स्वप्नात दाखविलेली अनुवृत्ती व व्यावृत्ती झोपेत दाखवली तरी चालण्यासारखी आहे. स्वप्नात ही आत्म्याची अनुवृत्ती आहे कारण जागे झाल्यावर स्वप्नाचे स्मरण होते, त्या अर्थी स्वप्नाचा साक्षी आत्मा तेथे मानला पाहिजे, व स्थूल देहाचे भान स्वप्नात नाही, त्यामुळे स्वप्नात स्थूल देहाची व्यावृत्ती म्हणजे अभाव आहे.

गाढ झोपेत लिंगदेहाचे म्हणजे अन्तःकरणाचे भान नाही. म्हणून सूक्ष्म किंवा लिंगदेहाचा सुषुप्ती अवस्थेत अभाव आहे. त्यावेळी लिंगदेहाचा लय अज्ञानात असतो, व सुषुप्तीचे ज्ञान सुषुप्ति अवस्थेत मानले पाहिजे नाही तर जागे झाल्यावर त्या अवस्थेचे स्मरण होणार नाही हे सुषुप्तीचे ज्ञान स्वयंप्रकाश ज्ञानस्वरूप आत्म्यानेच होते. अर्थात् सुषुप्ति अवस्थेत लिंग किंवा सूक्ष्मदेहाचा अभाव अथवा व्यावृत्ति व आत्म्याची अनुवृत्ति किंवा सत्ता त्या अवस्थेत सिद्ध झाली.

याप्रमाणे स्वप्नावस्थेत स्थूल देहाची व्यावृत्ती व आत्म्याची अनुवृत्ती व गाढ निद्रावस्थेत लिंग किंवा सूक्ष्म देहाची व्यावृत्ती व निद्रावस्थेच्या साक्षी रूपाने आत्म्याची अनुवृत्ती तुला दाखविली. आता समाधी अवस्थेत निद्रेची व्यावृत्ती व आत्म्याची अनुवृत्ती दाखविणेची आहे. ती पुढच्या श्लोकाने तुला दाखवू. म्हणजे देहत्रय व्यावृत्ती व आत्म्याची अनुवृत्ती तुला दाखविल्यासारखे होईल व त्यावरून, अनुवृत्त असणारा आत्मा सत्य व व्यावृत्त असणाऱ्या जागृती स्वप्न सुषुप्ती या अवस्था म्हणजेच देहत्रय मिथ्या आहे हे तुझ्या लक्षात येईल. (१५)

श्लोकः—

तद्विदोऽसुमनोध्याख्या गुणावस्थाभिदः पृथक् ।
सुप्त्यभानेऽन्वयो भानं समाधौ प्राग्वदन्यकः ॥१६॥

अन्वयः— समाधौ सुप्त्यभाने (अस्य) भान अन्वयः अन्यकः प्राग्वत् । गुणावस्थाभिदः असुमनोध्याख्या तद्विदः पृथक् (कृताः) ॥ १६ ॥

अर्थः—समाधी अवस्थेत सुषुप्तीचे भान नसते व आत्म्याचे भान समाधी अवस्थेच्या साक्षीरूपाने भान असते. म्हणून समाधीत आत्म्याचा अन्वय आहे, व सुषुप्तीचे भान नसल्याने अर्थात् सुषुप्ती अवस्थेची विस्मृति समाधीत असल्याने, सुषुप्तीची व्यावृत्ति समाधीत आहे, (एकाच लिंगदेहामध्ये) गुण व अवस्था याच्या योगाने भेद मानून या भेदज्ञानाने प्राणमय, मनोमय व विज्ञानमय असे तीन कोश पृथक् होतात व त्या लिंगदेहाच्या व सुषुप्तिरूप कारण देहाच्या व्यावृत्तीने समाधी अवस्थेत ज्ञानरूप आत्म्याची अनुवृत्ती व प्राणमय, मनोमय, विज्ञानमय, आनदमय या कोशाची व स्थूल शरीररूप अन्नमय कोशाचीही व्यावृत्ती सिद्ध झाली. (१६)

विवरणः—योगशास्त्रात व उपनिषदातही समाधी

नावाची जीवाची एक अवस्था सांगितली आहे. या समाधीचे दोन प्रकार आहेत. एक सविकल्प समाधी व दुसरी निर्विकल्प समाधी

विजातीय वृत्तीने रहित सजातीय वृत्तीचा म्हणजे ज्या विषयाचे आपण ध्यान करतो त्याच विषयाच्या वृत्तीचा एकसारखा प्रवाह जेवढा काळ चालेल, तेवढा काळ सविकल्प समाधीचा काळ आहे, असे म्हणतात व याही वृत्तीचा लय होऊन अंत करण निर्विकल्प म्हणजे कोणत्याही वृत्तीने युक्त नसून, निस्तरंग जलाप्रमाणे अगदी स्तब्ध असते, त्यावेळच्या समाधीला म्हणजे चित्तवृत्ति निरोधाला, निर्विकल्प समाधी म्हणतात.

या समाधी करता यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा व ध्यान या साधनांचा आदरपूर्वक श्रद्धेने सतत अभ्यास करावा लागतो जगातील सर्व व्यवहार तुच्छ व मिथ्या मानून सर्वदा या अभ्यासात तत्पर असणाऱ्यासच हा समाधि लाभ होतो या अवस्थेस जागृती म्हणता येत नाही. कारण बाह्यवृत्ती कोणतीही येथे असत नाही स्वप्नाप्रमाणे आतरवृत्तीही येथे नसतात म्हणून याস स्वप्नही म्हणता येत नाही चित्ताचा लय सुषुप्तिकाली अज्ञानरूप कारणात होतो, तसा या अवस्थेत चित्ताचा लयही नाही कारण सर्व वृत्तींनी रहित असे चित्त येथे विद्यमान असते या करता ही अवस्था सुषुप्तीही नव्हे

येथे केवळ स्वयप्रकाशमान आत्माच असतो व तो शुद्ध अंत.करणाचा प्रकाश वृत्तीशिवाय करीत असतो. म्हणून या अवस्थेत आत्म्याचे भान असते व अज्ञानरूप कारणदेहाचे किंवा सुषुप्तीचे भान नसते म्हणून आत्म्याची अनुवृत्ती व सुषुप्तिरूप कारणदेहाची व्यावृत्ती या अवस्थेत असल्याने, कारणदेहाची व्यावृत्ती येथे दाखविता येते याप्रमाणे प्रसिद्ध असलेल्या जागृति, स्वप्न, सुषुप्ति या तीन अवस्था व तदभिमानी विश्व, तैजस व प्राज्ञ यांची व्यावृत्ती व आत्म्याची अखंड अनुवृत्ती तुला दाखविली

यावरून अनुवृत्त व व्यावृत्त पदार्थ अत्यंत विलक्षण आहेत व अर्थाअर्थी यांचा व आत्म्याचा काही एक संबंध नाही, हे तुझ्या लक्षात आले असेलच अनुवृत्त पदार्थावर व्यावृत्त पदार्थ कल्पित असल्याने, ते मिथ्या आहेत व अनुवृत्त जो आत्मा तो त्रिकालाबाधित सर्व बाधाचा अवधी असा एकमेवाद्वितीय अशा ब्रह्मरूपाने शिल्लक राहतो, हे आता स्पष्ट झाले या करताच देहत्रयाचे हे अन्वय व्यतिरेक तुला सांगितले

शिष्य म्हणतो, गुरुमहाराज ! आपण सांगितलेले अन्वय व्यतिरेक माझ्या लक्षात आले परंतु आपण शुद्धआत्म स्वरूप दाखविण्याकरता आत्मा व पंचकोश यांचे अन्वय व्यतिरेक सांगायला आरंभ केला परंतु पंचकोशाचा व्यतिरेक न दाखविता शरीरत्रयाचाच व्यतिरेक दाखविला याचे कारण माझ्या लक्षात आले नाही तरी हे असे का केले, हे कळावे, अशी प्रार्थना आहे

गुरुमहाराज म्हणतात, बा शिष्या ! असे करण्याचे कारण तुला सांगतो ऐक अरे सर्व वस्तूंनी परिपूर्ण भरलेले घर एखाद्याने एखाद्या ब्राह्मणास दान दिले, तर पुन त्या घरातील प्रत्येक वस्तूचे वेगळे दान द्यावे लागत नाही. वस्तूंनी भरलेल्या घराचे दान केले की त्यातील वस्तूंचे दान झालेच तद्वत स्थूल, सूक्ष्म व कारणरूप तीन शरीररूप घरात पाच कोशरूप वस्तू भरल्या आहेत स्थूल शरीरात अन्नमय कोश आहे, किंवा अन्नमय कोश व स्थूल शरीर हे एकरूपच आहेत. सूक्ष्म किंवा लिंग शरीरात प्राणमय, मनोमय व विज्ञानमय असे तीन कोश अतर्भूत होतात. ते कोश लिंगशरीरात कसे अतर्भूत होतात हे पूर्वी सांगितले आहे अज्ञानरूप जे कारणशरीर, यात आनंदमय कोशाचा अन्तर्भाव होतो आता आनंदमय कोशाचे स्वरूप तुला सांगतो ऐक.

आपण केलेल्या पुण्य कर्माचे फल जे सुख, त्याचा अनुभव घेण्याकरता कोणी एक (ही वृत्ति नव्हे कारण, सुषुप्तीत बुद्धीचा लय आहे.) वृत्ति अन्तर्मुख होते कारण वृत्ति अन्तर्मुख झाल्याशिवाय सुखाचा अनुभव येत नाही त्या अन्तर्मुखवृत्तीत आनंदरूप असणाऱ्या आत्म्याचा आनंद प्रतिबिंबित होतो योग समाप्तिकाली ही वृत्ति निद्रा या रूपाने विलीन होते म्हणजे भाग काल असेल तोपर्यंतच ही वृत्ति असते ही वृत्ति अज्ञानातील सत्त्व गुणाचे कार्य असल्याने, तिला ‘सत्त्व’ असेही नाव आहे. आपणाला इष्ट असणाऱ्या वस्तूचे दर्शन म्हणजे प्रत्यक्ष ज्ञान झाले, म्हणजे या ज्ञानाला ‘प्रिय’ वृत्ति असे म्हणतात या वस्तूचा लाभ झाला, म्हणजे ती वस्तु

आपणास मिळाली अशी जी वृत्ती तिला 'मोद' असे म्हणतात. व त्या वस्तूचा आस्वाद आपण घेतला - म्हणजे या आस्वाद नावाच्या वृत्तीला 'प्रमोद' असे म्हणतात. या तीन वृत्तींने युक्त असणारी जी अन्तर्मुखवृत्ती, तीच आनदमय कोश आहे.

हा कोश अज्ञान नामक कारण शरीरात राहतो. अर्थात स्थूल, सूक्ष्म व कारण अशा तीन देहाहून आत्मा वेगळा आहे, असे अन्वय व्यतिरेकाने दाखविले, म्हणजे अन्नमयादि पंच कोशाहून आत्मा वेगळा आहे असे निराळे सागावे लागत नाही व पचकोशाची व्यावृत्ती दाखविण्यापेक्षा तीन देहाची व्यावृत्ती दाखविण्यात लाघव म्हणजे सुलभताही आहे. म्हणून पचकोशाची व्यावृत्ती दाखविती, असे म्हणून आम्ही तीन देहाची व्यावृत्ती तुला सागितली. या सागण्यात पचकोश व तीन देह याहून आत्मा वेगळा आहे असे सागण्याचाही लाभ झाला.

गुरुमहाराज ! स्थूल शरीरात एकच अन्नमय कोश असतो व कारण शरीरातही आनदमय नावाचा एक कोश असतो, हे बरोबर आहे. पण दोहोच्यामध्ये असणाऱ्या या लिंगदेहात तीन कोशाचा अन्तर्भाव कसा होईल ! पूर्वीच्याप्रमाणे एकेक कोशास राहण्याकरता एकेक वेगळे देह नकोत काय ?

गुरुमहाराज म्हणतात तुझे म्हणणे बरोबर आहे. परतु हे तीन कोश लिंगदेहाहून अगदीच पृथक् असे नाहीत. लिंगदेहातीलच काही भागातील गुण व अवस्था या भिन्नभिन्न करून या कोशाचा विभाग मानला आहे. जसे अन्तःकरण एकच असून त्याच्या वृत्तीच्या भेदाने मन, बुद्धि, चित्त व अहंकार असे भेद होतात, जसे एकाच पृथ्वीवर सीमेच्या रेषा बुद्धीने दरवून हे अमक्याचे राज्य व हे अमक्याचे राज्य असा विभाग करतात, परतु त्यामुळे पृथ्वीचा काही भेद होत नाही, तद्वतच येथेही समजणेचे आहे.

लिंगदेहात असलेली पाच कर्मेंद्रिये व पचप्राण हे रजोगुणापासून उत्पन्न झाले आहेत व मनोमय व विज्ञानमय हे सत्वगुणापासून झाले आहेत. म्हणून हे दोन कोश व प्राणमय कोश याच्यात गुणाने भेद झाला. आता मनोमय व विज्ञानमय या दोघाचा सत्वगुण एकच असल्याने गुणाने या दोघाचा भेद होत नाही तरीपण या दोघाचा अवस्थेने भेद होतो. मनोमय कोश हा कारण म्हणजे साधनरूप आहे म्हणून कर्ता असणारा जो विज्ञानमय कोश, त्याहून बाहेर आहे व विज्ञानमय आतर म्हणजे आत आहे. या बाहेर व आत या अवस्थेने याचा भेद झाला. म्हणून लिंगदेह या रूपाने हे तीन कोश जरी एक असले, तरी रजोगुण व सत्वगुण या भेदाने व बाह्य व आतर या अवस्था भेदाने, याच्यात भेद मानून या भेदज्ञानामुळे हे तीन कोश झाले आहेत. वास्तविक तीनी मिळून एकच लिंग किंवा सूक्ष्म शरीर आहे.

म्हणून लिंगदेहाच्या अन्वय व्यतिरेकाने प्राणमय, मनोमय व विज्ञानमय या तीन कोशाचा अन्वय व्यतिरेक स्थूल देहाच्या अन्वय व्यतिरेकाने अन्नमय कोशाचा अन्वय व्यतिरेक व कारण देहाच्या म्हणजे अज्ञानाच्या अन्वय व्यतिरेकाने आनदमय कोशाचा अन्वय व्यतिरेक तुला दाखविला. म्हणून सर्वावस्थेत अनुवृत्त असलेला आत्मा त्या त्या अवस्थेत व्यावृत्त होणाऱ्या देहाहून, व त्यातील कोशाहून अत्यत वेगळा आहे, असे सिद्ध झाले. याचा वारवार अभ्यास करून नित्य, निरंजन अद्वितीय आत्म्याचा साक्षात्कार तुला सपादन करावयास पाहिजे. म्हणजेच या अनर्थरूप बधातून तुझी मुक्ती होईल. (१६)

श्लोकः—

**त्यक्तत्रिदेहसंगस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत् ।**
**स्थिति परात्परं वस्तु सच्चिच्छर्म निराकृति ॥**

अन्वयः—त्यक्त त्रिदेह सगस्य निष्कल्पस्य सुषुप्तिवत्) स्थितिः (तदेव) परात्पर निराकृति सच्चिच्छर्म, वस्तु (अस्ति) ॥ १७ ॥

अर्थ— तीनी देहाचा अभिमान टाकून झोपेप्रमाणे कल्पनारहित जी स्थिति, तेच निराकार मायेच्याही पलीकडे असणारे सच्चिदानद रूप परब्रह्म आहे. (१७)

विवरणः—याप्रमाणे अन्वय व व्यतिरेकाने मी पचकोशाहून वेगळा आहे असे कळल्यावर, त्यानी स्थूल सूक्ष्म व कारण अशा तीनी देहाचाही अभिमान टाकला आहे, अशा साधकाची झोपेत जशी कल्पनारहित स्थिति असते, तशी कल्पनारहित अशा आपल्या स्वस्वरूपाचे ठिकाणीच स्थिति होते. ही अवस्था झोपे सारखी म्हणण्याचे कारण, ही झोप नसते. कारण झोपेत

अज्ञान असते. या अवस्थेत अज्ञानही नाही व योगत्याही प्रकारची कल्पनाही नाही. कल्पनारहित स्वरूप लक्षात येण्याकरिता झोपेचा दृष्टान्त येथे दिला आहे. कारण झोपेचा अनुभव सर्वांना आहे, व झोपेत कल्पना नसते हेही सर्वांना मान्य आहे. म्हणून झोपेसारखे असे म्हटले आहे. हेच सच्चिदानंद निराकार, सर्व विकाराच्या पलीकडे असणारे जे अक्षर म्हणजे मायोपाधिक ब्रह्म त्याहूनही हे ब्रह्म पलीकडचे म्हणजे निरुपाधिक शुद्ध ब्रह्म आहे.

श्रुतीने हा आत्मा ब्रह्म आहे असे जे या आत्म्याचे ब्रह्मरूपाने वर्णन केले आहे, ते या देहत्रयातीत झालेल्या व स्वस्वरूप स्थित झालेल्या आत्म्याचे वर्णन आहे, व हेच आपल्या आत्म्याचे मूळचे व खरे स्वरूप आहे. अन्वय व्यतिरेकपूर्वक तत्त्वज्ञान होण्याच्या पूर्वी जे आत्म्याचे स्वरूप भासते, ते सर्व मायिक आहे, हे दाखविण्याकरता श्रुतीने 'अयं' हा शब्द 'अयमात्माब्रह्म' या वाक्यात घालून अन्वय व्यतिरेकाने पंचकोशाहून व देहत्रयाहून वेगळा झालेला आत्मा 'अयं' शब्दाने ग्राह्य असे दाखविले आहे (१७)

श्लोकः—

क्ष्माप्कालैर्बीजलीनद्रुर्यथेभ्यो जागृतेस्तथा ।
सुप्त्यवित्स्थजगद्देहौ तत्परत्वाविदः पुनः ॥१८॥

अन्वयः—बीजलीनद्रुः क्ष्माप्कालैर्यथेभ्यो (भवति) तथा सुप्त्यवित्थजगद्देहौ तत्परत्वाविदः जागृते' पुन' ईदृशौ (भवतः) ॥१८॥

अर्थः—बीजात लीन झालेला वृक्ष पृथ्वी, पाणी व योग्य असणाऱ्या ऋतुरूप कालानी पुन बाहेर आलेला जसा प्रत्यक्ष दिसतो, त्याचप्रमाणे सुषुप्तिकालामध्ये असणाऱ्या व भासणाऱ्या अज्ञानात पूर्वी लीन झालेले जगत् व देह आत्मज्ञानशून्य म्हणजेच अज्ञानी जीवाला जागृत अवस्थेत पुनः स्पष्ट व्यवहाराला विषय होतात.(१८)

विवरण.—वसंत, ग्रीष्म, वर्षा वगैरे त्या त्या ऋतुरूप अनुकूल काल, जमीन, पाणी, बीज, हवा वगैरे सर्व सामग्री जमली म्हणजे बीजापासून अंकुर निर्माण होतो. कारण समुदायाला सामग्री म्हणतात. यातील एक कारण जर नसेल, तर सामग्रीचा अभाव असतो. त्या वेळी इतर सर्व कारणे असूनसुद्धा अंकुर निर्माण होत नाही. सर्व सामग्री जमली म्हणजेच अंकुर निर्माण होतो व क्रमाने त्याचा वृक्ष होऊन सर्वांना त्याचा उपयोग होतो. बीजात सूक्ष्म रूपाने असणाराच वृक्ष स्थूलरूपाने प्रकट होतो. बीजाने वृक्षाला आच्छादित केले होते. ते आवरण अंकुर सामग्रीने दूर केल्याबरोबर वृक्षाची प्रतीती होऊ लागली.

म्हणून कार्य हे कारण स्वरूपाने पूर्वी असतेच. नसलेले कार्य उत्पन्न होत नाही. असा सत्कार्यवाद सांख्यसंमत असणारा, येथे अद्वैतवेदान्त्यांनी स्वीकारला आहे. 'स देव सोम्यदमग्र आसीत्' इत्यादि श्रुतिसंमत हा सत्कार्यवाद आहे. सांख्य कार्य वास्तविक मानून सत्कार्य वाद मानतात व वेदान्ती अनिर्वचनीय कार्य मानून सत्कार्यवाद मानतात. एवढाच दोघामध्ये फरक आहे. असो.

सत्कार्यवादातील बीजात लीन झालेला वृक्ष सामग्रीच्या योगाने प्रगट होऊन सर्व व्यवहारक्षम होतो. हा जसा दृष्टान्त आहे, तद्वतच सुषुप्ति अवस्थेत स्पष्ट रूपाने भासणारे व जागृत–स्वप्न–सुषुप्ती, तीन्ही अवस्थेत असणारे जे अज्ञान, ते या दृश्यमान जगाचे व स्थूल व सूक्ष्म देहाचे बीजरूप कारण आहे. या अज्ञानरूप बीजात स्थूल सूक्ष्म देह व इतर जगत्‌रूप वृक्ष सुषुप्ति कालात लीन होतो. व अदृश्यमान झाल्याने विद्यमान असूनही व्यवहाराला अयोग्य होतो, व मी या देहत्रयाहून व पंच कोशाहून अगदी वेगळे असणारे ब्रह्म आहे, अशा बोधाचा अभाव व इतरही काल, संस्कार, शुभाशुभ कार्य इत्यादि सामग्रीने जागृती स्वप्न वगैरे अवस्थेत सूक्ष्म स्थूल अशा रूपाने पुनः तो प्रगट होतो.

संसाररूप वृक्ष अज्ञानातून प्रगट होण्यास ब्रह्मज्ञानाचा अभाव मुख्यत्वेकरून कारण आहे. ब्रह्मज्ञान झाले म्हणजे अज्ञानरूप बीजच नष्ट होते. मग हा वृक्ष पुन. कारणाशिवाय कसा निर्माण होणार ? अर्थात् मग एक अद्वितीय ब्रह्मच शिल्लक राहते. यालाच मोक्ष म्हणतात (१८)

श्लोक —

देहान्तेऽज्ञस्याहतास्थविश्वाकारोऽनुजन्मद. ॥१८३॥

अन्वयः—अज्ञस्य देहान्ते अहतास्थविश्वाकारो अनुजन्मदः (भवति) ॥१८३॥

अर्थ·—मरण काळी अज्ञानी जीवाचे ठिकाणी

असणारा जो अहंकार, त्यात असणारा जगदाकार पुनः त्या जीवाला जन्म देणारा असा होतो. (१८६)

विवरणः—गुरुमहाराज, झोपेत असणारे बीजरूप जे अज्ञान, त्यातच सूक्ष्म रूपाने जर जगत व देह असतील व ते जागृदवस्थेत जर प्रगट होत असतील, तर ही झोपच नाहीशी केली म्हणजे सहजच या जगाचा व देहाचा अभाव होईल व मग पीडा अनायासाने टळेल. आता झोप ही जिवंत प्राण्यालाच असते. मेलेल्या माणसाला झोप असते असे ऐकिवात नाही व झोप नाहीशी करणे हे मरणानेच सहजसिद्ध होईल, त्याकरता माणसाने अत्यंत कठीण व अनेक जन्मसाध्य अशा तत्वज्ञानाचा अभ्यास करण्याचे काय कारण आहे !

ही शंका ऐकून गुरुमहाराजाना हसू आले व शिष्य आलेली शंका प्रगट केल्याशिवाय रहात नाही, मग ती शंका कशीही असो, असे मनात आणून संतुष्टही झाले व ते शिष्यास सांगू लागले:—

बा शिष्या ! तू शंका केलीस हे ठीक आहे. परंतु या शंकेत मरण म्हणजे काय याची तुला कल्पना नाही, म्हणूनच तू अशी शंका केलीस. मरण म्हणजे काय हे ज्याला समजले आहे, तो अशी शंका करणार नाही

मरण हे नेहमी जन्मसापेक्ष आहे. जो जन्मालाच आला नाही, तो मरतही नाही. अन्नमय स्थूल देहाशी लिंगदेहाचा तादात्म्याध्यास, म्हणजे मी मनुष्य आहे, किंवा पश्वादिकाचा देह असला तर मी पश्वादिक आहे असे समजणे, याला जन्म असे नाव आहे व मरण म्हणजे या स्थूल देहाशी झालेले तादात्म्य टाकून देणे.

'तन्निरोधोऽस्यमरणं'

असे कपिलगीतेत म्हटले आहे. म्हणजे लिंगदेह व स्थूल देह याचा निरोध म्हणजे कार्य करण्याची अयोग्यता हेच मरण आहे. रोजच्या रोज झोपेत हे तादात्म्य आपण स्थूलरूपाने टाकतो परंतु सूक्ष्मरूपाने ते तादात्म्य असतेच. कारण जागे झाल्यावर पुनः स्थूल देहाशी आपण तादात्म्य जोडून पूर्ववत् सर्व व्यवहार करतो. सूक्ष्मरूपानेसुद्धा या देहाचे तादात्म्य टाकून देणे म्हणजेच मरण म्हणतात. म्हणूनच मेलेल्या म्हणजे लिंगदेहाचे तादात्म्य नसलेल्या देहास जाळले तरी लिंगदेहाला काही इजा होत नाही. कारण त्याच्याशी लिंगदेहाचा कोणताही संबंध नसतो. जिवंत असताना मात्र स्थूल देहास चटका बसला तरी लिंगदेहावर त्याचा परिणाम होत होता.

स्थूल व सूक्ष्म असा कोणताही संबंध नसताना लिंगदेहाने स्थूल देहाशी संबंध जोडणे म्हणजे जन्म म्हणतात. म्हणूनच जागे झाल्यावर हा जन्माला आला असे म्हणत नाहीत. कारण झोपेत लिंगदेहाचा सूक्ष्म संबंध स्थूल देहाशी होताच. दृष्टिसृष्टिवाद्याच्या मताने झोप म्हणजे मरणे व जागे होणे म्हणजे जन्म असे मानण्यास हरकत नाही. परंतु त्यांनी सूक्ष्म रूपात दृष्टिसृष्टी मानली नाही. काचकामलादि दोषाने नेत्रगोलकाला ज्या वेळी रूपदर्शनाची अयोग्यता असते, त्यावेळी चक्षुरिंद्रियालाही रूपदर्शनाची अयोग्यता येते त्याप्रमाणे स्थूल देहाला ज्या वेळेस प्रारब्धवशात् वैकल्य येते. त्या वेळेस तेथे राहणाऱ्या लिंगदेहासही वैकल्य येते म्हणजे त्या देहाचा सर्वस्वी संबंध सुटतो, यालाच मरण म्हणतात, व संबंध जोडणे म्हणजे जन्म, असे कपिलगीतेत

'द्वयोरल्ब्धिस्थानस्य'

इत्यादि श्लोकाने सांगितले आहे. लिंगदेहात सामान्य रूपाने नुसता 'मी' असा जो अहंकार आहे. म्हणजे मी मनुष्य, मी पशु असा विशेष अहंकाराहून वेगळा जो नुसता अहंकार आहे, अज्ञानी जीवाच्या या अहंकाराला विश्वाकार अहंकार म्हणतात. विश्व, तैजस व प्राज्ञ यापैकी सर्वसाधारण स्थूल देहाच्या अभिमान्याला ''विश्व' अशी संज्ञा आहे. हा विश्वाकार अहंकार सर्व स्थूल देहाची व्यावृत्ति म्हणजे अभाव निश्चय झाल्याशिवाय जात नाही. त्यामुळे अहंकारात असलेला हा विश्वाकार किंवा सूक्ष्म रूपाने संपूर्ण स्थूल सृष्टिरूप विश्वाचा आकार जो अहंकारात आहे, तो पुनः पुनः जन्माला देणारा असा होतो. स्थूल देहाच्या नाशाने अहंकारातील विश्वाकार जात नाही. झाड तोडले तरी पुनः जसे त्याला अंकुर भिन्न भिन्न उत्पन्न होतात, त्याप्रमाणे या अहंकारात असलेल्या विश्वाकाराने पुनः पुनः नवीन नवीन देह व जगत् हे उत्पन्न होतच राहते. याचा समूळ नाश करावयाचा झाल्यास ज्ञानाभ्यासच करावा लागेल. त्यायोगे देह चतुष्टयनिवृत्तिरूप मोक्ष प्राप्ती होईल. ज्ञाना-

म्यासात स्थूल–सूक्ष्म–कारण व महाकारण या देह चतुष्ट याचा प्रविलाप म्हणजे लय करावा लागतो. देहचतुष्टय हे अनिर्वचनीय मिथ्या आहेत. मिथ्या पदार्थांचा लय म्हणजे हे नाही असा निश्चयरूपच आहे. दण्डाने घट फोडावा तसा हा लय नाही. हा निश्चय करण्याच्यापूर्वी देहाचे प्रकार किती, त्याच्या अवस्था कोणत्या, त्याचे अभिमानी कोण, त्याची स्थाने कोणती, त्याचे आनंद कोणकोणते, त्याचे भोग कोणत्या प्रकारचे, त्याचे गुण कोणते, त्याच्या वाणी कोणत्या, त्याचे देव कोणते, त्याचे लोक कोणते व ओंकारातील त्याच्या मात्रा कोणत्या हे सांगोपांग जाणून मग त्याच्या लयाचा म्हणजे अभावाचा निश्चय केला असता तो निश्चय पक्का होईल. याकरता तुला एक तक्ता म्हणजे नकाशा काढून दाखवितो म्हणजे हे सर्व तुझ्या बरोबर लक्षात येईल व श्लोक वाचल्याबरोबर ते मनात सत्वर उपस्थित होईल. मग तसे चिंतन करणेही सुलभ होईल तो तक्ता किंवा नकाशा पुढीलप्रमाणे आहे'—

**ज्ञानाभ्यासानेच मोक्ष होतो. तो स्थूल देहादिकांच्या प्रविलापनाने होतो त्याचा प्रकार देहचतुष्टय क्रमाने जसे दाखविले आहे ते जाणून केले पाहिजे.**

| देह | अवस्था | अभिमानी | स्थान | आनंद | भोग | गुण | वाचा | देव | लोक | मात्रा |
|---|---|---|---|---|---|---|---|---|---|---|
| स्थूल | जाग्रत् | विश्व | नेत्र | विषयानंद | स्थूल भोग | रज | वैखरी | ब्रह्मा | भू. | अ |
| सूक्ष्म | स्वप्न | तैजस | कंठ | स्वप्नानंद | प्रविविक्त भोग | सत्व | मध्यमा | विष्णु | भुव. | उ |
| कारण | निद्रा | प्राज्ञ | हृदय | निद्रानंद | आनंद | तम | पश्यंती | रुद्र | स्व. | म |
| महाकारण | तुर्या | प्रत्यक् | मूर्धा | समाध्यानंद | परानंद | शुद्धसत्व | परा | आत्मा | महः | अर्धमात्रा |

अवस्था जागृति स्वप्नोनिद्रातुर्या चतुष्टये याचा पूर्वी स्थूल सूक्ष्मं कारणाख्य महाकारणमित्यपि। असे श्लोकार्ध अपेक्षित होते, परंतु ' चतुष्टये ' यानी तो अर्थ मिळाला. ' त्रिमात्राॐकृतेस्त्वर्धा तुर्ये ज्ञात्वैवमादित. '

या अर्थात एव शब्दाने ब्रह्माविष्णुश्चरुद्रश्च ह्यात्मा देवाः प्रकीर्तिताः।

भूर्भुवः स्वर्महर्लोकाश्चाद्यायैकमतो बुधैः ॥ अशा अर्थाचा श्लोक पाहिजे होता तोही मिळाला असे समजावे.

श्लोकः— (प्रक्षित)

**आनंदा विषय-स्वप्न-निद्रावस्था-समाधि जाः।**

अन्वय:—विषय स्वप्न निद्रावस्था समाधि जा आनंदा' (ज्ञेयाः)

अर्थ'—क्रमाने या चौघांचे विषयानंद, स्वप्नानंद, निद्रानंद व समाध्यानंद असे चार प्रकारचे आनंद समजावे.

श्लोक —

**अवस्था जागृति स्वप्नो निद्रा तुर्या चतुष्टये ॥१९॥**

अन्वय.—चतुष्टये जागृति. स्वप्नो निद्रा तुर्या अवस्था.॥१९॥

अर्थः– स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या चार देहात क्रमाने जागृति, स्वप्न, निद्रा व तुर्या अशा अवस्था आहेत. ( १९ )

श्लोक —

**विश्वतेज प्राज्ञप्रत्यगभिमानिन ईरिता ।**

**दृक्कंठहृन्मूर्धसंस्थाः स्थुलसूक्ष्ममुदुन्मुदः ॥२०॥**

अन्वयः–दृक्कंठ हृन्मूर्धसंस्थाः विश्वतेजः प्राज्ञप्रत्यगभिमानिन ईरिताः । स्थूलसूक्ष्ममुदुन्मुद (आनंदाः) (क्रमेण एषां) ईरिताः ॥ २० ॥

अर्थः–नेत्र-कंठ हृदय-व मूर्धा या स्थानात राहणारे विश्व, तैजस्, प्राज्ञ व प्रत्यक् असे या स्थूल, सूक्ष्म, कारण व महाकारण या देहाचे अभिमानी आहेत असे समजावे (२०)

श्लोकः—

**भोग। रजःसत्वतमः शुद्धसत्वगुणाः क्रमात् ।**
**वाचोऽत्र वैखरी मध्या पश्यंती च परास्त्रिषु॥**

अन्वयः–रज-सत्व-तमः शुद्धसत्वगुणा-क्रमात् गुणा (ज्ञेयाः) अत्र क्रमात् वैखरी-मध्या-पश्यंती परा च वाचो (ज्ञेयाः) ॥ २१ ॥

अर्थः–या विश्वतैजसादि अभिमान्याचे स्थूलभोग, प्रविविक्तभोग, आनंदभोग व परानंदभोग असे चार प्रकारचे भोग समजावे. रज-तम-सत्व-व शुद्धसत्व हे या चौघाचे गुण आहेत व वैखरी, मध्यमा, पश्यंती व परा अशा चार वाणी स्थूल-सूक्ष्मादि देह क्रमाने समजाव्या. (२१)

श्लोकः— (प्रक्षित)

**ब्रह्माविष्णुश्चरुद्रश्च ह्यात्मादेवाः प्रकीर्तिताः ॥**
**भूर्भुवः स्वार्मीलोकाश्राह्या वै क्रमतो बुधैः ॥**

अन्वयः—ब्रह्माविष्णुरुद्र स्तथा आत्मोएतो देवः (एषांचतुर्णाम्) बुधै माह्याः

स्थूलदेहाचा सूक्ष्मदेहात, त्याचा कारणदेहात व कारण देहाचा महाकारणदेहात लय केल्यानंतरच आनंदमय हा स्वस्वरूपाच्या ठिकाणी म्हणजे ब्रह्म स्वरूपात स्थित होतो. एरवी कर्मादि साधनाने तो ब्रह्मस्वरूपात स्थित होत नाही.

मांडूक्योपनिषदात " पादा मात्रा मात्राश्च पादाः " असे म्हटले आहे.

" ॐकारं पादशो विद्यात्पादा मात्रा न संशयः "

असे गौडपादाचार्यांच्या कारिकेत म्हटले आहे. याचे तात्पर्य टीकाकारांनी असे वर्णिले आहे—

विश्व तैजस व प्राज्ञ या जीवरूप अभिमान्यात जीवा-प्रमाणेच विराट किंवा वैश्वानर-हिरण्यगर्भ-व ईश्वर अशी असलेली ईश्वराची ही तीन रूपे आहेत, त्याचा अंतर्भाव करून, म्हणजे विश्व व वैश्वानर एकच आहेत, तैजस व हिरण्यगर्भ एकच आहेत व प्राज्ञ व ईश्वर एकच आहेत, असे चिंतन करून, यांचे ऐक्याचा निश्चय संशय जाईपर्यंत अभ्यास करून दृढ करावा. मग विश्वादि तीन पाद व ओंकाराचे अकार, उकार व मकार या तीन मात्रांचे संशय जाईपर्यंत ऐक्याचे चिंतन करावे. निष्प्रपंच ब्रह्मात्मक

सांगितला आहे

म्हणून या दोनी प्रक्रियेमध्ये थोडा फरक आहे मी चिदानंदस्वरूप, एक अद्वितीय आहे, हे दोनी प्रक्रियेमध्ये सारखेच आहे मी नित्य शुद्ध बुद्ध-मुक्त सत्-अद्वय परमानंद महाद् वासुदेवस्वरूप आहे, असे निश्चयाने जाणून व त्याबरोबर तसे स्वरूप आहे असे अंगीकृत करून विवेचन करणाऱ्या चित्ताला साक्षीरूप वासुदेवामध्ये लीन करावे व पूर्ण समुद्राप्रमाणे पूर्ण बोधरूपाने रहावे चित्ताला तेथून हालू देऊ नये याप्रमाणे अखंड अभ्यास करणारा योगी जितेन्द्रिय, जितक्रोध असा होऊन अद्वय आत्म्याला प्रत्यक्ष पाहतो इत्यादि सर्व वार्तिककार सुरेश्वराचार्यांनी पचीकरण व्याख्यानरूप वार्तिकात सांगितले आहे, ते सर्व येथे ग्राह्य आहे म्हणून लिहिले आहे (२२)

श्लोक —

**तस्माद्देहत्रये लीने धीलय ससमाधिक ।**
**तत्त्व परात्पर रूप निर्विकल्पमवेहि सत् ॥ २३॥**

अन्वय –तस्मात् देहत्रये लीने धीलय स समाधिक । तत् तं परात् पर सत् निर्विकल्प रूप अवेहि ॥ २३ ॥

अर्थ – याप्रमाणे प्रविलाप केला असता तीनी देहाचा व पचकोशाचा लय झाला असता प्रमाण, विपर्यय, विकल्प, निद्रा व स्मृति अशी पचवृत्त्याकार असणारी जी बुद्धि तिचा धर्मात लय होतो यालाच समाधी म्हणतात सर्वापेक्षा पर असणारी जी अविद्या किंवा तदुपाधिक चैतन्यरूप जे अक्षर, याला 'पर' म्हणतात त्याहूनही पलीकडे असणारे जे परात् पर सत् म्हणजे त्रिकालाबाध्य असे जे निर्विकल्प म्हणजे सर्व कल्पनाशून्य ब्रह्म, ते तुझे स्वरूप आहे असे तू जाण (२३)

श्लोक —

**घटादिवद्द्योर्जीवस्याविद्योपाधिस्तु तत्क्षये ।**
**स्वस्थधीवत्परात्मत्व जीवत्व लीयतेऽचिरात् ॥**

अन्वय – या घटादिवत् जीवस्य तु अविद्या उपाधि तत्क्षये स्वस्थधीवत् परात्मत्व (भवति) जीवत्व अचिरात् लीयते ॥ २४ ॥

अर्थ – आकाशाला ज्याप्रमाणे घट हा उपाधी आहे त्यामुळे त्याला परिच्छिन्नत्वादि भाव प्राप्त झाला, त्याप्रमाणे जीवरूप चैतन्याला अविद्या हा उपाधी झाल्याबरोबर मूळ परमात्म स्वरूप असणारे चैतन्य जीवदशेला प्राप्त झाले व घटाचा नाश झाल्याबरोबर आकाश घटस्थ न होता आकाशस्थ झाले त्याप्रमाणे अविद्येचा नाश झाल्याबरोबर जीव चैतन्याचा जीवपणा नष्ट होऊन मूळचाच परमात्मभाव त्याचा त्याला प्राप्त होतो (२४)

श्लोक —

**ज्ञाते क्षराक्षराद्दतापरे तत्त्वे स तन्मय ॥ २४½ ॥**

अन्वय – क्षराक्षराहतापरे तत्त्वे ज्ञाते स तन्मय (भवति) ॥ २४½ ॥

अर्थ क्षर म्हणजे सर्व भूतं, अक्षर म्हणजे कूटस्थ व अहंता म्हणजे सर्वांचा अभिमान, याहून पर असणारे तत्त्व जाणले असता तो जाणणारा तत्त्वज्ञ तत्त्वस्वरूप होतो (२४½)

श्लोक —

**सृष्टे प्राड् निर्विकल्पैका चिद्ब्रह्मास्मीत्यभूत्विह ॥**

अन्वय – सृष्टे प्राक् एका निर्विकल्पा चित् (आसीत्) इह तु ब्रह्मास्मीति स्फूर्ति अभूत् ॥ २५ ॥

अर्थ – सृष्टीच्या पूर्वी सर्व विकल्प म्हणजे कल्पनारहित, एक शुद्ध चैतन्य होते, श्रुतीने ज्या चैतन्याला 'सत्' असे नाव दिले आहे 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' अशी श्रुती आहे या चैतन्याला मी ब्रह्म आहे अशी स्फूर्ती झाली ज्याप्रमाणे वायुरहित शुद्ध आकाश असावे व त्यात एकदम वायूची लहर यावी, त्याप्रमाणे शुद्ध ब्रह्मात मी ब्रह्म अशी वृत्ति निर्माण झाली (२५)

श्लोक —

**स्फूर्तिं खे वायुवत्साद्या मायाधस्तज्ज्ञ ईश्वर ।**
**तत्र विश्वोद्गमेहाभूत्साऽन्या मायाथ तत्र तु ॥ २६॥**
**जगत्स्यामिति सकल्पोऽभून्महत्तत्त्वनामक ।**
**विद्याविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेशजीवकौ ॥ २७॥**

अन्वय — खे वायु वत्स्फूर्ति सा आद्या माया त ज्ञ ईश्वर आद्य तत्र विश्वोद्गमेहा अभूत् सा अन्या माया अथ तु तत्र जगत्स्यामिति सकल्पो महत्तत्त्व नामक अभूत् विद्याविद्ये उभे माये तज्ज्ञौ सर्वेश जीवकौ (ज्ञाते) ॥ २६–२७ ॥

अर्थ — त्या स्फूर्तीला आद्य माया असे म्हणतात ही माया शुद्ध सत्वगुणोपाधिक आहे हिलाच विद्या असे नाव आहे यात चैतन्याचे प्रतिबिंब पडले त्याला ईश्वर असे म्हणतात हा ईश्वर या मायेचा ज्ञाता आहे त्याला आद्य ईश्वर म्हणतात सर्वज्ञत्व सर्वकर्तृत्वादि याचे धर्म आहेत प्रतिबिंबसहित मायेमध्ये ईक्षण किंवा ज्ञान याच्या

लेशाने विश्व निर्माण करावे, अशी इच्छा झाली. ही इच्छा स्फूर्तीरूप मायेहून वेगळी माया आहे. ही मलिनसत्वी पाधिक आहे. म्हणून हिला अविद्या माया असे म्हणतात. पुढे ईश्वराला म्हणजे विद्या उपाधी असणाऱ्या चैतन्याला, मी जगद्रूप व्हावे असा सङ्कल्प झाला याला महत्तत्व असे म्हणतात. सांख्याची प्रकृति म्हणजे वेदान्त्याची विद्या व मी जगद्रूप व्हावे अशी ईश्वराची ईच्छा, म्हणजे सांख्याचे दुसरे तत्व–महत्तत्त्व–असे समजावे. सांख्य व वेदांती यांच्या तत्त्वाची नावे सारखीच असली तरी त्यांच्या अर्थात फार फरक आहे, हे लक्षात ठेवले पाहिजे. विद्यारूप मायेची उपाधि घेऊन त्यात प्रतिबिंबित चैतन्य ईश्वर, म्हणजे सर्वांचा मालक, सर्वज्ञ, सर्वकर्ता असा झाला व विश्वोत्पादनाची इच्छारूप मलिनसत्व मायेची उपाधि घेऊन, अर्थात् त्यात प्रतिबिंबित झालेले चैतन्य, हे जीवसंज्ञेला प्राप्त झाले. किंचिज्ज्ञ, किंचित्कर्तृत्व, वगैरे धर्म जीवाला लागू झाले. कारण यांच्या उपाधीतील सत्वगुण मलिन आहे. शुद्ध नाही. (२६-२७)

श्लोक–

जीवोऽविद्याऽऽवृत स्वांशो महतोऽहंकृतिस्त्रिधा।
क्रियाज्ञानद्रव्यशक्तिरज: सत्वतमोगुणैः ॥ २८॥

अन्वयः–अविद्यावृत स्वांशोजीव महतोऽहङ्कृति त्रिधा। रज सत्वतमोगुणै क्रियाज्ञानद्रव्यशक्ति. (अभूत्) ॥ २८॥

अर्थ — अविद्या मायेत पडलेले चैतन्य प्रतिबिंब किंवा जीव हा आवरणशक्तियुक्त असलेल्या अविद्येने आवृत झाला. म्हणून आपल्या स्वरूपाला न जाणणारा असा अज्ञानी झाला. यालाच ब्रह्मा, हिरण्यगर्भ वगैरे नावे आहेत. यालाच प्रथम भीति वाटली, याला काही आनंद वाटेना, वगैरे बृहदारण्यकात 'सोऽबिभेत्' 'स नैव रेमे' वगैरे वाक्यांनी याच्याबद्दलच सांगितले आहे. हा प्रथम जीव आहे व सर्व जीवांची समष्टि आहे. असो. मागे जगद्रूप मी व्हावे असा ईश्वराचा सङ्कल्प, म्हणजेच महत्तत्त्व, असे सांगितले होते. त्या महत्तत्त्वापासून रजोगुणात्मक क्रियाशक्ति अहंकार झाला, सत्वगुणात्मक ज्ञानशक्ति अहंकार झाला व तमोगुणात्मक द्रव्यशक्ति असा अहंकार निर्माण झाला. याप्रमाणे राजस, सात्विक व तामस असा तीन प्रकारचा अहंकार महत्तत्वातील तीन गुणांनी निर्माण झाला. (२८)

श्लोक –

प्राणेन्द्रियान्त:करणभूतान्यासन् क्रमात्ततः।
ततो लोका विराट् तैश्चिदंशात्कार्यक्षमोऽभवत् ॥

अन्वय – तत क्रमात् प्राणेन्द्रियान्तःकरण–भूतानि आसन् ततो लोका (आसन्) विराट् चिदंशात् तै कार्यक्षमोऽभवत् ॥ २९ ॥

अर्थ – राजस म्हणजे रजोगुणात्मक अहङ्कारापासून हस्तपादादि कर्मेन्द्रिये व प्राणापानादि वायु निर्माण झाले. सात्विकाहङ्कारापासून चक्षुरादि पाच ज्ञानेन्द्रिये, मन, बुद्धि, चित्त, अहङ्कारादिरूप अन्तःकरण व इन्द्रिये आणि अन्तःकरण यांच्या देवता, यांची सृष्टी झाली. तामसाहङ्कारापासून पञ्च पृथिव्यादि भूते झाली व त्या भूतापासून भूर्भुव स्वर्महर्जनस्तपः सत्य हे वरचे सात व अतल, वितल, सुतल, तलातल, महातल, रसातल, पातालरूप खालचे सात असे ब्रह्माण्डान्तर्वर्ति १४ लोक निर्माण झाले. त्यापासून विराट् प्रगट झाला. त्यात चैतन्यांशाचा प्रवेश झाल्याने तो सर्व कार्य करण्यास समर्थ झाला. हा विराट् स्थूल समष्ट्य भिमानी जीव आहे.

जरी समष्टिसूक्ष्मशरीराभिमानी हिरण्यगर्भ हा सत्य लोकाचा स्वामी आहे व याला सूत्रात्मा असे म्हणतात. तसेच या सत्य लोकाधिपती हिरण्यगर्भाचा पुत्र स्थूल समष्ट्य भिमानी विराट्पुरुष हाही एक जीवच आहे. त्याचप्रमाणे ईश्वराला या हिरण्यगर्भ शरीराचा व विराट् शरीराचा अभिमान म्हणजे तादात्म्याध्यास नाहीत. तरी पण सूक्ष्म समष्टि शरीर व स्थूल समष्टि शरीर यात राहून, तदुपाधिक होऊन, या दोन्ही शरीरांचे तो नियमन करीत असल्याने शरीरद्वय उपाधीने क्रमाने हिरण्यगर्भसूत्रात्मा व विराट् पुरुष असा व्यवहार ईश्वराचे ठिकाणी वेदान्तशास्त्रात उपाधिरूप गुणयोगाने केला आहे. म्हणून ओंकारातील अकाराने वैश्वानर अथवा विराट् या ईश्वराचे व उकाराने हिरण्यगर्भ या ईश्वराचेही, ग्रहण केले आहे. हे दोन्ही ईश्वर कोटी आहेत. म्हणजे जीवरूप हिरण्यगर्भ व ईश्वररूप हिरण्यगर्भ, जीवरूप विराट व ईश्वररूप विराट, असे हिरण्यगर्भ व विराट् दोन प्रकारचे आहेत. चित्रदीपामध्ये ईश्वररूप हिरण्यगर्भापेक्षा सत्यलोकाधिपती ब्रह्मदेवाची भिन्नत्वाने गणना केली आहे.

ईश्वररूप विराटाचे वर्णन पुरुष-सूक्तात व वैश्वानर

विद्यारूप जी आद्य माया, तिच्यात लय करावा व नंतर त्या आद्य मायेचा, परब्रह्मात लय करावा

म्हणजे मग सर्व ल्याचे अवधिभूत, अर्थातच कोणामध्येही लीन न होणारे, एकमेवाद्वितीय जे परब्रह्म, ते शिल्लक राहते. तेच 'तत्त्वमसि' वाक्यातील तत्पदाचे लक्ष्य आहे. याच प्रकारने व्यष्टीतील जीवोपाधिरूप शरीर, इंद्रिय, प्राण, मन, बुद्धि, अहंकार, इत्यादिकाच्याही ल्याने त्याचा अवधिभूत जो प्रत्यगात्मा शिल्लक राहतो, तोच 'तत्त्वमसि' वाक्यातील 'त्व' पदाचा लक्ष्यार्थ आहे, असे जाण (३४-३५)

श्लोक —

**व्याख्यारूपेकसद्वस्तु सृष्टे प्राक् चाधुनापि तत्।**
**त्वं श्रोत्रात्मेन्द्रियातीतमस्यैक्यमनुभूयताम् ॥३६॥**

अन्वय —व्याख्यारूपैकसद्वस्तु (यत्) सृष्टे प्रागधुनापि तत्। श्रोत्रात्मेन्द्रियातीत त्व असि ऐक्य मनुभूयताम् ॥३६॥

अर्थ —याप्रमाणे व्यतिरेकाने किंवा उपसंहाराने 'तत्' पदार्थ व 'त्व' पदार्थ याचे परिशोधन करून शुद्ध होऊन शिल्लक राहिलेल्या 'त्व' पदार्थाचे व 'तत्' पदार्थाचे अत्यत ऐक्य सागणाऱ्या महावाक्याचा अर्थ आता प्रकट करतो. तो ऐक.

वाणीने उच्चारले जाणारे नाम व मनाने लक्षात येणारा आकार म्हणजे रूप, याचा संबध ज्याला कधीच झाला नाही, असे एक म्हणजे सजातीय, विजातीय व स्वगत अशा भेदत्रयाने रहित असलेले सृष्टीच्या पूर्वी जे सद्वस्तु परब्रह्म रूप होते व आताही जगाच्या स्थितिकाली जे तसेच आहे व पुढेही प्रलयकाली जे तसेच राहणार, तेच तत्पदाचे लक्ष्य आहे.

जगात नामरूपरहित अशा दोन सद्वस्तु नसल्याने, सद्वस्तु सजातीय सद्वस्तूच्या भेदाने रहित आहे सद्वस्तूहून विजातीय जी माया व तिचे कार्य, हे विजातीय म्हणजे मिथ्या आहे. परंतु मिथ्या पदार्थांचा भेदही मिथ्याच असल्याने विजातीयाच्या भेदानेही सद्वस्तुरहित आहे सद्वस्तु निरवयव व वनाप्रमाणे अनेकात्मकही नसल्याने, वृक्षात जसा पत्र-पुष्प-फलादिकाचा स्वगत भेद असतो, किंवा वनरूप समुदायात जसा आंब्याचे झाड, फणसाचे झाड इत्यादिकाच्या भेदाने स्वगतभेद असतो, तसा परब्रह्मात स्वगतभेदही नाही त्यामुळे जे परब्रह्मरूप सद्वस्तु अखंड एकरस आहे, सच्चित् आनंद असे मुद्दा नाना रस त्यात नाहीत. हे भेदसुद्धा असत्, जड व दु.ख, या सापेक्ष कल्पनेने ज्याच्यात मानले आहेत, सत् म्हणजेच चित् व चित् म्हणजेच आनंद, असे ज्याचे वास्तविक स्वरूप आहे, असे जे सद्वस्तु, तेच तत्पदाचे लक्ष्य आहे.

विकार व नामधेय हे केवळ वाङ्मात्र आहे वाणीहून भिन्न अशी नामविकाराना सत्ताच नाही, व परब्रह्माहून अन्य सर्व 'आर्त' म्हणजे नाशरूप पीडेने युक्त आहे अर्थात् असत्शशशृंगाचा व सत् परब्रह्माचा नाश होत नाही व नामरूपाचा नाश होतो. म्हणून ते ब्रह्म व शशशृंग याहून वेगळे, अर्थात् अनिर्वचनीय म्हणजे मिथ्या आहे, अशी श्रुती 'वाचारंभण विकारोनामधेयम्' ''अतोऽन्यदार्तम्' अशा वाक्याने सांगत असल्याने, अखंडैकरस सद्वस्तुरूप परब्रह्मतत्पदाचे लक्ष्य आहे, असे जाणले पाहिजे

त्याचप्रमाणे महावाक्याच्या श्रवणाचा व तज्जन्य साक्षात्काराचा अधिकारी तू जो श्रोता, त्या तुझे देह, इन्द्रिय, अंत करण, इत्यादिकाच्या संघाताहून पलीकडे व त्याहून अत्यंत विलक्षण, या सर्वांच्या आत व या सर्वांस अधिष्ठान रूप जे साक्षिचैतन्य, ते तुझे स्वरूप 'त्व' पदाचे लक्ष्य आहे. 'तत्' व 'त्व' या दोन पदामुळे दोन अशा व्यवहारास पात्र झालेल्या परंतु वस्तुत' एक असणाऱ्या सर्वांचा बाध करून शिल्लक राहिलेल्या या लक्ष्यार्थांचे अत्यंत ऐक्य 'असि' या पदाने सागितलेल्या सामानाधिकरण्याने, अखंड एकरसत्वाने, म्हणजे तूच ते आहेस व तेच तू आहेस अशा ध्यानरूपनिदिध्यासनादि साधन क्रमाने, तू प्रत्यक्ष जाणून घे.

एक विभक्त्यंत दोन नामाचे सामानाधिकरण्य चार प्रकारचे व्यवहारत दृष्ट आहे बाध, अध्यास, विशेषण, व ऐक्य असे ते चार प्रकार आहेत. अंधकारात खांबालाच चोर समजून भ्यालेल्या माणसाला भयापासून दूर करण्याकरता चोराचा बाध करून म्हणजे हा चोर नसून तसा भासणारा खांबच आहे असे दाखविण्याकरता जो चोर आहे तो खांब आहे असे जे सामानाधिकरण्य, याला बाधासामानाधिकरण्य म्हणतात, यात चोराचा अत्यत बाध करून खांबाची स्थापना करणे हा उद्देश आहे. त्याप्रमाणे 'तत्त्वमसि' वाक्यामध्ये बाधासामानाधिकरण्य गृहीत धरले, तर जीवाचा बाध करून ब्रह्माची स्थापना केली, तर श्रुतीचा

हा प्रयत्न व्यर्थ जाईल. कारण यात जीवाचा अत्यंत अभाव सिद्ध होणार. मग नुसते ब्रह्म राहिले व ते मोठे चांगले असले, तरी मला त्याचा काय उपयोग !

' आत्मनस्तुकामाय सर्वे प्रियं भवति '

असा न्याय आहे. मीच जर नाही, तर ब्रह्म कोणा-करता ! व आपल्या नाशाची कोण इच्छा करील ! म्हणून हा पक्ष येथे इष्ट नाही. बरे, ब्रह्माचा बाध करून जीवाची स्थापना केली, तरीही हा प्रयत्न व्यर्थच आहे. कारण मग जीवाला सच्चिदानंदब्रह्मस्वरूप स्थितीरूप मुक्तीचा केव्हाही संभव नाही. मग असले दुःसह सामानाधिकरण्य भगदीच व्यर्थ होईल. सुरेश्वराचार्यांनी महावाक्यात बाधासामानाधिकरण्य मानले आहे. परंतु तेथे ' त्वं ' पदाचा अर्थ वेगळा आहे, हे तेथे पहावे.

आता दुसरे अध्यास सामानाधिकरण्य वाणीला धेनु समजावे, सूर्याला ब्रह्म समजावे, शाळिग्रामाला विष्णु समजावे, असा हा अध्यास सामानाधिकरण्यात अर्थ असतो. परंतु येथे वाणी, सूर्य किंवा शाळिग्राम हे वस्तुतः धेनु, ब्रह्म, व विष्णू यांच्यापासून अत्यंत भिन्न समजले जातात. परंतु शास्त्राज्ञेप्रमाणे या दोघांचे वास्तविक ऐक्य नसता तसे समजून उपासना केल्यास त्या उपासनेचे काही फळ मिळेल. परंतु वाणी वगैरे पदार्थ वास्तविक धेनु वगैरे होणार नाहीत.

त्याप्रमाणे जीवास तू ' मी ब्रह्म आहे ' असे समज असा उपदेश केल्यास तो वास्तविक ब्रह्म होणार नाही. कारण अध्यासामध्ये ' तू ब्रह्माहून वस्तुतः वेगळा आहेस ' असा अर्थ गर्भित असतो व तसे ज्ञात्यास सर्वच वेदान्त व्यर्थ होईल. कारण सच्चिदानंदरूप ब्रह्मरूपाने स्थितीरूप मुक्ति यातही संभवत नाही. उलट अनर्थच आहे. शिवाय ' वाचंधेनुमित्युपासीत ' याप्रमाणे ' तत्त्वमसि ' या वाक्यात ' इति ' पद व ' उपासीत ' असे ध्यानवाचक पदही नाही, व उपासनेचे काही फळ जरी चागले असले, तरी ते विनश्वर व दुःखमिश्रीतच असल्याने प्रपंचातर्गत व दुःख-रूपच आहे. म्हणून अध्यास पक्षही येथे इष्ट नाही. तिसरे विशेषण–विशेष्य–भावरूप अर्थ दाखविणारे सामानाधिकरण्य आहे. जसे नील हे विशेषण कमल या पदार्थास दिले आहे. येथे विशेषण–विशेष्य–भावरूप संबंध आहे व तो तादात्म्य दाखवितो, ज्यांचे तादात्म्य संभवत नाही, त्यांच्यात विशेषण–विशेष्य–भावही असत नाही. उदाहरणार्थ, ' गौरश्वः ' म्हणजे गाय घोडा आहे असा विशेषण–विशेष्य–भाव संभवत नाही. कारण हे दोन पदार्थ विरुद्ध आहेत.

त्याप्रमाणेच किंचिज्ज्ञ जीव व सर्वज्ञ ईश्वर हे दोन पदार्थ परस्पर विरुद्ध असल्याने यांच्यात तादात्म्य दाखविणारा विशेषण–विशेष्य–भाव सभवत नाही. अर्थात् ' तत्त्वमसि ' वाक्यात अत्यंत ऐक्य दाखविणारे सामानाधिकरण्य मानले पाहिजे, ते ' सोयं देवदत्तः ' या वाक्याप्रमाणे मानले पाहिजे. अर्थात् विशिष्ट देशकालरूप विशेषणांचा परित्याग करून विशेष्यरूप शुद्ध देवदत्त शरीररूप व्यक्तीचे ऐक्य जसे लक्षणा करून विवक्षित आहे, तसेच ' तत्त्वमसि ' वाक्यामध्ये जाणावयाचे आहे. अनादि कालापासून ' तत् ' व 'त्वं' हे अत्यंत भिन्न आहेत, असा अज्ञानामुळे दृढनिश्चय झाला असल्याने, श्रवणानंतर मननाने ऐक्याचा दृढनिश्चय करून, ऐक्याच्या साक्षात्कारा करता साक्षात्कार होईपर्यंत निदिध्यासन केले पाहिजे. साक्षात्काराशिवाय नुसत्या शब्द ज्ञानाने मुक्ति होणार नाही. म्हणून निदिध्यासनपूर्वक जीव ब्रह्मैक्याचा साक्षात्कार तू करून घे, असे आम्ही तुला सांगितले आहे. ( ३६ )

श्लोकः—

**सृष्टेः प्राक्सच्चिदानंदरूपोद्याहंकृतेर्लयात्।**
**प्राग्वदूर्ध्वमपीदिक्त्वं या सृष्ट्यस्तित्वकल्पना।**
**गवाधाराहंकृतेः प्राक्स्थानाभावान्न साघ चेत्।**
**तद्वत्क्वास्तित्वमेकोऽतोऽद्वितीयो ब्रह्म चिन्मयः**

अन्वयः–सृष्टेःप्राक् त्वं सच्चिदानन्दरूपः (आसीः) अद्य अहंकृतेर्लयात्प्राग्वत्सच्चिदानंदरूपः (असि) ऊर्ध्वम-पीदृक् (भविष्यसि) अहंकृतेः प्राक् या सृष्ट्यस्तित्व कल्पना सागवाधारा अद्यनचेत् तद्वत् क्वास्ति अतः त्वं एकोऽद्वितीयः चिन्मयः ब्रह्म (असि) ॥ ३७-३८ ॥

अर्थः–सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी तू सच्चिदानंद-रूपच होतास. आज अहंकाराच्या लयाने उपाधिरहित झाला आहेस, त्यामुळे पूर्वीप्रमाणेच हल्लीही तू सच्चिदानंद-रूपच आहेस व पुढेही विदेह कैवल्यादशेत असाच सच्चिदानंदरूप रहाणार. म्हणून सर्वदा कालत्रयात तू अद्वितीय सच्चिदानंदरूप आहेस, असे जाण. शिष्य म्हणतो, गुरु-महाराज ! मला माझ्याहून अन्य असणारी ही द्वैतात्मक

सृष्टी प्रत्यक्ष दिसते व या सृष्टीतील सुखदुःखादि सर्व परिणाम मला प्रत्यक्ष भोगावे लागतात. मग मी सर्वदा अद्वितीय सच्चिदानंदरूप कसा असू शकेन? अर्थातच असणार नाही, असे मला वाटते.

गुरुमहाराज म्हणाले, बा शिष्या! देहेन्द्रियांचे ठिकाणी अहंकाराची भावना किंवा अध्यास असल्याने पूर्वी सृष्टीची अस्तित्व कल्पना तुझ्या ठिकाणी भासत होती. वस्तुतः अन्तःकरणप्रेरित इंद्रियादिकांचे ठिकाणीच ती होती. परंतु आज तुला तत्त्वज्ञान झाल्याने, अज्ञान नष्ट होऊन शरीरेन्द्रियादिकांचे ठिकाणचा अहंकार नष्ट झाल्याने, सृष्टि-कल्पनेचा आधार व आधेयभूत सृष्टी हे सर्व आत्मस्वरूपच झाले आहे, प्रलयोदकात सर्व नद्या व तलाव लीन होऊन एक समुद्रच असतो. त्याप्रमाणे सर्व एक आत्मरूपच झाले आहे. त्यामुळे, स्थानच नसल्याने सृष्टीची कल्पना पूर्वीप्रमाणे कुठे आहे? कुठेच नाही. अंधारात पडलेल्या दोरीवर सापाचा भास झाला, काय आहे ते नीट पहावे म्हणून दिवा आणून पाहिले, तो पडलेली दोरी स्पष्टपणे दिसली. मग भासलेला साप भास पूर्वी मुळी नव्हता, आताही नाही व पुढेही पण नाही. असा त्रिकालामध्ये त्याचा जसा बाध झाला, त्याप्रमाणेच द्वैतभ्रमाधिष्ठान जो आत्मा, त्याचे ज्ञान झाल्यावर कालत्रयीही हे द्वैत आत्म्यावर नाही असा बोध झाला. मग आता जग कोठून असणार? (३८)

श्लोकः—

ब्रह्मबुद्ध्या द्वयाभावाद्देह्यहंकृतिसंक्षयात्।
शिष्यतेऽत्र निराकारः काख्यारूपात्मकं जगत्॥

अन्वयः— ब्रह्मबुद्ध्या अहङ्कृतिसंक्षयात् द्वयाभावात् अत्र देही निराकारः शिष्यते आख्यारूपात्मकं जगत् ॥३९॥

अर्थः— अखंड, एक अद्वितीय ब्रह्म मी आहे, अशी अपरोक्ष अखंडाकार बुद्धिवृत्ति झाल्याने अनात्म पदार्थांचे ठिकाणी झालेल्या अहं बुद्धीचा क्षय झाल्यामुळे सर्व द्वैताचा समूळ नाश झाला. म्हणून पूर्वी देहयुक्त भासत असलेला आत्मा म्हणजे देही आता निराकार ब्रह्मरूपानेच शिल्लक राहिला. आता याचे ठिकाणी नामरूपात्मक जगत् कोठचे? आता आत्म्याहून व्यतिरिक्त दुसरे जगत् नाहीच. (३९)

श्लोकः—

सम्भोगिवद्दृढमपि ज्ञानदीपात्र ते भ्रमः।
ज्ञानं त्यक्त्वा दृढाभ्यासी भ्रमेणापि न युज्यते॥

अन्वयः— सम्भोगिवत् दृढमपि (जगत्) ज्ञानदीपात् ते भ्रमः न। दृढाभ्यासी ज्ञानंत्यक्त्वा अपि भ्रमेण न युज्यते ॥ ४० ॥

अर्थः— गुरुमहाराज, आपण म्हटल्याप्रमाणे आत्मस्वरूपामध्ये द्वैत केव्हाच झाले नाही हे मला पटले. परंतु या द्वैताचा भास काही जात नाही. याला काय करावे?

गुरुमहाराज म्हणाले, बा शिष्या! सुषुप्ती व समाधी अवस्थेमध्ये द्वैत तुला भासत नाहीच. आता जागृतीत किंवा स्वप्नात तुझ्या प्रारब्धकर्मांचा भोग देण्याकरता द्वैताचा भास होणे आवश्यक आहे व तो भास अपरिहार्यही आहे. परंतु हे द्वैत खोटे आहे. उगीच गारुड्याने दाखविलेल्या इंद्रजालाप्रमाणे भासत आहे. असा तुझा पक्का निश्चय असल्यास ते तुला काय करणार? हे खरे आहे असे आता तुला झालेल्या तत्त्वज्ञानाने कधीच वाटणार नाही.

दोरीवर भासलेला साप, अथवा शुक्तीवर भासलेले रजत, दोरी व शुक्ती याच्या ज्ञानाने खोटे आहे असे ठरल्यावर, जरी तेथे साप व रजत भासत असले, तरी त्यापासून भय किंवा त्याबद्दल आस्था जशी रहात नाही, तसेच जगापासून भय किंवा त्याबद्दल आस्था तुझ्या मनात रहाणार नाही; मग नांगी तोडलेल्या विंचवाप्रमाणे किंवा विषारी दात काढलेल्या सापाप्रमाणे किंवा मिथ्या रजताप्रमाणे जगाशी खुशाल निर्भय व निरभिलाषपणे व्यवहार करण्यास काय हरकत आहे! हा व्यवहार पूर्वीच्या व्यवहाराप्रमाणे काही बाधक नाही. व्यवहार बाधक न होणे हेच तत्त्वज्ञानाचे मुख्य प्रयोजन आहे.

हे तत्त्वज्ञान किती दिवस सांभाळले पाहिजे, असा प्रश्न तुझ्या मनात उपस्थित झाला असेल. तर त्या प्रश्नाला उत्तर 'मी ब्रह्म आहे' व 'भासमान द्वैत खोटे आहे' याचा दृढाभ्यास होईपर्यंत हे तत्त्वज्ञान तुला सांभाळले पाहिजे. म्हणजे.

'आसुप्तेरामृतेःकाल नयेद्वेदान्तचिन्तया'

या उक्तीप्रमाणे सकाळी उठल्यापासून निजेपर्यंत व असे मरेपर्यंत हे तत्त्वज्ञान सांभाळले पाहिजे. कारण हा व्यवहार मरेपर्यंत चालणारच. बोधाने अभ्यास दृढ झाला, म्हणजे मात्र मग ज्ञान सांभाळण्याची आवश्यकता नाही. अभ्यास दृढ होण्याची खूण म्हणजे स्वप्नातसुद्धा मी 'देहेन्द्रियादिक

आहे ' व ' हे जगद्रूप द्वैत खरे आहे ' असे वाटता कामा नये. अशा लोकानाच

' त द्बुद्धयस्तदात्मानस्तन्निष्ठास्तत्परायणाः '

असे म्हणतात; व हेच लोक

' गच्छन्त्यपुनरावृत्तिं ज्ञाननिर्धूतकल्मषाः '

ह्या पदवीला प्राप्त होतात. ( ४० )

श्लोकः—

स्रज्यह्यभावः प्रागूर्ध्वं तद्वद्ब्रह्मणि चास्यतु ।
अभावा च्छून्यतां मैहि तज्ज्ञासंचित्सुखात्मक ॥

अन्वयः— यथा स्रज्यह्यभावः तद्वत् प्रागूर्ध्वं च ब्रह्मणि अस्य तु ( अभावः ) तज्ज्ञ सचित्सुखात्मक अभावाच्छून्यतामैहि ॥ ४१ ॥

अर्थः—हे शिष्या, फुलाच्या माळेवर अज्ञानाने भासलेला साप भ्रमाच्या-पूर्वी व माळेच्या ज्ञानानतरही वास्तविक नाही. त्याचप्रमाणे या ब्रह्माचे ठिकाणी जगद्भ्रम होण्याचे पूर्वी व ब्रह्मसाक्षात्कारानतरही जगाचा अभावच आहे, अर्थात् आदी व अंती जे नसते, ते मध्येही नसतेच, या न्यायाने ज्या वेळी भ्रमाने हे जगत् दिसते, त्या वेळीही ते नाहीच व जगाचा भ्रमही पण नाहीच.

हे ऐकून शिष्य म्हणतो, गुरुमहाराज ! मग सर्वांचा अभाव म्हणजेच मोक्ष असे म्हणण्यास हरकत नाही.

गुरुमहाराज म्हणतात, हा शिष्या ! सर्वांचा अभाव म्हणजे मोक्ष असे म्हणू नकोस. सर्वांचाच अभाव जर मोक्ष मानला, तर तो अभाव कोण सिद्ध करणार ? कारण अभाव आपणच आपणाला जाणू शकत नाही. कारण तो जड आहे. बरे, त्याला जाणणारे दुसरे कोणी आहे असे म्हणावे, तर सर्वांचा अभाव तू मानतोस. मग दुसरे जाणणारे कोण असणार ?

बरे, अभाव हाच स्वयंप्रकाशमान आहे असे मानले, तर स्वयंप्रकाशमान वस्तूचा अभाव स्वयंप्रकाशमान नाही. कारण स्वयंप्रकाशमानाचा अभाव जडच असणार. शिवाय स्वयंप्रकाशमानाचा अभाव असणे शक्य नाही, कारण स्वयंप्रकाशमान पदार्थ नियमाने सर्वव्यापक असतो व त्याचा अभाव मानला तरी त्याला जाणणार तरी कोण ? कारण ज्या वेळी स्वयंप्रकाशमान वस्तू आहे त्या वेळी त्याचा अभाव संभवत नाही. कारण भाव व अभाव एके वेळी असत नाहीत. स्वयंप्रकाशमान वस्तू ज्या वेळी नाही, त्या वेळी त्याचा अभाव मानल्यास त्याला जाणणारा कोणी नाही. या सर्व विचारावरून, स्वयंप्रकाशमान असा आत्मस्वरूप तू, त्या तुझ्याहून वेगळा याच्या म्हणजेच द्वैताचाच अभाव मोक्षाचे वेळी आहे. व तोही तुझ्याहून भिन्न नाही. कारण ब्रह्मस्वरूप असणाऱ्या तुझ्या ठिकाणी कल्पित जे द्वैत व द्वैत भ्रम, त्याचा अभाव तत्स्वरूपच आहे. कल्पिताचा अभाव म्हणजेच अधिष्ठान होय. म्हणूनच कालत्रयीही कल्पिताचा अभाव असतो. कारण कालत्रयी अधिष्ठान असते म्हणून द्वैत व तद्भ्रमाभावरूप स्वयंप्रकाशमान जो तू, तो तू शून्य-भावाला प्राप्त होऊ नकोस. तू शून्यालाही जाणणारा आहेस. म्हणून वेदान्तशास्त्रात तुला ' अतिशून्य ' असे म्हटले आहे. शून्याचेही अतिक्रमण करणारा म्हणून तू अतिशून्य सच्चिदानंदरूप असा आहेस. ही सर्व तुझी सच्चिदानंद वगैरे नावे द्वैत सापेक्ष आहेत. वास्तविक दृष्टीने तू नाम रूपातीत आहेस असे जाण. (४१)

श्लोक—

भास्वान्नित्यः प्रबोधोयं येदा भ्रांतहितैषिणः ।
साधनान्यद्य कार्याणि साध्याभावान्न कुर्वत.

अन्वय — अयम्प्रबोधः भास्वान् नित्यः (अस्ति) वेदाः भ्रान्तहितैषिणः ( सन्ति ) अतः साधनानि कार्याणि अद्य साध्याभावात् न कुरु ॥ ४२ ॥

अर्थ — हा शिष्या ! आतापर्यंतच्या विवेचनाने ब्रह्म स्वरूप जे तुझे निजरूप, त्याचा बोध तुला होऊन तू मोठा आनंदी व कृतकृत्य असा झाल्यासारखा आता तू दिसतो आहेस. तुझ्या मुखचर्येवरून हे सहजच कोणाच्याही लक्षात येण्यासारखे आहे परंतु हा बोध तुला आताच झाला असे नसून अनादिकालापासून हा बोध तुला आहे व अनंतकाल तो असाच रहाणार. तो कधीही नष्ट होणार नाही. कारण हा बोध परब्रह्म आत्मस्वरूप आहे व आत्मा हा अनादि अनंत आहे.

ज्याप्रमाणे सूर्य पृथ्वीच्या आड गेला म्हणजे तो अस्ताला गेला असे मानव समजतात व पृथ्वीच्या वरती आला म्हणजे तो उदय पावला असे मानतात, किंवा तो ढगाच्या आड झाला म्हणजे झाकला गेला व ढग दूर झाल्यानंतर प्रकट झाला असे भ्रान्त झालेले लोक समजतात. वास्तविक सूर्य कधी अस्ताला जात नाही. कधी उदयाला येत नाही. कधी लुप्त होत नाही व कधी प्रकटही

होत नाही. तो सर्वदा एकसारखा प्रकाशमानच आहे हे तत्त्व सूर्य लोकात राहणारासच कळण्यासारखे आहे. येरा गबाळाचे म्हणजे पृथ्वीवर राहणाराचे हे काम नव्हे. त्याच प्रमाणे देहेन्द्रियाचे ठिकाणी आत्मदृष्टी असणाऱ्या, म्हणजेच भ्रान्त किंवा मूढ लोकांच्या दृष्टीनेच आजपर्यंत मला आत्मबोध नव्हता. आत्म्याचे अज्ञान होते.

आता सद्गुरुमहाराजाच्या उपदेशाने ज्ञान झाले व त्याने अज्ञान दूर होऊन मी सच्चिदानंद परब्रह्मरूप झालो, असा व्यवहार आहे. अखंड एक निर्विकार आत्मवृत्तीने अवच्छिन्न चैतन्यालाच बोध असे नाव आहे. ही वृत्तीच उत्पन्न होते व त्यामुळे तदवच्छिन्न चैतन्य उत्पन्न झाले असे वाटते. ज्याप्रमाणे जमीन खणून विहीर बनविली म्हणजे त्या विहिरीतील आकाश निर्माण झाले, असा व्यवहार आहे. म्हणजे यालाच विहीर काढली असे म्हणतात. परंतु ते आकाश विहीर बनविण्याच्या पूर्वीच तेथे आहे. परंतु भ्रांताच्या दृष्टीने विहीर बनली म्हणजे आकाश अथवा पोकळी निर्माण झाली असा व्यवहार आहे. याप्रमाणेच येथे समजावे. विहीर खणणे म्हणजे वृत्ति निर्माण करणे व माती काढणे म्हणजे अज्ञान दूर करणे व बोध प्रकट करणे, हे सर्व भ्रांत दृष्टीने आहे. आकाशाच्या दृष्टीप्रमाणे आत्मस्वरूपाच्या दृष्टीने हे सर्व व्यवहार भ्रांता स्येच आहेत व अशा भ्रांत लोकांच्या कल्याणाकरताच वेदाचे कर्म, उपासना व तत्त्वज्ञान उपदेशाचे प्रकार त्याच्या त्याच्या अधिकारानुरूप आहेत. मुक्ताच्या दृष्टीने द्वैतच नाही. मग हे सर्व व्यवहार कोठून असणार ?

म्हणून बा शिष्या ! बोध जर नित्यच आहे, तर वेद हा बोध होण्याकरता नाना प्रकारचा उपदेश का करतो अशी शंका आता तुला येणार नाही.

शिष्य म्हणतो, गुरुमहाराज ! आता मी निष्कामकर्मयोगाचे किंवा अन्य उपासना किंवा ज्ञानादिकाचे अनुष्ठान देहपात होईपर्यंत करीत राहावे काय या विषयी श्रीचरणाचे मत मी श्रीचरणाजवळ विचारतो. श्रीची आज्ञा होईल त्या प्रमाणे माझा दैनंदिन व्यवहार मी ठेवीन.

गुरुमहाराज म्हणतात, हे शिष्यवर ! साधनानुष्ठान काही लभ्य सिद्ध करण्याचे असल्यास लोक करीत असतात. आता तू मुक्त व कृतकृत्य असल्याने, तुला काही साध्यच राहिले नाही मग साधनानुष्ठानाची काही गरज नाही म्हणून तू इतःपर काहीच करू नकोस. भगवतानी गीतेत

'नैव तस्य कृतेनार्थ '

म्हणजे त्याच्या साधनानुष्ठानाचे काहीच प्रयोजन नाही, असे स्पष्ट सांगितले आहे. म्हणून तुला आता काही कर्तव्य राहिले नाही. (४२)

श्लोक —

**भगवद्वाक्यतोऽसक्त:कुरु वा तैर्न लिप्यसे।**
**मनो विनापि ज्ञानासि ध्यानादे किं प्रयोजनं॥**

अन्वय — वा भगवद्वाक्यत असक्त: (सन्) कुरु तैर्न लिप्यसे (त्व) मनोविनापिज्ञाताऽसि (अत) ध्यानादे किंप्रयोजनम् ॥ ४३ ॥

अर्थ — अथवा, बा शिष्या असे

'नैवतस्यकृतेनार्थः'

असे ज्याप्रमाणे भगवद्वचन आहे, तसे —

'कुर्याद्विद्वांस्तथाऽसक्तश्चिकीर्षुर्लोक संग्रहम्'

असेही भगवद्वचन आहे. देहेन्द्रियाचे ठिकाणी आत्म बुद्धी ठेवणारे, म्हणूनच अविद्वान् किंवा भ्रांत लोक फलाच्या इच्छेने व 'मी हे कर्म करणारा व भोगणारा आहे' अशा भावनेने जसे कर्म करतात व त्या कर्मात ते अगदी तत्पर असतात, त्याप्रमाणे हे अर्जुना ! तूही जोपर्यंत तुझे प्रारब्ध कर्म शिल्लक आहे, म्हणूनच तुझ्या देहेन्द्रियादिकाची ही सत्ता जोपर्यंत विद्यमान आहे, तोपर्यंत तूसुद्धा कर्म, उपासना व ज्ञान या मार्गांचे तत्परतेने अनुष्ठान करीत जा. ज्ञानी झालेल्या तुझ्यासारख्याचा अनुष्ठानात फक्त 'मी हे कर्म करतो,' असा अभिमान, व 'मला याचे फळ भोगावे लागणार' असा निश्चय, हे तुझ्या ठिकाणी नसणार व अज्ञाच्या अनुष्ठानात प्राधान्येकरून या दोन भावना असणार. एवढाच दोघाच्या अनुष्ठानामध्ये फरक आहे, एऱ्हवी दोघाचे कर्म अगदी सारखेच आहे.

म्हणून अज्ञान्याला 'सक्त' अशी पदवी व ज्ञान्याला 'असक्त' अशी पदवी भगवताने दिली आहे. एऱ्हवी तरी ज्ञान्याला ज्ञान झाल्यानतर प्रारब्ध असेपर्यंत स्नान भोजन-निद्रादि शारीरिक कर्मे केल्याशिवाय गत्यंतरच नाही मग त्याप्रमाणेच तो ज्ञानी ज्या आश्रमात अथवा अवस्थेत असेल, त्या आश्रमातील अथवा अवस्थेतील शास्त्रविहित कर्मे त्याला फलासक्ती व अभिमान सोडून करण्यास काय हरकत आहे ! त्याने ती अवश्य करावीच,

म्हणजे त्याचे आचरण पाहून अज्ञ लोकही

'यद्यदाचरति श्रेष्ठः'

या न्यायाने स्ववर्णाश्रमविहित व स्वाभाविक कर्मे शास्त्र मर्यादेने करतील. ज्ञान्याचे आचरण पाहून, एवढे मोठे ज्ञानी असूनसुद्धा हे शास्त्रविहित कर्मे कटाक्षाने करतात, मग ही कर्मे आपण अवश्यच केली पाहिजेत असा अज्ञ लोकांना दृढ निश्चय होईल. यालाच 'लोकसंग्रह' म्हणजे लोकांचा सम म्हणजे उत्तम प्रकारचा अर्थात् कधीही न ढळणारा ग्रह म्हणजे निश्चय असे म्हणतात. यात अज्ञ लोकांचे कल्याण आहे. मग आपल्या शास्त्रविहित व आज पर्यंत अभ्यस्त असलेल्या सहज होणाऱ्या आचरणाने जर लोकांवर एवढा उपकार होतो, तर भगद्वाक्याप्रमाणे तू कर्म ज्ञान-उपासनादि कर्मे लीलेने आमरणांत करीतच जा. 'अशी कर्मे मी करीत गेल्यास त्यापासून पुन मी बद्ध होईन' अशी कल्पना स्वप्नातसुद्धा तू मनात आणू नकोस कारण तुझ्या बुद्धीवरचा 'मी कर्ता व भोक्ता' असा पूर्वी असलेला लेप व देहेन्द्रियादिकांचे ठिकाणी असलेला अहकार तत्वज्ञानाने पार निघून गेला आहे. त्यामुळे त्या कर्मांनी आता तू लिप्त होणार नाहीस. पाण्यात असलेले कमलपत्र त्याप्रमाणे पाण्यात असून पाण्याने अलिप्त म्हणजे त्याच्या ससर्गाच्या प्रभावाने रहित असते, त्याप्रमाणे तुझी बुद्धि तत्वज्ञान प्रभावाने अलिप्तच राहील.

गुरुमहाराज म्हणाले, हे शिष्या! ज्या निदिध्यासनाचे 'आसुप्ते रामृत काल'' म्हणून शास्त्राने अगदी अवश्य कर्तव्य म्हणून सांगितलेले जे 'अहब्रह्मास्मि' असे ध्यान-रूप अनुष्ठान, त्याचीसुद्धा तुला वास्तविक आवश्यकता नाही. कारण ज्याच्या बुद्धीला विपर्यास झाला आहे, त्यानेच तो उलट प्रत्यय म्हणजे 'मी देहेन्द्रियादिक आहे' असा प्रत्यय घालविण्याकरता 'मी देहेन्द्रियादिक नसून केवळ ब्रह्मरूप आहे' असे ध्यान करावयाचे असते परतु मी ब्रह्मरूप आहे' असा पक्का निश्चय ज्याचा झाला, त्याला मी ब्रह्म आहे असे ध्यान करीत रहावे लागत नाही. पहा मनुष्ये 'मी मनुष्य आहे' असे कधी चुकून तरी ध्यान करतात काय? नाही. कारण 'मी मनुष्य आहे' अशी त्याची पक्की खात्री झाली आहे. जर एखादे वेळी कोणीतरी त्याला पशु म्हटले तर तो त्याच्यावर फेरदा रागावतो व झगडा करण्यास तयार होतो. हा सर्व पक्क्या निश्चयाचा प्रभाव आहे म्हणजे तो सर्वदा 'मी मनुष्य आहे' असे घोकत नसतो. मग तुला 'मी ब्रह्म आहे' असा पक्का निश्चय झाला असल्याने आता 'मी ब्रह्म' असे ध्यान करण्याचे काय कारण? शिवाय, तू असे पहा की आपल्या स्वरूपाला तू मनाशिवाय स्वतःच जाणणारा म्हणजे स्वयप्रकाशमान असा आहेस. मग मनाने 'मी ब्रह्म' असे ध्यान करून मग त्या मनाने तुला तुझे ज्ञान थोडेच करून घ्यायचे आहे? मग तू केलेल्या ध्यानाचा उपयोग तरी काय? काहीच उपयोग नाही.

केवळ लोकशिक्षणाकरता लीलेने वाटल्यास नट जसा निरनिराळा वेष घेऊन प्रसगानुरूप त्या त्या भूमिका करतो, त्याप्रमाणे कर्मी लोकामध्ये कर्मठासारखा, उपासकामध्ये उपासकासारखा व ज्ञान्यामध्ये ज्ञान्यासारखा, प्रारब्ध असे पर्यंत वागत जा, शास्त्र दृष्टीने वागले तरी तुझे काही भले होणार नाही व अशास्त्रीय वर्तनानेही तुझे काही अनिष्ट होणार नाही 'न कर्मणा वर्धते नोकनीयान' असे श्रुती तुझ्या स्वरूपाचे वर्णन करते. परतु तत्त्वज्ञान होईपर्यंत तू फार नियमाने व शास्त्रमर्यादेने वागत आल्यास व त ससकार तुझे फार दृढ झाले आहेत. शिवाय ते सस्कार शास्त्रीय म्हणजे प्रमाणजन्य असल्याने अनियत जन्मसिद्ध दु.सस्काराचा बाध करून तुला शास्त्र मर्यादेने वागण्यास देत ते प्रवृत्त करतील म्हणून जोराचा वारा सुटला म्हणजे माणसाचे त्या वाऱ्याच्या विरूद्ध असणारे प्रयत्नसुद्धा निष्फळ होऊन वाऱ्याला अनुकूलच प्रयत्न त्याच्याकडून घडतात, त्याचप्रमाणे तुझ्या हातून कर्म ज्ञान उपासना इत्यादिकांचे अनुष्ठानच घडत राहाणार! चुकूनसुद्धा असा अशास्त्रीय वर्तन तुझ्या हातून घडणार नाही. तरी तुला हे 'निष्काम बुद्धीने शास्त्रीय आचरण कर' असे सांगण्याचे कारण काय? व तुला सांगणार तरी कोण? कारण तू कोणाचाही नियम्य असा आता राहिला नाहीस ॥ ४१ ॥

श्लोक —

अदेहप्राणहृद्धर्म· प्रारब्धान्ते सुखं वस।
इदं रहस्यं बोधाख्यं तज्ज्ञो ब्रह्ममयो भवेत्॥४८॥

अन्वय —अदेहप्राण हृद्धर्म· (सन्) प्रारब्धान्ती सुख वस। इद बोधाख्य रहस्य (अस्ति) तज्ज्ञ ब्रह्ममयो भवेत् ॥४४॥

अर्थ :— श्रुती. तत्त्वज्ञान्याच्या विदेह-कैवल्य-

प्रातीला जोपर्यंत प्रारब्धकर्म संपत नाही तोपर्यंत, म्हणजे तेवढाच काळ प्रतिबंधक आहे. प्रारब्ध संपले की तो विदेह कैवल्याला प्राप्त होतो, असे

'तस्य तावदेवचिरं यावन्न विमोक्ष्ये अथ संपत्स्ये' इत्यादि वाक्याने प्रारब्धकालाचे वर्णन करते. परंतु त्या प्रारब्ध कालाचे तुला काय? सम दृष्टीने पहाणाऱ्याला स्वर्ग काय किंवा नरक काय सर्वच ब्रह्ममय आहे. शिवाय, हे प्रारब्धही बदलण्याचे तुझ्या अंगात सामर्थ्य आहे. परंतु हे बदलण्याची तुझी इच्छाच नाही. कारण तसे केल्यास, हे चांगले व हे वाईट असा भेद तुझ्या बुद्धीत आहे असे सिद्ध होईल. मग तुझ्या सम दृष्टीत किंचित् न्यूनता आहे असे सिद्ध होईल, स्वप्नातील राजा व भिकारी सारख्याच किंमतीचे असता, 'मी भिकारी न होता राजा व्हावे' असे जर स्वप्नात एखाद्यास वाटले, तर तो स्वप्नाला स्वप्न न समजता ती खरी वस्तुस्थिती मानतो, असे म्हणावे लागेल. म्हणून तू प्रारब्ध बदलण्याची इच्छा व तदर्थ प्रयत्न करणारा नाहीस हे खास. मग जोपर्यंत प्रारब्ध आहे तोपर्यंत प्रारब्धाधीन होऊन.

"जैसी स्थिती आहे तैसापरी राहे कौतुक न पाहे संचिताचे।"

याप्रमाणे देह असेपर्यंत तू रहा. ब्राह्मण-क्षत्रियादि वर्ण व ब्रह्मचर्य-गार्हस्थ्यादि आश्रम हे स्थूल शरीराचे धर्म आहेत. 'मी अमक्याचा मुलगा, अमक्याचा भाऊ' वगैरे पुत्र-पितृत्वादि व भ्रातृत्वादि संबंध, काळे-गोरेपणा, कृश-स्थूलपणा, इत्यादि धर्मही स्थूल देहाचेच आहेत. स्थूल देहाचा व याचा अन्वय व्यतिरेक आहे. तसेच भूक-तहान वगैरे प्राणधर्म आहेत व शोक मोहादि अन्तःकरणाचे धर्म आहेत. तुझा व याचा अगदी काडीमात्र संबंध नाही. ज्याप्रमाणे घराला लागलेला रंग घर मालकाच्या अंगावर असत नाही, तसाच तुला शरीरेंद्रिय अन्तःकरणादि धर्मांचा संबंध लागू शकत नाही. असा तू साक्षिरूप होऊन सुखाने आत्मस्वरूपामध्ये रहा व आलेले प्रारब्ध आनंदाने संपीव, आणि या जगात धन्यतम हो. याप्रमाणे सर्व ज्ञानाचे आगर जो वेद, त्यातील अगदी गुप्त असलेले उपनिषद्भागरूप जे रहस्य, ज्याचे बोध असे नाव आहे व ज्या योगाने मनुष्य परब्रह्मरूप व कृतकृत्य होतो, ते 'बोधरहस्य' तुला सांगितले आहे. याउ जाणणारा तोगीही ब्रह्मरूप होईल. फक्त हे जाणण्याचा अधिकार मात्र त्यानी संपादन केला पाहिजे. जे रहस्य जाणले असता प्राणिमात्र सर्व अनर्थापासून मुक्त होऊन अमृतत्वाला प्राप्त होतो, असे श्रुती माउली या बोधरहस्याचे मुक्त कंठाने वर्णन करीत आहे. याप्रमाणे गुरुशिष्य संवादरूपाने सर्व वेदाचा रहस्यरूप जो ज्ञानमार्ग, तो या रहस्यात परमपूज्य प्रातःस्मरणीय श्रीदत्तमहाराजांचेच अवताररूप श्रीमद्वासुदेवानंदसरस्वती श्रीचरणानी सर्व भक्त लोकाच्या कल्याणाकरता प्रगट केला आहे. द्विसाहस्रीरूप भगवद्विग्रहाचा हा शिरोभाग आहे. यात सर्व वेदान्ताचे सार पदोपदी भरले आहे. महाराज म्हणतात, या ग्रंथाने सर्वान्तर्यामी भगवान् दत्तगुरू संतुष्ट होवोत. दत्तमहाराजानीच माझ्याकडून द्विसाहस्रीच्या पहिल्या त्रयोदशाध्यायाने ज्ञान बोलविले. पुढील पाच अध्यायानी म्हणजे १४ ते १८ अध्यायापर्यंत कर्मकाण्ड रहस्य वदविले. त्या पुढील पाच म्हणजे १९ ते २३ अध्यायानी भक्तिरहस्य वर्णिले याप्रमाणे त्यानी प्रत्यक्ष आज्ञा दिल्याप्रमाणे द्विसाहस्री संहिता २३ अध्यायात संपूर्ण झाली. ही काण्डत्रयात्मक आहे. पुढे योगरहस्य व बोधरहस्य अशी दोन प्रकरणे द्विसाहस्री संहितेचे आवश्यक अंगभूत असणारी त्यानीच करविली. मी फक्त निमित्तमात्र आहे कर्ता व करविता तोच भगवान आहे. हा मूळ ग्रंथ झाल्यावर टीका करण्याची आज्ञा झाली. ग्रंथ समोर नाही. टीका कशी करावी? असा विचार येताच टीकेस आरंभ केल्यावर ग्रंथ स्फूर्ती होईल असा आदेश झाला. त्याप्रमाणे टीकेस आरंभ झाला. पश्चिम समुद्र तीरावर प्रभास क्षेत्रात वास्तव्य असता नऊ अध्यायाची टीका प्रगट झाली. इतर सर्व ग्रंथाची टीका श्रीकृष्ण परमात्म्याला प्रिय असणाऱ्या द्वारका क्षेत्रात चातुर्मास्यात झाली. वेद ज्या सद्गुरु दत्तमहाराजांचे वर्णन करतो व त्रिकाली ज्याना वंदन करतो अशा सद्गुरु श्रीदत्तमहाराजाच्या चरित्राची याप्रमाणे अद्भुतरीत्या निर्मिती झाली आहे, ही टीका शालीवाहन शके १८२१ साली व संवत् १९५६ साली संपूर्ण झाली. या वर्षी चातुर्मास्य वास्तव्य द्वारकेत झाले व या साली चतुष्कडे अवर्षण होते.

श्रीदत्तगुरुमहाराजाच्या कृपेनेच हे कार्य संपूर्ण झाले. ते त्याच्या चरणी अर्पण असो.

॥ ॐ तत्सत् ॥

— प. आत्माराम शास्त्री, गोरे

तीरावर माणगाव येथे आचारसंपन्न अशा टेंब्ये कुलामध्ये श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांचा जन्म झाला. श्रीमहाराजाचे वडील वे. मू. गणेश भटजी आणि आई रमाबाई ही उभयता श्रीदत्तप्रभूचे परमभक्त. श्रीगणेश भटजींना अपस्माराचा विकार होता. त्यामुळे त्यांचे व्यवहार परस्वाधीन असत. तथापि श्रीदत्तप्रभूवरील परम निष्ठेमुळे ते एकटेच गाणगापुरी नित्य जात आणि वर्ष वर्ष तेथे राहात. रमाबाईही नानाविध सत्कर्मात नित्य रत असत. या उपासनेने प्रसन्न असल्याचे सागून, शके १७७६ आनद सवत्सरात श्रावण कृष्ण ५।६ रविवारी सूर्योदयानतर २६ घटिकानी श्रीदत्तप्रभू रमाबाईच्या पोटी अवतरले. मुलाचे नाव वासुदेव असे ठेवण्यात आले.

पित्याच्या व्याधिमय अवस्थेमुळे कुटुंबाचा सारा भार आजोबा वे. मू. हरिभट यांच्यावर असे. श्रीमहाराजाचे बाल्यातील संवर्धन आजोबानी केले; सारे पूर्वाध्ययन त्याच्या सन्निधच झाले. दारिद्र्यामुळे प्रपचाचा निर्वाह अति कष्टाने चालू होता. श्रीगणेश भटजी तर घरी अतिथि वृत्तीने वागत. हे दारिद्र्य श्रीमहाराजाच्या तपश्चर्येला अनुकूलच ठरले. श्रीमहाराजाचे उपनयन आजोबानी केले. उपनयनाबरोबरच साय प्रातः संध्यावदन, श्रीगुरुचरित्र वाचन आणि वेदाध्ययन यास आरंभ झाला. अल्पावधीतच आजोबाचे देहावसान झाले. वडील गाणगापुरी होते. श्रीमहाराज एकाकी पडले. आप्ताचे साहाय्य झाले नाही. उलट याच प्रसगी वडिलाचे बंधू श्रीबाळकृष्णभट यानी घरातील चीजवस्तु लाबवून कुटुंबावर कर्जाचा बोजा ठेवला. पुढे शके १७९९ मध्ये वडिलानी पूर्व सूचना देऊन 'इच्छामरण' स्वीकारले. आता तर प्रपचाचा सर्व भार श्रीमहाराजाच्यावर आला. अवतारी पुरुष असूनही श्रीमहाराजानी सामान्य प्रापंचिकास येणारी आपत्ति साहिली.

## शास्त्रपूत आचार आणि सिद्धवेदविद्या

श्रीमहाराजानी द्विजधर्म शास्त्रानुसार अत्यत निष्ठेने आचरिला. प्रपच निर्वाहार्थ यजमानाच्या घरी पौरोहित्यासाठी जावे लागे. परान्न मात्र सर्वथा वर्ज्य. त्यामुळे, यजमानाचे कर्म यथाशाग करावे आणि घरी येऊन वैश्वदेव करून अन्न ग्रहण करावे.

श्रीमहाराजाचे वेदाध्ययन नित्य शुचि स्वरूपात नियमपूर्वक झाले. ईश्वरीप्रज्ञेमुळे अल्पावधीतच श्रीमहाराज परिणत प्रज्ञ, वेदशास्त्र पारंगत असे झाले. अत्यंत शास्त्रपूत आचारधर्मामुळे श्रीमहाराजांची वेदविद्या ही सिद्धविद्या झाली. त्याचा प्रत्ययही अनेक प्रसंगाने आला. अगदी आरभापासून श्रीमहाराजानी आपल्या विद्येचा परमार्थ आणि जनहित या कामीच विनियोग केला. एकदा परीक्षार्थ सर्व मंत्राचा प्रयोग केला. मत्रसिद्धीचा अनुभव आला. तथापि ईश्वरी करुणेमुळे सर्पमुक्ति केली आणि सर्प मत्राचा प्रयोग कायमचा सोडून दिला. अशाच एका प्रसगाने अवलळ गायीस गरीब केले. सरकारी अधिकाऱ्यानाही चोर शोधार्थ साहाय्य केले.

ईश्वरी पुरुष असूनही श्रीमहाराजानी दारिद्र्याची साथ सोडली नाही. जवळ पुरती वस्त्रेही नसत. अशा स्थितीत विवाहाचा विचार कोणी करावा ! मात्र, ईश्वरी योजनेनुसार विवाह झाला. त्यासही गुरुजींची आज्ञा हेच तात्कालिक कारण ठरले. पत्नीचे नाव अन्नपूर्णाबाई असे ठेविले होते. विवाहोत्तर श्रीमहाराजानी तात्काल स्मार्ताग्नीची उपासना चालू केली; गायत्री मत्राचे पुरश्चरणही केले.

श्रीमहाराजाचे वैवाहिक आयुष्य लौकिकार्थाने अत्यंत क्लेशदायक गेले. घरी आई आणि पत्नी याचा नित्य विसवाद. प्रसगी घरी स्वयपाकही होत नसे. प्रायश्चित म्हणून श्रीमहाराज कठिण असे चाद्रायण व्रत आचरीत. ही सारी स्थिति मनस्तापास कारण ठरणारी असली तरी ईश्वरी संकेतानुसार ती भविष्यातील संन्यासाश्रमाची पूर्व तयारी होती. घरी विसवाद असला तरी आईविषयी श्रीमहाराजाना परम आदर वाटे 'न मातुः परदैवतम्' ही आज्ञा श्रीमहाराजानी अतीव निष्ठेने पाळली.

## गुरुप्राप्ति आणि दत्तदर्शन

कित्येकदा गृहकलह असह्य होई. आणि घराचा त्याग करून नृसिंहवाडीस जावे असे श्रीमहाराजाना वाटे. एका प्रसगाने आईची अनुज्ञा मिळवून श्रीमहाराज वाडीस आले. वाडीच्या प्रवासाची आणि वाडी येथील कार्याची ईश्वरानेच सर्व पूर्व योजना केली होती.

नृसिंहवाडी येथे श्रीगोविंदस्वामी आणि श्रीमौनिस्वामी म्हणून परम अधिकारी पुरुष होते. या उभय महात्म्याची

भेट झाली. श्रीगोविंदस्वामी हेच श्रीमहाराजांचे गुरु ठरले. श्रीमहाराजांना श्रीदत्तप्रभूंच्या मनोहर पादुकांचे दर्शन झाले; गुरुप्राप्ति झाली. येवढेच नव्हे तर भगवान् नृसिंहसरस्वती दत्तमहाराजांनी साक्षात् दर्शन दिले.

श्रीमहाराजांची नित्याची अग्नि आणि सूर्योपासना होती. आता श्रीदत्तोपासना सुरु झाली. श्रीनृसिंहसरस्वती दत्तप्रभूनेच स्वप्नात मंत्रोपदेश दिला. त्याचे विधान श्रीगोविंदस्वामींनी सांगितले; आणि उपनिषद्भाष्य वाचण्याची आज्ञा केली.

## माणगावी नृसिंहवाडीचा अवतार

श्रीमहाराजांच्या मनात संन्यासाचा विचार नित्य होता. वाडीच्या वास्तव्यात या विचाराला तीव्रता येई. परंतु श्रीदत्तप्रभूंना माणगाव येथे लीलाचरित्र दाखवावयाचे होते. माणगावी सात वर्षे राहणार असल्याचे श्रीदत्तप्रभूंनी सांगितले. श्रीमहाराज स्वतः श्रीदत्तप्रभूंचा अवतार. जन्मग्रामी यावे असे प्रभूंना वाटावे; हे साहजिक होय! श्रीमौनि स्वामींच्या सांगण्यावरून संन्यासाचा विचार काही काळ स्थगित ठेवला. श्रीमहाराज माणगावी परतले. वाटेत कागल येथे एका मूर्तिकाराने पूर्व दृष्टान्तानुसार दत्तमूर्ति दिली होती. काही दिवसांनी देवालयासाठी अयोचित जागा मिळाली. देवालय तयार झाले; देवाचे गर्भगृह श्रीमहाराजांनी स्वहस्ते बांधून काढले. शके १८०५ वैशाख शुद्ध पंचमी या दिवशी श्रीदत्तमूर्तीची स्थापना झाली. आणि या दिवसापासून सात वर्षे श्रीदत्तप्रभू माणगावी राहिले.

आता श्रीमहाराजांनी अधिक नियमपूर्वक अनुष्ठान चालू ठेविले. प्रातःकाळी चार वाजता उठावे; प्रातःस्मरणपूर्वक योगाभ्यास करावा; स्नान संध्या संपवून श्रीदत्तमूर्तीची पूजा करावी; आरंभी महान्यास करून रुद्रैकादशणी करावी; गर्दी असल्यास प्रभूंच्या अनुज्ञेने एक आवर्तन करावे. किंवा केवळ पुरुषसूक्ताने अभिषेक करावा. पूजनोत्तर जपादि संपवून शुष्क भिक्षा आणावी. स्वहस्ते पाकसिद्धि करून नैवेद्य, वैश्वदेव, गोग्रास आणि अतिथि यांची व्यवस्था करावी. आणि मग शेष अन्न सेवावे. दुपारी कोणी विद्यार्थी असल्यास पाठ द्यावा. कधी पुराण सांगावे. सायंकाळी धूप, आरती, मंत्रपुष्पादि यथासांग करावे. तदुत्तर काही ग्रंथवाचन योगाभ्यास आणि नंतर निद्रा असा नित्यक्रम असे. श्रीमहाराज विवाहित होते. परंतु प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंची आज्ञा झाल्यानंतरच वैवाहिक जीवनास आरंभ केला—

श्रीगुरुचरित्राच्या ३६–३७ या अध्यायामध्ये वर्णिलेल्या आचारधर्मांचा हा वस्तुपाठच होता.

श्रीदत्तप्रभूंचा प्रत्यक्ष वास; यथाशास्त्र अर्चन यामुळे अल्पावधीतच माणगाव हे अत्यंत जागृत स्थान म्हणून विख्यात झाले. प्रत्यक्ष श्रीनृसिंहवाडी तेथे अवतरली. नित्य उपासना पद्धतीही वाडी प्रमाणेच होती. माणगावी येणाऱ्यांच्या सर्व कामना पूर्ण होत. श्रीदत्तप्रभूतर श्रीमहाराजांना नित्य साक्षात्कृत होते. श्रीनामदेवाप्रमाणेच श्रीमहाराजांशी देवाच्या मूर्तीचा व्यवहार होई. कागलहून आणलेल्या मूळ दत्तमूर्तीशिवाय पालखीसाठी एक उत्सवमूर्ती, एक प्रवासी मूर्ती अशा तीन मूर्ती माणगावी होत्या.

क्रमशः माणगावचे वैभव वाढतच गेले. पालखीच्या वेळी सहस्रावधि समाज जमे. श्रीगुरुद्वादशी, श्रीदत्त जयंति हे उत्सव मोठ्या प्रमाणावर होऊ लागले. देवापुढे वस्तूंचा पर्वतप्राय ढीग होई. घरची निष्कांचनता असूनही श्रीमहाराज या वस्तुविषयी पूर्ण निरासक्त असत. नृसिंहवाडी हे प्रभूंचे मूलस्थान. तेथूनच माणगाव देवस्थानचा उगम. अशी श्रीमहाराजांची भावना होती. देवापुढील ठोक उत्पन्न वाडीस पाठविले जाई. किरकोळ उत्पन्नातून देवस्थानचा खर्च होई. पुढे लोकांनीच आग्रह धरला आणि देवाच्या उत्पन्नातील चतुर्थांश भाग श्रीमहाराजांच्या घरी पाठविण्यास आरंभ केला. देवानिमित्त येणाऱ्या प्राप्तीविषयीची श्रीमहाराजांची ही दृष्टि अखेरपर्यंत कायम होती. सार्वजनिक संपत्तीचे व्यवस्थापन करणाऱ्यांनी कसे दक्ष असावे याचा हा सर्वोत्कृष्ट आदर्श होय.

## श्रीमहाराजांचा योगाभ्यास

श्रीमहाराजांचा योगाभ्यास चालू होता. मार्गदर्शन प्रत्यक्ष श्रीदत्तप्रभूंचे होते. एकदा अभ्यासात काही स्खलन झाले. प्रभूंनी श्रीमहाराजांना कापशी गावी एका मोजणीदार ब्राह्मणाकडे पाठविले आणि त्याजकडून कबीर आणि [illegible] दास यांचा संवादरूप हिंदी ग्रंथ देवविला.

चौपायातून योगरहस्य दर्शन आहे. सिद्ध पुरुषाचा कोण ताही ग्रंथ कसा तारक ठरतो याचे हे उदाहरण आहे श्रीदत्तगुरूंच्या साहाय्याने योगविद्या सिद्ध झाली. योग-सिद्धी वश झाल्या. परंतु प्रारब्धाने येणारी दु खे भोगूनच संपवावयाची अशी श्रीमहाराजांची वृत्ति होती.

श्रीदत्त सांप्रदायामध्ये योगाचे महत्त्व विशेष आहे योगानेच स्वसंवेद्य अशा सद्वस्तूची प्रत्यक्ष अनुभूति शक्य होते. एकदा एका शास्त्रीबुवानी श्रीमहाराजांशी योगा*विषयी वाद घातला. त्यावेळी श्रीदत्तप्रभु स्वत बटु रूपाने येऊन योगाची आवश्यकता साधार प्रतिपादिली असा इतिहास आहे.

श्रीमहाराजांच्या चरित्राचा आदर्श दृष्टी समोर नित्य राहिल्याने पत्नी सौ. अन्नपूर्णाबाई याही वृत्तीने वैराग्यशील झाल्या, दत्तप्रभूच्या कृपेने कोणताही पूर्वाभ्यास नसता त्यानाही सहज समाधि सुखाचा लाभ मिळू लागला.

## ' द्विसाहस्री '-प्रसादग्रंथ

श्रीमहाराजांची वाणी ही आर्षवाणी होती. त्यांची वाङ्मय संपदा अपार असून त्या वाङ्मय सरितेचा उगमही माणगावीच झाला. श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने श्रीमहाराजानी श्रीगुरुचरित्रावरचा ' द्विसाहस्री ' हा अपूर्व प्रसाद ग्रंथ रचिला. ग्रंथारंभी श्रीगुरुस्तुति असून मुख्य चरित्र तेवीस अध्यायाचे आहे. शेवटी योगरहस्य आणि बोधरहस्य अशी दोन प्रकरणे आहेत. ग्रंथरचना पूर्ण झाल्यावर ' सहितेय द्विसाहस्री ' असे प्रभूनी सागितले. श्रीमहाराजानी श्लोक, अर्धश्लोक आणि उवाचमंत्र यांची संख्या मोजून पाहिली ती दोन सहस्र भरली ! श्रीमहाराजांची प्रथम वाङ्मय रचना प्रभूच्या आज्ञेने व्हावी आणि त्या रचनेचे नामकरण प्रभूनीच करावे हा अपूर्व योग होय. ज्ञान, कर्म, भक्ती, योग आदि चतुर्विध साधनांचा प्रसाद या द्विसाहस्रीच्या पठणाने होतो. ' महाराष्ट्र भाषेत जो गुरुचरित्र ग्रंथ आहे तोच ग्रंथरूपी दत्तात्रेय अविनाशी सर्वांना तारक असा सर्वोत्कर्षाने येथे द्विसाहस्रीमध्ये विराजमान आहे. नित्य पारायण करणाऱ्या भक्ताच्या सर्व पीडा दूर करून त्यांच्या सर्व कामना पूर्ण करणारा महात्मा श्रीदत्तात्रेय समर्थ आहे. ' असे प्रत्यक्ष श्रीमहाराजांचे आश्वासन आहे. ' द्विसाहस्री ' ग्रंथ हा असा प्रणवतुल्य आहे.

## माणगावातून निर्गमन

आता माणगाव येथील वास्तव्य संपत आले. श्रीदत्त प्रभूनी सांगितलेला सात वर्षांचा अवधी भरत आला आणि शके १८११ पौष मासात माणगाव सोडण्याविषयी प्रभूनी सांगितले. श्रीमहाराजानीही जाण्याची तात्काळ तयारी केली. अन्नपूर्णाबाई गरोदर होत्या. सासूसुनेचा विसवाद पूर्ववत् होता. अशा अवघड अवस्थेतही कटु शब्दांनी निरोप मिळाला. माणगावी राहण्याचा मोह होऊ नये म्हणूनच कदाचित् ही ईश्वरी योजना असावी ! बरोबर कागल दत्तमूर्ती आणि प्रवासी मूर्ती, एक तांब्या आणि अन्नपूर्णाबाईंच्या जवळ मंगळसूत्राचा एकमेव सौभाग्य लंकार, एक धोतर आणि एक लुगडे-वस्तू घेऊन श्रीमहाराजानी माणगाव सोडले. आज माणगावी उत्सव मूर्ति तेवढी आहे.

जेथे सात वर्षे प्रत्यक्ष वैकुंठ अवतरले होते, ज्या परिसरात स्वयशाचा परिमाण दशदिशांत पसरला होता—ते स्थान, तो परिसर क्षणार्धात सोडून निघावे. ही घटना लौकिकदृष्ट्या किती करुण ! किती अघटित ! ! श्रीमहाराजांच्या प्रखर वैराग्याचा हा प्रत्यय होता. याच वृत्तीमुळे श्रीमहाराजानी उत्तर आयुष्यात द्वारकापीठाचे आचार्यपदही स्वीकारले नाही.

## कठोर गृहस्थाश्रमाची समाप्ति

श्रीमहाराज गरोदर पत्नीसह नृसिंहवाडीस आले. श्रीदत्तपादुकाना वंदून श्रीगोविंदस्वामी आणि श्रीमौनी स्वामी यांचे दर्शन घेतले. थोड्याच दिवसात अन्नपूर्णाबाई प्रसूत झाल्या. मुलगा झाला. श्रीमहाराज जातकर्म करण्यासाठी आले. तो मुलगा मृत झालेला. याही प्रसंगी स्वकीय आप्तांच्या कटु शब्दांची सोबत झाली. पेवढी ही कठोर अग्निपरीक्षा.

यानंतर काही दिवस नृसिंहवाडी येथे श्रीमहाराजांनी अतिथि सत्कारपूर्वक गृहस्थाश्रम केला. याच अवधीत श्रीगोविंदस्वामींचा पूर्ण अनुग्रह झाला. श्रीस्वामींचे निर्याण झाले, आणि श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने श्रीमहाराज वाडीहून निघाले. कोल्हापूर, पंढरपूर करून गोदातीरा

गंगाखेड येथे आले. तेथे अन्नपूर्णाबाई महामारीने आजारी पडल्या. दूरवर परप्रान्तात पतिपत्नी दोघेच. अन्नपूर्णाबाईंचे सारे काही श्रीमहाराज स्वहस्ते करू लागले आणि त्याच आजारात शके १८११ वैशाख वद्य १४ शुक्रवारी श्रीमहाराजांची पुण्यशील सहधर्मचारिणी देवाघरी गेली. उभयताना याचवेळी नेण्याचा देवाचा हट्ट होता. श्रीमहाराजांचा सन्यास संकल्प होता आणि ते मागे राहिले.

श्रीमहाराज आता सर्व लौकिक बंधनातून मुक्त झाले. पत्नीचे और्ध्वदेहिक यथाविधी केल्यावर चौदाव्या दिवशी महाराजांनी सन्यासाश्रम स्वीकारला. त्याच रात्री श्रीदत्त-प्रभूंनी श्रीगोविंदस्वामींच्या रूपाने स्वप्नात प्रणवोपदेश दिला. गृहस्थाश्रम संपल्याबरोबर सन्यासाश्रम झाला. 'अनाश्रमी न तिष्ठेत.' या वचनानुसार झालेले हे चरित्र आहे. पुढे श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेने श्रीमहाराज उज्जयनी येथे गेले. श्रीनृसिंह सरस्वती दत्तमहाराजांच्या वंशातील श्रीनारायणानंद सरस्वती यांजकडून दण्ड मिळाला श्रीमहाराजांचे वासुदेवानंद सरस्वती असे सन्यास ग्रह णाच्या वेळी प्रभूंनी सांगितलेले नावच ठेवण्यात आले.

असिधारा व्रतासारखा चाललेला श्रीमहाराजांचा गृह-स्थाश्रम संपला, लौकिक जगातील दारुण दुःख सोसूनही भक्त, उपासक, साधक आणि सिद्ध या सर्व भूमिकांवरील व्यवहार श्रीमहाराजांनी अति दक्षतेने आणि सक्षेपाने केला आणि सर्व मुमुक्षू जनासाठी श्रेष्ठतम आदर्श निर्मिला.

## लोकोद्धारक संन्यासाश्रम

आता श्रीमहाराजांच्या जीवनगंगेचा उत्तर प्रवाह सुरु झाला. दंडग्रहणानंतरचे श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती हे भगवान् श्रीनृसिंह सरस्वती दत्तप्रभूंचे स्वरूपदर्शन होते आणि त्यांचे चरित्र 'श्रीगुरुचरित्र'—पुनर्दर्शन होते

दंडग्रहणानंतर श्रीस्वामी महाराजांनी श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनुसार धर्मसंस्थापनार्थ अखिल भारत वर्षात पायीच सचार केला आणि परिव्राज ही संज्ञा सार्थ केली. श्रीमहाराजांची वृत्ती नित्य अनासक्त. बरोबर चार लंगोट्या, दोन छाट्या, एक कमंडल, उपनिषदाची पोथी, पचायतनाचा संपुट, दोन दत्तमूर्ती, पाणी काढण्याची दोरी, क्वचित् एखादी थाळी याशिवाय अन्य वस्तू नसे. स्नान त्रिकाल असे. वस्त्रे धुणें आदि स्वतःची कामे स्वतः करीत. कोणाचा स्पर्श नसे, झाल्यास पुनः स्नान होई.

प्रवासात नदीच्या तीराने जावे. दोन प्रहरी जो गाव लागेल, त्या गावातील मंदिरात उतरावे आन्हिक करून श्रीदत्तमूर्तींची पूजा करावी. दक्षिणी ब्राह्मणाच्या तीन घरची भिक्षा आणावी अग्र भिक्षा नदीस अर्पून शेषान्न सेवावे दर्शनास कोणी आल्यास उपदेश करावा. असा क्रम असे. उत्तरेत दक्षिणी सख्या अत्यल्प अशा वेळी महिना महिना भिक्षा नसे. खारीक खोबरे अशा पदार्थांवर दिवस जात पण नियमाचे कठोर पालन होई.

वर्षाऋतूत मात्र चातुर्मासानिमित्त एकाच ठिकाणी दोन महिने वास्तव्य होई. शके १८१३ मध्ये श्रीमहाराजांनी संन्यासाश्रम घेतला. शके १८३६ मध्ये अवतार समाप्ती केली. या अवधीत श्रीमहाराजांचे एकदर चोवीस चातुर्मास झाले. ब्रह्मावर्त, सारगपूर, हवनूर पवनी, कुरुपुर, नरसी, बढवाई चिखलदा आणि गरुडेश्वर या स्थानातील चातुर्मास विख्यात आहेत. काश्मीर, पजाब, बगाल या प्रान्तात श्रीमहाराज गेले नाहीत. काश्मीरमध्ये जाण्याची प्रभूंची आज्ञा झाली होती. मात्र त्यांचा आग्रह धरला नाही. हिमालयात दोन चातुर्मास झाले असावेत. त्यांचा वृत्तांत मात्र उपलब्ध नाही. श्रीनृसिंहवाडीवर श्रीमहाराजांचे विशेष प्रेम. तेथील वास्तव्य अधिक काळ असे. श्रीगरुडेश्वरी अखेरचा चातुर्मास सव्वा वर्ष चालला.

श्रीमहाराजांची चातुर्मासातील दिनचर्या मोठी चित्ता-कर्षक असे. प्रातःकाळी सूर्योदयापूर्वी उठावे. योगसाधना करावी योगाभ्यासकाना मार्गदर्शन करावे. स्नानास नदीवर जावे. स्नानाच्या वेळी बरोबर मडळी असावयाची. स्नान-संध्यादि सपवून श्रीदत्तमूर्तींचे अर्चन करावे. मंदिरात आल्यावर जिज्ञासूना वेदशास्त्र, उपनिषदे यांचा पाठ द्यावयाचा. यात एक प्रहर जाई. नतर सर्वांना तीर्थप्रसाद मिळे. त्यावेळी कोणास औषध, कोणास जप, कोणास तप तर कोणास अनुष्ठान असे अधिकारानुरूप सागणे होई.

चातुर्मासाचे स्थान रेल्वे स्टेशनपासून फार दूरवर असे. येणाऱ्या मडळींची व्यवस्था रेखीव असे. भोजन एक वेळ

होई. रात्री प्रसाद मिळे. पुराण, कथा, कीर्तन, प्रवचन, भजन या द्वारा धर्मशिक्षण होई. किंबहुना श्रीमहाराजांची दिनचर्या हीच एक पाठशाळा असे.

## ईश्वरी वाङ्मय संपदा

अशा चातुर्मासातच श्रीमहाराजांनी आपले ईश्वरी वाङ्मय निर्मिले. उपास्य दैवत श्रीदत्तात्रेय. त्यामुळे श्रीमहाराजांच्या वाङ्मयातील प्रधान प्रतिपाद्यही श्रीदत्तात्रेय. या वाङ्मय निर्मितीची अनुज्ञा श्रीदत्तप्रभूंची.

माणगावी पूर्वाश्रमातील 'द्विसाहस्री' हा प्रसाद ग्रंथ श्रीदत्तप्रभूंच्या आज्ञेनेच निर्माण झाला होता. त्याचा आधार मराठी 'श्रीगुरुचरित्र' हा सिद्ध ग्रंथ होय. याच मूळ चरित्रावर आधारित–श्रीगुरुसंहिता त्रिशति गुरुचरित्र काव्य हे दोन संस्कृत आणि सप्तशति गुरुचरित्र हा मराठी–असे तीन ग्रंथ श्रीमहाराजानी लिहिले.

' श्रीगुरुसंहितेचे 'समश्लोकी गुरुचरित्र' असे दुसरे नाव आहे. त्याची निर्मिती गंगा तीरावर ब्रह्मावर्तास १८२४ मध्ये झाली. रोज २००/२५० श्लोक रचना होऊन ५१ अध्यायाचा हा प्रचंड ग्रंथ अवघ्या महिना – सवा महिन्यात पुरा झाला. श्रीगुरुचरित्र सर्व भारतभर ज्ञात व्हावे ही संस्कृत रचनेतील दृष्टी होती. मराठी गुरुचरित्र ब्राह्मणानी स्नान–संध्या करून सोवळ्यात वाचावे अशी पद्धति आहे. हे ज्यास शक्य नाही अशाकडून काही वाङ्मय तप व्हावे या दृष्टीने सप्तशती गुरुचरित्राची रचना आहे. या ग्रंथातील प्रत्येक ओवीतील तिसरे अक्षर क्रमाने वाचले तर श्रीमद्भगवद्गीतेतील पंधरावा अध्याय तयार होतो. हा एक विशेष बुद्धि–विलास होय.

त्रिशति गुरुचरित्र काव्याची रचना वाडी येथील पुजकाच्या मुलासाठी झाली. त्याच्याचसाठी श्रीदत्तचंपू हाही ग्रंथ रचिला गेला. श्रीदत्तपुराण हा श्रीमहाराजाचा आणखी एक प्रसाद ग्रंथ होय. यातील भाग श्रीदत्तचंपूमध्ये संक्षेपाने आहे. पुराण आणि इतिहास यामधून श्रीदत्तप्रभूंचे जे चरित्र आहे, ते सर्व सार रूपाने श्रीदत्तपुराण या ग्रंथामध्ये आले आहे. एखाद्या संशोधनात्मक प्रबंधासारखे या ग्रंथाचे स्वरूप आहे. या श्रीदत्त पुराणाची रचना ऋक्संहिते सारखी असून प्रथमाध्यातील प्रत्येक श्लोकात ऋग्वेदातील मंत्रभाग मूळ स्वरूपात उध्दृत आहे. हा अध्याय 'वेदपाद स्तुति' म्हणून विख्यात आहे. वेदवाङ्मयाचा श्रीमहाराजांचा व्यासंग किती गाढ होता; याचा हा पुरावाच होय. किंबहूना श्रीमहाराज हे स्वयं वेद पुरुष होते यात संशय नाही.

श्रीदत्तपुराणातील उपासना काडाचा भावार्थ वर्णिणारा श्रीदत्तमहात्म्य हा मराठी ग्रंथ श्रीमहाराजांनी लिहिला आहे. हा ग्रंथहि अनेकार्थानी अपूर्व असा आहे. श्रीदत्त महात्म्यात कार्तवीर्यार्जुन, अलर्क, आयु, नहुष, यदु, आदि. प्राचीन दत्त भक्ताची चरित्रे आहेत. आचारधर्म, पतिव्रताधर्म. राजधर्म, अष्टांगयोग, उपासना महात्म्य. तत्त्वज्ञान, प्रवृत्ति निवृत्ति, जीवन मुक्ताचा व्यवहार, ज्ञानोत्तर भक्ति – अशा विविध विषयांचा अत्यत विलोभनीय परामर्श आहे. भारतीय-जीवन-दृष्टीचा हा एक 'दर्शन' ग्रंथच होय! श्रीमहाराजांचे सर्वच ग्रंथ श्रीदत्त प्रभूस्तव झाले. तथापि श्रीमहाराजांनी

'विहार तुझ्या स्वभक्त हृदयात। तूं भक्ताधीन सतत
मी मागतो पसरून हात। या ग्रंथी सतत सान्निध्य ठेवी॥'

अशी विशेष प्रार्थना श्रीदत्तमहात्म्यात केली आहे. यावरून या ग्रंथाची योग्यता आणि प्रयोजन ध्यानात येईल.

श्रीदत्तमहात्म्य हा पाच हजार ओव्याचा ग्रंथ आहे. त्याचाही संक्षेप करून एक हजार श्लोकाचा 'श्रीदत्त लीलामृताब्धिसार' हा मराठी ग्रंथ श्रीमहाराजानी रचिला आहे. साधन सुलभ व्हावे हीच यात दृष्टी आहे. श्री महाराजाची सामान्यजना विषयीची वत्सलता अपार होती.

भगवत प्राप्तीचे साधन मार्ग अनंत. एकरूप असले तरी साधकाच्या अधिकारानुरूप साधन मार्ग वेगवेगळे रहतात. श्रीमहाराजानी या विषयाचे अत्यंत प्रसादपूर्ण विवेचन कुमारशिक्षा, युवाशिक्षा आणि वृद्धशिक्षा या 'शिक्षात्रय' ग्रंथात केले आहे.

## श्रीमहाराजांचा सर्वात्मभाव

भगवान श्रीदत्तात्रेय हे श्रीमहाराजाच्या सर्व लेखनाचे प्रतिपाद्य असले, तरी श्रीमहाराज स्वयं ईशरूप सर्वात्मभावी अद्वैत दृष्टी होते. सर्व देवतामध्ये उपास्य देवतेचे दर्शन व्हावे आणि सर्व देवताची उपास्यरूपांनी अनुभूति घ्यावी — हे उपासना शास्त्राला अनुसरूनच आहे. श्रीमहाराजाच्या' अभेद अद्वैत दृष्टीचा प्रत्यय त्याच्या स्तोत्र वाङ्मय-

थात येतो. श्रीमहाराजांनी सर्व देवांची स्तुतिस्तोत्रे अनेकशः गायिली आहेत. संचारात श्रीमहाराज ज्या ज्या गावी जात त्या त्या स्थानच्या ग्रामदेवता साक्षात् दर्शन देऊन श्रीमहाराजांचे स्वागत करीत. काही प्रसंगी तर देवतांनी श्रीमहाराज आपल्या स्थानी यावेत असा आग्रह धरला आहे. एकदा श्रीमहाराज गंगातीरावर दीर्घकाल राहिले. आपल्याही तीरावर श्रीमहाराज यावेत म्हणून श्रीनर्मदा मातेने हट्ट केला! श्रीमहाराजांची नर्मदालहरी प्रसिद्ध आहे. अशीच रचना आपल्याविषयी असावी अशी श्रीकृष्णामातेने इच्छा दर्शविली आणि श्रीकृष्णालहरी निर्माण झाली.—साऱ्या चराचर सृष्टींनी श्रीमहाराजांच्या वर अपार प्रेम केले.

वर्णाश्रम धर्म श्रीमहाराजांच्या रूपाने साकारला होता. तथापि सर्व धर्मांविषयी त्यांचा समभाव होता. प्रसंगी मशीदीचा जीर्णोद्धार श्रीमहाराजांनी करविला असून यवन आर्तांना कुराणातील मंत्रही दिले आहेत.

## भाष्यतुल्य टीका साहित्य

श्रीमहाराजांनी आपल्या सर्व संस्कृत ग्रंथावर स्वतः टीका लिहिल्या आहेत. त्या टीकाहि 'भाष्य' तुल्य आहेत. कित्येकदा मूळ ग्रंथ जवळ नसताही केवळ स्मरणाने टीका झाली आहे. लौकिक अर्थाने श्री महाराजांचे अध्ययन अत्यल्प झाले. परंतु श्रीमहाराजांचे सर्व ग्रंथ-व्याकरण, न्याय, वेदान्त, मीमांसा, साहित्य, योग, सांख्य इत्यादि सर्व शास्त्र-प्रमेयांनी युक्त असे केवळ प्रमाण ग्रंथ ठरले आहेत. भगवान् नृसिंह सरस्वती दत्तप्रभूंनी उपनयनाच्या वेळी चार वेदांचा उच्चार केला. आणि तदुत्तर पहिल्याच वर्षी शास्त्राध्यापन केले. त्या चरित्राचे हे पुनर्दर्शनच होय.

येवढे ईश्वरी वाङ्मय निर्मूनही श्रीमहाराजांची अलिप्तता, साधुता विलक्षण होती. 'द्विसाहस्र' वरील टीकेविषयी श्रीमहाराज म्हणतात-" ही टीका होणे येवढा या व्यक्तीचा अधिकार नाही. रामोश्री करणाऱ्या मुखाचे हे माहात्म्य नव्हे. तर श्रीस्वामींचा अनुग्रह स्वमहिमाख्यापक श्रीगुरु प्रसाद जाणावा."

• द्विसाहस्रीचा स्वाहाकार करावा असा एकास हट्टात झाला त्यांनी अनुज्ञा मागितली तेव्हा-" मनुष्य प्रणीत ग्रंथाचे अनुष्ठान करू नये..मग त्याचा स्वाहाकार कोणी सांगावा? व हा ग्रंथ मी केला असाही अभिमान श्रीगुरुची इच्छा असेल तसे घडो"—असे उत्तर देण्यात आले आहे या उत्तरावर काय लिहावे!

श्रीमहाराजांचे वाङ्मय ईश्वरी असून त्याचे पठण हे एक भगवत् प्रसादाचे सुलभ साधन ठरले आहे.

## विलोभनीय भक्तियोग

श्रीमहाराज ज्ञानयोगी होते. सारे ज्ञान त्यांच्या रूपाने साकारले होते. तथापि श्रीमहाराज श्रेष्ठतम भक्तही होते. बरोबर असलेल्या दत्तमूर्तीचे अर्चन अखेरपर्यंत अत्यंत प्रेमपूर्वक चालू होते. एकदा एकांनी 'संन्यासाश्रमात मूर्ति-पूजा कशासाठी' असा प्रश्न केला होता. त्यावर, 'त्या मूर्तीच्या पूजनाने ब्राह्मीस्थिती प्राप्त झाली. त्या मूर्तीचे पूजन त्यागावे कसे?' असा श्रीमहाराजांनी प्रतिप्रश्न केला. त्यातून लोकांच्या समजुतीसाठी श्रीदत्तमूर्ती गंगेमध्ये सोडली. तेव्हा मूर्ति स्वयं श्रीमहाराजांसमोर उपस्थित झाली

'भक्ति ज्ञानाचे साधन आहे आणि ज्ञानोत्तर भक्ति ही कृतज्ञता-दर्शक आहे. राज्यशासनाला राजमुद्रेचा जसा अभिमान असतो, तसा निर्गुण परमात्म्याला आपल्या सगुण स्वरूपाचा अभिमान असतो.' असे श्रीमहाराजांचे प्रतिपादन असे.

## दत्तभक्तीची उत्कटता

श्रीमहाराजांच्या जवळील श्रीदत्तमूर्ति ही नृसिंह-वाडीतील श्रीदत्त प्रभूंची छायामूर्तीच होती. जेव्हा वाडीस श्रीमहाराज येत तेव्हा ते सांगतः 'माहूर, गिरनार अशा अवघड जागी राहणारा परमात्मा केवळ भक्तासाठी येथे उघड्या माळावर येऊन राहिला आहे.'—आणि श्रीदत्तप्रभु, श्रीकृष्णामाता यांच्या स्मरणाने गहिवरून येत. महापुरुषाच्या भक्ति प्रेमाचे केवढे हे उदात्त, उत्कट दर्शन!

एकदा दिवाळीत वाडीतील श्रीदत्तपादुकावर अति-कढत पाणी घातले गेले. त्याचा परिणाम श्रीमहाराजांच्या शरीरावर झाला. पूजक मंडळी पुढे अधिक दक्ष राहिली आणि श्रीमहाराज बरे झाले. उपास्य देवतेशी

श्रीमहाराजाची अशी अति निलोभनीय एकरूपता होती श्रीपादुकांच्या अर्चनात जेव्हा काही कमी अधिक होई तेव्हा वाडीवर सकट येई आणि श्रीमहाराज असतील तेथून वाडीस येत पूजकाना मार्गदर्शन करीत श्रीदत्तप्रभूचा क्रोध शान्त व्हावा म्हणून प्रार्थना करीत अशाच एका प्रसगी श्रीमहाराजाची "शान्त हो श्रीगुरुदत्ता" ही विख्यात करुणा-त्रिपदी निर्माण झाली आज सर्व श्रीदत्तस्थानातून ही करुणात्रिपदी नित्य गायिली जात

## अलौकिक योगैश्वर्य आणि

श्रीमद्भगवद्गीतेमध्ये भगवन्तानी योगविद्या सागितली आहे त्यात वर्णिलेल्या "सर्व सकल्प सन्यासी योगारूढ पुरुषाचे" श्रीमहाराज हे साक्षात्कृत उदाहरण होत योगसिद्धी प्रसन्न राहूनही त्याचा स्वत साठी यत्किञ्चितही वापर केला नाही मात्र भक्ताना त्याच्या श्रद्धा बलाने श्रीमहाराजाच्या योगसिद्धीचा लाभ यदृच्छया झाला मृत अर्भकाचे सजीवन, अल्प पाक सिद्धीतून सहस्रावधींचे भोजन, असाध्य व्याधीचा उपशम-अशी कृपेची अनुभूति श्रीमहाराजाच्या निजभक्ताना आली आहे. शके १८३६ मध्ये श्रीमहाराजानी अवतार समाप्त केला त्यानतरही या क्षणापर्यंत स्वप्नादिरूपाने मार्गदर्शन, आदेश याचा लाभ अनेक भाग्यवन्ताना होत आहे

## तत्प्रसादरूप दत्तावतार

श्रीमहाराजाच्या—प्रत्यक्ष या दृष्टान्तादिद्वारा झालेल्या कृपा प्रसादाने अनेक दत्तावतार सिद्ध झाले

नृसिंहवाडी येथील श्रीनृसिंह सरस्वती दीक्षित स्वामी—पूर्वाश्रमीचे श्रीनारायण दीक्षित—हा असा पहिला दत्तावतार या श्रीदीक्षित स्वामींना सध्यादि सर्व आचारधर्माचे शिक्षण श्रीमहाराजानी स्वत दिले श्रीमहाराजाचे हे एकमेव दण्डी शिष्य होत श्रीदीक्षित स्वामी यानी नृसिंहवाडी येथे कृष्णेच्या पूर्व तीरावर श्रीवासुदेवानद सरस्वती पीठ स्थापून श्रीमहाराजाचे सर्व वाङ्मय सग्रहीत केले याची समाधि भयोध्येस झाली

श्रीमहाराजाच्या प्रत्यक्ष अनुग्रहाने पुण्य नगरीत श्रीगुळवणी महाराज असख्य साधकाना पावन करीत आहेत श्रीगुळवणी महाराजानी आपल्या तपाबलाने पुणे येथे श्रीवासुदेवानद सरस्वती ग्रथमाला स्थापून श्रीस्वामी महाराजाचे सपूर्ण वाङ्मय मुद्रित करून भक्त, साधक, जिज्ञासु आणि चिकित्सक अशा सर्वांना उपलब्ध करून दिले आहे योगातील 'शक्तिसक्रमण' या सहजयोगाचे एक परम अधिकारी पुरुष म्हणून श्रीगुळवणी महाराज आज ख्यात नाम आहेत आणि त्याच्या प्रेरणेनेच आज पुण्यामध्ये, त्याचे गुरुद्वय श्रीमद्वासुदेवानद सरस्वती आणि वगीय योगी श्रीलोकनाथ तीर्थ याची स्मृति चिरतन करणारा 'श्रीवासुदेव निवास योगाश्रम' निर्माण झाला आहे

श्रीस्वामी महाराजाच्या स्वप्न दृष्टात मार्गदर्शनाचा फल स्वरूप असा मनोहर दत्तावतार पू रगअवधूत याच्या रूपाने नर्मदा तीरावर नारेश्वर येथे आज विराजमान आहे

पृ. रग अवधूत हे शब्दसृष्टीचे ईश्वर असून मराठी, गुजराथी, हिंदी, सस्कृत आणि इग्रजी अशा अनेक भाषाचे प्रभु आहेत. पू रग अवधूताची रचनाही ऐश्वरी आहे मराठी ही पू रग अवधूताची मायबोली परतु श्रीदत्तप्रभूचे लीलाचरित्र वर्णिणारा पू. रग अवधूताचा 'श्रीगुरु लीलामृत' हा त्रिकाण्डात्मक गुजराथी ग्रथ गुर्जर सरस्वतीचे अनमोल लेणे ठरला आहे मराठी श्रीगुरुचरित्राप्रमाणेच हे लीलामृतही वेदतुल्य आहे. यातील दुसऱ्या भागात मराठी श्रीगुरुचरित्रातर्गत चरित्र असून पहिल्या भागात श्रीदत्तप्रभूचे पुराणान्तर्गत चरित्र आहे आणि तिसरा भाग श्रीमद्वासुदेवानद सरस्वतींच्या चरित्रामृताचा आहे. श्रीस्वामीमहाराजाच्या दत्तावतारित्वाचे हे एक प्रमाण होय

## आचार धर्माचा अमृतोपदेश

साक्षात् ईशस्वरूप असूनही श्रीमहाराजानी केवळ लोकोपकारार्थ सर्व आश्रमधर्म अत्यत कटाक्षाने आचरिला व्रतभग वा वचनभग होऊ नये म्हणून श्रीमहाराजानी प्रसगी श्रीदत्तप्रभूची आज्ञाही बाजूस सारिली असा इतिहास आहे.

## श्रीमहाराजाचा अमृतोपदेश

पूर्वाश्रमात अभिचाराचा प्रयोग झाला होता त्याने अतिसाराचा विकार जडला त्याचा प्रतिकार केला नाही निर्याणाच्या काळात याच व्याधीने उचल खाल्ली तथापि

अगदी शेवटच्या दिवशी देखील श्रीमहाराजांनी नित्यकर्म करण्याचा प्रयत्न केला.

"स्वकर्मांच्या आचरणानेच अंतःकरण शुद्ध होते. अंतःकरण शुद्ध झाले तर उपासना स्थिर होते. उपासना स्थिरावली तर मन शान्त होते आणि मन शान्त झाले म्हणजे आत्मज्ञान होऊन ईश्वराचा लाभ होतो. मनुष्याने वेदान्त, गुरु आणि ईश्वर यांची सेवा यावज्जीव करावी." हा श्रीमहाराजांचा अमृतोपदेश आहे.

'कलौ योगिराजो भविष्यति'

भविष्य-पुराणात असे वचन आहे. भगवन्ताने या वचनाची पूर्ति श्रीमहाराजांच्या रूपाने केली.

जगत्-पिता प्रभु श्रीमत् शंकराचार्यांच्या रूपाने अवतरला. माया युक्तावधूत आणि माया मुक्तावधूत भगवान दत्तात्रेय श्रीमद्वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराजांच्या रूपाने अवतरला.

—असा हा अत्यंत चित्ताकर्षक लोकोत्तर दत्तावतार नर्मदेच्या तीरावर श्रीगरुडेश्वरी आनंद संवत्सरात शके १८३६ आषाढ शु. प्रतिपदा या दिवशी लौकिकार्थाने समाप्त झाला.

सगुण परमात्म्याचे गुणवर्णन वाणीला पावन करते असे श्रीमहाराजांचे वचन आहे. श्रीमहाराजांचे हे चरित्रामृत— सर्वांना पावन करील.

—डॉ. दि. व. केळूर
(एम्. ए., पीएच्. डी.)



# दत्तयोगी श्रीवामनराव गुळवणी महाराज

## यांचे चरणी



### श्लोक

परमार्थ साधावया तीन योग । आत्मज्ञान भक्ति तिजा राजयोग ॥
सिद्धि मिळे नमुनि गुरूपदाला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ १ ॥

दत्तावतारी श्रीवासुदेव । वैराग्य ज्ञाना देई सदैव ॥
दृष्टी दिली दिव्य शिष्योत्तमाला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ २ ॥

जागृत हो कुंडलिनी जयाची । असे कृपा लोकनाथ प्रभूंची ॥
दिले शक्तिपाता सामर्थ्य ज्याला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ३ ॥

साध्वी उमाबाई माता जयाची । पतिव्रता स्त्री दत्तात्रेयाची ॥
श्रीदत्तगुरु दे तिज या सुताला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ४ ॥

मिळाल्या प्रसादार्थ श्रीपादुका त्या । सुगंधयुक्त ग्वन्या चांदिच्या त्या ॥
पूजेत त्या ठेविल्या पादुकाला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ५ ॥

तपो-बलाने गुरू-ग्रंथ-माला । पुरी करोनी दे साधकाला ॥
गुरूकृपें जो स्वानंदी रमला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ६ ॥

आत्मप्रभावें करि शक्ति जागी । शिष्याची, व्हाया परिपूर्ण योगी ॥
दिक्षा दिली ती मज पामराला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ७ ॥

असे पूर्ण ज्ञानी सदाचारी शांत । वैराग्य तळपे जसा सूर्यकांत ॥
न हो षड्रिपू-त्रास ज्याच्या मनाला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ८ ॥

निर्व्याज प्रेमे मार्गास दावी । इच्छा कशाची नच त्यास ठावी ॥
सौजन्य समबुद्धिचा योग झाला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥ ९ ॥

जरी ब्रह्मचारी विश्रांती नाहीं । हे विश्व अपुले समजून राही ॥
कष्टा करी उद्धरी मानवाला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥१०॥

माझ्या मनीचे अज्ञान जाया । दिक्षा दिली ती सुफल कराया ॥
विनंती असे ही मिळाया कृपेला । नमस्कार माझा श्रीवामनाला ॥११॥

गुरु वासना, कामना त्रास देते । कळते परी ते नच पूर्ण होते ॥
दावी मला सत्वरी सत्पथाला । नमस्कार माझा तुझिया पदाला ॥१२॥

—भास्कर एकनाथ सोमणी

# प. प. वासुदेवानन्द सरस्वतींची

# स्फुट कविता

सिद्धयोगी श्रीमद्वासुदेवानद सरस्वति याचे विभूत मत्व हे योग, ज्ञान व भक्ति याचे सगमस्थान असून दत्त सांप्रदायातील अवतारी पुरुषात त्याची गणना होते जे काही थोडे आध्यात्मिक पुरुष साहित्य निर्मितीचेही केंद्र स्थान ठरले आहेत, त्यात वर्तमान युगात श्रीमद्वासुदेवानद सरस्वति हे अग्रगण्य होत मोठमोठ्या ग्रथाच्या निर्मितीबरोबरच त्यानी प्रासगिक स्वरूपाची स्फुट काव्य रचनाही पुष्कळ केली आहे त्याची स्फुट कविता संस्कृत व मराठी अशा दोन्ही भाषात आहे देवता-स्तोत्रे हे त्याच्या संस्कृत स्फुट कवितेचे प्रधान स्वरूप असून पदे, उपदेश पर अभग, पाळणे, आरत्या, वेदातपर व उपदेशपर प्रकरणे हे त्याच्या मराठी स्फुट कवितेचे स्वरूप आहे

ही स्फुट कविता अध्यात्माच्या अधिष्ठानावर स्थिराव लेली असून तिचा मुख्य रस शात हा आहे पावित्र्याबरोबरच मार्गदर्शन व भक्तीच्या जिव्हाळ्याबरोबरच मत्रगर्भत हे त्याच्या संस्कृत व मराठी स्फुट कवितेचे समान विशेष आहेत.

## असाप्रदायिक भूमिका

प प वासुदेवानद सरस्वति हे स्वत: दत्तोपासक असून दत्त साप्रदायाच्या उपासनेला त्यानी परिपुष्ट केले हे प्रसिद्धच आहे असे असूनही त्याच्या अत करणाला साप्रदायिकतेचा स्पर्शही झालेला नाही आवडीचा विषय म्हणून त्यानी श्रीदत्तात्रेयावर सर्वात अधिक स्तोत्रे केली असली तरी गणेश, शिव, अन्नपूर्णा, नरसिंह, राम, कृष्ण, सूर्य, शक्ति, दशावतार, परशुराम, मारुति, व्यकटेश इत्यादि अनेक देवतावर सारख्याच उत्कटतेने आपली भावसुमनाजलि वाहिलेली आहे. याचे कारण एकाच परमेश्वरी चित्‌शक्तीचे वेगवेगळे देव हे आविष्कार आहेत, ही त्याची दृढ धारणा होती

"एक सद्विप्रा बहुधा वदन्ति"

या वैदिक धारणेचा आविष्कार करताना श्रीमद्वासुदेवानन्द सरस्वति म्हणतात –

विष्णु शिवो गणेशोऽर्क शक्तिश्चेति पृथड्नहि ।
एकोऽज पञ्चधा जात कुतो भेदोऽस्ति दैवते ॥
देवद्रोहस्त तस्याज्यस्तद भक्तस्यापिसर्वदा ।
तथा स्वीश्वर सेव्यो नान्यथा भेद माचरेत् ॥

'शिव, विष्णु, गणेश, सूर्य, शक्ति इत्यादि देवता परस्पराहून भिन्न नाहीत एकच परमेश्वर पाच प्रकारानी नटलेला आहे. देवतात का कुठे भेदभाव असतात' यास्तव देवाच्या एका आकाराचा अभिमान धरून देवा च्याच दुसऱ्या आकाराचा द्रोह करणे चुकीचे आहे कोणत्याहि प्रकारच्या देवाच्या स्वरूपाचा भक्त फक्त आपल्याला अभिप्रेत असलेल्या आकृतीचा भक्त नाही येवढ्याच कारणासाठी त्याचा द्वेष करणे चुकीचे आहे चित्ताच्या एकाग्रतेच्या दृष्टीने आपल्याला योग्य वाटेल

त्या स्वरूपाच्या देवाची भक्ति व उपासना करावी पण देवतात भेद कल्पू नये.'

आजच्या सांप्रदायिकतेच्या विरोधी म्हणून गाजलेल्या काळातही, समर्थ रामदास हे श्रीरामचंद्राचे उपासक असल्यामुळे त्याना संत मानता येत नाही, जे पंढरपूरच्या पांडुरंग देवतेचे भक्त आहेत तेच केवळ संत होत, असे आग्रहाने प्रतिपादन करणारे पंढरपूरच्या भा प. बहिरटाऱ्यासारखे वारकरी पंथाचे मुखंड पाहिले म्हणजे प । वासुदेवानंद सरस्वतींच्या विशाल व सर्वसमावेषक धारणेपुढे कोणीही नतमस्तक झाल्याविना रहात नाही

## राष्ट्रदेवतेचे दर्शन

श्रीमद्वासुदेवानंद सरस्वतींच्या स्तोत्र वाङमयातून भारतमातेच्या पवित्र व विशाल स्वरूपाचे समग्र दर्शन घडते गंगा, यमुना, सरस्वती, गोदावरी, नर्मदा, क्षिप्रा, कृष्णा, तापी, वेणा, पंचगंगा, घटप्रभा, तुंगभद्रा, कावेरी इत्यादि दक्षिणोत्तर भारतातील महत्वपूर्ण अशा सर्व पवित्र नद्यांच्या प्रवाहाकडे त्यांच्या प्रतिभेने झेप घेतलेली आहे वाराणसीपासून तर शिव काञ्ची, विष्णुकाञ्ची, पक्षितीर्थ व अरुणाचलमपर्यंतची पवित्र स्थळें त्याच्या प्रतिभेचा वर्ण्य विषय ठरलेली आहेत त्यानी संपूर्ण भारत अनेकवार आपल्या पदयात्रेचा विषय बनविला होता भारताच्या अस्मितेचा साक्षात्कार घड विणाऱ्या या पवित्र स्थळांचे त्यानी स्वत दर्शन घेतले व आपल्या प्रतिभेने सर्वांना ते शाश्वत घडविण्याची व्यवस्था केली या प्रत्येक वर्णनात सारखीच उत्कटता आढळते हे आगळे वैशिष्ट्य आहे उदाहरणार्थ दक्षिणेतील अरुणा चलमला त्यानी वाहिलेले भावपुष्प पहा —

काश्या मुक्तिर्मरणात अरुणाख्यस्याचलस्य तु स्मरणात्।
अरुणाचलेश संज तेजोलिंग स्मरेत्सदा मरणात् ॥ "

" काशीमध्ये मरणानें मुक्ति तर अरुणाचलाच्या केवळ स्मरणानेंच मुक्तीची प्राप्ति होते यास्तव अरुणाचलेश नावाच्या तेजोलिंगाचे आमरण स्मरण करणे कल्याणप्रद आहे "

## स्तोत्राची मंत्रमयता

स्तोत्राचे स्वरूप सामान्यत ईश्वराच्या प्रार्थनेचे असते वासुदेवानंद सरस्वतीमहाराजांच्या स्तोत्राचे आणखी एक वैशिष्ट्य असे आहे की, त्याची पुष्कळ स्तोत्रे मंत्रमय आहेत गणपति अन्नपूर्णा, शिव इत्यादि देवतास्तोत्रात पहिली, पाचवी, नववी व बारावी अशी अक्षरे एकत्राली एक अशी वाचली म्हणजे स्तोत्रकर्त्यांचे नाव, गणेश गायत्री मंत्र, महामृत्युंजय मंत्र, शिवपंचाक्षरी मंत्र, शिव व दत्त याचे गायत्री मंत्र, गणेशवेद मंत्र, अन्नपूर्णा मंत्र, मालामंत्र इत्यादि मंत्र गुफलेले आढळतात दत्तमहात्म्यात तर विशिष्ट अक्षरे सरळ वाचली म्हणजे श्रीमद्भगवद् गीतेचा पंधरावा अध्याय सरळ तयार होतो त्या त्या देवतेचे स्तोत्र म्हणताना स्तोत्र पाठाबरोबरच त्या त्या देवतेच्या मंत्र जपाचाही स्तोत्र पाठकाना लाभ व्हावा यास्तव ही योजना आहे. साहित्याच्या दृष्टीने या वाङ्मया कडे पाहणे उद्‌बोधक ठरेल

## साहित्याचा निकष

श्रीमद्वासुदेवानंद सरस्वतींच्या वाङ्मयात भक्तीच्या जिव्हाळ्याबरोबरच पांडित्याचा प्रकर्षही आढळूनच येतो साहित्य शास्त्रातील शब्दालंकार व अर्थालंकाराबरोबरच हारबंधासारखे बंधही त्यानी सहज लीलेने साधलेले आहेत गंगादि पुण्य नद्यावरील त्याची संस्कृत कविता जगन्नाथ पंडिताची आठवण करून देणारी आहे पण त्याच्या सर्व कवितेत त्याच्या प्रतिभेची उत्तुंग झेप आध्यात्मिक रूप कात्मक अशा त्याच्या कवितेत दृग्गोचर होते त्याची आध्यात्मिक रूपके, भव्यता, उदात्तता व आत्मप्रत्यय याना अलौकिक साक्षात्कार घडवितात श्रीमद् भागवताच्या दशमस्कंधातील ऋतुवर्णनाशीच केवळ या रूपकाची तुलना करता येईल

## त्रिवेणीवरील रूपक

त्याची काही रूपकें मी येथे उद्धृत करतो हिंदुस्था नात तीर्थराज प्रयागाचे विलक्षण महत्व असून ते गंगा, यमुना व सरस्वति या तीन पुण्यनद्यांचे संगमस्थान आहे या ठिकाणी वेणीदान करण्याची प्रथा आहे श्रीमद् वासुदेवानंद सरस्वति आपल्या ' त्रिवेणी ' या नितांत सुंदर कवितेत म्हणतात—

' इंद्रियाणां जडानां च विषयाणां च तादृशाम् ।
वैरस्य ज्ञानपूर्वं यद्विरक्ति सा प्रकीर्तिता ॥१॥
जडौघान्नश्वराद् दृश्याद् बुद्धि वृत्ति निवर्त्य च ।
चैतन्यप्रवणा कार्या भक्ति सा परिकीर्तिता ॥२॥
सर्वांतरोऽस्मि घनचित् प्रकाशात्मेति या मति ।
महावाक्य विचारोत्था सात्मज्ञप्ति प्रकीर्तिता ॥३॥

एताहि यमुना गगा सरस्वत्योऽत्र सगता ।
त्रिवेणी सैव तत्रैव स्नानायागाद्यघक्षम ॥
गुणत्रिवणीदान धी स्त्रियः कुर्यात् पुमानिह ।
पातस्त्रेच्छोद्‌भवो नात्र पुनरन्यत्र तद्‌भव ॥

" जीवन हीच वस्तुतः तीर्थ राजाची भूमि आहे. या भूमीत जड इन्द्रिये व विषय याच्या विषयीच्या विरक्तीची यमुना, नश्वर जगतापासून निवृत्त होऊन ईश्वरप्रवण झालेली बुद्धिवृत्तीची भक्तिरूपी सरस्वति व आत्मज्ञानाची गगा या तीन नद्याचा सगम झाला की या जीवन भूमिला जे पावित्र्य येते ते लौकिक प्रयागाहून कितीतरी श्रेष्ट आहे. साधकाने आपल्या बुद्धिरूप स्त्रीची, सत्व-रज-तम या तीन गुणानी गुफिलेली जी वेणी, तिचे जर दान केले, तर त्याला लौकिक वेणीदानाने कधीहि प्राप्त न होणारा मोक्ष सहज प्राप्त होईल."

## काशी-विश्वेश्वर

काशी विश्वेश्वरावरही महाराजानी असेच सुदर रूपक केले आहे ते असेः—

या षोडशकला काशी तनुरूपा प्रकाशते ।
ज्ञानगगान्विता यत्र शभुरात्मा प्रतिष्ठितः ॥ १ ॥
विश्वनाथःसात्विकधीभवान्यालिंगितःसदा ।
यद्दर्शनान्न पुनरावृत्तिः कल्पशतैरपि ॥ २ ॥

" वस्तुतः सोळा कलानी युक्त असलेले आपले शरीर हीच खरी काशी होय. या काशीतील विश्वेश्वर म्हणजे आत्मा असून ज्ञानरूपी गगेने ते अलकृत आहेत. अर्ध नारीनटेश्वराप्रमाणे सात्विक बुद्धिरूप भवानीच्या आलिंगनात ते सदा निमग्न असतात. याचे एकदा दर्शन झाले की पुनरावृत्ती कधीच होणार नाही." ही कविता वाचल्यावर "काया ही पढरी। आत्मा हा विठ्ठल" या तुकाराम महाराजाच्या अभगाची आठवण होणे अपरिहार्य आहे.

त्याचे वेदातपर रामायण व वेदातपर भागवत असेच हृदयगम आहेत. वेदातपर रामायणातील मालारूपक पहा :—

" दशेन्द्रियरथो देही राजा दशरथः स्मृत. ।
कौसल्या तत्प्रिया बुद्धी रामस्तत्रोद्‌गत. पर ॥ १ ॥
वृत्वा सीता स्वानुभूति सुखमास्तेऽथ दैवत. ।
संसारविपिन प्रापाहकारो रावणाभिध. ॥ २ ॥
राजसः स्वानुभूतिं तां सीता यत्नाज्जहार ह ।
रामः परात्मापि ततः स्वानुभूति वियोगतः ॥ ३ ॥
प्राप्तो दीनदशा दुःखी शुशोच विरहातुरः ।
परिभ्रमन्हनुमता विवेकेन च सगतः ॥ ४ ॥
तेन सीता स्वानुभूति स्थितिवार्ता प्रकाशिता ।
ततो वानरसद्‌वृत्तिसैन्येन च हनुमता ॥ ५ ॥
सेतु बध्वा सजलधी साधनाश्मभिरुत्कटैः ।
ततो भवाब्धिमुल्लघ्य दीप्तज्ञानाग्निना भृशम् ॥ ६ ॥
सूक्ष्मदेहांग्ल्यलका च दग्ध्वोपनिषदस्त्रतः ।
कामक्रोधादिरक्षांसि हत्वा युद्धे सहस्रशः ॥ ७ ॥
सात्विकाहकार बिभीषणसाहाय्यतस्ततः ।
कुंभकर्ण तामसाहकार राजसमप्यथ ॥ ८ ॥
निहत्य रावण स्वानुभूतिं सीता प्रगृह्य च ।
रामः स्वरूपसाम्राज्येऽभिषिक्तोऽरीरमतया ॥ ९ ॥

'दहा इंद्रियरूपी रथात राहणारा जो देही तोच वस्तुत. राजा दशरथ असून बुद्धि ही त्याची प्रिया कौसल्या होय. त्या युग्माचे ठिकाणी आत्माराम प्रगट झाला. तो स्वानुभूतिरूपी सीतेला वरून तिच्यासह निजानदात निमग्न असता दैवयोगाने ससाररूपी दडकारण्यात रावण नावाचा अहकार प्राप्त झाला. हा राजसाहकार होय. या राजसाहकाररूपी रावणाने स्वप्रयत्न करून स्वानुभूती रूप सीतेचे अपहरण केले. श्रीराम परात्मा असतानाहि स्वानुभूतीच्या वियोगामुळे दीन दशेला प्राप्त होऊन दुःखी झाला. तिच्या विरहाने आतुर होऊन शोक करू लागला. तो भ्रमण करीत असता विवेकरुपी हनुमताशी त्याचा सबध जुळला. या हनुमताने स्वानुभूतिरुपी सीतेच्या स्थितीची वार्ता आत्मारामाला सांगितली नतर विवेकरुपी हनुमान व सद्वृत्तीरुपी वानर सैन्य याच्या समवेत उत्कट साधनरुपी पाषाणाचा सेतू संसार समुद्रावर उभारून तो समुद्र आत्मारामाने उल्लघन केला नतर प्रदीप्त ज्ञानाग्नीने उपनिषदरुपी महास्त्राने सूक्ष्म देहरुपी लंका जाळून युद्धात सहस्रावधि कामक्रोधरुपी राक्षसाचा नाश केला. सात्विक अहकाररूपी बिभीषणाच्या साहाय्याने

हृदयगम आहे

**श्रीमहाराजांची मराठी कविता**

श्रीमद्वासुदेवानद सरस्वति याची मराठी कविता त्याच्या सस्कृत कविते इतकीच विपूल असून सगीत शास्त्राचा त्याचा परिचय किती सूक्ष्म होता याची त्या कवितेच्या रचनेवरून कल्पना येते. मराठीत त्यानी लिहिलेले गगाष्टक काही ठिकाणी सस्कृत गगालहरीची आठवण करून देणारे आहे. कल्पनात्मकतेतून ते भावजगतात प्रवेश करतात. तेव्हा त्याच्या कवितेला विलक्षण गोडवा व सुलभता उत्पन्न होते. एका ठिकाणी ते म्हणतात.

' पुरे करतील, प्रेमे दीपमाळ ।
पावे तोचि काळ भजनाचा ॥
लाभे जें जें स्थळ तें शुद्ध देऊळ ।
पावे तोचि काळ भजनाचा ॥
जेव्हा जें स्मरण तोचि क्रम जाण ।
भजनी सर्वा पूर्ण अधिकार ॥ '

विशुद्ध वर्णाश्रम धर्माचे कठोर कर्तव्यनिष्ठ स्वरूप ज्याच्या जीवनातून प्रगट झाले, त्याच्या हृदयाची केवढी ही श्रीमती आहे! आपल्या एका अभगात स्वतःला भगवताची कन्या कल्पून महाराज म्हणतात —

" भवसिधू माजी पडली मी आता ।
काढी वर ताता हात धरूनी ॥
हरावया कष्ट मुलीचे गुरुबाप ।
मग आपोआप धावे त्वरे ॥
त्वरे धाउनीया आली गुरुमाय ।
मलीचा अपाय हरावया ॥
काग वोरडसी काय झाले तुज ।
त्वा उगीच आज गाजवीले ॥
झाडावर तर चढोनिया खाली ।
पाहुनी आपुली पडछाया ॥
पडले प्रवाही बुडले मी आता ।
धावा हो वरता काढा म्हणें ॥
तेणें परी असे तुझें हें वचन ।
व्यर्थ तू भुन्न बोभाटसी ॥
बुद्धि सिंधुमाजी निज प्रतिबिंब ।
पाहोनिया क्षोभ पावलीस ॥'

श्रीमद्वासुदेवानद सरस्वतींची भक्ति ही साधकाची भक्ति नसून सिद्धाची भक्ति आहे. भक्ति ही साधनरूप असते तेव्हा ती खरी परिपक्व नसते. ज्ञानदेवानी आपल्या भावार्थ दीपिकेत सिद्धाच्या भक्तीचे अथवा ज्ञानोत्तर भक्तीचे हृदयगम वर्णन केलेले असून तिला मुक्तावस्थे हूनहि श्रेष्ठ असा पाचवा पुरुषार्थ मानलेले आहे या अवस्थेत भक्त, भगवान् व भागवत हे एकरूप होतात असे श्रीमद्रामकृष्ण परमहसानी म्हटले आहे. एकदा अद्वैत स्थितीत पोहोचल्यावर मग अभेद स्थितीत भक्ति सभवेलच कशी? असे पुष्कळाना कोडे पडते. म्हणून एकागी ज्ञानमार्गी, असभवनीयतेच्या कल्पनेने, ज्ञानोत्तर भक्तीचा पुरस्कार करणाऱ्याचा उपहास करतात. पण श्रीमदाद्यशकराचार्य, श्रीज्ञानदेव श्रीगुलाबरावमहाराज या सर्व ज्ञानी पुरुषानी आपल्या साहित्यातून ज्ञानोत्तर भक्तीचा पुरस्कार केलेला आहे. या सिद्ध पुरुषानी आपल्या जीवनातून तिचा प्रत्यक्ष आविष्कारहि केला आहे. श्रीमद्वासुदेवानद सरस्वती या भक्तीचा हृदयगम आविष्कार करताना म्हणतात.—

" जस पाषाणाचे कोरिले देऊळ ।
पाषाण केवळ देव त्यात ॥
देवाचा परिवार पाषाण सुदर ।
वस्त्र अलंकार पाषाणचि ॥
असें मज आता उमजे सर्वथा ।
पूजा करू जाता देवचि सर्व ॥
मी तू एक पूर्ण होता आवाहन ।
कैसेही करून पूजू देवा ॥
तूचि एक देवा भवक्ष पाषाण ।
तुजला आसन योजू केवी ॥
तुज अभिषेक करू तरी एक ।
दिससी उदक रूपी तू बा ॥
देवा जे जे द्यावें तुज उपचार ।
ते सर्व समाचार रूप तुझे ॥ "

आध्यात्मिक अधिष्ठान असलेल्या भावकाव्यात श्रीमद् वासुदेवानद सरस्वतींच्या मराठी कवितेचे स्थान वैशिष्ट्यपूर्ण आहे. श्रेष्ठ तत्वज्ञ आत्मसाक्षात्कारी सिद्ध व भक्त या त्याच्या तीन्ही भूमिका त्याच्या मराठी कवितेतून प्रगट झालेल्या आहेत. त्याचे सस्कृत व मराठी काव्य हे सस्कृत व मराठी सारस्वताचा अनर्घ्य अलंकार ठरेल

—म. म. बाळशास्त्री हरदास, नागपूर

# योगच तारून नेईल!

लोकमान्य टिळकांच्या गीतारहस्याची मोठी कामगिरी ही आहे, की कोणत्याही मानव समाजाची संस्कृति जर खरी समजावयाची असली, तर त्या समाजाची विश्वकल्पना (cosmology) नीट समजली पाहिजे हे त्यांनी सप्रमाण सिद्ध केले. नुसते तत्वज्ञान समजून भागत नाही. कारण, तत्वज्ञान हे जरी अंतिम ध्येय दाखवीत असले, तरी प्रत्यक्ष जीवनाशी संबंध विश्वकल्पनेचाच येतो. म्हणूनच, सर सी. पी. रामस्वामी अय्यर म्हणतात त्याप्रमाणे, भारतीय धर्म अथवा संस्कृति यांचे अंतरंग खरे समजावयाचे असेल, तर मुख्यत: कर्मतत्व आणि पुनर्जन्म हे सिद्धांत नीट समजले पाहिजेत आणि हे नीट समजावयाचे म्हणजे भारतीयांची सप्तलोकात्मक विश्वकल्पना समजली पाहिजे.

## भारतीयांची सप्तलोकात्मक विश्वकल्पना

या सप्तलोकात्मक कल्पनेचा विशेष हा आहे की पाश्चात्य पंडित किंवा त्यांचे भारतीय मानसपुत्र समजतात त्याप्रमाणे, ती अज्ञानातून निघाली नसून विज्ञानातून निघाली आहे, विज्ञानाच्या प्रत्यक्ष अनुभवातून निघाली आहे. विज्ञान म्हटले, की ज्या आजच्या विज्ञानाची कल्पना डोळ्यात येते, त्या विज्ञानापेक्षादेखील जास्त प्रगत अशा विज्ञानातून निघाली आहे आणि म्हणूनच, आजच्या विज्ञानाची जेथे गति कुंठित झाली आहे तेथे त्याने वाटचाल केली आहे आणि आजच्या विज्ञानाला जी रहस्ये अज्ञात आहेत, इतकेच नाही तर अज्ञेय वाटत आहेत, त्यांचा त्याने साक्षात्कार करून घेतला आहे.

अनंत अवकाशावर स्वामित्व करू पहाणाऱ्या आजच्या विज्ञानाला अजून दोन गोष्टींचा पत्ता लागला नाही. उत्तरोत्तर सृष्टि इतकी सूक्ष्मातिसूक्ष्म झालेली दिसते आहे, की यापुढे तिचे ज्ञान कसे मिळवावे असा प्रश्न पडला आहे. सृष्टीचे नियम कळले आहेत. मानवी सुखाकरता त्यांचा हवा तसा उपयोगही करून घेता येतो. परंतु सृष्टीचे रहस्य अजून थोडेही कळले नाही. याचे कारण असे आहे, की अर्वाचीन विज्ञानाची सारी भिस्त प्रयोगशाळेवर आहे. प्रयोगाने सिद्ध होईल तेवढेच खरे मानावयाचे, असाच त्यांचा बाणा आहे आणि तो योग्यही आहे. प्रत्यक्षानुभूति प्रयोगानेच प्राप्त होते. आपल्याकडेही प्रत्यक्षानुभूतीला श्रुतीपेक्षाही जास्त महत्व देण्यात आले आहे. परंतु प्रयोगानेच असे आढळून येत आहे, की अत्यंत सूक्ष्म अशा सृष्टीचा प्रयोगाने अनुभव करावयाचा तर अत्यंत सूक्ष्म अशी प्रयोगाची साधने आणावयाची तरी कुठून ? प्रयोगाकरिता सोन्याचा अत्यंत पातळ पत्रा म्हणजे एका इंचात दशलक्ष पत्रे बसतील इतका पातळ बनवला तरी तो अक्षरश: स्थूलच ठरतो. तेव्हा आता शास्त्रज्ञ म्हणू लागले आहेत, की त्या मूळ रहस्याशी काय करावयाचे आहे ? सृष्टीचे

नियम समजून त्याचा मनुष्याला आपल्या इच्छेप्रमाणे उपयोग करता आला म्हणजे झाले! (Science is not Concerned with the why of things) परंतु खऱ्या विचारी माणसाचे याने समाधान कसे होईल?

## विचारवन्तापुढील प्रश्न

विचारी म्हणून जो कोणी आहे, मग तो सृष्टीच्या पाठीवर कोठेही असो, त्याच्यापुढे अनादिकालापासून पडलेला प्रश्न सृष्टीचा उपयोग कसा करून घ्यावा, हा नाही. हे मानवी जीवनाचे कोडे काय आहे? या सृष्टीत चेतन आणि अचेतन असे दोन प्रकार काय म्हणून आहेत? ते खरे आहेत किंवा आभासमय आहेत? खरे म्हटले तर मूळ काय? चेतन का अचेतन? यापैकी कोणतेही मूळ म्हटले तर त्यातून दुसरा प्रकार का व कसा उत्पन्न झाला? अशा अनेक प्रश्नांचा अंतर्भाव ज्यात होतो तो मुख्य प्रश्न म्हणजे हा सर्व व्यवहार करणारा, ज्याला जड, भौतिक व अतिभौतिक म्हणजे मानसिक अशी तीन अंगे आहेत, तो मनुष्य जीव काय आहे? हा आहे. इतका सर्व व्याप करून सृष्टीवर सत्ता गाजविण्याची हाव धरणारा मनुष्य जीव, मात्र हे सर्व करीत असता अगस्तिपण एका क्षणात परंतु नाहीसा कसा होतो? त्याचा मागमूसही मागे रहात नाही हे गौडबंगाल काय आहे? हा जर पत्ता नसेल तर सारे करायचे तरी कशाला आणि जास्त जगायचे तरी कशाला? एक दिवस व्हाडे काय आणि शंभर वर्ष व्हाडे काय सारखेच, मग आजच या जीवनाचा अंत का करू नये, असे वाटणे साहजिक आहे आणि त्याप्रमाणे वेड, आत्महत्या, गुन्हे यांचे प्रमाणही वाढत आहे.

या साऱ्या प्रश्नांना अर्वाचीन विज्ञानाचे उत्तर गीतेत म्हटल्याप्रमाणे,

' असत्यमप्रतिष्ठं ते जगदाहुरनीश्वरम् ।
अपरस्परसंभूतं किमन्यत्कामहैतुकम् ॥ '

हे आहे. या साऱ्या विचारात शिरणे हेच खोटे. समोर आहे तोपर्यंत त्याचा उपभोग घ्यावा. जास्त खोलात जाऊ नये व तसे जाण्याची आवश्यकता देखील नाही. या टाळेझाकणीचे खरे कारण हेच आहे की प्रयोगशाळा कुण्ठित झाली आहे. हा प्रश्न आपण मानलेला आहे. असे यथार्थतेने म्हणण्याचा अधिकार फक्त भारतीय प्रज्ञावंतानाच आहे. याचे कारण असे आहे की प्रत्यक्ष अनुभव देणारे असे एक प्रयोगशास्त्र त्यांच्या हाताशी आहे. इतकेच नाही तर त्याचा अनुभव घेणारांची परंपरा, कोणत्याही का प्रमाणात असेना, आजपर्यंत अव्याहत चालत आली आहे.

ब्रह्मर्षि अण्णासाहेब पटवर्धन, स्वामी विवेकानंद, स्वामी रामतीर्थ, श्रीअरविंद यांच्यासारख्या पाश्चात्य विद्या विभूषितांनीहि त्याचा अनुभव घेतल्याची साक्ष आहे. ते प्रयोगशास्त्र-म्हणजेच भारतीयांचे योगशास्त्र.

## योग हे केवळ भारतीय शास्त्र

भारताच्या कोणत्याही गोष्टीबद्दल कितीहि मतभेद असले, तरी एक गोष्ट सर्वमान्य आहे. योग हे केवळ भारतीय शास्त्र आहे ही गोष्ट निर्विवाद आहे. तसेच ते अत्यंत प्राचीन आहे याविषयीही शंका नाही. इडा, पिंगला, सुषुम्ना यांचे ज्ञान अमेरिकेतील पुरातन रहिवाशांनाहीसुद्धा होते, असे न्यायमूर्ति वुड्रफने शोध घेऊन लिहिले आहे. असेही म्हणता येईल, की जरी प्रत्यक्ष हे शास्त्र अवगत नसले तरी जगात जी म्हणून धार्मिक साधने आहेत अथवा जादूटोण्यासारखे प्रकार आहेत, त्या सर्वांचे मूळ योगशास्त्रात सापडते. इतकेच नाही तर आजच्या विज्ञानाला ज्या गोष्टी नुकत्याच समजू लागल्या आहेत, त्याही त्यात सापडतात. त्याचे तत्त्वही एकच आहे. उदाहरणार्थ विज्ञानाच्या लक्षात आता कोठे आले आहे, की विविधरूपांनी नटलेले हे विश्व खरोखर एकजिनसी आहे व त्यात जे भिन्न प्रकार दिसतात ते केवळ, त्या मूळ एकजिनसी वस्तुतत्त्वाच्या परमाणूंच एकमेकांत मिळून जाण्याचे पर्याय वगैरे वगळे झाल्यामुळे दिसतात—याला प्रतिसिद्धान्त असा, की जर काही प्रयत्नाने हे पर्याय बदलता आले, तर त्या वस्तूच्या रूपात व गुणधर्मात ही फरक होईल याचाच अर्थ असा की मनुष्याला कोणत्याही वस्तूचे वाटेल त्या द्रव्यात रूपांतर अथवा कोणत्याही अनुभवाचे वाटेल त्या अनुभवात परिवर्तन करता येईल. अर्वाचीन विज्ञानाची ही एवढी प्रचंड प्रगति मूळ ज्या नियमांवरून झाली, त्यांची पूर्तता अशा रीतीने आज त्या विज्ञानाने केली आहे. परंतु सर्वांपूर्वी पुष्कळ विज्ञानशास्त्र परिपूर्ण भरली होती. त्या वर्गेस गम्यमता

गोष्ट लावणारी मादाम क्युरी उपस्थित होती. तिने आपल्या भाषणात सांगितले होते, की लोखंडाचे सोने आम्ही आज बनवू शकतो. या असल्या परिवर्तनाचे, विज्ञानाचे आणि योगाचे तत्त्व एकच आहे. वस्तुतत्त्व एक असता त्याचे असे प्रकार का होतात, याचे तत्त्व पतंजलींनी हेच सांगितले आहे, की

'क्रमान्यत्वम् परिणामान्यत्वे हेतुः ।'

क्रम पालटला की परिणाम पालटतो. विज्ञानशास्त्राला हे हे क्रम पालटण्याचे शास्त्र थोडे थोडे कळले आहे. मादाम क्युरींनी त्या वेळी असेही सांगितले होते, की तुम्ही म्हणाल असे जर आहे तर मग सोन्याच्या खाणी अजून का रेल्वे वर दिसत नाहीत? वाटेल त्या प्रमाणात सोने का उत्पन्न करीत नाही, तर त्याचे उत्तर हे आहे की शास्त्रदृष्ट्या जरी ती गोष्ट शक्य असली तरी व्यवहारीदृष्ट्या अशक्य आहे. एक तोळा सोने तयार करावयास जर लक्षावधि रुपयांचा खर्च येऊ लागला, तर त्याचा काय उपयोग? अर्वाचीन विज्ञान आणि भारतीय योग यांच्यात सर्वांत मोठा फरक हाच आहे, की 'विज्ञान' असे अत्यंत परतंत्र आहे, तर 'योग' हा फार स्वतंत्र आहे. इतका स्वतंत्र आहे की त्याला मनुष्य आस्तिक असण्याचीही गरज नाही. आस्तिक असला तर चांगलेच, पण त्यावाचून अडण्याचे कारण नाही, हे पतंजलींनी 'ईश्वर प्रणिधानाला' विकल्पात काढले आहे, यावरूनच दिसून येते. अवश्य लागते ते एक कर्मधैर्य

'श्रद्धावीर्यसमाधि प्रज्ञापूर्वक'

असे कर्म, मग ते करणारा कोणीही असो. येथे स्त्री पुरुष भेद नाही, वर्णभेद नाही, जातिभेद नाही. श्रद्धा म्हणजे चिकाटी, साधनावर विश्वास आणि संवेग पाहिजे, मग तो मृदु-तीव्र जसा असेल तसे फळ मिळेल.

भारतीय प्रज्ञावंतांच्या हे फार प्राचीन काळीच लक्षात आले, की विश्व जरी अनंत असले आणि अनंत रूपांनी विस्तारले असले, तरी वस्तुतः हा सारा एकाच शक्तीचा खेळ आहे. याचाच अर्थ असा, की त्याच्या सर्व प्रकारचा परस्परांशी संबंध असलाच पाहिजे, अनंत ब्रह्मांडात जी शक्ति भरून राहिली आहे तिचाच अंश मानवी शरीरातही खेळ करीत असला पाहिजे असे जर आहे तर हे उघड आहे, की या मानवी शरीरातील शक्ति जर स्वाधीन करून घेता आली तर त्यायोगाने ब्रह्मांडातील शक्तिशी संबंध जोडता येईल व त्याच्याद्वारे या विश्वरूपाचे सारे रहस्यही समजू शकेल. त्याशिवाय नुसत्या ब्रह्मांडाच्या रूपरूपात कितीही भटकले तरी खरे ज्ञान होणार नाही.

## चार राजांची कथा

हीच गोष्ट 'योगवासिष्ठात' विपश्चित राजाच्या आख्यानात सांगितली आहे. चार राजे या विश्वाचा अंत शोधण्याकरिता चार दिशेस गेले. त्यातील दोघांच्या लक्षात आले, की हा शोध बाहेर धुडून लागणार नाही. स्वतःच्या ठिकाणीच शोध केला पाहिजे. त्याप्रमाणे करून ते मुक्त झाले. पण दुसरे, कल्पचे कल्प झाले तरी अजून शोध करीत भटकत आहेत. अजूनही त्यांना पत्ता लागला नाही. कसा लागणार? गोल चेंडूवर मुंगी कितीही फिरली तरी तो प्रवास कधी तरी संपेल काय? आजचे विज्ञानीही या भटकणाऱ्या राजांच्याच अवस्थेत आहेत. अनुभवाने शहाणपण येईल तेव्हा येईल, पण जेव्हा येईल तेव्हा भारतीय प्रज्ञावंतांच्याच भूमिकेवर त्यांना यावे लागेल.

मानवी शरीरातील शक्ति आणि ब्रह्मांडातील शक्ति एकच आहे असे म्हटले, की सहजच असे प्राप्त होते की कोठे तरी मानवी शरीरातील शक्तीचा ब्रह्मांडातील दिव्य शक्तीशी सांधा जुळत असला पाहिजे. हा सांधा जर स्वाधीनतेने जुळवता आला, तर सहजच मनुष्याचे या ब्रह्मांडाशी ऐक्य होईल असे पिंडब्रह्मांडाचे स्वाधीनतेने ऐक्य होणे याचेच नाव 'योग'. 'युज' धातु जोडणे या अर्थाचा आहे. त्यावरून 'योग' शब्द झाला आहे.

## मानवी देहातील चार प्रभावी शक्ति

मानवी शरीरात शारीरिक (Physiological) आणि रासायनिक (Chemical) अशा ज्या क्रिया घडतात त्यांचा संबंध अर्थातच त्या शरीरापुरताच असतो. पण शरीरात अशाही काही शक्ति आहेत की ही देहसंस्था चालविण्याला त्यांची आवश्यकता तर असतेच, पण त्यांचा संबंध शरीराबाहेरील विश्वाशी येतो. या शक्ति जर स्वाधीन करून घेता आल्या, तर विश्वाशी संबंध सहज जोडता येईल. अशा शक्ति चारच आहेत. असा अनुभव आहे की त्यांतील एक रीत आपल्या स्वाधीन आहे पण दुसरे स्वाधीन नाही. यांतील पहिली महत्त्वाची शक्ति 'प्राण' ही आहे. अर्थात

दुसरी शक्ति 'मन' ही आहे. सहज लक्षात येत नाही पण निश्चय म्हणजे इच्छाशक्ति (will Power) असे म्हणतात तीही एक शक्तीच आहे–बुद्धि ही निर्णय करणारी शक्ति आहे–तिच्या निर्णयाला अनुसरून जीव संकल्प करतो. म्हणूनच संकल्परूप बुद्धि ही स्वतंत्र शक्ति आहे आणि याशिवाय 'वाक्' शक्ति ही एक स्वतंत्र शक्ति आहे हे ओळखून वेदशास्त्राच्या स्वरूपात तिचा उपयोग फक्त भारती यानीच करून घेतला आहे—अर्वाचीन विज्ञानाला नुकता कुठे तिचा सुगावा लागला आहे. 'सुपरसॉनिक्स'चे आज तयार होत असलेले शास्त्र कदाचित् त्याना वेदाच्या पायाशी आणील्ही.

## योगाचे चार मुख्य प्रकार

शक्तीच्या या चार प्रकारामुळे योगाचेही मुख्य चार प्रकार झाले आहेत. प्राणशक्ति ताब्यात घेऊन तिच्याद्वारे वर जावयाचे याला 'हठयोग' म्हटले आहे. याचे तत्त्व श्रीज्ञानेश्वर महाराजानी फारच सुदर सागितले आहे.

'पिंडे पिंडाचाचि ग्रासु। हा नाथ संकेतीचा दंशु'॥

व्यवहारात 'हट' शब्दाचे रूपातर 'हट्ट' शब्दात झाल्यामुळे या योगाविषयी मनुष्य अशी कल्पना करतो, की शरीराला क्लेश देऊन, दासबोधात तमोगुणाचे वर्णन केले आहे, तसे काही तरी विलक्षण करणे म्हणजे हठयोग–पण ती कल्पना अत्यत चुकीची आहे. हठयोगाचा मूळ पाया धातुसाम्य हा असल्यामुळे हठयोगाला तर उलट

'कफ्ग रसे मधुरमपि'

असे म्हावे लागते योगाचा दुसरा प्रकार मनाचा सयम करून 'प्राणशक्ति' ताब्यात घ्यावयाची असा आहे. त्यालाच 'राजयोग' म्हटले जाते. तिसऱ्या प्रकारात हीच गोष्ट सकल्पशक्तीच्या जोरावर शरीराचा साक्षी होऊन शरीरापासून वेगळे व्हावयाचे आणि इच्छेप्रमाणे दैवतात अथवा अनतात मिळून जावयाचे. हा 'ज्ञानयोग' आहे गीतेतील 'आत्मसमर्पणा सारखी साधने यात येतात. हेच सारे कार्य 'वाक्' शक्तीच्या साह्याने घडवून आणावयाचे हा 'मत्रयोग' आहे. या मूळ चार प्रकाराचे अनेक प्रकारे मिश्रण होऊन पुढे साधनाचे अनत प्रकार बनले आहेत. पर्याय कितीही असोत, त्या सर्वांचे मूळ या चारातच असत,

## कुंडलिनी जागरण हेच हठयोगाचे रहस्य

अर्वाचीन विज्ञानाच्या भाषेत सागावयाचे तर असे सागता येईल, की शरीराच्या कणाकणात खेळून राहिलेली चैतन्य–शक्ति एका बिंदूत केंद्रित करणे आणि केंद्रित शक्तीचे इष्ट तशा प्रकारात रूपातर करून घेणे याचे नाव 'योग.'

'सर्वशरीरेषुचैतन्यैक्यता ध्यानम्'।

या व्याख्येने मडळ ब्राह्मणाने हेच तत्व सागितले आहे. चैतन्यशक्तीचे शरीरातील स्थूल रूप म्हणजेच प्राणशक्ति–हठयोगाचा तर प्रारभच, ही शक्ति ताब्यात घेऊन एकीकडून मनाचा निरोध करावयाचा व दुसरीकडून पिंड ब्रम्हांडाचा साधा उघडून त्याच्याद्वारे दिव्यशक्ति शरीरात मिळवावयाची, हा असल्यामुळे हठयोगात 'कुंडलिनी' लाच सर्व महत्व आहे, विस्तार न करता थोडक्यात असे म्हणता येईल, की दिव्यशक्ति शरीरात प्रथमतः गुद आणि जननेंद्रिये याच्यामधील जागेत श्रीज्ञानेश्वरानी म्हटल्या प्रमाणे दोन बोटे वर व दोन बोटे खाली सोडून जे केन्द्र आहे. त्यात प्रगट होते या प्रगट शक्तीलाच 'कुंडलिनी' असे पारिभाषिक नाव आहे. जीवमात्रात ही शक्ति आहेच. इतकेच, की ती अचल असते अथवा श्रीज्ञानेश्वराच्या भाषेत म्हणावयाचे तर निजलेली असते. तिला चल करावयाची म्हणजे जागी करावयाची, म्हणजेच पिंडब्रह्मांडाचा साधा जोडला जातो 'कुंडलिनी जागरण' हेच योगाचे मुख्य रहस्य आहे.

कुंडलिनीचे हे जागरण पाच प्रकारानी होऊ शकते. प्राणशक्तीच्या जोराने अथवा श्रीज्ञानेश्वरानी म्हटल्याप्रमाणे 'मुद्रेच्या प्रौढीने,' राजयोगाच्या 'अजपा' इत्यादि अनेक साधनानी, देवता प्रसादाने, अधिकारी सद्गुरुनी केलेल्या 'शक्तिपाताने' अथवा मत्रयोगाने, अशा पाच प्रकारापैकी कोणत्याही प्रकारानी कुंडलिनी जागृत होऊ शकते. या पाच प्रकाराच्या अनेक पर्यायानी भारतीय प्रज्ञावतानी विश्वाचे रहस्य व मानवी जीवाचे कोडे उलगडून सकल्पेकात्मक विश्व, मानवी जीवाचा आणि विश्वाचा अन्योन्यसबध, मानवी जीवाचे अतिम पर्यवसान, त्याचे चार देह, पुनर्जन्म, कर्मतत्व इत्यादि सत्याचा साक्षात्कार करून घेतला व त्याच्या पायावर धर्म आणि संस्कृति याची उभारणी केली, परतु नुसती संस्कृति उच्च अथवा

समर्थ असून उपयोग नव्हता. शस्त्र कितीही चांगले असले तरी काय उपयोग ! ते धारण करणारे हात समर्थ पाहिजेत. संस्कृतींच्या सहाय्याने या सत्याचा उपयोग करून घेऊ म्हणणारा माणूसही तसाच सुयोग्य आणि समर्थ हवा. नाही तर आजच्या गांधी भक्तासारखी स्थिति व्हावयाची !

## जीवनाच्या सर्व अंगात योग आणला पाहिजे

ही गोष्ट मुख्यत: लक्षात घेऊन त्या प्रज्ञावंतानी माणूस तयार करण्याकरिता योगशास्त्राचे सहाय्य घेतले व त्याच्या जीवनाची घडी अशी बसविली, की त्या जीवनाच्या अंगप्रत्यंगातून योग प्रगटू लागला. भारतीयाचे कोणतेही क्षुल्लक अथवा मोठे धर्मकृत्य असो, ते 'आचम्य प्राणान् आयम्य' याशिवाय होतच नाही. त्या कोणत्याही प्रकारच्या धार्मिक कृत्याकडे पहा, असे दिसून येईल, की त्यात उपरोक्त सर्व योगांगाचे मिश्रण आहे. योगाच्या तत्त्वाचाच आधार घेऊन, अशीही अनेक साधने उत्पन्न झाली, की ज्यात योगाचा मूळ पाया जो 'संयम' त्याचा अनेक रीतींनी दुरुपयोग केला गेला. परंतु ती सारी साधने कमीजास्त प्रमाणाने वैयक्तिक आहेत. त्यांचा संबंध धर्म आणि संस्कृति यांच्याशी मुळीच नाही. धर्म आणि संस्कृति या वैयक्तिक असूच शकत नाहीत. वैदिकधर्म तर साराच सामाजिक आणि सांघिक जीवनावर उभारलेला आहे. समाजाचा मूळ पाया मानवी शरीर हा आहे. म्हणून शरीराची विशेष तयारी योगाच्या सहाय्याने करण्यापासूनच वैदिक जीवनाची घडी बसवली आहे. विशेषत: सांस्कृतिक आदर्श सांभाळण्याची ज्याची जबाबदारी आहे व ज्याच्याविषयी भगवान मनूने

'स्वं स्वं चरित्रं शिक्षेरन् पृथिव्यां सर्व मानवा:'

अशी प्रतिज्ञा केली आहे, त्या अग्रजन्म ब्राह्मणाचे सारेच जीवन, गर्भात प्रवेश केल्यापासून तो चितेवर जाईपर्यंत असे संयमी बनवले आहे की योग शब्द न उच्चारताही त्यात 'योग' मूर्तिमंत अवतरतो. त्यामुळे, एका बाजूने ऐहिक जीवन कठीण असताही त्यांना योग संयमाचे लाभ मिळून अनेक प्रकारच्या सिद्धी सहजच मिळत असत. हा योग जोपर्यंत त्यांच्या जीवनात होता, तोपर्यंत राष्ट्र तेजस्वी, बलवान् आणि वैभवसंपन्न होते. जसजसे त्यांच्या जीवनातून यौगिक साधने कमी होत गेली तसतसे राष्ट्र हळू हळू दुर्बळ होत गेले, आजही एवढ्या आपत्तीत वैदिक धर्माचे रक्षण करावयाचे असले, तर जीवनाच्या सर्व अंगात 'योग' आणला पाहिजे तसा तो आणावयाचा म्हणजे काय हा अर्थातच स्वतंत्र लेखाचा विषय आहे.

## "योगपूर्वांगे"

वर सांगितल्याप्रमाणे योगाचे कितीही प्रकार असले तरी त्या सर्वांचे अनुष्ठान मानवी शरीरानेच करावयाचे असल्यामुळे, कोणत्याही योगपद्धतीत मानवी शरीराला फार महत्त्व आहे. हठयोग तर सर्वस्वी पिंडाधिष्ठितच आहे. पण योगाच्या इतर कित्येक प्रकारात शरीरापासून अलग होऊन 'भू' तत्त्वाच्या पलीकडील जगातील अनुभव घेतले जातात. पण तेथेही अलग होण्याच्या अवस्थेपर्यंत शरीर योगाच्या सहाय्यानेच तयार करावे लागते. असे करण्यास योगाचा जो भाग उपयोगी पडतो त्यालाच शास्त्रीय भाषेत 'योगपूर्वांगे' असे म्हणतात. यम, नियम, आसन आणि प्राणायाम यांचा तरी अवलंब करावाच लागतो.

## आज ब्राह्मणाची अवस्था काय आहे

ब्राम्हणाच्या जीवनात योग सहजच उतरला, असे जेव्हा मी म्हणतो, तेव्हा त्याचा अर्थ, निदान एवढी पूर्वांगे तरी त्यात असलीच पाहिजेत तरच ते ब्राम्हणाचे जीवन असाच आहे. पण आज ब्राम्हणाची अवस्था काय आहे ?

माणूस या नात्याने सर्वतोपरि अध:पात झाला आहे गुरुत्व अपात्री गेले आहे, दारिद्र्य निरंतरचेच आहे. शारिरिक ऱ्हास कधी योगाचा नसेल इतका झाला आहे. ब्रह्मचर्याची नावापुरतीच ओळख आहे प्रत्येक नवी पिढी सनातन अशा श्रद्धांना पारखी होत आहे. भारतीय स्त्रीच्या जागी, साने गुरुजींनी म्हटल्याप्रमाणे फुल पाखरे दिसत आहेत, इंग्रजी छापाच्या लोकांच्या हाती असलेले आटनावाचे लोकशाही शासन व वा नेहरूना वाटत होते त्याप्रमाणे सनातन धारणांचा नाश करण्याचा विडा घेतलेले आहे. कवि विनायकानी म्हटल्याप्रमाणे,

'मित्र सर्व शत्रू झाले'

असे म्हणण्याची वेळ येऊ पहात आहे. कर्ममार्गाला अवकाश नाही, भजन करता आले तरी भक्तियोगाची लायकी नाही, अशी सर्वतोपरि आकाश फाटल्यासारखी अवस्था झाली आहे आणि

'न ऋते श्रान्तस्य सख्याय देवाः'

असा तर ईश्वरी संकेत आहे. अशा स्थितीत अजूनही जर कोणी हात देऊ शकेल तर तो योगच! निघून गेलेला योग पुनः जीवनात आणला पाहिजे जीवन पुनः योगारूढ केले पाहिजे. अजूनही सनातन तत्त्वावर श्रद्धा असणारे असंख्य लोक आहेत. पण मतामतांच्या गोंधळाने आणि परिस्थितीच्या दडपणाने दुर्बल झाले आहेत. आजच्या परिस्थितीत तरी योगाची कास धरल्यावेरीज दुसरी आशा नाही. अधिकारी लोकांनी योगशक्तीचा उपयोग करून त्यांना योगाकडे वळवले पाहिजे, त्यांच्या इच्छा योग शक्तीने आपल्या ताब्यात घेऊन त्यांची शरीरे अनेक प्रकारच्या घातक सवयी टाकून देऊन योगस्थ होतील असे केले पाहिजे, शक्तिपाताने कुंडलिनी शक्ती देखील जागवता येते तेथे, हिप्नॉटिझमसारख्या साध्या उपायाने करता येते ते करणे काय कठीण आहे!

## परमात्म्यावर विश्वास ठेवा

येथे एक शंका अवश्य येईल. तिचे थोडे निराकरण करतो शास्त्रदृष्ट्या योग हे कितीही स्वतंत्र साधन असले तरी ते व्यक्तिदृष्ट्या फार परतंत्र आहे. परिस्थितीची अनुकूलता लागते मार्गदर्शक गुरू लागतो. त्यात अनेक धोके आहेत, बुवाबाजी आहे. दीडवितीच्या आजच्या घरात आसने करू म्हटले तर जागादेखील नसते. या सर्व अडचणी आहेत. त्यात पुनः दैवयोग असा आहे की अनुभवी व अधिकारी माणसांनी लिहिलेले ग्रंथही योगावर नाहीत. एक काय ते व्यासभाष्य पातंजल सूत्रावर आहे. हा व्यास म्हणजे वेदव्यास नव्हे. हे म. म. वासुदेव शास्त्री अभ्यंकर यांनी चांगले दाखविले आहे पण त्यांचे देखील भाष्य योगाचा अनुभव जास्त सांगत नाही, पांडित्य जास्त सांगते. या भाष्यावर अनेक टीका असल्या तरी त्या भोजाने म्हटल्याप्रमाणे.

'क्वचार्थं यदतीवतद्विजहति स्पष्टार्थमित्युक्तिभिः ।
स्पष्टार्थेष्वतिविस्मृतिं विदधति व्यर्थैः समासादिभिः ॥
अस्थानेऽनुपयोगिभिश्च बहुभिर्जल्पैर्भ्रमं तन्वते ।
श्रोतॄणामितिवस्तु विप्लवकराः सर्वेऽपि टीकाकृत

वस्तु विप्लव करणाऱ्याच आहेत. तेव्हा काय करावे असे वाटले तरी निराश होण्याचे कारण नाही. धर्मकार्यार्थ उद्यत असलेला परमात्मा तर कुठे गेला नाही! त्याच्यावर विश्वास ठेवून प्रामाणिकपणाने योग पूर्वांगाची कास धरली, तर त्याच्याच कृपेने पुढील मार्ग उजळला जाईल प्राणायामाच्या भानगडीतही जास्त पडू नये अनैसर्गिक रहाणी, व्यसनाधीनता, अनियंत्रित जीवन इत्यादिकांमुळे जो प्राणशक्तीचा अपव्यय होतो तेवढा वाचविल्याने जो प्राणाचा आयाम होईल तेवढा प्रारंभाला पुरा आहे थोडक्यात माझे म्हणणे एवढेच आहे, की ब्राह्मण म्हणून यथार्थतेने जगावयाचे असेल आणि सनातन वैदिक धर्मा संबंधी काही कर्तव्य आहे असे वाटत असेल, तर जीवनात योग आणल्यावेरीज गत्यंतर नाही. तशी प्रेरणा ब्राह्मण म्हणविणाऱ्यास व्हावी अशी प्रार्थना करून हा लहानसा वाग्विलास त्या योगेश्वराचे चरणी अर्पण करतो

—अप्रबुद्ध, नागपूर



# पंढरीच्या वारकऱ्यांची साधना

या लेखात ज्या वारकऱ्यांच्या साधनेविषयी थोडी माहिती देण्याचा प्रयत्न केला आहे ते पंढरपूरचे वारकरी होत ही गोष्ट लेखाच्या सुरवातीलाच सांगण्याचे कारण, वारकऱ्यांची साधना एवढेच शब्द ठेवले तर कोणत्या वारकऱ्यांची साधना सांगण्यात येणार आहे हे स्पष्ट होत नाही. कारण 'वारकरी' हा शब्द वारीकरी याचे अपभ्रष्ट रूप आहे व त्याचा अर्थ नियमाने येरझारा करणारा एवढाच आहे व त्या अर्थाने तो जेजुरीच्या खंडोबाची अगर तुळजापुरच्या भवानीची वारी करणाऱ्यासहि लावता येईल. या लेखात पंढरपूर सोडून जे इतर वारकरी आहेत त्यांच्या साधनेसंबंधी विचार केला जाणार नसल्यामुळे या लेखाचे शीर्षक 'पंढरीच्या वारकऱ्यांची साधना' असे हेतुपूर्वक दिले आहे.

वारकरी पंथात साधनेस किती महत्व आहे हे या पंथास जे 'वारकरी' नाव आहे त्याचा नुसता विचार केला तरीही कळून येण्यासारखे आहे. बहुतेक धर्म अथवा पंथ हे त्या पंथातील इष्ट दैवतांच्या नावावरून अथवा धर्मसंस्थापकाच्या नावाने ओळखले जातात. उदाहरणेच द्यायची झाली तर शैव, वैष्णव हे पंथ अथवा इस्लाम व ख्रिश्चन धर्म यांची देता येतील. पण वारकरी पंथ हा त्या पंथाचे जे उपास्य दैवत श्रीविठ्ठल अथवा त्याच्यासाठी देव पंढरपुरला आले तो 'भक्तराज पुंडलीक' यांच्या नावाने ओळखला जात नाही, तर 'वारी' हे वारकऱ्यांच्या साधनेतील जे अतीव प्रमुख साधन, त्यावरूनच त्याला वारकरीपंथ असे नाव पडले आहे. हे लक्षात घेतले म्हणजे वारकरी पंथात साधनेला किती महत्व आहे हे स्पष्ट होते.

या पंथातील साधनेची पुढील तीन प्रमुख अंगे आहेत:– (१) वारी (२) तुळशीची माळ (३) नामोच्चार नामस्मरण हरीकीर्तन.

वारी –पंढरीची वारी करणे याचा अर्थ पंढरीच्या विठ्ठलाची प्रतिवर्षी नियमाने यात्रा करणे असा आहे.

महाराष्ट्रात वारीची साधना सांगणारे अनेक उपासना पंथ आहेत. खंडोबाची उपासना सांगणारा जेजुरीची वारी, तर भवानीची उपासना सांगणारा तुळजापूरची वारी करण्यास सांगतो! पण तरीही वारकरी पंथाने वेगळे जे इतर उपासना पंथ आहेत त्यांना त्यात पंढरपूरच्या वारकरी पंथात जितके वारीला प्रमुख स्थान आहे तितके त्यात नाही. तुकाराम बोवा सांगतात 'वारकरी होऊन पंढरपूरला जा, त्याने सर्व साधनांचे फळ मिळेल.'

> होय होय वारकरी। पाहे पाहे रे पंढरी।
> काय करावी साधने। फळ अवघेचि येणे॥

एकनाथ महाराज म्हणतात—

> वारकरी पंढरीचा। धन्य धन्य जन्म त्याचा ॥१॥
> जाय नेमें पंढरीसी। चुको नेदी तो वारीसी ॥२॥
> आषाढी कार्तिकी। सदा नाम गाय मुखी ॥३॥
> एका जनार्दनी करी वारी। धन्य तोचि संसारी ॥४॥

देव भक्त उभे दोन्ही एके ठायी।
चला जाऊ पायी तया गावा॥

दुसरा लक्षात घेण्यासारखा फरक म्हणजे इतर वारकरी पथात वारीचा उपयोग कामिक फळे मागण्याकरता अधिक केला गेला आहे. पंढरपूरच्या वारकरी पथात 'वारी' ही मोक्षाची साधना म्हणून समजली आहे.

पंढरपूरची वारी ही संस्था फार जुनी आहे. तिचा इतिहास सात आठशे वर्षांपेक्षा जुना आहे. श्रीज्ञानोबा व नामदेव यांच्याही पूर्वी 'वारी' होती. ज्ञानोबाचे वडील वारीस जात, असे नामदेवानी वर्णन केले आहे. शिवाय त्यांच्या अभगात पुढीलप्रमाणे वचन आहे.

देव म्हणतात—

आषाढी कार्तिकी विसरु नका मज।
सांगतसे गुज पांडुरंग॥

यावरून नामदेवाच्या वेळेलाच आषाढ शु. ११ स व कार्तिक शुद्ध ११ स यात्रा भरत असत असे दिसते. आता या दोन तिथींशिवाय माघ व चैत्र शुद्धातहि यात्रा भरतात. काही वारकरी महिन्याच्या शुद्ध एकादशीस पंढरपूर व वद्य एकादशीस आळंदीस पायी जातात. त्याना महिन्याचे वारकरी म्हणतात असे पुरुष व बायका मिळून तीनशे वारकरी आहेत. वारकऱ्यानी शक्य तर आषाढी व कार्तिकी या दोन्ही पण निदान एक तरी यात्रा करावी व शक्य तो ती पायी करावी असेही संत सांगतात. कारण, पायी वारी करण्यात तपाची साधना उत्तम होते.

गात जा गा गात जा गा। प्रेम मागा विठ्ठला॥
पायी तीर्थयात्रा घडो। देह संता घरी पडो॥
मार्गी चालता पाऊल पाउली। चिंतावी माऊली पांडुरंग॥

ही पायी वारी, ज्ञानदेवासारख्या संताच्या पालखीबरोबर भजन करीत करता आली तर फारच उत्तम, कारण त्या योगे गीतेत सांगितलेले शारीरिक, वाचिक व मानसिक अशा तीनही प्रकारचे तप अनायासे घडते. पायी देवाकडे जात असल्याने अनायासे शारीरिक तप घडते.

तया प्रिय देवताल्या। यात्रादिकें करावया।
आठी पहार पाया। उळिग धापे॥ ज्ञानेश्वरी अ.१७।२०२

पायी जाताना देवाचे नाव घेतल्याने वाङ्मय तप होते. वाचिक तपाबद्दल ज्ञानदेव म्हणतात.

नातरी एकादे नाव। तेंचि शैव का वैष्णव।
वाचे वसे ते वाग्भव। तप जाणावे ज्ञानेश्वरी १७।२२३

पालखीबरोबर चालत असता संत समागम होतो व साधकाच्या व संताच्या संगतीत देवभक्ताच्या कथा करीत काळ जातो व प्रपंचाचे स्मरणही राहात नाही देवच मनात राहतो असे मानसिक तपही होते.

असे तीनही प्रकारचे तप वारीत होते म्हणून वारकरी साधनेत 'वारी' स अनन्य साधारण महत्त्व आहे.

या 'वारीस' जे इतके महत्व आहे त्याची आणखी एक दोन कारणे सांगता येण्यासारखी आहेत. वारकरी पथ हा सगुण भक्तिप्रधान असा उपासना पथ आहे यामुळे देवाकडे जाऊन मागणे यास महत्त्व आहे.

शिवाय या वारीच्या साधनेच्या मागे श्रीविठ्ठलाच्या स्वरूपाची व त्या पथाच्या इतिहासाची फार मोठी बैठक आहे.

श्रीहरी हे पुंडलिकासाठी आले पण त्याचे कार्य करून इतर अवतारांप्रमाणे वैकुंठास परत न जाता तिथेच विटे वर उभेच राहिले. तसे ते का राहिले याचा विचार केला की श्रीविठ्ठलाच्या वारीच्या महात्म्याचे बीज लक्षात येईल. देव राहिले याचे कारण देवाला भक्तानी वचनात गोवून घेतले. त्याचा इतिहास असा आहे. देव प्रसन्न झाल्यावर पुंडलीकाला 'वर माग' म्हणाले व पुंडलीकानी पुढीलप्रमाणे मागणी केली.

मूढ पापी जैसे तैसे। उतरी कासे लावूनी॥

व त्याच्या पूर्तीसाठी देव राहिले हा संपूर्ण अभंग पाहण्यासारखा आहे. म्हणून देतो.

पंढरीचे वारकरी। ते अधिकारी मोक्षाचे॥ १॥
पुंडलिका दिधला वर। करुणाकरे विठ्ठलें॥ २॥
मूढपापी जैसे तैसे। उतरी कासे लावूनि॥ ३॥
तुका म्हणे खरे झाले। एका बोले संताच्या॥ ४॥

श्रीनामदेवानीही असेच सांगितले आहे.

श्रीविठ्ठलाची मूर्ती जी आज आपल्यासमोर आहे ती कमरेवर हात ठेवून उभी आहे शंकराचार्य व सर्व मराठी मन असे समजतात की कमरेवर हात ठेवून श्रीविठ्ठल असे सुचवितात की मला जे शरण येतात त्याना कमरे इतक्या पाण्यातून जाण्याइतकी (टुरत्यया माया) नदी तरण्यास सोपी आहे.

शंकराचार्य म्हणतात—

प्रमाण भवाब्धेरिद मामकाना ।
नितम्बः कराभ्या धृतो येन तस्मात् ॥

ज्ञानदेव म्हणतात—

कर विठ्ठल स्मरण । नामीदर्पा अनुसे पान ।
जाणोचिनि भक्ता भवलक्षण । जघन प्रमाण दाविती ॥

ह्या देवाचा अवतारच मूढ, पापी याचा उद्धार करण्याचा असल्याने त्याची कीव भाकल्याने त्यास लवकर कीव येईल व आपले कार्य होईल अशी समजूत आहे.

शिवाय दुसरे महत्त्वाचे कारण म्हणजे असे की वारकरी सांप्रदायात या वारीचा महिमा स्वानुभवे वाढवणाऱ्या संतांची मांदियाळीच निर्माण झाली असे म्हणावयास हरकत नाही. या संतश्रेष्ठांपैकी काहींजणांचे काही अनुभव पुढे देतो—

ज्ञानदेव—

ज्ञानदेव म्हणे ज्योतीची निजज्योति ।
*ते हे मूर्ति उभी विटेवरी ॥*

नामदेव—

युगें अठ्ठावीस विटेवरी उभा ।
पुंडलिका भेटी परब्रह्म आलेगा ॥

श्रीएकनाथ दत्त सांप्रदायातले, पण त्यांनीहि पंढरीचा महिमा वाढविला. ते म्हणतात—

दक्षिण द्वारका पंढरी । शोभतसे भिमातीरीं
द्वारका समुद्रात बुडविली । परी पंढरी राखिली अद्यापि ॥

तुकाराम महाराज म्हणतात—

आनंद अद्वय नित्य निरामय । जे का निजतेज योगियाचे
*ते हे समचरण साजिरे विटेवरी । पहा भीमातीरी रूपविठ्ठल ।*

श्रीएकनाथ आपला अनुभव सांगतात—

*डोळां घालूनी अंजन घेऊनी गेले मज राउळी वो ।*
विटेवरी जगदंबा एका एकीं नयनीं देखिली वो ।
मनोभावे वर्दळवृत्ति । देहाची खुंटली वो ।
एका जनार्दनी भले । द्वैत हरपलें । ऐक्य सचलें ।
जन्ममरणाचा पट फाटला ॥

तात्पर्य—या मूर्तीच्या ठिकाणी श्रीज्ञानदेवादि थोर संतांना थोर पारमार्थिक अनुभव मिळाले व त्यांनी त्या अनुभवांकरिता पंढरपुराला श्रीविठ्ठलाच्या दर्शनास जा असे कळकळीने सांगितले व त्यामुळेच या साधनेस फार महत्त्व आले व आज लाखो लोक अखिल महाराष्ट्रातून वारीस येत असतात.

या वारीचा थोडा तपशील सांगितला की ही वारी कोणत्या जातीचे पारमार्थिक साधन आहे याची कल्पना येईल. इतर क्षेत्राप्रमाणे पंढरपूर क्षेत्रात गेल्यावर तीर्थोपवास करावा लागत नाही, मुंडण नाही, श्राद्ध नाही.

तुकाराम महाराज म्हणतात—

नलगे हिंडणे मुंडणे तें काही । साधनाची नाही आटा आटी ॥

या क्षेत्रातला विधी—

चंद्रभागे स्नान विधितो हरिकथा
समाधान चित्ता सर्वकाळ ॥
तुका म्हणे काला वैकुंठी दुर्लभ ।
विशेष तो लाभ संतसंग ॥

चंद्रभागेत स्नान करावे व तिच्या वाळवंटात हरिकथा करावी अथवा ऐकावी व चित्त सदा समाधानात ठेवून देवाचे अखंड स्मरण करावे हाच विधि.

सूज्ञ वाचकाच्या लक्षात आले असेलच की वरील कडव्यात तुकारामबोवांनी देवाच्या दर्शनाचा उल्लेख केलेला नाही. याची दोन कारणे असावीत. एक साधक वारकरी हा देवदर्शनाकरताच गेला असल्याकारणाने तो देवदर्शन घेणारच हे सांगायलाच नको. म्हणून त्याचा उल्लेख नसावा. पण त्याचबरोबर त्यांना हेही सुचवायाचे आहे की देवदर्शनाबरोबर साधकाने कथा श्रवण करणे अथवा स्वतः कथा करणे याला अधिक महत्व आहे. देवदर्शन फार मोठा थोडा वेळ (काही क्षण) होणारे आहे देव पहावा तो डोळ्यात व मनात ठसेपर्यंत. पण पुढे त्याचे पुढीलप्रमाणे स्मरण करीत साधन करावे

नाम उच्चारिता कंठी । पुढें उभा जगजेठी ।
ऐसे धरोनिया ध्यान । मनें करावे चिन्तन ॥

अशा रीतीने दशमी ते पौर्णिमेपर्यंत पंढरीत साधन करीत काला करून घरी परतावे. पण परतताना वृत्ती कशी असावी ते तुकोबांच्या शब्दात देणे बरे

बाहेर येता प्राण फुटे । रडे दाटे गहिंवरे ॥
दधिमंगल भोजन सारा । म्हणती करा मुरडिवा ।
मागुता हा पाहो ठाव । पंढरीराव दर्शने ॥

सतसमागम, भगवताचे नामस्मरण, हरीकीर्तन, शारीरिक, वाचिक, मानसिक, तप व देवाची करुणा भाकणे या सर्व गोष्टींचा वारीत समावेश होतो. या सर्व गोष्टी देवाचे प्रेम वाढविण्याकरता आहेत व देवाजवळ जाऊन प्रेमच मागा

यचे आहे. कारण भगवत् विषयक प्रेम हे वारकरी साधनेचे अन्तरंग स्वरूप आहे.

वर उल्लेखिलेल्या गोष्टींस पारमार्थिक साधनेत महत्त्व नाही असे कोण म्हणेल ? हे सर्व वारी करण्यात घडते म्हणूनच वारीची नितांत आवश्यकता आहे.

**(२) गळा तुळशी माळ**-गळ्यात तुळशीची माळ धारण करणे हे वारकरी साधनेचे दुसरे अंग आहे. गळ्यात तुळशीची माळ न घालता पंढरीच्या यात्रेस गेला तर तो यात्रेकरू 'वारकरी' समजला जात नाही, गळ्यात माळ घालून गेला तरच तो वारकरी. येन्हवी नाही, इतके महत्त्व माळ धारण करणे यास या साधनेत आहे. ही माळ १०८ मण्यांची असते व ती तुळशीच्या मण्यांचीच असावी लागते. कारण वारकरी हा वैष्णव आहे व विष्णूला तुळस प्रिय आहे. बहुतेक सर्व धर्मातील साधनेत माळेला स्थान आहे. पण ते 'स्मरणी' म्हणून आहे वारकऱ्यांच्या साधनेत तिला अनन्य साधारण स्थान आहे मौजीबंधनाचे वेळी द्विज यज्ञोपवीत धारण करतो पण संन्यास घेतला की यज्ञोपवीत जाते. तसे तुळशीच्या माळेचे नाही. ती गळ्यात घातली की देहाबरोबरच जाणार. ही सतत देहावर ठेवण्याची दोन कारणे असावीत. आपल्या धर्मात तुळशीपत्रास एक विशेष प्रकारचे महत्त्व आहे. ग्रहणात जे पदार्थ धुवून घेता येत नाहीत त्यांना पवित्र राखावे म्हणून त्यावर तुळशीपत्र ठेवतात. मृत्यु झाल्यावर मढे उचलण्यापूर्वी मृताच्या तोंडात तुळस घालतात. तात्पर्य, तुळस ही पवित्र करणारी असल्याने तुळशीचे पाणी स्नानाच्या वेळी शरीरावर पडले तर कायाशुद्धी होईल म्हणून ती सतत गळ्यात ठेवावी असे सांगितले असावे.

यापेक्षाही दुसरे महत्त्वाचे कारण आहे व ते म्हणजे ही माळ गळ्यात धारण करण्याच्या मागे असलेली भावना. घरावर अथवा कोणत्याही वस्तूवर तुळशीपत्र ठेवणे याला मराठीत एक विवक्षित अर्थ आहे तो असा की, ज्या वस्तूवर तुळशीपत्र ठेवले, त्या वस्तूवरील आपली मालकी अथवा सत्ता काढून घेतली. शरीरावर तुळस ठेवणे याचा अर्थ हे शरीर भोगाकरता नाही, देवाच्या सेवेकरता, देवाला वाहिलेले आहे, अशा भावनेची सतत जागृती व्हावी म्हणून तुळशीची माळ सतत गळ्यात ठेवावी असा वारकऱ्यांचा विधि आहे.

तुळशीची माळ धारण करणे म्हणजे धारणकरणाऱ्याचा नवा आध्यात्मिक जन्म होणे आहे, अशी भावना माळ धारण करण्याच्या मागे आहे. वारकऱ्यांना मुद्राधारणादिक जी इतर चिन्हे धारण करण्यास सांगितली आहेत ती गौण आहेत.

या माळ धारण करण्याबाबत आणखीही एक महत्त्वाची गोष्ट लक्षात ठेवण्यासारखी आहे. माळ घातल्याने जात, कुळ, यात काही बदल होत नाही. स्त्री, पुरुष कोणीही माळ धारण करू शकतो. असा हा भक्तिपंथ उदार आहे. त्याचा अधिकार सर्वांना आहे.

तुकारामबोवा म्हणतात—

यारे यारे लहानथोर । याती भलते नारीनर ।
करावा विचार । नलगे चिन्ता कोणासी ॥

या माळेला या पंथात असे महत्त्वाचे स्थान असल्याने या पंथास माळकरी पंथ असेहि म्हणतात,

**(३) नामोच्चार–नामस्मरण–हरिकिर्तन**

वारकऱ्यांच्या साधनेतील अन्तरंग 'साधन' म्हणजे नामस्मरण वारकरी हा नामैयणी होय. पायी वारी अथवा गळ्यात माळ ही देवाचे स्मरण व्हावे एवढ्याकरताच. ते होत नसेल तर यात्रा करणे अथवा माळ धारण करणे याचा फारसा उपयोग नाही. मागे एकाचा आकडा असला तरच पूज्यास किंमत येते, तसेच येथे आहे व म्हणूनच सर्व साधूंनी नामस्मरणावर विशेष भर दिला आहे.

करा विठ्ठल स्मरण । नामी रुपी अनुसंधान ।
ज्ञानदेव ऐके रे जना । तुझ्या स्वहिताच्या खुणा ।
पंढरीचा राणा । मनामाजी स्मरावा ।
ऐसे धरोनिया ध्यान । मनें करावें चिंतन
तुका म्हणे ऐसा आहे श्रेष्ठाचार ।
नाम हेचि सार विठोबाचे ॥

नामस्मरण हे मुख्य–पण ते नियमाने, प्रेमाने व रूपाचे अनुसंधान ठेवून होणे कठीण, म्हणून सारखे स्मरण ज्यांना होत नाही त्यांनी वैखरीने देवाचे नाव घ्यावे.

ज्ञानदेव म्हणतात—

तें नाम सोपे रे रामकृष्ण गोविंद ।
वाचेसि सद्गद् जपा आधि ॥ (हरीपाठ अ. ७४)
असोनि संसारी जिव्हे वेगू करी ।
वेदशास्त्र उद्घारी बाह्य सदा ॥ (हरीपाठ अ १)

हे नाम देण्यास ज्याने ते सिद्ध केले आहे असा नाम दाता गुरु भेटला तर त्या भाग्यास सीमा नाही पण वारकरी संत असे सांगतात की तो नामदाता सद्गुरु भेटेपर्यंत नामस्मरण थांबवण्याचे कारण नाही नामाच्या तपाने संतुष्ट होऊन देवच गुरुरूपाने भेट देतो

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव ।
आपणचि देव होय गुरु ॥ १ ॥
पढियें देहभाव पुरवी वासना ।
अन्ती ते आपणापाशीं न्यावें ॥ २ ॥

या पंथाच्या साधनेत नामस्मरणाबरोबर नामसंकीर्तन, हरिकीर्तन यालाही महत्त्व आहे. भगवताचे प्रेमपूर्वक नामसंकीर्तन केले तर अंत करण शुद्धि कशी होते, देव अंत करणात येऊन कसा बसतो, हे आपल्या भागवतात अध्याय २ मध्ये एकनाथांनी फार सुंदर सांगितले आहे ते महत्त्वाचे असल्याने त्यांच्याच शब्दात देणे इष्ट होईल नाथमहाराज म्हणतात—

सप्रेम सद्भावें संपूर्ण । नित्य करिता नामस्मरण ।
वृत्ती पालटती आपण । तेहि लक्षण ऐक राया ॥ ७५ ॥
नामासरिसाच हरि । रिघे हृदया माझारीं ।
तेणे थाके अभ्यंतरीं । हो लागे पुरी हृदय शुद्धी ॥ ७६ ॥
तेव्हां प्रपंच सांडोनि वासना । जडोनि ठाके जनार्दना ।
भेदकाद सांडोनि अहंपण । सोऽहं सदनामाजीं रिघे ॥ ७७ ॥
चित्त विसरोनि चिंता । जडोनि ठाके भगवंता ।
मनाची मोडली मनोगतता ।
संकल्प विकल्पता कुरु विसरे ॥ ७८ ॥
कृत निश्चयेंसी बुद्धी । होऊनि ठाके समाधी ।
ऐशी देखोनी हृदय शुद्धी ।
तेथोनि निशुद्धी न रिघे हरी ॥ ७९ ॥
(ए भा अ २)

हरिकीर्तनाचा दुहेरी उपयोग आहे ते करणाऱ्या-च्या बरोबर ऐकणाऱ्याचाही उद्धार करते व्यक्तीच्या पारमार्थिक साधनातील दोष जाऊन अन्त शुद्धि होणे, भगवद्विषयक प्रेमाची वाढ होणे, यासारख्या गोष्टी

'देवाचिया चाडें आळवावें देवा'

अशा हेतूने केलेल्या हरिकथेने होतात शिवाय या कथे मुळे व्यक्तीबरोबर समाजाचेहि हित साधते वारकरी कथा अथवा भजनी निरूपण ह हरिदासी कथेपेक्षा जनजागृतीचे समाजशिक्षणाचे अधिक प्रभावी साधन आहे या निरू पणात पूर्वरंग, उत्तररंग नसून साधूंच्या पद्यांचा अभंग अथवा पद-विस्तार, त्यांतील प्रमेये श्रोत्यांपुढे मांडून केला जातो व कीर्तनकार हे करीत असताना त्यास पन्नास पाऊणशे प्रसंगविशेषी शंभर टाळकरी साथ देत असतात यामुळे फार मोठा लोकसंग्रह यात होतो

'लावुनि मृदंगश्रुति टाळ घोष । सेवूं ब्रह्मरस आवडीने ।'

असे याचे स्वरूप तुकोबांनी वर्णिले आहे त्याचा परिणाम त्यांच्याच शब्दात सांगायचा तर.—

कुंथली नादीं लागली समाधि । मूढ जन नरनारी लोकां रे ।
पंडित ज्ञानी योगी महानुभव । एकचि सिद्ध साधकां रे ।

पंडितापासून अशिक्षित मूढापर्यंत सर्वांचा अधिकार परत्वे संग्रह करून घेणारे हरिकीर्तन हे लोकशिक्षणाचे, लोकांची नैतिक पातळी उभारण्याचे प्रभावी साधन आहे

वारकरी साधनतील एक अंगभूत वैशिष्ट्य म्हणूनच पुढील गोष्टींचा उल्लेख करणे जरूर आहे वारकरी साधने तील नामस्मरण-हरिकीर्तन हे साधकाला केवळ मुक्तावस्था प्राप्त करून देऊन थांबत नाही, तर ती त्याला सतत्व प्राप्त करून देते, साधकावस्थेत चाललेले लोकसंग्रहाचे कार्य मुक्त झाल्यावर त्याच्याकडून अधिकच जोमाने सुरू होते आणि तसे होणेच स्वाभाविक आहे कारण स्वत मुक्त झाल्यामुळे त्याचा अधिकारहि उंचावलेला असतो ज्ञानदेव यासंबधाने म्हणतात—

जे पुरुषार्थ सिद्धि चौथी । घेऊनि आपुलिया हाती ।
रिगाला भक्तिपंथीं । जगा देत ॥ २ ॥
कैवल्याचा अधिकारी । मोक्षाची सोडी बांधी करी
अ १७-२११२०

परि श्रुतिस्मृतींचे अर्थ । आपणचि घेऊनि मूर्त ।
अनुष्ठाने जगा देत । वडिल जे हे ॥ अ १७।२६

या संताच्या कीर्तनाचा परिणाम ज्ञानेश्वर महाराजांची गीतेतील अ ९ श्लोक १४-सतत कीर्तयन्तो मा-यावर भाष्य करताना जो सांगितला आहे तो जरूर वाचावा कीर्तनाच्या उत्कर्षाचे याच्यापेक्षा अधिकारवाणीने वर्णन करणे अशक्य आहे

नामदेवराय थोडक्यात पुढीलप्रमाणे सांगतात

नाचू कीर्तनाचे रंगी । ज्ञानदीप लावू जगीं ।

मग त्यांनाही काय करावयाचे आहे, आपण देवाचे नाव

घेतले की पुढे असे म्हणणारा परमार्थी नव्हे. नाथमहाराज म्हणतात, तो भक्त पाखंडी आहे.

धर्माधर्म न विचारिता । म्हणती ईश्वरचि मोक्ष दाता ।
हे भक्त पाखंडी कथा । —भागवत

तुकारामबोवाहि सांगतात—

इंद्रियांसी नेम नाही । मुखी राम म्हणोनि काई
जेवी माशीसवे अन्न । सुख न दे तें भोजन ॥

ही तो अंगी नाही चिन्हे । गाईल वेच्येच्या ठव्याने

पंढरपूरची वारी केली म्हणजे साधकाची सर्व साधना संपली असे मात्र नव्हे. त्याने नियमाने भजन केले पाहिजे. तसेच आपली विहित नित्य नैमित्तिक कर्मे केलीच पाहिजेत. त्याविना परमार्थ नाही.

पावावया परमार्थ । अवश्य पाहिजे शुचिष्मता ॥

त्याचे नैतिक आचरण शुद्ध हवे. कर्म ईश्वरार्पण बुद्धीने करीत ईशाचे स्मरण केल्याने परमार्थास हवी अशी चित्तशुद्धि प्राप्त होते. त्याने रोज नियमाने जपध्यानादिक केलीच पाहिजेत नाथमहाराज म्हणतात—

जया परमार्थाची चाड । तेणे साडावें लिगाड ।
धरुनि भजनासि चाड । नित्य नेम आदेश ॥

व हे साधन परमात्मा दिसे पर्यंत केलेच पाहिजे.

जे जे दृष्टी दिसे तें ते हरिरूप । पूजा ध्यान जपत्यासी नाही ॥

बाकी सर्वांना अवश्य आहे असे नाथमहाराज आवर्जून सांगतात.

उत्कट साधना करून देव प्रसन्न झाले म्हणजे देव काय देतात हे श्रीतुकोबानी पुढील दोन अभंगात फारच उत्तम रीतीने दिले आहे.

शोधूनि अन्वय वंशवंशावळी ।
परस्पराकुळी जागरण ॥ १ ॥
म्हणविले मार्गें पुढें चाले कैसे ।
केला सामरस्यें अभिषेक ॥ २ ॥
एकछत्र झळके उन्मनी निशाणी ।
अनुहतध्वनी गगनगर्जे ॥ ३ ॥
तुक्या स्वामी स्थापी निजपदीं दासा ।
करुनि उल्हासता सप्रेमता ॥ ४ ॥
पिकल्या सेंदे कडुपण गेले ।
तैसें आम्हा केलें पांडुरंगे ॥ १ ॥
काम क्रोध लोभ निमाले ठायींचि ।
अवघी आनंदाची सृष्टी झाली ॥ २ ॥
आठव नाठव गेले भावाभाव ।
झाला स्वयमेव पांडुरंग ॥ ३ ॥
तुका म्हणे भाग्य या नावें बोलिजे ।
संसारी जन्मिजे याची लागी ॥ ४ ॥

भगवत् कृपेने साधक स्वयमेव पांडुरंग झाला की साधनाची समाप्ति झाली. 'सा काष्ठा सा परा गतिः ।'

पण या नामसाधनाची मौज अशी आहे की साध्य जरी सिद्ध झाले तरी 'भजन' सुटत नाही.

यामुळे या साधनाचे वैशिष्ट्य सांगावयाचे म्हणजे या भक्ति साधनेत साधन भक्ति व साध्य भक्ति असे प्रकार करता येतील. देवाहून भिन्न राहून नामस्मरणादि करणे ही साधन भक्ति आहे व स्वतः देव होऊन त्याचे व भजन करणे ही साध्य भक्ति आहे.

'शिवो भूत्वा शिवं यजेत् ।'

ही उच्च वैदिक भक्तीच वारकऱ्याची उच्च भक्ति आहे

गाय वासुदेव वासुदेवा ।

असे तुकोबा म्हणतात.

ज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

मीचि होऊनि पांडवा ।
करिती माझी सेवा ॥ ज्ञा. अ. ९ ॥

या भक्तीच्या उत्कर्षास ते पंचम पुरुषार्थ मानतात व मानवी जीवनाचे ध्येय समजतात. 'सा काष्ठा सा परा गतिः ।'

तात्पर्य या मार्गाचे साध्य व साधन थोडक्यात सांगायचे तर पुढीलप्रमाणे सांगता येईल.

शिवो भूत्वा शिवं भजेत् ।

हे साध्य आहे. वारकरी साधन मंदिराचे ते शिखर आहे. सगुण विठ्ठलाची भक्ति व नामस्मरण हे साधन हा या साधन मंदिराचा पाया आहे.

तुकारामबोवा म्हणतात.

अवघ्या दशा येणे साधती ।
मुख्य उपासना सगुण भक्ति ।
प्रगटे हृदयींची मूर्ति ।
भाव शुद्धि जाणोनिया ।
बीज आणि फळ हरिचे नाम ।

—शं. वा. दांडेकर

# पारमार्थिक-

# ‘मानसशास्त्र’

गती-अधोगती मनाची हे युक्ति ।
मन लावी एकांती, साधुसंगें ॥ १ ॥
जतन करा, जतन करा ।
धांवतें सैरा ओढाळ तें ॥ २ ॥
मान-अपमान मनाचें लक्षण
लाविलिया ध्यान तेंचि करी ॥ ३ ॥
तुका म्हणे मन उतरी भवसिंधु ।
मन करी बंधू चोऱ्यांशीचा ॥ ४ ॥

भगवद्भक्त तुकाराममहाराज या अभंगात पारमार्थिक दृष्ट्या मानसशास्त्राची मांडणी करीत आहेत. यात गति किंवा अधोगति ही मनावर अवलंबून आहे व त्यामुळे जीवाला बंध किंवा मोक्ष होतो, असा सिद्धांत मांडतात आणि हा बंध चुकविण्याचे साधनही सांगतात. पारमार्थिक दृष्ट्या मानसशास्त्राची मांडणी असे म्हटले ते एवढ्याचसाठी की, व्यावहारिक मानसशास्त्र व पारमार्थिक मानसशास्त्र यात भेद आहे. तो असा पारमार्थिक मानसशास्त्र निवृत्तीकडे झुकते तर व्यावहारिक मानसशास्त्र प्रवृत्तीकडे झुकते. पारमार्थिक मानसशास्त्रात पुण्य पापात्मक विचारांना प्राधान्य असते तर व्यावहारिक मानसशास्त्रात पाप पुण्य विचारापेक्षा व्यावहारिक लाभाला प्राधान्य असते. पारमार्थिक मानसशास्त्रात वासनांचा व कल्पनांचा संकोच असतो तर व्यावहारिक मानसशास्त्रात त्यांचा विस्तार असतो

‘मन एव मनुष्याणां कारणं बन्ध मोक्षयो’

या श्लोकाचा भावार्थच या अभंगात स्पष्ट केला आहे.

मन ही पिंड ब्रह्मांडाला खेळती ठेवणारी अशी अजब शक्ति आहे. म्हणून मनाला ‘मनोदेव’ असेही म्हणतात. ते सुष्ट आहे तसेच दुष्ट आहे. ते शत्रु आहे तसेच मित्र आहे. ते भित्रे आहे तसे धीटही आहे. ते संकुचित आहे तसे व्यापक आहे. ते अपकारी आहे तसे उपकारी आहे. ते बालवत् आहे तसे पिशाचवत् आहे. ते हट्टी आहे तसे समजस आहे. ते उन्नति करते तसे अवनति घडविते. ते दुर्जन आहे तसे सज्जनही आहे, म्हणून मनुष्यत्वाकडून ईशत्वाकडे नेणारे मनच आणि मनुष्यत्वाकडून पशुत्वाकडे नेणारेही मनच. यामुळे ‘गति-अधोगति’ असे म्हटले.

वास्तविक जीव हा परब्रह्माचा अंश असल्यामुळे तो स्वभावतः निरुपाधिकच आहे. तो कर्मात असून कर्मातीत आहे, देहात असून देहातीत आहेत, पण अशा जीवाला बंध-मोक्ष भासविणे हीच मनाची ‘युक्ति.’

‘नवल लाघवी कैसें मन। शुद्धी उपजवी मीपण।
चिद्रूपा लावूनी जीवपण। सुख-दुःख जाण भोगवी॥’

म्हणून तुकोबांनी ‘गति-अधोगति मनाची हे युक्ति,’ असे म्हटले. त्रिगुणांचा आश्रय करून, ते जीवाची उन्नति करते, आहे त्याच स्थितीत ठेवते किंवा त्याला अधोगतीस नेते.

'ऊर्ध्वं गच्छति सत्त्वस्था मध्ये तिष्ठति राजसा ।
जघन्य गुणवृत्तिस्था अधोगच्छति तामसा' ॥ गी १४ १८

असे हे परस्परविरोधी गुणानी युक्त कल्पक, कुशल जबरदस्त. जगाला झुलविणारे विचित्र इंद्रिय आहे. सामान्य मनुष्याची गोष्ट तर दूरच, पण सामर्थ्यसपन्न पुरुष विना देखील याच्या तडाख्यातून सुटले नाहीत.

मन देवासी दुर्धर। मन भयकरा भयकर।
मनें आकळिले हरिहर। मनासमोर कोण राहे '? ॥ ए. भा

'रावण प्राणासी मुकला। भस्मासुर भस्म झाला ॥
गुरुपत्नीही रतला। क्षय रोग त्या चद्राला ॥
इद्रा अगीं सहस्र भगें। नामा म्हणे विषयासगें ॥'

भगवद्गीतेच्या सहाव्या अध्यायात चित्त-चैतन्ययोग भगवतानी सागितल्यानतर अर्जुनाची 'चञ्चल हि मन' कृष्ण' हीच तक्रार आली. तो म्हणतो.

'जे निरोधिलें घे उवावो। जया सयमचि होय सावावो।
'तें मन आपुला स्वभावो। साडील काई?॥' ज्ञा. ६।४१६

त्याच्या समाधानासाठी भगवतानी 'अभ्यास आणि वैराग्य' हे उपाय सुचविले. त्याप्रमाणेच तुकोबा म्हणतात.

'मन लावी एकातीं साधू सगे.'

साधु किंवा सज्जनाच्या सगतीत मनावर सस्कार करून त्याला वळण लावून न सागतील तो अभ्यास करावा तुकोबाच्या काळी काय किंवा सध्याच्या काळी काय, योग्य साधु भेटणे दुर्लभच.

टिळा, टोपी, माळा इत्यादि बाह्य लक्षणे दिसतात त्या ठिकाणी साधुत्व नादतेच असे नाही. साधूचे मुख्य लक्षण म्हणजे –

'मदाय रहित ज्ञान। तेंचि साधूचें लक्षण।
मिद्धाअगीं सदायहीन। लागेल कैचा?॥' दा. ५।१०।१३

पण साधूच्या अतरगातील या ज्ञानाची ओळख साधकाला कशी पटावी? म्हणून साधुत्व ओळखण्याचे एक अगदी सोपे लक्षण अष्टपैलू सामर्थांनी सागितले आहे, ते असे –

'करी वृत्ति जो सत तो सत जाणा।
दुराशेविणे जो नव्हे दैन्यवाणा।
उपाधी देहेबुद्धी ते वाढविते।
परि सज्जना केवि बाधू शके ते?॥'

देहबुद्धी नष्ट झालेली असल्याने साधूला कसलीच हाव नसत व तो अत्यत निरपेक्ष असतो, पण असा सज्जन भेटेपर्यंत साधकाने स्वस्थ बसाव काय? नाही. त्याने सताच्या वाङ्मयाचा आश्रय करून तृषाची तहान ताकावर भागवावी पण सज्जनाच्या शोधात मात्र असावेच तत्त्वज्ञानाचे ग्रथ वाचून ज्ञान होईल तथे साधूची दलाली कशाला? असे काही लोक म्हणतात. पण ग्रथद्वारा ज्ञान होत असले तरी प्रत्यक्ष व्यवहारात त ज्ञान वापरते वळी मनुष्य लटपटतो ज्ञान राहाते पुस्तकात आणि व्यवहार होतो प्रतिकूल मग तो म्हणू लागतो 'व्यवहार तो व्यवहार, त्याचा परमार्थाशी काय सबध? प्रपचात होणाऱ्या पाप-पुण्यात्मक क्रिया याच अवनति व उन्नतीला कारणीभूत असतात.

'जो प्रपचीं सावधान। तोचि परमार्थ करील जाण।
जो प्रपचीं अप्रमाण। तो परमार्थी खोटा ॥ दा. १२१

या सिद्धाताचा निसर पडतो म्हणजे, पुस्तकातून ज्ञान कळते किंवा बोलता येते, परतु पुस्तके अभ्यासून वैराग्य प्राप्त होत नाही. म्हणून देहधारी साधूच्या सगतीचीच आवश्यकता आहे, तत्त्व एकात मानवतो–म्हणजे अनुभवाला येतो ज्या एका स्वरूपात सर्व वृत्तींचा अत होऊन ते स्वरूप आपण अनुभवीत आहोत याची जाणीवही सपते, तो एकात तात्पर्य, हा मनोल्याचा अभ्यास प्रत्यक्ष देहधारी साधूच्या सहवासानेच सहज होतो. कारण

'सहज बोलणे हित उपदेश। करुनी सायास शिकविती॥
काय सागू आतां सताचे उपकार। मज निरतर जागवीती॥'

असे तुकोबा म्हणतात

'मन लावी एकाती साधुसग'

हा चरणार्ध या हेतूने सागितला आहे.

साधूने शिकविले पण साधकाने अभ्यास केला नाही, तर त्या शिक्षणाचा उपयोग काय? त्यासाठी एकाग्रतेने मनन–निदिध्यासन लागतेच. साधूने ज्ञानोपदेश करून मनाला वळण लावले तरी ते ज्ञान योग्य प्रकारे ग्रहण होऊन जीवनात उतरते की नाही, हे पहाण्यासाठी आपले मनावर बारकाईने लक्ष्य पाहिजे शाळेत पतोजी मुलाला शिकवीत असला तरी मुलाचे लक्ष्य अभ्यासात आहे की नाही, ते कुठे उठतो–बसतो, त्याला सगत कोणती आहे इत्यादि गोष्टी पालकानेच पाहिल्या पाहिजेत सहा तास तो शिक्षकाच्या सहवासात असला तरी झोप सोडून बाकीचे दहा तास तो पालकाच्या सहवासात असतो मग आपली जबाब

दारी ओळखून पालकानेही त्याचेवर लक्ष्य ठेवले पाहिजे तशीच किंवा त्याहीपेक्षा जास्त जबाबदारी मनावर लक्ष्य ठेवण्याची आपली आहे म्हणून दुसऱ्या चरणात तुकोबा म्हणतात —

'जतन करा, जतन करा

वाड जनावर जसे गवतावर धावते तसे हे मन विषया कडे धाव घेते तरी त्याच्यावर लक्ष्य ठेवा, त्याला सांभाळा वास्तविक हे आपले कर्तव्य नाही का? आपल्या मनाच्या हालचाली आपणास कळतात की दुसऱ्याला? वास्तविक मनावर सत्ता आपली एका साधूला 'को देव?' असा प्रश्न विचारला असता 'यो मन साक्षी' असे उत्तर तो देतो आपल्या मनाची हालचाल जर आपणासच कळते, तर त्या मनावर आपलेच लक्ष्य पाहिजे पण मोठे दुर्दैव हेच आहे की जीव 'आपण मनाचे साक्षी–देव आहो', हेच मुळी विसरतो. आणि मनाच्या तंत्रानेच नाचतो म्हणून साधूने 'मनाचा साक्षी तू देव आहेस' हे साध काला पटवून द्यावे लागते आपण शरीर जसे ठाकठीक ठेवतो तशी मनाची काळजी घेतो का? आपण शरीराची घाण साबण लावून धुतो, पावडर लावतो, नखे काढतो, केश कर्तन करतो, तसे मनावरील डाग आपण नाहीसे करतो का? कामक्रोधादि त्याची नखे काढतो का? संकल्प–विकल्प याच मुंडन करतो का? त्याला आत्मा नात्म विचाराच्या मैदानात सोडून, ते मरणालाही भिणार नाही असे त्याला धीट करतो का? संताचा उपदेश भरवून त्याला बाळसे आणतो का? वास्तविक हे सब आपले काम पण ते न करता, आपण मनाला मात्र ते दुर्जन म्हणून दोष देतो

वास्तविक मन सज्जन की दुर्जन? सूक्ष्म विवेकाने पाहिले तर ते सज्जनच ठरते कारण मन सुख असल तेथेच उडी घेते खेळकर पोराप्रमाणे ते कोठेही आनंद शोधते कारण ते घरदाज आहे त्याचा जन्म आनंद सागरात, मनाचे मूळ पहिले अहं स्फुरण लाट म्हणजे समुद्राचेच पाणी तसे मन म्हणजे भगवद्विभूति 'इंद्रि याणां मनश्चास्मि'। ब्रह्माचा अंश जो जीव तो आपल्या पित्याप्रमाणे आनंदात राहाणारा शूर वीर असेल म्हणून मन त्याच्या सहवासास आले पण मालक जीव विषय विप वीन असलेला पाहून, मनही विषयातच आनंद शोधू लागले जीव जर ब्रह्मानंद चाखेल व मनालाही तो झरा दाखवील तर तेही आनंदात राहील त्याला खुबीने निरिंद्रिय सुखाची वाट दाखवावी लागते त्याला आनंदाची वाट दाखविणे हे जीवाचे कर्तव्य नव्हे का? म्हणून ज्ञानोबा यथार्थाने म्हणतात

'का जे यया मनाचें एक निकें।
जे देखिलिया गोडीचिया ठाया सोकें।
म्हणोनि अनुभवसुखचि कवतुकें।
दावीत जाइजे॥ ज्ञा ६।४२०

पण जीव ही वाट त्याला दाखवीत नसल्याने ती मनाला माहीत नसते, म्हणून आत्मसुख शोधण्याच्या भानगडीत ते पडत नाही असे सुखाचे स्थान जरी त्याला कळले तरी सवयीमुळे ते इंद्रिये बरोबर घेऊन ते ते स्थान पाहू लागते आणि ते दिसले नाही म्हणजे तळमळते म्हणून इंद्रिये बाजूला ठेवून इंद्रियातीत आत्माराम कसा अनुभवावा हे साधुसंगतीत शिकून जीवाने मनाला ते शिकवावे लागते

'धावते सैरावैरा ओढाळ ते'

असा चंचलत्याचा गुण सांगून तिस या चरणात मनाच स्वरूपलक्षण सांगतात.

'मान–अपमान मनाचे लक्षण'

मनाचे स्वतंत्र असे स्वरूप प्रतीत होत नाही म्हणून मान–अपमान, हिंसा–अहिंसा, दंभ–अदंभ इत्यादि विरोधी गुणदोषांची कल्पना करणारे आणि ज्याची चटक लावावी त्या गोष्टीच्या मागे लागणारे जे अंतरेंद्रिय, ते मनाचे स्वरूपलक्षण होय ते प्रत्यक्ष दिसत नाही, पण त्याच्या कल्पनाकार भाराचा अनुभव मात्र प्रत्येक मनुष्यास आहे

'हे मन कैसें केवढें। ऐसें पाहो म्हणो तरी न सांपडे।
एरवी राहाटावया थोडें। त्रैलोक्य यया॥ ज्ञा ६।४१२
'बाप्पा मन हें नाव। एऱ्हवी कल्पनाचि सावेव।
जयाचेनि संगे जीव—। दशा वस्तु॥ ज्ञा १३।११०
'संकल्पें सृष्टि घडी। सवेंचि विकल्पोनि मोडी।
मनोरथांचिया उतरडी। उतरी रची॥ ज्ञा १३।११४

'करू नये त्याची करी विवंचना'

याप्रमाणे ईश व जीवसृष्टि ही कल्पनेनेच व्यापिली आहेत ईश सृष्टीचे मूळ कल्पनाच

'एकोऽहं बहुस्याम्'
हे स्फुरण प्रथम झाले आणि ईश सृष्टीला सुरवात झाली पुढ
'महर्षय सप्तपूर्वे चत्वारो मनवस्तथा।'
मद्भावा मानसा जाता येषां लोक इमा प्रजा ॥गी १०।६
तसेच जीव सृष्टीचे. आधी मनात कल्पनेचे स्फुरण, मग तिचे सूक्ष्मरूप, मग तिचे व्यक्तरूप व शेवटी स्थूलरूप उदाहरणार्थ 'घर असावे' हे कल्पनेचे स्फुरण, 'त्याच्या रचनेची कल्पना' हे सूक्ष्मरूप, 'त्याचा नकाशा' हे व्यक्तरूप आणि 'प्रत्यक्ष घर' हे स्थूलरूप

मानापमान हे लक्षण पूर्वार्धात सागून उत्तरार्धात मनाचे दुसरे लक्षण सागतात
'लाविलिया ध्यान तेंचि करी।'
त्या कल्पनेची मनाला चटक लावावी त्या कल्पनेला ते चिकटते मी जीव, मी पापी, मी दुःखी इत्यादि कल्पनाना ते जसे चिकटते, एवढेच नव्हे तर त्याचा ध्यास घेते, तसेच मी परमात्मा, मी पुण्यवान, मी सुखी यांही कल्पनाना चिकटून ते ध्यास धरते असे हे परस्पर विरोधी लक्षण मनाचे आहे म्हणून शेवटच्या चरणात तुकोबा म्हणतात —

'तुका म्हणे मन उतरी भवसिंधू ।
मन करी बधू चौ याशीचा ।'

परस्पर विरोधी गुणानी युक्त असे मनाचे स्वरूप असल्यामुळे मनाचे तोंड विषयाकडे फिरविले की तुम्ही संसारात अडकता आणि ते अतर्मुख करून आत्मारामाकडे वळविले की तुम्ही चौ याशीच्या फेऱ्यातून मुक्त होता नाथ म्हणतात

'या मनाची एक उत्तम गति। जरी स्वयें लागलें परमार्थी।
तरी दासी करी चारी मुक्ती। दे आधोनि हातीं परब्रह्म ॥

'लविलीया ध्यान तेंचि करी' हे मनाचे वर्म ध्यानात घेऊन, या ससारचक्रातून सुटण्यासाठी साधुसंतानी साधका पुढे पुष्कळ मार्ग ठेवले आहेत तुकोबा याचा विस्तार न करता 'मन लावी एकांतीं साधुसगें।' एवढेच सागतात, कारण साधू साधकाला 'अधिकार तैसा करू उपदेश' या न्यायाने त्याचा अधिकार पाहून अचूक मार्गदर्शन करतात पण सज्जन सगति मिळेपर्यंत साधकाने स्वस्थ बसावे काय? म्हणून स्वत चा अधिकार पाहून कोणता मार्ग पत्करावा यासाठी ते मार्ग कोणते आहेत ते आपण पाहू

१. जर अगात नेट आणि स्वभाव करारी असेल तर त्या साधकाने परमार्थ विरोधी कल्पना, मनाच्या आधीन न होता, मोडून काढावी तुकोबा म्हणतात

'होऊ नको काहीं या मना आधीन।
नाइके वचन त्याचें काहीं ॥१॥
हटीयाची गोष्टी मोडून टाकावी।
सोई ही धरावी विठोबाची ॥ २ ॥
तुका म्हणे झाले जे मना आधीन।
तयासी बधन यम करी ॥ ३ ॥

२ हे झेपण्याप्रमाणे नसल्यास मन कुठे जाते तिकडे खुशाल जाऊ दे, पण साधकाने त्याच्यामागे लागून धावू नये कुत्र्याच्यामागे मालक लागल्यास ते पुढेच पळते, पण मालकाची पाठ फिरल्यास तेही थांबून मालकामागे येते चैतन्याच्या आधारावरच मन जगत असल्याने त्याचा आधार तुटताच ते पागळे पडते

३ हेही होत नसल्यास
'जैवि हिरेन हिरा चिरिजे। ए भा
तेवि मनेंचि मन धरिजे।'
लोखडाची बेडी जशी लोखडाच्या छनी-हाताड्यानी तोडावी लागते तसेच समारभाला कारणीभूत होणाऱ्या कल्पना पारमार्थिक कल्पनानीच तोडाव्या

असो ऐसी हे कल्पना। साधनें टे समाधाना।
एरव्ही हे पतना। मूळची॥' दा ७-५-२५

परतु नाथ इशारा देतात की
'हेही तैंचि गा लाहिजे।
जैं गुरुकृपा पाविजे सपूर्ण स्वयें ॥ ए भा

४ हेही न जुळल्यास मनाशी मैत्री करून त्याला हळू हळू शिकवावे
'चोर भाडारी करिता पूर्ण।
चोर चोराते निवारी जाण।
तेवि मनासी करिता मित्रपण।
मनाचे अवगुण मनचि नाशी ॥ ए भा

समर्थांनी मनोबोधात मनाला या उपायाने शिकविले आहे पण ही चार साधने जरी सागितली तरी गुरुकृपा आणि मनाची परमार्थाकडे ओढ या गोष्टी सहजसाध्य नाहींत

५ नाथ म्हणतात—

'साधनीं माझी मुख्य भक्ति।
त्यात विशेष नामकीर्ति।'

म्हणून सर्व संतानी एकमुखाने नामसंकीर्तन हे साधन सांगितले. श्रीवासुदेवानंद सरस्वति म्हणतात —

ही स्वरूपाची मात। ही छत्री अत्यद्भुत।
हें एक जाळें निश्चित। मनोमत्स्य ज्यात सापडे॥

चतुर व चिकित्सक साधक एक शंका अशी घेईल की तुकोबानी मनाला देवाच्याही वरच्या पायरीवर कसे नमविले? मन बंधाला कारण होईल हे म्हणणें योग्य वाटते, कारण मनुष्य अनेक कल्पनांच्या जाळ्यात सापडून वाहवतो, याचा अनुभव आहे 'गोड परमार्थ वाटे कडू आणि कडू विषय वाटे गोडू।' ही मनाची स्थिति प्रत्ययाला येते. पण 'तुका म्हणे मन उतरी भवसिंधु' हे कसे? मुक्तिदाता मन की भगवत? मन स्वत जड असून परप्रकाशाने म्हणजे हृदयस्थ चैतन्याने प्रकाशित होते. ते सर्व इंद्रियांचा राजा आहे हे खरे, पण हे त्याचे राजेपण चैतन्याच्या जिवावर आहे, म्हणून आत्मकृपेने मुक्ति प्राप्त होईल. पण परप्रकाशित जड मन मुक्तीला म्हणजे भवसागर तरून जाण्याला समर्थ कसे होणार? ही शंका योग्यच आहे.

हिच्या समाधानासाठी आपण व्यवहारातील एक उदाहरण घेऊया. दिवसा सूर्यप्रकाशाने व रात्री दीपप्रकाशाने आपला सर्व व्यवहार आपण करतो म्हणून सूर्य व अग्नि या दोघानाही आपण देव मानतो. आता सूर्याने सर्व शरीर प्रकाशित केले पण डोळा नसेल तर ते दिसेल का? ज्याच्या योगे सर्व दिसेल असे नेत्राविना दुसरे इंद्रिय नाही. सूर्याशिवाय नेत्र असून आंधळा आणि नेत्राशिवाय सूर्य असूनही आंधळाच. सूर्य प्रकाशाने नेत्रानाच का दिसते? कारण सूर्य हीच त्याची देवता आहे, म्हणून डोळ्यात तेज. म्हणजे डोळा ही सूर्याची विभूति म्हणून तो सर्व पाहतो. डोळा सूर्य तेजाने जसे इतर पदार्थ पाहतो तसा तो सूर्यही पाहू शकतो. हीच गोष्ट मनाच्या बाबतीत ततोतंत लागू पडते मन हे आत्मसत्तेच्या साहाय्याने जसे सर्व व्यापार जाणते तसेच शुद्ध झालेले एकाग्र मनच आत्मस्वरूप जाणते, कारण ते आत्मारामाची विभूति आहे. गीतेत भगवत म्हणतात माझ्या विभूतीत—

'इंद्रियाणा मनश्चास्मि।'

डोळा चहूबाजूला वळला की सर्व दिसते आणि वर आकाशाकडे वळला की सूर्य दिसतो. तसेच मन बहिर्मुख झाले की त्याला विषय दिसतात, आणि तेच अंतर्मुख झाले की त्याला आत्मारामाचा साक्षात्कार होतो. म्हणून

'तुका म्हणे मन उतरी भवसिंधू।'

मन प्रसन्न ठेवले, म्हणजे ते संकल्प विकल्प रहित केले, की त्याच्यासारखे दुसरे दैवत नाही. मनानेच एकदा मी जीव नसून परमात्मा आहे असे ठरविले की मुक्तच. म्हणून तुकोबा म्हणतात—

'मन करा रे प्रसन्न।
सर्व सिद्धीचे कारण॥ १॥
मोक्ष अथवा बंधन।
सुख समाधान इच्छा ते॥ २॥
साधक वाचक पंडित।
श्रोत वक्ते ऐका मात॥ ३॥
नाही नाही आन दैवत।
तुका म्हणे दुसरे॥ ४॥'

हे पारमार्थिक मानसशास्त्र सर्वच संतांना मान्य आहे. श्रीसमर्थ मनोबोधात म्हणतात,

स्फुरे वीषयी कल्पना ते अविद्या।
स्फुरे ब्रह्म रे जाण माया सुविद्या।
मुळी कल्पना दोरूपे तेचि जाली।
विवेके तरी स्वस्वरूपे मिळाली॥

— डॉ रा. द. प्रणी



# मानवी जीवन-विकासातील सद्गुरूंचे स्थान

मानवी जीवन ही एक सामान्य गोष्ट नसून ती एक अत्यंत महत्वाची, रक्षणीय व संवर्धनीय अशी वस्तु आहे पण हे जीवन माणसाला कसे प्राप्त होते, यासंबंधी मतभेद आहे अनेक दुष्कर प्रयत्नाना आलेले हे एक सुमधुर फल आहे अनेक सुकृताची ही एक परिणति आहे. परमेश्वरापासून अलग झालेला हा जीव अनेक जन्म घेतल्यानंतर या उत्कृष्ट अवस्थेला प्राप्त झाला आहे. ही अवस्था म्हणजे लाभलेले एक नेत्रदीपक भाग्यच आहे प्राण्याच्या धडपडीचे हे मोठे सुयश आहे

प्राणी कर्म करीत असतो व तो कर्माप्रमाणे पुढील देह प्राप्त करून घेतो असे आपल्या शास्त्रज्ञानी मानले आहे, यालाच पुनर्जन्माचा सिद्धान्त असे म्हणतात हा सिद्धांत अनेक सतर्कांनी सिद्ध झाला आहे अशा प्रकारे दीर्घ प्रयत्नानंतर ही जी अमोलिक वस्तु प्राप्त झाली आहे तिचे काहीतरी महत्व असले पाहिजे व काहीतरी प्रयोजन असले पाहिजे, कारण–या सृष्टीच्या मुळाशी योजकता, कल्पकता, चातुर्य, संयोजन या गोष्टी दिसतात

या जगात तीन गोष्टी अत्यंत दुर्लभ आहेत त्यापैकी मनुष्यत्व याचा पहिला क्रमांक आहे भगवत्पूज्यपाद श्रीमच्छंकराचार्य म्हणतात की—

दुर्लभं त्रयमेवैतद्दैवानुग्रह हेतुकम् ।
मनुष्यत्वं मुमुक्षुत्वं महापुरुष संश्रय ॥

जरा अन्य भाषेत सांगावयाचे झाल्यास परमेश्वराला ओळण्याकरिता त्या दयाघनप्रभूने हा सुंदर मानव निर्माण केला आहे. या निर्मितीत परमेश्वराने आपली सर्व बुद्धीमत्ता व कौशल्य खर्च केले आहे. जीवशास्त्राच्या सिद्धांताप्रमाणे 'मानव ही निरपवाद व निर्दोष अशी जीवसृष्टीची निर्मिति आहे,' असे म्हटले आहे यापेक्षा अधिक निर्दोष कृति आजच्या तरी विज्ञानाच्या कक्षेत येत नाही असे जर असेल तर या कृतीचे प्रयोजन जाणिले पाहिजे तिचे रहस्य ओळखले पाहिजे त्याचा हेतु समजून घेतला पाहिजे

' महता पुण्यपण्येन क्रीतेयकायनौस्त्वया ॥

जीवन ही जर जादू नसेल व अनायासे प्राप्त झालेली वस्तु नसेल व ती अमूल्य वस्तु असून जर प्राप्त व्हायला अतिशय कठीण असेल तर ती ज्या अवस्थेत दिली (मिळाली) त्यापेक्षा ती उत्कृष्ट करणे, दिव्य करणे ही गोष्ट क्रमप्राप्तच आहे किंबहुना ते परम कर्तव्य आहे

मग असा प्रश्न निर्माण होतो की, या जीवनाचे ध्येय तरी काय असले पाहिजे ? पण हे कसे निश्चित होणार यासाठी शुद्ध, सात्विक, पवित्र बुद्धीची आवश्यकता आहे, शुद्ध बुद्धीतच ध्येयरूपी बिंबाचे यथार्थ प्रतिबिंब पडत असते परंतु दैनंदिन व्यवहारात अनेक दुर्घटनामुळे व दुर्धर प्रसंगाने बुद्धि मलिन होत असते अशा प्रकारच्या बुद्धीला

ध्येयाचे भान होणे कठीण व झालेच तर ते अयथार्थ व संदिग्धही असणे शक्य आहे, जर ते अयथार्थ-अथवा-संदिग्ध असेल तर, ग्राह्याग्राह्यतेचाहि प्रादुर्भाव होणार, म्हणून सर्वांचे मूळ जी बुद्धि आहे. ती बुद्धि शुद्ध व्हावी, अशी इच्छा असली पाहिजे किंबहुना आपल्या शास्त्रकारांनी हे जाणूनच संस्कारांची योजना केली आहे. माणसाच्या जन्म कालापासूनच या संस्कारांची सुरुवात होते. फेवढा हा व्यापक विचार आपल्या पूर्वजांनी केला आहे! हे संस्कार जीवनात अत्यंत अवश्यक आहेत. म्हणून त्या त्या प्रसंगी त्याची सुयोग्य व्यवस्था केली आहे. संस्कार यात मूळ शब्द 'सम + कृ' आहे व याचा अर्थ-शुद्ध-करणे, स्वच्छ करणे, पवित्र करणे, उजळा देणे असा आहे.यालाच सद्गुणाचे आधान व दोषाचे अपनयन असे म्हणतात. या संस्कारांचाच संस्कृतीशी संबंध आहे.भूषणभूत जी सम्यक कृति तिला संस्कृति म्हणतात. सुंदर–आचार, सुंदर विचार आणि त्यांच्या–(सुंदर आचार-विचाराच्या) सुंदर समन्वयाने मानवी जीवनाला सुंदर व पवित्र आकार प्राप्त होत असतो. अशा प्रकारचे जीवन हे आदर्श, अनुकरणीय व गौरवास्पद होत असते, हे संस्कार मानवावरच केले जातात. पशु किंवा इतर प्राण्यावर नाही. पशु किंवा इतर प्राणी यांच्या प्राथमिक गरजा जरी सारख्या असल्या तरी संस्कारामुळे ते प्राणी व पशु यांच्यामध्ये जमीन अस्मानाचा फरक पडतो.

अशा प्रकारचे उत्कृष्ट व आवश्यक कार्य कोण करणार! म्हणूनच जीवनात गुरूचे स्थान आले. गुरुची ही आवश्यकता मानवी जीवनातल्या विविध अवस्थेत असते. स्वरूप फक्त भिन्न असते एवढेच. या सृष्टीत मानवी जीवाने पदन्यास केला की, तेव्हापासून गुरुची आवश्यकता आहे. आणि निसर्गाने त्याची योग्य योजनाही केली आहे. 'माता ही सर्व मानवी जीवाचा आद्य गुरु होय.' गुरुवर आत्यंतिक विश्वास असेल तरच चांगले संस्कार होणार. गुरु हे आपले सर्वस्व आहेत असे वाटले पाहिजे. "जिच्या हाती पाळण्याची दोरी, ती जगाते उद्धरी" या लोकोक्तीत फार खोल अर्थ भरला आहे. मानवीजीवनाला पहिला आकार देण्याचे काम आई करते. आईवर मुलाचा जितका विश्वास असतो तितका विश्वास दुसऱ्या कोणावरही नसतो. सर्व गोष्टी पडताळून पहाण्याची कसोटी म्हणजे आईच होय असे त्याला वाटते म्हणून जगातील विचारवंत लोक असे म्हणतात की, मुलाचे खरे शिक्षण त्याच्या सहा सात वर्षातच होत असते. आईचे हे महत्व लक्षात घेऊनच मानवाला "मातृदेवोभव" असा हिला पाठ, उपनिषदांनी दिला आहे. स्मृतिमध्येही आईचे हे अनन्य साधारण महत्व ओळखून "उपाध्यायान दशाचार्यः आचार्याणां शतं पिता। सहस्त्रंतु पितृन्माता गौरवेणातिरिच्यते॥"

आचार्य आणि पिता यांच्यापेक्षाही वरचे स्थान आईला दिलेले आहे व ते अगदी यथार्थ आहे. यानंतर क्रमाने 'पिता' हा गुरु होय. उपनयन नामक महत्त्वाचा संस्कार केल्यानंतर मानवी जीवनात आचार्यरूपी गुरुचा प्रवेश असतो.

हळू हळू हा मानव जीवनाच्या विशाल प्रांगणात प्रवेश करू लागतो, अशा वेळीच त्याला गोंधळण्याची शक्यता असते व तो गोंधळ नाहीसा करून त्याला योग्य ते मार्गदर्शन करण्याचे काम गुरु करतो. अशा या गुरुचे महत्व मानवी जीवनात फारच आहे. गुरूचा स्पर्श जीवनाला झाल्यानंतर जीवनाचे कानेकोपरे उजळू लागतात. जीवनाचा प्रत्येक भाग स्वच्छ होऊ लागतो. अज्ञानरूपी अंधकाराची निवृत्ती होऊ लागते. स्वभावाचे उदात्तीकरण होऊ लागते, म्हणून आपल्या पूर्वजांनी भगवान् वेदव्यासाचे सर्व मानव जातीचे गुरु म्हणून अत्यंत यथार्थ वर्णन केले आहे.

> नमोऽस्तुते व्यासविशाल बुद्धे
> फुल्लारविंदायतपत्रनेत्र।
> येनत्वया भारत तैलपूर्णः
> प्रज्वालितो ज्ञानमयः प्रदीपः॥

म्हणूनच गुरुपौर्णिमा हा गुरु स्मृतीचा दिवस मानला जातो. व्यासांच्यारूपाने सर्व गुरूचे स्मरण करायचे असते. मानवी मूल्यांचे जतन व संवर्धन करण्याचे महान् कार्य ज्यांनी केले. त्यांच्या स्मरणाचा तो दिवस आहे. कृतज्ञता ही भारतीय संस्कृतीमधील एक महान गुण आहे व ज्ञानदात्या गुरुविषयी कृतज्ञ असणे ही महान् व उच्च परंपरा आहे. अशाप्रकारे ज्ञानदात्या गुरुविषयी कृतज्ञता व्यक्त करण्याचा हा संस्कार म्हणजे भारतीय संस्कृतीने मानवाला दिलेली ही मोठी देणगीच आहे, असे ज्ञानदाते सद्गुरु, हे ईश्वरापेक्षा श्रेष्ठ आहेत असे प्रौढोक्तीने काही संतानी वर्णिले आहे. ईश्वर व सद्गुरु हे जर दोघी समोर

उभे राहिले तर प्रथम वंदन कोणाला करावे ? असा प्रश्न आला असता, महात्मा कबीर म्हणतात. प्रथम गुरुला वंदन करावे. कारण ईश्वर प्रसन्न झाला तर जगातील इतर वैभव प्राप्त होईल पण गुरु जर प्रसन्न झाला तर तो ईश्वराचाच साक्षात्कार करून देतो. कबीर म्हणतात.

' गुरु गोविंद दोऊ खडे काके लागू पाय ।

बलिहारी गुरू आपनो जिन गोविंद दियो बताय । '

अशा प्रकारचे गुरु हे सामान्य कोटीतले गुरु नसून ते असामान्य आहेत. म्हणूनच त्याना सत्गुरू म्हटले आहे, ध्येयाकडे घेऊन जाण्याचे काम सद्गुरूच करीत असतात. जर ध्येयमार्ग प्रज्वलित करायचा असेल तर त्याला गुरु कृपेच्या दीपाचीच आवश्यकता आहे. अशा ज्ञानदात्या, व ध्येय प्रदर्शक गुरूविषयी भगवत्पूज्यपाद श्रीमत् शंकराचार्यानी शतश्लोकी ग्रन्थात अत्यंत आदराने सद्गुरूचे वर्णन केले आहे. आचार्य म्हणतात.

दृष्टांतो नैव दृष्ट स्त्रिभुवनजठरेसद्गुरोर्ज्ञानदातुः

स्पर्शश्चेत्तत्रकल्प्य. स्यनयतियदहोस्वर्णतामश्मसारं ॥

नस्पर्शत्वंतथपिश्रित चरणयुगेसद्गुरुः स्वीयशिष्ये

स्वीयं साम्य विधत्ते भवति निरुपमस्तेनवा लौकिकोऽपि ॥

या त्रिभुवनात ज्ञानदात्या सद्गुरुना दृष्टान्तच नाही. परि याचा दृष्टात द्यावा तर तो परिस लोखडाचे सोने करतो, परन्तु सोने करण्याचा स्वतःचा गुण त्याला देत नाही. परंतु सद्गुरु हा शिष्याला सद्गुरु करतो व सद्गुरु करण्याचे गुण पण देतो म्हणून सद्गुरु हा अनुपमेय होय. ज्ञानाने अज्ञानरूपी अंधःकार नाहीसा करून शिष्याला कृतार्थ करण्याचे काम सद्गुरु करतात.

आपल्या सर्व शास्त्रकारानी व संत महात्म्यांनी सद्गुरुचे महत्त्व मुक्त कंठाने प्रशंसिले आहे. केवळ मोक्षमार्गातच सद्गुरुची आवश्यता आहे असे नाही तर व्यावहारिक जीवनही सुरसंपन्न होण्याकरिता व उत्कृष्ट ध्येयनिष्ठतेची सिद्धि करिता सद्गुरुची आवश्यकता आहे

म्हणूनच शास्त्रकारानी असे म्हटले आहे की मानवी जीवन प्राप्त झाले असता तीन वस्तूची नित्य सेवा केली पाहिजे. म्हणजे तीन वस्तूंचे स्मरण केले पाहिजे व ओळख ठेविली पाहिजे. ' यावज्जीव त्रयः सेव्य' वेदान्तो गुरू ईश्वरः ' येथे वेदान्त शब्दाचा अर्थ सत्शास्त्र व ईश्वर म्हणजे चित्शक्ति आणि गुरु म्हणजे सद्गुरु देह ही दीपन्या याने गुरु हा मध्य बिंदु असल्यामुळे, तो ईश्वराचे दर्शन ही करून देतो व सत्शास्त्राचे दर्शनही करतो, सद्गुरु तो आहे की जो केव्हाही स्वार्थपरायण न होता निरंतर शिष्याचे शाश्वत कल्याण कसे होईल; याचाच विचार करतो तो. गुरु हा शिष्याचे जीवन उदात्त बनवितो व त्यामध्ये सुगंध निर्माण करतो, गुरु काय करीत नाही ? सद्गुरूची प्राप्ति झाली असता, जीवनात निर्भयता व तेजस्विता प्राप्त होते नी जीवनात अत्यंत आवश्यक आहे. प्रथमतः संस्कारानी व ईश्वरार्पण बुद्धीने निष्काम कर्म योगाने चित्त शुद्ध व सात्विक होऊन उपासनेने निश्चल होते.

तेथे ज्ञानाचा उदय झाला असता परभक्तीने क्रमशः साधक हा ईश्वराचा होतो व नतर ईश्वरस्वरूप होऊन जातो. या मानवी ध्येयाकरिता लागणारी–निष्कामकर्म, उपासना व ज्ञान ही साधने साधक–शिष्याच्या जीवनातील आवश्यक मूल्ये आहेत. ह्या तीनही मूल्याचा योग्य समन्वय शिष्याच्या जीवनात सद्गुरूच करून देतो. म्हणून सद्गुरु हा ब्रह्मा, विष्णु, महेश स्वरूप आहे. ब्रह्मा ही कृतिशील देवता आहे. विष्णु ही भक्तीची देवता आहे व शंकर ही ज्ञान देवता आहे. निष्काम-कर्मयोग मधुरा-भक्ति व ज्ञान याचा योग्य समन्वय सद्गुरुच्या जीवनात झालेला असतो म्हणूनच सद्गुरु साक्षात् ब्रह्मरूप आहे,

' गुरुर्ब्रह्मा गुरुर्विष्णु गुरुर्देवो महेश्वरः

गुरुः साक्षात् परब्रह्म तस्मै श्री गुरवेनमः ॥ '

असे योग्य वर्णन शास्त्रकारानी केले आहे. एवच, गुरु हे शिष्याला स्वकर्मशील बनवून भक्तीचे माधुर्य दाखवून ज्ञानमंदिराकडे नेत असतात. यातच शिष्याची इतिकर्तव्यता आहे. अशा–या साधकाना नितांत आदर्शनीय, निरुपम प्रातः स्मरणीय, वंदनीय सद्गुरूंना शतः प्रणाम.

— रघुनाथशास्त्री जोशी

# भक्तिविवेक

मंगलमय अशा परमेश्वराची प्राप्ति करून घेणे हे मानव जन्मातील प्रधान कर्तव्य आहे. सर्वैश्वर्य संपन्न अशा परमेश्वराची प्राप्ति करून घेण्यास मानवदेह योग्य-समर्थ आहे. मानव देहाची योग्यता फार मोठी आहे. देवसुद्धा या मानव देहाची प्रशंसा करतात. आणि आपणास मिळावा अशी प्रार्थना करतात. "मुकुंद सेवोपयिक स्पृहाहिन" असे प्रमाणवचन त्याबद्दल प्रसिद्ध आहे

सात्विकशास्त्रेसुद्धा मानवांना ईश्वरप्राप्ति व्हावी या करताच प्रवृत्त झालेली आहेत. त्या शास्त्रांना अनुसरणारे सत्पुरुष पराकाष्ठेचा प्रयत्न करून ईश्वर प्राप्ति करून घेतात. सात्विक शास्त्रांनी प्रतिपादन केलेला हा मार्ग अनादिकाळापासून प्रवृत्त झाला असून फळप्रद म्हणून सर्व सज्जनांना संमत आहे अशा सात्विक शास्त्रामध्ये ईश्वर प्राप्तीची अनेक साधने जरी सांगितली असली तरी त्या सर्वांमध्ये भक्ति हे साधन सर्वांना साध्य असून सर्वांना सुलभ आहे म्हणून साधुसंतांनी मोठ्या आदराने याचा स्वीकार केला आहे.

"भक्ति म्हणजे थोडक्यात भगवद्भजन होय."

'भगवान अपि परमकारुणिक' सुप्रसिद्ध ' भगवान् परमकारुणिक असून अपरिमित ऐश्वर्य संपन्न आहे. ज्ञान, ऐश्वर्य, शक्ति, बळ, वीर्य आणि तेज या सहा गुणांनी तो सर्वदा युक्त आहे. जगाची उत्पत्ति, स्थिति व संहार करणारा म्हणून तो प्रसिद्ध आहे

भगवान् सर्व कर्मांची फळे देतो. भक्तावर अनुग्रह करतो भक्ताकरता नाना रूपे घेऊन भक्ताचे मनोरथ पूर्ण करतो त्याच्या प्रसन्नतेवर सर्व सिद्धि अवलंबून आहेत. तो भक्त वत्सल आहे. तो सर्वसेव्य आहे असा आपला अनुभव दिव्य सामर्थ्यसंपन्न अशा महर्षींनी आणि महात्म्यांनी व्यक्त केला आहे. पुरातन काळापासून येणारा हा अनुभव साधुसंतांनी आजही आपल्या प्रत्ययास येतो असे स्पष्ट सांगितले आहे.

युक्तीने पाहिले तरी भगवान् सर्वांना सेव्य आहे. म्हणजे सर्वांनी त्याची सेवा करावी हे योग्यच दिसते सर्वज्ञ सर्व शक्तिमान् कर्तुमन्यथाकर्तुं समर्थ व नियामक अशा ईश्वराचे भजन म्हणजे सेवा अल्पज्ञ अल्प शक्तिमान् सर्वथा असमर्थ व नियम्य अशा मानवाने करणे हे उचित क्रमप्राप्त आणि अवश्य कर्तव्य आहे यात विवाद नाही.

अवश्य कर्तव्य केले नाहीतर मानवाचे अधःपतन होते हे निसर्गसिद्ध आहे म्हणून ते केले पाहिजे.

"अनित्यमसुखं लोकमिमं प्राप्य भजस्व माम्"

अर्थः—हा मानवदेह अनित्य आहे. तो केव्हा नष्ट होईल याचा नेम नाही तो गर्भवासादि अनेक दुःखांनी युक्त आहे. तथापि अत्यंत दुर्लभ असून सर्व पुरुषार्थ मिळवून देणारा आहे. दुर्लभ असा मानव देह मिळाल्यावर तो जोपर्यंत नष्ट झाला नाही तोपर्यंत सत्वर माझे भजन कर, असे भगवान श्रीकृष्ण आपल्या प्रिय शिष्यास म्हणजे

अर्जुनास स्पष्ट सांगतात
' अगा माते न भजावयालागीं। कवण बळ पां आपुल्यि अंगीं। जाइपरी की भोगीं। निश्चिंती केली ॥
ना तरी विद्या की वयसा। या आणि यासि हा ऐसा। मज न भजता भरवसा। सुखाचा कोण ॥ (ज्ञानेश्वरी)
अनेक दुःखांनी भरलेल्या या मृत्युलोकात येऊन मला कसे भजू नये ? अरे अर्जुना ! माझे भजन न करण्याला तसे आपल्या आंगी कोणते सामर्थ्य आहे. हे घराच्या जोरावर का भोगाच्या जोरावर बेफिकीर झाले आहेत अथवा विद्येने किंवा तारुण्याने हे बेपर्वा होऊन बसले आहेत ? माझे भजन न करता असे बेपर्वा होऊन बसण्या मागची या प्राण्यांना सुखाची ग्वाही कोणाची आहे ? असे ज्ञानेश्वर महाराज म्हणतात
एवढ्यावरून भगवद्भजन अवश्य कर्तव्य असून न केल्यास मानवाचे अधःपतन ठरले आहे असे सिद्ध होते
अवश्य कर्तव्य असलेले भगवद्भजन विविध व अनंत फळाला देणारे आहे फळ दोन प्रकारचे असते. एक अवान्तर फळ व एक मुख्य फळ भजनाची अवांतर म्हणजे आनुषंगिक फळे विविध आहेत भगवद्भजनाने मानवता अभिव्यक्त होते मानवतेची अभिव्यक्ति सर्व लोकांना आणि सर्व राष्ट्रांना नेहमी अपरिमित असते भक्ताची मानवता भजनाने अभिव्यक्त झाल्यामुळे तो भक्त मानवमात्राच्या हितार्थ प्रवृत्त होतो 'सर्वभूतहितेरता' असे भक्ताचे वर्णन केले आहे त्याचेवर सर्वांचा विश्वास बसतो तो सदा चारसंपन्न बनतो भजनाभ्यासामुळे त्यास मान मिळतो व्यवहारात मानवता, अभिव्यक्ति, विश्वासास्पदता, सदाचारसंपन्नता व भजन मान्यता ही फळे फार महत्त्वाची आहेत त्यामुळे जगात सुव्यवस्था आणि सुखसमृद्धि यांची वाढ होत असते तरी हा थोडक्यात भजनाची आनुषंगिक फळे आहेत मुख्य फळाचा विचार मोठा आहे त्याकरता पुढील वचने पहाण्यासारखी आहेत
'भक्त वत्सल स्वयमेव सर्वेभ्यो मोक्षाग्रभ्यो भक्ति निरान परिपालयति सर्वाभीष्टान् प्रयच्छति मोक्ष दापयति भक्त्या असाध्य न किंचिदस्ति' इत्यादि
अर्थ — भक्तवत्सल भगवान् स्वतः भक्तांचे मोक्षविघ्ना पासून रक्षण करतो सर्व इच्छित फळे देतो व मोक्ष देतो भक्तीने असाध्य असे काही नाही सर्व सुलभ आहे भक्तीने ध्रुवाला अढळपदाचा लाभ झाला प्रल्हादाचे शस्त्रास्त्रां पासून रक्षण झाले अंबरीष दुर्धर अशा दुर्वासाच्या शापातून मुक्त झाला राजकुल सर्वथा प्रतिकूल असताना द्रौपदीची विटंबना करण्याचा दुःशासनाचा उद्देश सिद्ध न होता द्रौपदीचे रक्षण झाले सुग्रीव, बिभीषण यांना राज्यलाभ झाला सुदामाची विपत्ति नष्ट होऊन संपत्ति त्यास मिळाली उदरामध्ये असलेल्या परिक्षिताचे ब्रह्मास्त्रापासून रक्षण झाले इत्यादि उदाहरणे पाहिल्यावर भक्तीने सर्व फळे मिळतात असे सिद्ध होते स्वतः भगवतानेही भक्तीने सर्व फळाचा लाभ होतो असे स्पष्ट प्रतिपादन केले आहे

' यत्कर्मभिर्यत्तपसा ज्ञान वैराग्यतश्चयत्।
योगेन दान धर्मेण श्रेयोभिरितरैरपि। '
सर्वं मद्भक्तियोगेन मद्भक्तो लभतेऽञ्जसा ॥

अर्थ —कर्माने, तपाने, ज्ञानाने, वैराग्याने, योगाने, दानधर्माने व इतर साधनाने जे फळ मिळते ते सर्व फळ भक्ति योगाने माझ्या भक्तास अनायासाने मिळते. सर्व साधनांनी दुर्लभ असलेली माझी प्राप्ति माझ्या उत्कट भजनाने होते परमेश्वरप्राप्ति हे भजनाचे मुख्य म्हणजे परम फळ आहे ते मिळाले की पूर्णता येते
' ईश्वरप्राप्तीचा क्रम भक्तिशास्त्रात वर्णन केला आहे "
पूर्व जन्मात किंवा या जन्मात केलेल्या पुण्यकर्मांच्या परिपाकाने श्रवण-कीर्तनादि भक्तीचा उदय होतो या भक्तीने भक्ति, विरक्ति व भगवत्प्रबोध अशी तीन फळे एकदम प्राप्त होतात भक्ति म्हणजे प्रेमलक्षणाभक्ति विरक्ति म्हणजे विषयाचे वैराग्य, आणि भगवत्प्रबोध म्हणजे भगवताच्या मूर्तिचे स्फुरण होय. त्याप्रमाणे भोजनापासून तुष्टि, इंद्रियांचा पुष्टि आणि क्षुधानिवृत्ति होते अर्थात् एक एक घास घतल्याने थोडी तृप्ति, थोडी पुष्टि व थोडी भुकेची निवृत्ति होत होत शेवटी पूर्ण तृप्ति, पुष्टि व क्षुधानिवृत्ति होते त्याप्रमाणे प्रत्येक कीर्तनादि भजनाने थोडे प्रेमलक्षणाभक्ति, थोडे विषयासक्ति वैराग्य व थोडे हृदयात भगवताच्या मूर्तीचे स्फुरण होते म्हणून सतत भजन करावे

इत्यच्युतांघ्रि भजतोऽनुवृत्त्याभक्तिर्विरक्तिर्भगवत्प्रबोध ।
भवन्तिवै भागवतस्य राजन् तत परां शान्तिमुपैतिसाक्षात् ॥

अर्थ — सतत भजन केल्याने परम प्रेमरूपभक्ति, पूर्ण विरक्ति आणि पूर्ण भगवताच्या मूर्तीची स्फूर्ति होते. त्यामुळे भगवत्स्वरूपाचा साक्षात्कार होऊन परागतीचा लाभ होतो

तात्पर्य भगवत्प्रनोर परिपक्व झाल्यावर भगवान् स्वत पूर्णानंद ब्रह्मरूपाने साक्षात स्फुरतो. यासच ईश्वरप्राप्ति असे म्हणतात

' मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ।
निर्वैरः सर्वभूतेषु य. स मामेति पाण्डव । '

इत्यादि वाक्यानी भक्तास भगवत्प्राप्ति होत असे प्रतिपादन केले आहे. म्हणून निष्काम असो सकाम असो अथवा मोक्षकाम असो त्याने भगवद्भक्ति करावी, आपले परमहित संपादन करावे असे भजनाचे मुख्य फळ आहे. ते अविनाशी असल्यामुळे त्यास अनंतफळ असे म्हणतात.

"भक्तीचा प्रभाव लोकोत्तर आहे. '

परमेश्वर भजनानेच मी कृतार्थ होईन असा भक्ताचा निश्चय असतो. या सुंदर निश्चयामुळे बाह्य दुराचाराचा त्याग करून लगेच त्याचे मन धर्माला अनुसरू लागते. तो सदाचारी होतो व नित्य शांति त्यास मिळते. हे अर्जुना! माझा भक्त नाशाला प्राप्त होणार नाही तर कृतार्थ होईल अशी तू प्रतिज्ञा कर. असे भगवान अर्जुनास स्पष्ट सांगतात. अजमिळासारखी उदाहरणे प्रसिद्ध आहेत माझा भक्त दुराचारी असो, संकटात सापडलेला असो, अयोग्य अगर दुर्लभ अर्थाची प्रार्थना करणारा असो, अतिमूढ असून त्याचे रक्षण करणारा कोणीहि नसो, तो नाशास प्राप्त होणार नाही. कृतार्थच होईल असा भक्तीचा प्रभाव आहे

' भक्तीचे वैभवहि अप्रतिम "

अशी भक्त भजन करीत असताना त्याच्या हृदयात परम सुखरूप भगवान् आविर्भूत होतो त्यामुळे सर्व संसारदुःख नाहीसे होते. नित्यास विश्रांति मिळते आणि त्यास परम सुख प्राप्त होत. या परम सुखासच भक्तीने मिळणारा पंचम पुरुषार्थ असे काही लोक म्हणतात. अशा परमसुखाने वैराग्यरूपि महाभाग्याचा लाभ होतो. जगात कोणताहि लाभ होवो त्यास भय हे आहेच. भोगाचा लाभ झाल्यास रोगाचे भय असते. वित्त मिळाल्यास राजाचे भय. बलवानास शत्रूचे भय, गुणवानास दुष्टाचे भय, शरीरास मरणाचे भय याप्रमाणे प्रत्येकास भय आहे. सर्व पदार्थ भयाने युक्त आहेत. 'वैराग्यमेवाभयम्' केवळ वैराग्य हे भयरहित आहे. वैराग्यामुळे भक्तास निर्भयता प्राप्त होते.

" अशा भक्ताचे ईश्वरावर पूर्णप्रेम असते."

त्यातच इतकेच निष्पन्न झाले की, सर्वदा नारायणाचे ध्यान करावे. ईश्वराची सगुण रूपे अनेक आहेत. विश्वरूप भगवंतांनी अर्जुनास प्रत्यक्ष दाखविले तेव्हा अर्जुन म्हणतो, देवा! तुझ्या देहामध्ये इन्द्रादिक देव आणि चराचराचे समूह मला दिसतात. तसेच तेथे प्रजेचे नियमन करणारा चतुर्मुख ब्रह्मदेव, वसिष्ठादिक ऋषि, वासुकि प्रभृति दिव्य सर्प मला दिसतात. ज्याला अनेक हात, अनेक उदर, अनेक नेत्र आहेत, सर्वत्र अनतरूपे ज्याची आहेत, ज्याला आदि, मध्य व अंत नाही असे तुझे विश्वरूप आहे. अर्जुन पुढे म्हणतो, भगवंता! तुला पुढेमागे सर्व बाजूला नमस्कार असो. तू अनत बळानी व अपरिमित पराक्रमानी संपन्न असून अखिल विश्वाला व्यापून राहणारा असल्यामुळे तू सर्व आहेस. तुझ्यापेक्षा अन्य काही नाही. असे विश्वरूप मनात आणून त्या विश्वरूपाचे ध्यान काही लोक करतात. सकळ सौंदर्यसार सर्वस्व धारण करणारा आनदमय असा द्विभुज अथवा चतुर्भुज, सर्व जनाच्या मनाला मोह निर्माण करणारी मुरली वाजविणारा, शखचक्र, गदापद्म धारण करणारा भगवान् वासुदेव याचे ध्यान कोणी करतात. तर कोणी परमकारुणिक सुदर सुदर असा रघुनदनाचे, कोणी अद्भुतरूपधारी असा नरसिंहाचे, कोणी व्याघ्रचर्माम्बरधारी शशाक शेखराचे, कोणी माला-कमडलु, डमरु-त्रिशूल, शख-चक्रधारी त्रिगुणात्मक गुरुरूप दत्तात्रेयाचे, कोणी जगदबा, सरस्वती इत्यादि देवताच्या रूपविशेषाचे ध्यान करतात तात्पर्य कोणत्याही देवतेचे ध्यान करावे हे इष्ट व मुख्य आहे ते न जमणाऱ्यास पुढील पक्ष सागितले आहेत. असे ध्यान करण्यास जो असमर्थ असेल त्याने ध्यानाचा अभ्यास करावा. 'इतर विषयापासून चित्त परावृत्त करून ध्यावाच्या ग्राह्य प्रतिमेचे ठिकाणी चित्त पुन पुन ठेवणे यास ध्यानाभ्यास असे म्हणतात. ध्यानाभ्यास होत नसल्यास केवळ ईश्वर सतोषा करताच श्रवणकीर्तनादिकर्म करावे तात्पर्य ईशगुणश्रवण, नामसकीर्तन श्रीहरिस्मरण, सर्वेश्वराचे पादसेवन, अच्युताचे अर्चन, विश्वेश्वरवदन जगदीश्वरदास्य, भगवत्सख्य व आत्मनिवेदन यापैकी अनेक अथवा एक कर्म ईश्वरार्थ सतत करणे प्रधान व्यवहार त्याकरताच करावा. हेहि शक्य नसल्यास सर्व कर्मफळ त्याग करावा. म्हणजे कोणत्याहि फळाची इच्छा न धरता ईश्वरार्पण बुद्धीने कर्म करावे. अर्थात अधिकार उत्तम असल्यास ध्यान, मध्यम असल्यास ध्यानाभ्यास, मद असल्यास ईश्वर सतोषा करताच सर्व कर्म, मदतर असल्यास सर्वकर्मफळ त्याग, असे थोडक्यात भक्तीचे स्वरूप चार प्रकारचे आहे म्हणून भक्ति कोणसहि करता येते.

" इतर साधनापेक्षा परमेश्वराचे भजन सुलभ "

व्यवहारात मानवाना देवाचे सहाय्य अवश्य मिळवावे लागते. कारण देव यज्ञाने सतुष्ट होतात आणि मानवास इष्टार्थ देतात असा नियम आहे. तेव्हा इष्टार्थ सपादन करण्याकरता अधिक श्रम करावे लागतात. विशेष नियमाचे परिपालन करणे अवश्यक असते. यापेक्षा परमेश्वराचे भजन फार सुलभ आहे, त्याकरता द्रव्यादिकाची अपेक्षा नाही. अरण्यातील पत्र, पुष्प, फळ किंवा नुसते पाणी झाले की पुरे. त्याने भजन होऊ शकते. झाडाचे एखादे पान असो, पुष्प असो अथवा केवळ पाणी असो ते प्रेमाने ईश्वरास अर्पण करावे म्हणजे झाले परमेश्वराचे भजन. त्याने ईश्वर सतुष्ट होतो आणि भक्ताचे मनोरथ पूर्ण करतो. भगवान् म्हणतात- अरण्यातील पत्रपुष्पादि मिळवण्याचे श्रमसुद्धा माझ्याकरता नकोत. स्वभावत. किंवा शास्त्राज्ञा म्हणून अवश्य केली जाणारी कर्मे म्हणजे देहधारणा करता केलेले भोजन, गमनादि लौकिककर्म, आणि होमदान, तपादि शास्त्रीय कर्म जे घडेल ते मला अर्पण कर की झाले माझे भजन. त्यास इतर साधनाची अपेक्षा नाही इतके सुलभ परमेश्वराचे भजन आहे.

' भक्तीचे निरुपम सौंदर्य "

यज्ञशास्त्राने सागितले ते साधुसतानी आचरणात आणले. सर्वथा रजोगुणी पुरुषाना जे अशक्य असे भगवद्भजन माझे हातून घडते म्हणून आनद होतोच. मन हे आनदरूप परमेश्वरावर ठेवत असताना परिणामी आनद मिळतोच. त्याच्यावर पूर्ण कृपा असल्यामुळे भगवान त्याच्या चित्तवृत्तीत ज्ञानरूपाने प्रकट होऊन त्याचे अज्ञ न नष्ट करतो. त्यामुळे भक्त सर्व सुदर होतो असे भक्तीचे सौंदर्य असल्यामुळे ते सौंदर्य निरुपम आहे हे सिद्ध होते ईश्वरप्राप्ति करून देणारे भगवद्भजन सुलभ, सुदर, सुखद व अनत फळद आहे आणि मानवाचे अवश्य कर्तव्य आहे. म्हणून मानवाने मोठ्या आदराने या सात्विक भगवद्भजनाचा अगीकार करावा. क्रमाने ईश्वरप्राप्ति करून घ्यावी आणि मानवी जीवनाचे साफल्य सपादन करावे इतिशम्

—श्रीपादशास्त्री जेरे, कोल्हापूर.

Passengers ...

***YOUR COOPERATION CAN PREVENT***

# FIRES

***IN TRAINS***



***OBSERVE THESE***

# FIRE PREVENTION RULES












*Issued In the interest of SAFETY in Travel by* THE CENTRAL RAILWAY

# ज्ञान-भक्ति-विवेक

ज्ञानी इयेते स्वसंविति । शैव म्हणती शक्ति ।
आम्ही परम भक्ति । आपुली म्हणों ॥

(ज्ञानेश्वरी अ. १८)

भागवतधर्मीय महाराष्ट्रीय संत हे बहुधा श्रीज्ञानेश्वर तुकाराम यांच्या प्रणालीतील आहेत आणि त्यांचे अवतारकृत्य सर्व जनसुलभ अशा भक्तिमार्गाच्या प्रचारासाठी, प्रसारासाठी आहे. तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने बहुतेक सर्व श्रीमत् शंकराचार्यांच्या केवलाद्वैताचेच पुरस्कर्ते आहेत. यात मतभेद संभवतात हे मला माहिती आहे. तथापि बहुसंख्य जाणत्यांनी अद्वैतपक्षाला कौल दिला आहे हेही उघड आहे. काही अंतस्थ द्वैत्यांना श्रीशंकराचार्यांच्या केवलाद्वैताचे वावडे असल्याने त्यांनी श्रीशंकराचार्यांच्या अद्वैत तत्त्वज्ञानापेक्षा त्यांच्या स्वत:च्या मनाने श्रेष्ठ असलेले भक्तीचे एक स्वतंत्र तत्त्वज्ञान कल्पिण्याचा उपक्रम केलेला दिसतो व त्यासाठी संत वचने राबविण्याचा आग्रहही धरला आहे असे दिसते.

प्रतिपक्षाचे खंडण करीत असताना आणि स्वपक्षाचे मंडण करीत असताना काही गोष्टी प्रामाणिक भाष्यकारांनी बाट नियम म्हणून अंगिकाराव्या लागतात. त्यात एक गोष्ट अशी आहे की प्रतिपक्षाने आपला सिद्धांत शब्दनिविष्ट करताना शब्दाने जे अर्थ घेतलेले असतील, विधानाची जी व्याप्ति कल्पिली असेल आणि वर्णनाचा जो हेतु मानला असेल, तो प्रतिपक्षाच्या प्रामाणिक बुद्धीप्रमाणे जसाचा तसा गृहीत धरला पाहिजे. परंतु हे विधान सर्वच ठेवतात असे नाही. खंडणासाठी स्वत:ला सोयीस्कर होतील असेच अर्थ वा हेतू प्रतिपक्षाच्या विधानावर लादून मग त्या सोयीस्कर अर्थाने प्रतिपक्षाचे खंडण शब्द-पांडित्याच्या बळावर केले जाते. ही पद्धति अर्थातच उचित नव्हे.

संतांच्या वाङ्मयनिर्मिती मागची भूमिका आणि ग्रंथावर भाष्य लिहिणाऱ्या भगवान् श्रीशंकराचार्यांसारख्या भाष्यकाराची भूमिका ही एकरूप नव्हे. ही गोष्ट प्रथमतः लक्षात घेतली नाही तर शब्दांचे अर्थ कसे करावेत यासंबंधीचे निश्चित गमक निदान संतवाङ्मयाचा विचार करताना तरी उपलब्ध होणार नाही. संतांचे वाङ्मय हे नवीन तत्त्वज्ञान निर्माण करण्याच्या भावनेने निर्माण झालेले नाही. जुन्या ग्रंथांचे अर्थ कोणी विकृत केले आहेत ते पुन्हा मूलशुद्ध अर्थांनी प्रगट करण्यासाठी निर्माण झालेले नाहीत. ते एकतर स्वत:च्या हृदयात अनुभविलेल्या साक्षात्काराचा आनंद त्या त्या अवस्थानुरूप प्रगट करण्यासाठी स्वाभाविकपणे निर्माण झालेले आहेत. किंवा भक्तिपराङ्मुख विषयग्रस्त इंद्रियाधीन अज्ञानी अशा सामान्य जनतेला पारमार्थिक सुखाचा मार्ग दाखविण्यासाठी प्रगट झाले आहेत. त्यामुळे त्यांच्या वचनाची पूर्वापर संगती तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने लावण्याचा प्रयत्न करावयाचा झाला तर अर्थवाद, अवस्थाभेद, विधेयस्तुति इत्यादि हेतू विचारात घेणे आवश्यक होते. तत्त्ववेत्त्यांचे बोलणे अंतस्थ-रीत्या एका ध्येयासाठी असले, तरी त्यांच्या प्रतिपादन

शैलीत व बाह्य हेतूत अंतर पडत हे लक्षात घेतले पाहिजे

संत वाङ्मयामध्ये भक्तीचा, सगुणाचा, नामरूपाचा आणि प्रेमानुभवाचा पुरस्कार अत्यंत आग्रहाने फार स्पष्ट शब्दात वारंवार केलेला असता आणि त्या आवेशात ज्ञान, योग, कर्म, व्रत, नियम, कैवल्य, मोक्ष याच्यासंबंधी तुच्छतेची, धिक्काराची वा उपेक्षेची भावना कधी सौम्य तर कधी तीक्ष्ण शब्दांनी प्रगट केली जात, निराळ्या ठिकाणी आपणच यापेक्षा निराळे प्रतिपादन केले आहे व त्या विधानाचा व्याप्त विधानाशी (अधिकार भेद, अवस्था भेद मानला नाही तर) विरोध येतो हे लक्षात घतलेले दिसत नाही तसेच कित्येकांनी चालले म्हणायचेच झाले की, त्याच्या तुलनेला मोक्ष हा गौणत्वास आणि ज्याला चांगले म्हणावयाची ती गोष्ट मोक्ष प्राप्त करून देणारी आहे, मोक्षापेक्षा श्रेष्ठ आहे असे मानण्याची एक पद्धति प्राचीन काळी होती संतानीही मधून मधून ही पद्धति स्वीकारिली आहे तिचे कोणी परमार्थता सत्यत्व मानावयाचे ठरविले तर तत्त्वज्ञानदृष्ट्या मोठीच अडचण उत्पन्न होईल उदाहरणार्थ–श्रीएकनाथी भागवतामध्ये भक्ति आणि ब्रह्मसुख याचा किती भावाचा संबंध जोडला आहे ते पाहिले म्हणजे माझ्या वरील म्हणण्याचा प्रत्यय येईल

" यालागी आवडे माझी भक्ति ।
ते पाया लागती चारी मुक्ति । ए भा १६
ना पित्राचेन विश्रामी ।
मोक्ष याची ओळगणा । ए भा २१
सद्गुरु सेवा करिता पाही ।
ब्रह्म सायुज्यता लागे पायी । ए भा २७
तेथ प्रगटे माझी चौथी भक्ति ।
तिच्या पायी चारी मुक्ति । ए भा १८
मद्विवेक ज्ञानी त्यासी ।
चारी मुक्ति त्याच्या दासी । ए. भा. २०
ब्राह्मण भजन मार्गो ।
भक्ति सुख पाया लागे । ए भा १७

मात्र मुक्तीचा संबंध असलेली ही सव विधाने पाहिली म्हणजे साधन अवस्थेत उपयोगी पडणाऱ्या अनेक प्रकारच्या सद्गुणांचा गौरव करण्यासाठीच केवळ संत मोक्ष मुक्तीचा उपयोग करतात असे स्वच्छ दिसते

भक्तीच्या प्रतिपादनासाठी मुक्तीची उपेक्षा करताना भक्ति का पाहिजे आणि मोक्ष का नको हे सागत असताना काही संत वचने अशी आहेत —

' सर्वात्मकपण । माझे हिरोनि नेता कोण ॥
मनी भक्तीची आवडी । सेवा व्हावी ऐशी गोडी ॥
मोक्षाचे ता अम्हा नाही अवघड ।
ती असे उघड गाठोडीसी ॥ '

असे श्रीमद्गुरु तुकाराम महाराज म्हणतात श्रीएकनाथ महाराजानी श्रीउद्धवाचे तोडी पुढील वचने घातली आहेत

म्हणसी म्या दिधली नित्य मुक्ति ।
तरी ते भजनानी सिद्ध होती ॥
दिधली म्हणणे हे मिथ्या वदती ।
वायुगी ख्याती दातृत्वाची ॥ "

आता या वचनाकडे पाहून मनात विचार येतो की, मुक्ति स्वत सिद्ध आहे म्हणून ती मिळणे यात विशेष नाही तर भक्ति ही आहार्य अस्वाभाविक आहे की काय? सर्वात्मकपण हिरोनि नेणे शक्य नाही मग भक्ति हिरोनि नेणे शक्य आहे काय?

वर उद्धरिलेल्या उद्धवाच्या उक्तीच्या थोडे आधी उद्धव म्हणतो—

' भक्तीच्या पायी जन्मली मुक्ति ।
वाढली भक्ति भक्तीत घाती ।
ऐशी जे का भक्ति । मातृहती ॥
तिसी मी सर्वथा नाकळे । '

जी मुक्ति भक्तीच्या पायी जन्मली ती स्वत सिद्ध कशी? पुढे तर ती स्वत सिद्ध आहे असे म्हटले आहे

ती दोन्ही वचने परमार्थत सत्य मानता येणार नाहीत अधिकार भेदाने श्रद्धेच्या दृढतेपुरती सत्य मानता येतील अमृतानुभवात तर भक्तिभजन हेही स्वत सिद्ध मानले आहे प्रकाशाची उगडी दिव्याच्या ज्योतीला तू नेम असे कोणी सागत नाही ती तिच्या ठिकाणी स्वभावताच असतात असे श्रीज्ञानोबाराय म्हणतात

माझिये सहजस्थिति । भक्ति नाव । '

असे ज्ञानेश्वरीतही म्हटले आहे श्रीतुकाराम महाराजानी

' जळो माझी ऐशी बुद्धि । मज घाली तुजमधी ॥ '

या अभंगामध्ये ' बोलिले त्या नाही अभेदाची आवडी।' असे म्हटले आहे त्यावरून चुकून कोणीतरी द्वैत तत्त्वज्ञानाचा पुरस्कार संतवाङ्मयात आहे असे भासत

असले तरी त्यावरून त्यांना अद्वैत तत्त्वज्ञान मान्य नव्हते असा अर्थ करता येणार नाही. कारण अभेदाची आवडी नाही असे प्रेमसुखासाठी म्हणणारे श्रीतुकाराम महाराज 'गातो नाचतो ते दावतिनो जना। प्रेम नारायणा नाही अंगी ॥' असेहि म्हणतात. आता येथे शब्दांचे अर्थ परमार्थताही सत्य घेतले तर आपत्ति येईल की नाही? याचा विचार सूज्ञाने अवश्य केला पाहिजे. पंचम पुरुषार्थी वरील भक्तीचे वर्णन करीत असताना ही भक्ति सोने वा अलंकार, चंद्र वा त्याचे चांदणे, जल वा त्यावरील तरंग यासारखी अभेदान्वयाची असते. असे तत्त्वज्ञानाच्या समाधानासाठी वर्णन करण्याची प्रथा आहे. पण श्रीतुकोबारायाच्या वरील अभंगात तर हा केवळ नाममात्र भेद अपेक्षित नाही तर

'जळ न गाती जळा। वृक्ष आपुलिया फळा।
भोक्ता तो निराळा। तेणे गोडी निवडली ॥'

असे ते म्हणतात. या ठिकाणी नाममात्र तर सोडाच पण पाण्याच्या दृष्टान्ताने सजातीय आणि वृक्षफलाच्या दृष्टान्ताने स्वगत भेदहि श्रीसद्गुरु तुकाराम महाराजांनी धिक्कारिले आहेत. आणि उघड उघड विजातीय भेदाचा म्हणजेच शुद्ध द्वैताचा पाठपुरावा केला आहे. आणि त्यातच खरा आनंद आहे. असे सांगितले आहे. आता यावरून भागवत धर्मीय संत शुद्ध द्वैतमार्गाचे पुरस्कर्ते होते असे म्हणावयाचे की काय ? ते किती गैरसोयीचे आहे व सर्व वाङ्मयाचा विचार करताना कसे विसंगत आहे ते अभ्यासकांना चांगले माहिती आहे. त्यामुळे प्रचारकाच्या भूमिकेवरून माल खपविण्यासाठी पैस मांडलेल्या दुकानातील शेटीच्या वचनाचा विचार अधिकार भेदाने घेतला पाहिजे ही गोष्ट लक्षात येईल.

ज्ञान आणि भक्ति हे परस्पर भिन्न मानणे वा त्यात विरोध मानणे चूकच ठरेल. कारण परमार्थतः विचार करताना परमोच्च ज्ञान आणि परमोच्च भक्ति ही दोन्ही केवळ सारख्याच योग्यतेची नसून अगदी एकरूपच आहेत. व्यवहारदृष्ट्या उपयोगी पडणाऱ्या नामभेदापेक्षा त्यात कोणताही वेगळेपणा नाही. श्रीज्ञानेश्वर महाराज ज्ञानेश्वरीच्या अठराव्या अध्यायात म्हणतात—

'ज्ञानी इयते स्वसंविति। शैव म्हणती शक्ति।
आम्ही परम भक्ति। आपुली म्हणों ॥'

ज्ञानी ज्याला 'स्वसंविती' म्हणजे आत्मज्ञान म्हणतात त्यालाच भक्तिप्रेमात रंगलेले संत 'परम भक्ति' म्हणतात. असे असले तरी संतवाङ्मयाचा अभ्यास करताना मोक्ष तुच्छतापर वा ज्ञानाच्या उपहासावर असलेली आणि कैवल्यापेक्षा भक्तीची श्रेष्ठता प्रतिपादन करणारी वचने ज्यांच्या दृष्टीत भरली आहेत असा गृहस्थ माझ्या विधानावर, ते ज्ञानेश्वरांच्या वचनाधारे केलेले असतही पडकरून आक्षेप घेईल याची जाणीव मला आहे. यासाठी मी माझे म्हणणे थोडे स्पष्ट रीतीने मांडावयाचे ठरविले आहे. लोककल्याणासाठी अवतीर्ण झालेल्या संत महात्म्यांच्या वचनांचा अर्थ लावताना, विशिष्ट गोष्टीविषयीच्या निंदा-स्तुतीचा विचार करताना विद्वानांमध्ये सम्मत असलेला एक सिद्धांत प्रथम लक्षात घेतला पाहिजे "न हि निंदा निंद्यमिति निंदितु प्रवर्तते किंतु विधेयं स्तोतु।' निंदा केली जाते या कमीपणा दाखविला जातो तो खरोखरीच ती वस्तु योग्यताहीन आहे म्हणून नव्हे, तर प्रस्तुत वस्तूचे महत्त्व प्रतिपादिणे हेच तिचे प्रयोजन असते. वेदामध्ये सूर्योदयापूर्वी आणि सूर्योदयानंतर अशा दोन्हीही वेळी हवन करण्याचा विधी सांगितला आहे. परंतु 'उदिते जुहोति' या वचनाचा पुरस्कार करताना "प्रातःप्रातरनृतं ते वदंति पुरोदयात् जुव्हति येऽग्नि होत्रं" सूर्योदयापूर्वी हवन करणाराना खोटे बोलण्याचे पातक लागते याचा अर्थ सूर्योदयानंतर जे हवन करतात त्यांनी आपली पद्धत सोडू नये एवढाच आहे. कारण 'अनुदिते जुहोति' हेही वेदवचन असून ते 'उदिते जुहोति' इतकेच पुण्यकारक आहे. उपनिषद् वाक्ये ही, आपण वेदशिरोभागाची नि पूज्यतम मानतो. पण कर्मकांडाचा पुरस्कार करणारे मीमांसक त्यांना अर्थवादात्मक मानतात, ती यजमानाची स्तुति आहे असे म्हणतात.

हे जर परमार्थतः खरे मानले तर सर्व उपनिषदे व्यर्थच ठरतील. कर्म करणाराची श्रद्धा दृढ व्हावी एवढेच त्या म्हणण्याचे प्रयोजन आहे. शिव-विष्णुपर असणाऱ्या पुराणातून विष्णूची वा शिवाची निंदा आढळते, ती काही कोणी परमार्थतः सत्य मानीत नाहीत.

'न धापि दृष्ट शिव विष्णू भेद.।'

हेच वस्तुतः खरे असल्यामुळे शिवाची निंदा असेल त्यावेळी शिव हे कार्यब्रह्म, विष्णु कारण ब्रह्म, उलट असेल त्यावेळी विष्णु कार्यब्रह्म, शिव कारणब्रह्म आहे असे मानावे

असेच सर्वजण तात्त्विक विचाराच्या वेळी समजतात.

ज्ञानभक्तीचेही असेच मानावे. साध्य ज्ञानापेक्षा साधन भक्ति कनिष्ठ, साध्य भक्तीपेक्षा साधनज्ञान कनिष्ठ आणि परमोत्कर्षाच्या सर्वोच ठिकाणी ज्ञानेश्वराच्या वचनाप्रमाणे दोन्ही एक. साधन–ज्ञान आणि साधन–भक्ति यात मात्र साधनभक्तीच श्रेष्ठ आहे हे नि:संशय. तिचा सोपेपणा, तिची माणसाच्या नैसर्गिक मनोव्यापाराशी असलेली अनुकूलता आणि आरंभापासून अनुभवास येणारी सुखरूपता यामुळे भक्तिमार्ग साधारणपणे बहुतेकांनाच इतर साधन मार्गापेक्षा सुलभ होतो अर्थात् हे साधन भक्ति पुरतेच खरे आहे. सिद्धभक्ति या फलस्वरूपभक्ति ही काही तशी सोपी नाही, ती अवघडच आहे.

श्रीतुकाराम महाराज म्हणतात—

" भक्ति तो कठीण सुळावरील पोळी।
निवडे तो बळी विरळा शूर ॥ "

पूज्यपाद श्रीमत् शंकराचार्यांचा केवलाद्वैत सिद्धांत मान्य असेल तर वरीलप्रमाणे ज्ञानभक्तीची एकरूपताच मानणे भाग आहे. भक्तीकरिता स्वीकारावे लागणारे किंचित् द्वैत वा कल्पित द्वैत त्यात तत्त्वतः संभवत नाही.

" देव देऊळ परिवारू। कीजे कोरुन डोंगरू।
तैसा भक्तीचा वेव्हारू। का न व्हावा ॥ "

असे जरी श्रीज्ञानदेवानी विशिष्ट हेतूने म्हटले असले तरी अद्वैत भक्तीत

' क्रिया कीर न साहे '

असे प्रतिपादणाऱ्या भक्तीचा व्यवहार शाब्दीक अर्थाने घेता येणार नाही. डोंगरामध्ये देव, देऊळ नि त्याचा परिवार व्यक्त होण्याकरिता डोंगर पोखरून काढून पोकळी निर्माण करावी लागते. ती पोकळी स्वगत, सजातीय, विजातीय, भेदातीत असलेल्या एकमेवाद्वितीय अशा अनायतन ब्रह्मात कशी निर्माण करणार, ज्यामुळे देव भक्त जाणवावेत ?

यासाठी श्रीतुकाराम महाराज म्हणतात

" देव भक्त ऐसी बोली। जव भ्रांति नाहीं गेली ॥ "

" याजसाठीं भक्ती। जगी रूढवावया ख्याती॥
नाही तरी कोठे दुजे। आहे बोलावया सहजे ॥ "

खरे मानले पाहिजे. श्रीज्ञानोबानी अमृतानुभवाच्या शेवटी

" भजता भजन व्हावे। न भजता काय न व्हावे।
ऐसे नव्हे आघवे। शिवुची असे ॥
भक्ति आणि अभक्ती। झाले ताट एके पाती।
कर्माकर्माच्या वाती। माल्हाउनिया ॥ "

असे म्हणतात. कारण परम स्थितीस पोहोचून ब्रह्मत्त्व प्राप्त झालेला पुरुष भक्ति करतो वा भक्ति करीत नाही असे आवर्जून म्हणणे उचित नव्हे. त्याची चावटी तेच खुणेचे स्तवन असते. आणि

" आपलेनि भेदेविण। माझे जाणिजे जे एकपण।
तयाचि नाव शरण। मज येणे गा॥ "

श्रीकृष्णाशी म्हणजेच परब्रह्माशी ( ब्रह्म आन नोहे मी वाचोनी ) एकरूप होणे असणे हेच शरण जाणे होय.

मोक्षामध्ये सोऽहभाव राहतो आणि त्या सोऽहभावाने परम सुख प्राप्त होत नाही. कारण श्रीएकनाथ महाराज म्हणतात

नेणपणाचा अभिमान। तत्काळ जाय निघोन।
तैसें नव्हे ज्ञानाभिमान। चाविरा जाण ज्ञानियां ॥

ज्ञानाभिमान चावरा असतो. त्याची बोच होऊ नये म्हणून भक्ति करावी लागते, असे कोणी मानील तर ते खरे नाही कारण ' अधिकार तैसा उपदेश ' करावयाचा असल्याने संतानी बोधव्यवहाराच्या सोयीसाठी मोक्षाचे सोऽहंसायुज्य, सगुणबंध सापेक्ष असे अनेक प्रकार कल्पिले असले तरी खरा मोक्ष कैवल्यस्वरूपच आहे. त्यालाच पूर्णपणे सायुज्य वा चौथा पुरुषार्थ म्हणता येते, श्रीज्ञानेश्वर महाराजांनी भावार्थ दीपिकेच्या चौदाव्या अध्यायात याच चौथ्या पुरुषार्थाचे वर्णन केले आहे.

" *हेरूनि मग परस्परे। ते सोऽहंवृत्ति जै अवतरे।
तैं तियेही सकट सरे। आपैसया ॥* "

उत्पन्न झालेली सोऽहंवृत्ति आपोआप विरली. भेदाचा नाश करुन ज्ञान सरले, देवभक्ताचे अलीकडील पलीकडीलपण नष्ट होऊन अनादिसिद्ध ऐक्य प्रगटले आणि गुणातीत झाला गुणाला जिंकिले ही भाष ही नष्ट होऊन तो मिठी पडलेला एकपणाही विरघळला या स्थितीस काही नाव व्यवहारासाठी द्यावयास हवे म्हणून ब्रह्मत्त्व म्हणावयाचे आणि—

या ब्रह्मत्त्वासी पार्था। सायुज्य ऐशी व्यवस्था।
याचे नावे चौथा। पुरुषार्थ गा ॥

अशा या मोक्षात सोऽहभाव कसा कल्पिणार ? श्रीशंकराचार्यही बंधापेक्षा मोक्षाला अंतिम साध्य मानीत नाहीत

" नैव बंधो न वा मोक्ष इत्येषा परमार्थता "

हा कैवल्यरूप मोक्ष अन्वय ज्ञानानेच मात्र प्राप्त होता कृष्णाच्या पूतना, शिशुपालादिक वैऱ्यांना मिळणारा वा त्रिवेणीच्या स्नानाने नि काशीत मरण्याने मिळणारा मोक्ष त्याग मोक्ष नव्हे, हे श्रीमुकुंदराजानी आपल्या विवेकसिंधूत आणि ज्ञानदेवानी अभंगात स्पष्ट शब्दात सांगितले आहे. सामान्य मोक्ष, खऱ्या मोक्षापुढे–या सायुज्यापुढे–निस्तेज होतो. श्रीएकनाथ महाराज भागवताच्या १३ व्या अध्यायात म्हणतात:—

' तेथ वैऱ्या बोरू वैची बुद्धी । देवपण बुडाले निशुद्धी ।
लाजा निमाली मोक्ष सिद्धी । कैचा क्षीराब्धी शेषशायी ॥
तेथ माझीही भगवतता । हारपोनि जाय तत्त्वता ।
प्रणवाचा बुडाला माथा । ऐशी सायुज्यता पावले ॥ '

यावरून लाजून नाहीसा होणारा जो एक गौण मोक्ष आहे. तोच इतरांना प्राप्त होतो हे मानणे सुसंगत आहे. कैवल्य मोक्ष प्राप्त करून देणारे जे अन्वयज्ञान आणि परम भक्ति प्राप्त करून देणारी जी अव्यभिचारी भक्ति ती एकच आहेत हे ज्ञानेश्वरीतील १८ व्या अध्यायाच्या पुढील ओव्यांतून स्पष्ट होईल

. . . तैसा ईश्वरू मी आन । नोहेचि मा ॥
ऐसेनि या समरसे । दृष्टी जे उल्हासे ।
त भक्ति पैं ऐसे । आम्ही म्हणों ॥
आणि ज्ञानाचे चागावे । याच भक्ति नाव ।

जर संतांना खऱ्या मोक्षाचा खरोखरीच धिक्कार करायचा असता, ज्ञानाला तुच्छ मानावयाचे असते तर वरील अद्वैतानुकूल कैवल्यपर उद्गार त्यांनी काढले नसते.

" जळो माझी ऐशी बुद्धी ।
मज घाली तुजमधी ॥ "

या भावनेलाच त सदैव दृढ धरून राहिले असते. तुकी–तुकल्याची आणि नतर उपकारापुरते उरल्याची भाषा वापरली नसती. श्रीपांडुरंगानी आपल्या एकनिष्ठ प्रेमळ भक्ताला–संतशिरोमणी नामदेवांना सगुण मूर्तीवर पाय देऊन निजलेल्या विसोबाकडे उपदेशासाठी पाठविले नसते. आणि एकनाथ महाराजानी भागवतात म्हणल्याप्रमाणे—

" जो ब्रह्मज्ञान दे माझिया भक्ता ।
तयाहून आणिक परता ।
मज आन नाही गा पढियता ।
जाण तत्त्वा उद्धवा ॥ '

असे वचन उच्चारिले नसते, श्रीकृष्णदेह चैतन्यघन असल्याने त्याचा निरास करावा लागत नाही हे मला मान्यच आहे. कारण खऱ्या ज्ञानानंतर विश्वाचाही निरास करावा लागत नाही.

" म्हणोनि विश्वपण जाव । मग माते घेयाव ।
ऐसे नव्हे आघवे । सगटची मी ॥
ऐसेनि माते जाणिजे ।
ते अव्यभिचारी भक्ति म्हणिजे ॥ "

असे श्रीज्ञानेश्वर महाराज स्वच्छपणे म्हणत असतानाही जर कोणी आग्रह धरील तर व्यक्तिस्वातंत्र्य आहेच. न परम सिद्धांत मात्र ठरणार नाही.

श्रीसंताना जगाचे कल्याण साधण्यासाठी भक्तीची ख्याति रूढवावयाची होती. पार पावलेल्याने नाव जाळू नये वा वैद्या अंगी रोग नसला तरी जगावर उपकार करण्यासाठी औषधी संग्रही ठेवाव्या या न्यायाने त्यांनी उपकारापुरते उरून स्वार्थनिरपेक्ष भक्तीचा डांगोरा पिटिला. त्या भरात काही आग्रही वचने साधकाची श्रद्धा दृढ करण्याकरिता उच्चारली असली तरी त्याचे प्रयोजन ज्ञान मोक्षाच्या तुच्छतेत नाही हे पक्के समजावे.

' सहज माझी जे प्रकाशस्थिती ।
ते भक्ति बोलिजे भागवती ।
संविती बोलिजे वेदांती ।
शैवी शक्ति बोलिजे ॥ '

हाच ज्ञानभक्तीची एकरूपता प्रतिपादिणारा संतमान्य सिद्धांत आहे.

श्रीमधुसूदन सरस्वतींनी भक्तिरसायनाच्या प्रथमो ल्लासातील स्वकृत टीकेत ज्ञान आणि भक्ति दोन भिन्न मानून भक्तीचे श्रेष्ठत्व सामान्यतः प्रतिपादिले असले तरी ते सर्व साधन भक्तिपरच मानले पाहिजे. कारण स्वत. स्वामींनीच आपल्या अद्वैतसिद्धि ग्रंथाच्या अगदी शेवटील प्रकरणात मुक्तीचे सर्वानंदमयत्व, परमोत्कृष्टत्व आणि निरपेक्षत्व अत्यंत समर्पक रीतीने न्यायघटित भाषेत प्रतिपादिले आहे. परममुक्तीला गौणता येईल असे सर्व त्यांनी खोडून काढिले आहे, आणि परमानंद प्राप्त्यर्थ भक्तीची आवश्यकता मानणाऱ्यांचे सप्रमाण खंडण केले आहे

मुक्त्युत्तर भक्तीच्या प्रस्थापनेसाठी मधुराद्वैत मानणारे श्रीगुलाबराव महाराजही मुक्तीचा अधिक्षेप करून शान्यावर हळूच म्हणतात

" मागा जे केलें उपेक्षण।
ते ब्रह्मलोकरूप मोक्षाचें ॥ "

श्रीगुलाबराव महाराजाच्या वाङ्मयामुळे अलिकडे या पचम पुरुषार्थाच्या श्रेष्ठत्वाच्या प्रतिपादनाला विशेष बळ प्राप्त झालेले दिसते. श्रीज्ञानेश्वर महाराजाना जी परमभक्ति अपेक्षित होती. तेथे

'क्रिया वीर न साहे'

अशी स्थिती होते. हे भजन केले तरच ते होणारे नव्हत न भजताही स्वत सिद्ध होते. या शरणागतीसाठी तीर्थयात्रा करावी लागत नव्हती. तर

'आपुलेनि भेदेविण'

एकपणा जाणावा लागत होता. चावटी ही खुणेचे स्तवन होत होते परतु ज्ञानेश्वर कन्येच्या मधुराद्वैताला मात्र परमभक्तीचे असे सुदर बोधस्वरूप मान्य नसावे असे म्हण ण्यास जागा आहे.

'नृत्यति रौति गायति'

एवढ्यानेही या मधुरतेचे समाधान होत नाही

भागवतातल्या शुकदेव वर्णित कामविव्हल गोपिकाचा काम भगवताचे चरण हृदयावर धरून शात होत होता पण सतानी वर्णिलेल्या या दिव्य व्यभिचाराचीही निरागस सात्विकता, देह सबधातीतता श्रीगुलाबरावाना मान्य नव्हती की काय ते कळत नाही श्रीज्ञानेश्वर महाराजानी कात भक्तीला मान्यता दिली असली आणि देव भक्तातील प्रेमाला वल्लभेच्या पढियतेपणाची उपमा दिली असली तरी प्रेमाच्या शुद्ध स्वरूपाला बाधक होईल असे काहीही श्रीज्ञानोबारायानी लिहिलेले नाही. श्रीरामकृष्ण परमहस आणि शारदामाता याचेमधील देहातीत दिव्य प्रेमाचे अलौकिक चरित्र ज्याना माहिती आहे त्याना वल्लभकाताच्या उपमेने गागरण्याचे कारण नाही मधुरा द्वैतवाद्याना शानासवेच त्याच्या पाविन्याचाहि अधिक्षेप करावयाचा आहे असे दिसते श्रीगुलाबराव महाराज स्वत ला श्रीकृष्णाची पत्नी म्हणवीत. गळ्यात मगळसूत्र बाधीत येथवर ठीक आहे. पण त्यानी एकदा विरहाच्या ट गाने आपल्या प्रियकराला म्हणजे श्रीकृष्णास मीलनासाठी पत्र लिहिले आहे. त्यातील ( श्रीगुलाबराव महाराज पत्र व्यवहार भाग १ ला पत्र १५ वे )

'हे ममहृदय वारिज भृगा, ऋतुस्नात मी विरहिणी'

या शब्दानी आरभिणाऱ्या काही ओव्या पहाव्या. त्या येथे उधृत करण्याचे धाडस माझे ठायी नाही

भक्तीला ज्ञानापासून तोडले म्हणजे ती कोणते स्वरूप धारण करते हे यावरून प्रत्ययाला येईल जिचा सर्वांना अधिकार आहे. ल्हान थोरानीही जिचा अवलब करावा अशी सत प्रणीत भक्ति आणि ही भक्ति एक नव्हे. असे म्हटले तर ते समाजाच्या हिताचेच ठरेल व साधकालाही आपले साधन शुद्ध राखता येईल असे मला वाटते. यासाठी भक्ति मार्गीयाने अतिम स्थली असलेला ज्ञानभक्तीचा अभेद कधीही डोळ्याआड करता कामा नये असे मला प्रामाणिकपणे वाटते ते वास्तव सत्य असल्याचे सत वचनाधारे मी वर दाखविले आहेच.

—भ दा. आठवले, पुणे



# पुरुषोत्तम योग

**पुरुषोत्तम योग**—हा भागवत धर्माचा प्राण आहे. वेदान्तसार ह्यालाच म्हणावे. सारे अध्यात्मरहस्य ते हेच. उपनिषद्रूप गोमातेचे महत् दुग्धामृताचे नवनीत असे हे आहे. भगवताच्या हृदयातले परमगुह्य हितगूज दृढांग लिंगनाने त्याने भागवतोत्तमाच्या हृदयात जणू ओतले ते हे होय. तस्मात युद्धस्वभारत हे नव्हे.

'यत्र योगेश्वरः कृष्णो यत्र पार्थोधनुर्धरः।

तत्र श्रीर्विजयोभूतिर् ध्रुवानीति मतिर्मम ॥ १८।७८॥

हे संजयाने धृतराष्ट्राला अखेर सांगितले. ते भगवानुवाच नव्हे.

सर्वगुह्यतमं भूयः शृणु मे परमं वचः

इष्टोऽसि मे दृढमिति ततो वक्ष्यामि ते हितम् ॥ ६४॥

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु।

मामेवैष्यसि सत्यं ते प्रतिजाने प्रियोऽसि मे ॥ ६५॥

सर्व धर्मान्परित्यज्य मामेकं शरणं व्रज।

अहं त्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुचः ॥ ६६॥

म्हणजे सर्वांत अत्यंत गुह्य असे माझे उत्कृष्ट भाषण पुनः ऐक. तू मला अत्यंत प्रिय आहेस, म्हणून तुला मी तुझे हित सांगतो. माझ्या ठिकाणी मन ठेवणारा हो, माझा भक्त हो, माझे यजन करणारा हो, मला नमस्कार कर, म्हणजे माझ्याप्रत येशील; तू मला प्रिय असल्यामुळे, हे मी तुला प्रतिज्ञेवर सत्य सांगत आहे. सर्व धर्माधर्मांच्या कारणीभूत अज्ञानाइह त्याग करून मला एकट्यालाच अद्वैत भावाने शरण ये. मी तुला सर्व पापापासून मुक्त करीन. तू शोक करू नकोस.

याघरील ज्ञानेश्वरी सार

तरी अवधान पघळ। करूनिया आणिक एक वेळ।

वाक्य माझें निर्मळ। अवधारी पां ॥१३४१॥

हें वाक्य म्हणौनि बोलिजे। का श्राव्य मग अयिकिजे।

तैसे नव्हे परि तुझें। भाग्य बरवें ॥ ४२॥

कूर्मिचिया पिलियां। दिठी पान्हा ये धनंजया।

आकाश वाहे पाणिया। घरींचें पाणी ॥ ४३॥

जो व्यवहारु जेथ न घडे। तयाचें फळ तेथ जोडे।

काय दैवें न सापडे। सानुकूळें ॥ ४४॥

एऱ्हवीं द्वैताची वारी। सारूनि ऐक्याचा परिपरी।

भोगिजे तें अवधारीं। रहस्य हें ॥ ४५॥

आणि निरुपचारा प्रेमा। विषय होय जें प्रियोत्तमा।

तें दुजें नव्हे कीं आत्मा। ऐसेंचि जाणावे ॥ ४६॥

म्हणौनि आघवीचि गूढें। जे पाऊनि अति उघडें

तें गोप्य माझें चोखडें। वाक्य आइक ॥ ५२॥

तरी बाह्य आणि अंतरा। आपुलिया सर्व व्यापारा।

मज व्यापकातें वीरा। विषो करी ॥ ५३॥

आघवा आंगीं जैसा। वायु मिळोनि आहे आकाशा।

तू मज सर्व कर्मी तैसा। मजसीचि अस ॥ ५४॥

किंबहुना आपुले मन। करीं माझें एकायतन।

माझेनि श्रवणें कान। भरून घाली ॥१३५५॥

मग भरलेया जगा आतु ।
नाऊनिया तिजयाची मातु ।
होऊनि ठायील एकातु । आम्हा तुम्हा ॥१३६०॥
तेव्हा भक्तिये आवस्थे । मी तूतें तू मात
भोगिसी ऐसें आइतें । वाढेल सुख ॥६३॥
आणि तिजें आदळ परितें । निमालें अर्जुना जेथें ।
तें मीचि म्हणौनि तू मात । पावसि शेखीं ॥६४॥
जैसी जळींची प्रतिमा । जल्नाशीं बिंबा ॥
येता गाभागोमा । काही थाह ॥६५॥
पैं पवनु अंबरा । का कल्लोळ सागरा ।
मिळता आड वारा । कोणाचा गा ॥६६॥
म्हणौनि तू आणि आम्ही । हे दिसताहे देहधर्मी ।
मग याचा विरामीं । मीचि होसी ॥६७॥
यया बोला माझारीं । हाय न होय म्हणें करीं
येथ आन आथी तरी । तुझीच आण ॥६८॥
सैंधव सिंधु पडलिया । जो क्षणु धनंजया ।
तेणें विरेचि की उरावया । कारण कायी ॥ ८० ॥
तैसें सर्वत्र मातें भजता । सर्व मी होता अहंता ।
नि शेष जाऊनि तत्त्वता । मीचि होसी ॥ ८१ ॥
एव माझिये प्राप्तीवरी । कर्मा लागोनि अवधारीं ।
दाविलीं तुज उजरी । उपायाची ॥ ८२ ॥
जे आधी तव पाडुसुता । सर्व कर्में मज अर्पिता ।
सर्वत्र प्रसन्नता । लाहिजे माझी ॥ ८३ ॥
पार्था माझा तिये प्रसादीं । माझें ज्ञान जाय सिद्धी ।
तेणें मिसळिजे निशुद्धी । स्वरूपीं माझ्या ॥ ८४ ॥
मग पार्था तिये ठायीं । साध्य साधन होये नाहीं ।
किंबहुना तुज काहीं । उरेचिना ॥ ८५ ॥
तरी सर्व कर्में आपुलीं । तुवा सर्वदा मज अर्पिली ।
तणें प्रसन्नता लाधली । आजि हे माझी ॥ ८६ ॥
म्हणौनि येणें प्रसाद बळें । नव्हे झुजाचेनि आडळे ।
न ठकेचि येथ वेळे । भाळलो तुज ॥ ८७ ॥
जणें सप्रपंच अज्ञान जाये । येकु मी गोचरू होये ।
ते उपपत्तीचेनि उपायें । गीतीरूप हे ॥ ८८ ॥
मग अज्ञान निमालिया । मीचि एकु असें अपैसया ।
मनिद्र स्वप्न गेल्या । आपण पैं जैसें ॥९६॥
तैसा मी वाचूनि काहीं । मग भिन्नाभिन्न आन नाहीं ।
सोऽहं बोधें तयाच्या ठामीं । अनन्यु होय ॥१३९७॥
ऐं आपलेंनि भेदेंविण । माझें जाणिजे जें एकपण
तथ चि नाव शरण । मज येणें गा ॥९८॥
म्हणौनि घटाचेनि नाशें । गगनीं गगन प्रवेशे ।
मज शरण येणें तैसें । ऐक्य करी ॥९९॥
सुवर्णमणि सोनया । ये कल्लोळु जैसा पाणिया ।
तैसा मन धनंजया । शरण ये तु ॥१४००॥
वाचुनि सागराच्या पोटीं । वडवानळु शरण आला किरिटी
जाळू न ठाके तया गोठी । वाळूनि दे पा ॥१४०१॥
मजही शरण रिघिजे । आणि जीवत्वेंचि असिजे ।
धिग् बोली धिया न लजे । प्रज्ञा केवीं ॥२॥
अगा प्राकृताही राया । आश्री पडे जें धनंजया ।
तें दासिरूही कीं तया । समान होय ॥३॥
मा मी विश्वेश्वरु भेटे । आणि जीवग्रंथी न सुटे ।
हे बोल नको वोखटें । कानीं लाऊ ॥ ४ ॥
म्हणौनि मी होऊनि मातें । सेवणें आहे आयितें ।
तें करीं हाता येतें । ज्ञाने येणें ॥ ५ ॥
मग ताकौनिया काढिलें । लोणी मागौतें ताकीं घातलें ।
परी न घेणे काहीं केलं । तेणें जेंवी ॥ ६ ॥
लोह उभें खाय माती । तें परिसाचिये संगती ।
सोनें जाल्या पुढती । न शिविजे मळें ॥ ७ ॥
हे असो काष्ठापासोनी । मथूनि घेतलिया वन्ही ।
मग काष्ठेंही कोंडोनि । न ठके जैसा ॥ ८ ॥
तैसें अद्वयत्वें मज । शरण रिघालिया तुज ।
धर्माधर्म हे सहज । लागतील ना ॥ ९ ॥
अर्जुना काय दिनकरु । देखत आहे अंधारु ।
कीं प्रबोधीं होय गोचरु । स्वप्नभ्रमु ॥ १० ॥
तैसें मजसी यकवटलेया । मी सर्वरूप वाचूनिया ।
आन काहीं उरावया । कारण असे ॥ ११ ॥
म्हणौनि तयाचें काहीं । चित्तीं ना आपुला ठाई ।
तुझें पापपुण्य पाहीं । मीचि होईन ॥ १२ ॥
जळीं पडलिया लवणा । सर्वही जळ होय विचक्षणा ।
तुज मी अनन्य शरणा । होईन तैसा ॥ १३ ॥
तेथ सर्वबंध लक्षणें । पावें उरावें दुजेपण ।
तें माझा बोधीं वायाणें । होऊनि जाईल ॥ १४ ॥
येतुलेनि आपैसया । सुटलाची आहासी धनंजया ।
घेईं मन प्रकाशोनिया । सोडवीन तूतें ॥ १४१५ ॥
या कारणें पुढती । हे आधी न वाहे चित्तीं ।

मज एकासि ये सुमती । आणोनि शरण ॥ १४१६ ॥
ऐसें सर्व रूप रूपसें । सर्व दृष्टि डोळसें ।
सर्व देश निवासें । बोलिलें श्रीकृष्णें ॥ १७ ॥
मग भावंडा सव्यकरणु । बाहु पसरोनि दक्षिणु ।
आलिंगिला स्वशरणु । भक्तराजु तो ॥ १८ ॥
न पवतां जयाते । वाचेसहित बुद्धीतें ।
बोलणें मागौतें । परतलें ॥ १९ ॥
ऐसें जें कांहीं एक । जें बुद्धीसही अटक ।
तें यावया मिरत । मेळाचें केलें ॥ २० ॥
हृदया हृदय एक झालें । ये हृदयींचें तें हृदयीं घातलें ।
द्वैत न मोडतां केलें । आपणा ऐसें अर्जुना ॥२१॥
दीपें दीप लाविला । तैसा परिष्वंगु तो जाहला ।
द्वैत न मोडितां केला । आपण पैं पार्थु ॥२२॥
तेव्हां सुखाचा मग तया । पूर आला जो धनंजया ।
तेथ वाड तरी बुडोनियां । ठेला देवो ॥२३॥
सिंधु सिंधूतें पावों जाये । तें पावणें ठाके दुणा होये ।
परी रिगे पुरवणिये । आकाश ही ॥२४॥
तैसें तया दोघांचें मिळणें । बोधा नावरे जाणावें कवणें ।
किंबहुना न सांगवे । विश्व कोंदलें ॥२५॥
एवं वेदांचें मूळसूत्र । सर्वाधिकारैक पवित्र ।
श्रीकृष्णें गीताशास्त्र । प्रकट केलें ॥२६॥
येथ गीता मूळ वेदां । ऐसें पां कैसी आलें बोधा ।
हें म्हणाल तरी प्रसिद्धा । उपपत्ति सांगो ॥२७॥
तरी जयाच्या निश्वासीं । जन्म झालें वेदराशी ।
तो सत्यप्रतिज्ञ पैजेसीं । बोलिला स्वमुखें ॥२८॥
म्हणौनि वेदां मूळभूत । गीता म्हणों हें होय उचित ।
आणिकही येकी येथ । उपपत्ति असे ॥२९॥
जें न नशतु स्वरूपें । जयाचा विस्तारु जेथ रूपे ।
तें तयाचें म्हणिपे । बीज जगीं ॥३०॥
तरी काडत्रयात्मकु । शब्दराशी अशेषु ।
गीतेमाजीं असे सेतु । बीजीं जैसा ॥१४३१॥
म्हणौनि वेदांचें बीजें । श्रीगीता होय हें मज ।
गम आणि सहज । दिसतही आहे ॥१४३२॥
जे वेदांचे तिन्ही भाग । गीते उमटले असती चांग ।
भूषण रत्नीं सर्वांग । शोभलें जैसें ॥१४३३॥

यापुढे ज्ञानेश्वरांनी आपल्या मते गीतेची त्रिकांडात्मक रचना कशी ते सविस्तर सांगितले आहे. विस्तार भयास्तव ते येथे दिले नाही

येथे ज्ञानेश्वरीचा उतारा विस्तृत दिला, त्याची दोन कारणे आहेत. एक येथे प्रकृत जो विषय पुरुषोत्तम योग अथवा ईश्वरवाद त्या संदर्भात गीता हा सर्वोत्कृष्ट प्रमाण ग्रंथ मानला जातो. गीतेतील कृष्णार्जुन या दोन व्यक्ति नाममात्र आहेत. साक्षात् भगवान् व भागवत अथवा सद्गुरु यांच्यामधील तो अत्यंत जिव्हाळ्याचा अध्यात्मपर संवाद आहे. त्यातील युद्धाची भूमिका हा सृष्टीतील तीव्र संघर्षाचा म्हणजे अंतर्बाह्य युद्धाचा प्रसंग आहे. देहू जवळपास भंडाऱ्या डोंगरावर बसून श्रीतुकाराम स्वानुभवपूर्वक सांगतात की

रात्रंदिवस आम्हा युद्धाचा प्रसंग ।
अंतर्बाह्य जग आणि मन ॥ १ ॥
जीवाही आगोज पडती आघात । येऊनिया नित्य नित्य वारू

(१) भगवद्गीतेतील उपदेश कृष्णानुवाच असा लिहिला नाही भगवानुवाच असा आहे वर जे गीतेचे अवतरण दिले आहे त्यात कृष्णार्जुन हे मेव्हणे मेव्हणे नसून श्रीगुरु–शिष्य या नात्यात आहेत.

अर्जुनपण न घेता । मी ऐसें जें पडुसुता ।
उठतसे तें तत्त्वता । तयाचें रूप ॥ १८।१३१५
मी अर्जुन एक अर्जुनु । ऐसा देहीं वाहे अभिमानु ।
आणि कौरवांतें इयां स्वजनु । आपुला म्हणें ॥ ११।५१
यात अर्जुन या नामरूपाचे मिथ्यात्व स्पष्टच दर्शविले आहे

नाईल कर्वेशा मिळाली, दिवाळे निघाले, मुले दुष्काळाने मेली, निंदकांनी गाढवावर धिंड काढली, मंबाजीबोवांनी

ओटपून काढण्यास कमी केले नाही, अभंगाच्या वह्या इंद्रायणीत बुडविल्या हे दुर्दैवाचे आघात बुद्धाहून कमी दारुण नव्हत ! हे असे युद्धाचे, द्वैतात्मक संघर्षाचे अद्वैतात्मक प्रसंग पुरुषोत्तम योगात आटवे येत नाहीत व त्यातील पाप-पुण्य, सुख-दुख, धर्माधर्म याचा संपर्क त्यात ल्पलेश नसतो हे गीतोपदेशाचे रहस्य आहे. यास्तव अगीच्यानन्व मोक्षस्त्व। ह्या २।११ श्लोकापासून सुरु केलेल्या उपक्रमाचा उपसहार १८।६६ या श्लोकाअखेर

"अहं त्वा सर्वपापेभ्यो मोक्षयिष्यामि मा शुच ॥ ६६"

या भगवताच्या आश्वासनात झाला आहे गीतेचा पहिला अध्याय हीच कौरव पांडव-युद्धरूप नाटकाची नांदी आहे व अठरावा अध्याय हा समारोप होय. कौरव पाडवाचा संग्राम, कौरवाचा नाश, अभिमन्यूचा मृत्यु हे सारे रणागणाच्या रंगभूमीवरील देखावे होत. अर्जुनाच्या लाडक्या अभिमन्यूचा वध हा अर्जुनाच्या अहंकाराचा नाश मानावा या रंगभूमीवरील व्यवहाराची फलश्रुति पुढे परीक्षिताने शुकाकडून भागवत् श्रवणाने पुरुषोत्तमयोग साधणे, परीक्षितीने आपले दृश्य निरहीत द्रष्टेपण अनुभविणे या मोक्ष पुरुषार्थात आहे.

"जो व्यवहार जेथ न घडे।  
तयाचं फळ तेथ घडे ॥" (१३४८)

या श्रीज्ञानेश्वराच्या गूढ उक्तीचा मी हा अर्थ मानतो. जगताकारराने उभा केलेला व्यवहार म्हणजे ससार वेगळा व त्याची फलश्रुति वेगळी. या ससारातच यत्नाचा अहंकार बाळगणे हाच श्रीज्ञानेश्वर म्हणतात तो या भवसागरातील वडवानळ होय. नृसिंहावतार नाटकातील नरहरि या भावना प्रधान नटाने मिथ्या भूमिकेशी तादात्म्य पावून हिरण्यकश्यपु या नटाचे खरोखरीच हातातील वाघनखाने पोट फाडले, हा जो त्यानी यत्नाचा विक्रम दाखविला तो द्वैतात्मक वडवानळ असे श्रीज्ञानेश्वर वरील १४०१ ओवीत बजावतात नाटकातल्या नरसिंहाच्या भूमिका घेणाऱ्या नटाने हातातील वाघनखरूप यत्नाचा नुसता आविर्भाव दाखवावा एवढीच त्याची वास्तविक भूमिका हे त्याने विसरू नये हिरण्यकश्यपू नटाला ठार मारण्याचा विक्रम हा खरा पुरुषार्थ नव्हे. हा आत्मघात होय. एकच प्याला नाटकातील सुधाकर नामक सज्जनाने खरोखरीच दारूडा बनून आपल्या धर्मपत्नीचा व सुपुत्राचा घात करून मरावयाचे नाही. नाट्य व्यवहार असा भासला तरी त्याची फलश्रुति दारुला स्पर्शहि न करणे ह्या बोधात आहे असे ज्ञानेश्वर सागतात. मी वस्तुत कोण ? हे नटाने कधीच विसरता कामा नये हे ह्या ससाररूपी रंगभूमीवरील प्रत्येक नटाच्या पुरुषार्थाचे वास्तविक रहस्य आहे. हाच अत्यंत महत्वाचा आदेश जगास देण्यासाठी *गीता या नटीचे भारतीय युद्ध हे नाटक होय.* हाच गीता सागणारे श्रीमत् व्यास, भागवत सांगणारे श्रीमत् शुकाचार्य व त्याचा भावार्थ स्पष्ट सांगणारे भगवताचेच अवताररूप संतश्रेष्ठ श्रीज्ञानेश्वर याच्या भावार्थ दीपिकेचा अध्यात्म ज्ञान प्रकाश होय. हाच पुरुषोत्तम योगरूप मोक्षपुरुषार्थ होय इतके मीच सारे स्पष्ट सांगितल्यावर श्रीपुरुषोत्तम पुरुषार्थ वादाची समस्या ती माझी कोणती उरली ? ह्या प्रश्नाचे आता प्रत्यक्ष व्यावहारिक दृष्टीचे उत्तर मी सांगतो.

वर मी जो समारोप केला ती वास्तविक गीता रहस्या बद्दलची माझी केवळ मान्यता आहे. केवळ मान्यता म्हणजे निष्ठा, मान्यता म्हणजे साक्षात् प्रचीति नव्हे त्यास दुर्दैवाचे अंतराय येऊ शकतात, हे श्रीज्ञानेश्वरानीच वरील निरूपणात दोन ठिकाणी दर्शविले आहे, इतकेच नव्हे तर हे अतराय निःशेष दूर करण्याकरिता भगवद्रूप श्रीसद्गुरूनी आपल्या मंद साधकरूप शिष्यास आलिंगन देऊन आपल्या हृदयातील अपरोक्ष ज्ञान शक्तिपातपूर्वक त्याच्या हृदयात घातल्याचे अगत्यपूर्वक वर्णिले आहे. येथील भाग्यहीन मंद साधकास ही अपरोक्षानुभूति कशी घडावी हे माझ्या बिकट समस्येचे रूप आहे.

—डॉ **सदाशिव कृष्णा फडके,**  
( नवयुग धर्ममालाकार )

# योग-भक्ति-दर्शन

मंगळवार दि २५।८।६७ रोजी सकाळी प पू. गुळवणी महाराजांच्या दर्शनास गेलो असता त्यांनी प्रस्तुत ग्रंथाचे माहितीपत्रक मला देऊन लेख लिहिण्याची आज्ञा केली या ग्रंथात समाविष्ट व्हावयाच्या विषयावर लिहावयास लागणारा अधिकार मजकडे नाही माझे तुटपुंजे ज्ञान आणि अपुरा अनुभव यांच्या अतिसंकुचित मर्यादांची मला पूर्ण जाणीव होती व आहेही, म्हणून मी थोडा साशंक झालो परंतु "तुम्हाला जे येईल ते आणि जसे येईल तसे लिहून पाठवा" असा आधार प पू महाराजांनी दिल्यामुळेच मी या लेखनाला प्रवृत्त झालो या लेखातील प्रेरणा आणि विचार प पू महाराजांचे असून केवळ 'लेखक' होण्याचे भाग्य मला लाभले हाच माझा आनंद!

## ग्रंथनामाची मीमांसा

या ग्रंथाचे नाव '**योग भक्ति दर्शन**' असे आहे संयोजकांना नेमके काय अभिप्रेत आहे याची मला स्पष्ट जाणीव नाही, पण **दर्शन** या शब्दाच्या सर्वसामान्य रूढ अर्थांखेरीज 'तर्कशुद्ध सैद्धान्तिक विचार' अगर 'तत्त्वज्ञान' असापण एक अर्थ विद्वन्मान्य आहे भारतीय परंपरेत षड्दर्शनांचाच प्रामुख्याने विचार होत असल्यामुळे '**दर्शन**' म्हणजे की आपणासमोर सांख्य-योग, न्याय-वैशेषिक आणि मीमांसा-वेदान्त या सहांचाच उभा राहतात वास्तविक बौद्ध, जैन, चार्वाक आणि इतर दर्शने पण अस्तित्वात आहेतच

वरील मथळ्यात दिलेल्या या ग्रंथाच्या नावामधील 'योग' दर्शन फार जुने असले तरी त्यात भक्तीचा अंतर्भाव झालेला नाही भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायाचे नामकरण 'भक्तियोग' असे आहे पण त्या ठिकाणी तो कर्मधारय समास असल्यामुळे भक्ती नावाचा एक योग एवढाच त्याचा अर्थ होऊन योग शब्दाचा अर्थ फक्त एक मार्ग किंवा पद्धति एवढाच आहे. मथळ्यातील 'योगभक्ति' हा द्वन्द्व समास असण्यापेक्षा तो मध्यमपदलोपी समास असणे अधिक सयुक्तिक आणि अन्वर्थक आहे संयोजकांची तीच कल्पना आहे काय याचे मला ज्ञान नाही त्यामुळे 'योगयुक्ता भक्ति' असा त्या समासाचा विग्रह होऊन हे एक नवेच सकरित दर्शन भारतीय संस्कृतीत आणि विचारधारेत समाविष्ट झाले काय असे वाटण्याचा संभव आहे पण तसे झाले तर त्यामुळे आश्चर्य अगर विषाद वाटण्याचे काहीच कारण नाही, उलट त्यामुळे भारतीय दर्शनांचे पुन परीक्षण करण्याची संधि मिळून आपल्या अस्फुट कल्पनांना उजाळा मिळेल आणि त्या दर्शनांचे स्पष्ट दर्शन आपणास घडेल शिवाय आम्ही केवळ परंपरावादी नसून आमच्या तत्त्वज्ञानाचा पुनर्विचार करून तर्कशुद्ध आणि वास्तववादी भूमिकेवरून अनुभवाच्या कसोटीवर त्यात योग्य आणि आवश्यक तो बदल करण्याइतके प्रगतीपर आहोत हे पण सिद्ध होईल पुढील विचार याच

दृष्टीकोणातून मांडण्याचा प्रयत्न केला आहे.

## भक्तिमार्गाचे श्रेष्ठत्व

भक्तीचे श्रेष्ठत्व दर्शविताना नारदभक्तिसूत्रात

'सा तु कर्मज्ञानयोगेभ्योऽप्यधिकतरा । (सू. २५)

या सूत्राने कर्म, ज्ञान आणि योग यांपेक्षासुद्धा भक्ति श्रेष्ठ आहे असा दावा मुनिश्रेष्ठ देवर्षि नारदांनी मांडला आहे. कारण ती फलस्वरूपच आहे ज्ञान, कर्म आणि योग यांच्यामुळे जे फल प्राप्त व्हावयाचे म्हणजेच केवळ साधनरूप असलेल्या या तत्त्वाचे जे साध्य ते फल म्हणजे भक्तीचेच संभाव्य स्वरूप आहे (फलरूपत्वात् । सू. २६) भगवद्गीतेमध्ये पूर्वार्धात मोक्षाचे मार्ग म्हणून ज्ञान, कर्म आणि योग यांचे विवेचन करून शेवटी नवव्या आणि बाराव्या अध्यायात चौथ्या मार्गाचे म्हणजे भक्तियोगाचे विवरण केले आहे कदाचित् तार तम्याने ही योजना केली असेल तर ज्ञान हे श्रेष्ठ आणि भक्ति हे कनिष्ठ साधन ठरण्याचा संभव आहे. पण तसा अर्थ त्या ठिकाणी अभिप्रेत आहे असे मानण्याला फारसा आधार नाही

## गीतेचे श्रेष्ठ वैशिष्ट्य

किंबहुना इतर सर्व तात्त्विक ग्रंथापेक्षा भगवद्गीतेची जी वैशिष्ट्ये सांगता येतात त्यातील सर्वांत महत्त्वाचे आणि सर्वांत श्रेष्ठ वैशिष्ट्य हे की गीतेने मोक्ष मार्गामध्ये भक्तीचा अंतर्भाव करून वैदिक धर्मामध्ये असलेली एक मोठी उणीव भरून काढली आणि त्या धर्माला परिपूर्णत्व देण्याचा यशस्वी आणि क्रांतिकारक प्रयत्न केला. सामान्य माणसाच्या शक्तीचा विचार करता ज्ञान, कर्म आणि योग हे तीन मार्ग त्याला दुर्गम आहेत.

ज्ञानमार्गासाठी प्रखर बुद्धिमत्तेची आणि एकनिष्ठ ज्ञान तपस्येची आवश्यकता असून शिवाय त्यासाठी लागणारा "श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ" गुरु नेहमीच मिळेल ही शाश्वती नसते. शिवाय ज्ञानी माणसामध्ये अनेकदा दुरभिमान निर्माण झाल्याची उदाहरणे थोडीथोडकी नाहीत. त्यामुळे त्या मार्गात थोडा धोका आहेच.

कर्ममार्गामध्ये पण सर्व साधनांची जरूरी असते. शिवाय योग्य आणि अनुभवी परंतु सम्यग्दर्शी मार्गदर्शकाची आवश्यकता असते या कर्ममार्गामध्ये कर्मयोग नष्ट होऊन त्याला कर्मठपणा कसा प्राप्त होतो याचे चालतेबोलते उदाहरण म्हणजे मनुवंशांनी, मतवेडेल्यांनी आणि सोवळ्या ओवळ्यासारख्या बाह्याचार आणि कुजलेल्या विचारांनी ग्रस्त झालेला आजचा हिंदू धर्म होय. 'दात गेले आणि सोवळे राहिले' अशी त्याची स्थिती झाली आहे.

योगमार्गी माणसाला पुष्कळदा दांभिकतेचा दुर्धर रोग जडलेला आढळतो. त्यामुळे या तिन्ही मार्गात काही ना काही प्रमाणात कद्रुपता आहे असे मानावयास हरकत नाही. याउलट भक्तिमार्गामध्ये भक्त नेहमीच दीनत्व आपणाकडे घेऊन स्वामित्व भगवंताचे ठिकाणी मानीत असल्यामुळे तो या दोषापासून नेहमीच मुक्त असतो

न साधयति मां योगो न सांख्यं धर्म उद्धव ।
न स्वाध्यायस्तपस्त्यागो यथा भक्तिर्ममोर्जिता ॥

(भाग. ११।१४)

या भागवतातील श्लोकात पण पुन्हा भक्तीचे श्रेष्ठत्व प्रतिपादिले आहे. भक्ती ही फलस्वरूपिणी आहे असे म्हटले याचे कारण असे की ज्ञानादिचे मार्ग हे साधनभूत असल्यामुळे त्यांमधून इतर काही साध्य प्राप्त करावयाचे असते परंतु भक्तीचे फल भक्ति हे आहे. भक्ति हे केवळ साधनच नव्हे तर ते स्वतःच साध्य आहे. अनेक संतांची साक्ष यासाठी काढता येईल 'तुझा विसर न व्हावा' असे आवर्जून दान मागणारे भक्तचूडामणी तुकाराम महाराज अगर महान् भगवद्भक्त एकनाथ महाराज आपणास हेच सांगतात.

भक्तिप्रेमाविण ज्ञान नको देवा ।
अभिमान नित्य नवा तयामाजी ॥

(एकनाथ-अभंग)

अर्थात अनेक तत्त्वज्ञांच्या आणि भक्तांच्या निरूपणांचे सार असे म्हणता येईल की अन्य मार्ग वाईट नाहीत पण त्यांच्यात काहीना काही उणीव आहे. ती भक्तीने भरून निघते

म्हणून ती सर्वश्रेष्ठ आहे शिवाय ती सर्वसुलभ पण आहे.

'अन्यस्मात् सौलभ्यं भक्तौ।' (सू. ५८)

या सूत्रात नारदांनी तिची सुलभता स्पष्ट केली आहे ज्ञानाला बुद्धिसामर्थ्याची तर योगाला शरीरसामर्थ्याची आवश्यकता असते, कर्माला साधनसामर्थ्य हवे असते पण

भक्तीला दुसरी कसलीच आवश्यकता नाही. भक्त आणि भगवान् यांच्यातील परम प्रेमाचा मंगल तंतू कुठेही आणि केव्हाही कसाही निर्माण होतो, करता येतो आणि त्यामुळे जिवाशिवाची गाठ बांधली जाते. शिवाय वरील तीन मार्ग व्यक्तिविशेष सापेक्ष आहेत. तर भक्तिमार्ग सर्वांनाच मोकळा आहे.

'स्त्रियो वैश्यास्तथा शूद्रास्तेऽपि यान्ति परां गतिम् ॥'

अशी भक्तिमार्गाची सुलभता सार्वत्रिक आणि सार्वकालिक असल्यामुळे तो अधिक तर मानवांना उपलब्ध आहे. त्यावर नियमने, नियंत्रणे आणि बंधने नाहीत.

'अहो जाता येता उठता बसता कार्य करता'

असा पाहिजे तसा भगवंताची स्वेच्छेप्रमाणे मनमुराद सेवा जाणून भक्त आपल्या परमानंदात मग्न होऊन राहतो. म्हणून भक्ती मार्गाची सुलभता इतरांपेक्षा अधिक आहे.

## सुलभ भक्तिमार्गातील काही अवगुण

परंतु अशा शुचि आणि सुलभ भक्तिमार्गातहि काही अवगुण निर्माण झाल्याचे आपण नित्य व्यवहारात पाहतो. कदाचित भक्तिसंप्रदायाचा खरा अर्थ न उमगल्यामुळे अगर त्याचा योग्य वापर न केल्यामुळे असेल. परंतु त्या शुद्ध भक्तिसुवर्णामध्ये हीण ममामिश्र होऊन त्याचा कस उतरला असण्याची शक्यता आहे. भक्तामध्ये अनेकदा केवळ साम्प्रदायिकता अगर निरर्थक अभिनिवेश निर्माण झालेला दिसतो. सर्वांभूती पांडुरंग पाहणारा वारकरी पंढरपुरला गेला की मी या मठाचा आणि तो दुसऱ्या मठाचा अगर माझा अमका पंथ श्रेष्ठ आहे तर दुसरा पंथ कनिष्ठ आहे अशी असली दुरभिमानाची लक्तरे वेशीवर टांगतो. पूजा अगर अर्चना म्हणजे भक्तीचे केवळ एक प्रतीक! परंतु ती अमूक वेळी, अमूक पद्धतीने आणि विवक्षित 'द्रव्याने' केली तरच ती उत्कृष्ट होऊन ती भगवंताला आवडते आणि तिचे त्वरित आणि श्रेष्ठ फळ मिळते हा मनाचा अभिनिवेश उपासकात निर्माण होतो. वास्तविक

'पत्रं पुष्पं फलं तोयम्।'

यांपैकी कोणतीही एक अथवा अनेक वस्तू सश्रद्ध आणि भक्तियुक्त हृदयाने परमेश्वराला अर्पण केल्यामुळे त्याची पूजा होते. किंबहुना याची पण आवश्यकता नाहीच.

'यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम् ॥'

किंवा

'यत्करोषि यदश्नासि यज्जुहोषि ददासि यत्।
यत्तपस्यसि कौन्तेय तत्कुरुष्व मदर्पणम् ॥'

या तत्त्वानुरोधाने भगवंतानी सांगितलेल्या पद्धतीने लौकिक आणि लोकप्रसिद्ध पूजा न करताही परमेश्वराची आराधना करता येते आणि ती परिपूर्ण होते. पण तरीही लोभाने म्हणा, मोहाने म्हणा अगर अज्ञानाने म्हणा पूजेच्या उत्तम मध्यमाधम श्रेणीविषयी समाजात अनेकदा चर्चा चालतेच. भिन्नभिन्न देवतांच्या श्रेष्ठकनिष्ठत्वाविषयी तर निर्माण होणारे बालिश वाद पाहिले की परमेश्वर आणि मगर तत्त्वाची पण मानव आपल्या संकुचितपणाने आणि जाड्याने किती आणि कशी विटंबना करू शकतो याचे हिडीस चित्र समोर उभे राहते आणि या हीनत्वाची कीव करावीशी वाटते. असो. भक्तमार्गातहि आणखी एक वैगुण्य असे असू शकते की भक्त समोर दिसणाऱ्या सगुण स्वरूपाशीच तन्मय होतो, तेच परमात्म्याचे सत्य स्वरूप आहे अशी त्याची मनोमन धारणा होते. किंबहुना त्या दृश्य स्वरूपात जर यदाकदाचित थोडासा बदल झाला तर त्याला वैषम्य वाटते, त्याच्या भावना दुखावतात. भक्ती ही त्या विशिष्ट स्वरूपाचीच मानल्यामुळे सगुणातून निर्गुणाकडे, दृश्यातून अदृश्याकडे, साकाराकडून निराकाराकडे आणि सांतातून अनंताकडे जाण्याच्या मार्गात प्रचंड अनुल्लंघ्य भिंती निर्माण होतात. भक्तिमार्गातील ही क्षती दूर करावयाची असली तर तिला काहीतरी जोड देणे अत्यावश्यक आहे. ज्ञानाने तर्कशुद्ध सिद्धान्त निष्पन्न आणि सिद्ध होईल, पण परमेश्वराच्या सत्य स्वरूपाविषयी तहानेने व्याकूळ झालेल्या भक्ताला अशा वैचारिक आणि तार्किक युक्तिवादाने समाधान लाभणार नाही. त्याला भगवंताच्या दर्शनाची, त्याच्या साक्षात अस्तित्वाची ओढ लागलेली असते. भक्त आणि भगवान या प्रत्यक्ष स्वानुभवाच्या द्वंद्वात तो गुरफटल्यामुळे त्याला त्या मोहातून बाहेर काढून अद्वैताचे अनुभवसिद्ध दर्शन घडविणारे तसेच बलवान् आणि सद्य फलदायी रसायन आवश्यक आहे. हे रसायन योगशास्त्रच देऊ शकते. तसे पाहिले तर योगमार्ग आणि भक्तिमार्ग यांच्यात तत्त्वतः फारसा फरक नाही.

'योगश्चित्तवृत्ति निरोधः।'

या व्याख्येने सांगितलेला योग हा इतस्ततः स्वच्छंदपणे भटकणाऱ्या आणि इंद्रियांच्या द्वारे त्या त्या विषयांना

लालचावलेल्या चित्तवृत्तींचा निरोध करण्याचे जजावीत आहे तर भक्तिमार्ग त्या चित्तवृत्तींची मूलभूत प्रेरक प्रवृत्ती जी आवड अथवा प्रेम त्याची परमोच्च सीमा करून उत्कट स्वरूपाचे प्रेम "ह्या" च्या ठिकाणी केन्द्रित करण्याचे सांगत आहे.

'सा त्वस्मिन्परम प्रेमरूपा।'

(नारद सू. २)

योग एकल्यानेच एकान्तात आचरावयाचा असतो तर भक्ति सर्व भक्तांसह पण समाजात, प्रपंचात राहूनही अवलंबिता येते. योग निर्गुण, निराकार अशा अज्ञेय अनंताच्या शोधात असतो तर भक्ति सगुण, साकार, ज्ञेय आणि सान्ताची मूर्ती समोर उभी करते किंबहुना अष्टांगयोगातील पाचवे अंग जे ध्यान म्हणजे केन्द्रीभूत उपासना तेच तर भक्तीचे मूर्तिमंत स्वरूप आहे परंतु योगमार्गातील यम नियमाचा पसारा हा कडक आणि क्लिष्टकृत्य रोकविलिष्ट आणि निष्ठुर वाटतो पण भक्तिमार्गात या काठिण्याचा आणि नैष्ठुर्याचा अभावच असतो आणि म्हणून तर तो सर्वसुलभ आहे,

## योग आणि भक्ति याचा समन्वय

मुद्दा असा की सान्ताकडून अनंताकडे, सगुणाकडून निर्गुणाकडे जाण्यासाठी समोर दिसणारी साकार मूर्ती ही त्या निराकार अमूर्ताचे केवळ प्रतीक आहे याची साक्षात् प्रचीती भक्ताला यावयास हवी. समोरची मूर्ती म्हणजे केवळ माझ्याच हृदयात नव्हे तर यच्चयावत् जडचेतनात वावरणाऱ्या अमूर्ताचे स्वरूप आहे, एक अवतार आहे याची मनोमन खात्री भक्ताला पटावयास हवी. हे कार्य फक्त योगच करू शकेल आणि त्यामुळे भक्ताला ऐहिक सुख समाधान तर लाभेलच, परंतु "पुनरपि जननं पुनरपि मरणं" च्या अविरत चक्रातून तो मुक्त होऊन मोक्षाचा अधिकारी होईल भक्तीला लागणारी सर्व तयारी त्याची झालेली असतेच, फक्त त्याचे क्षेत्र वाढविण्याची, क्षितिज विशाल करण्याची, आवाका मोठा करण्याची आणि जे जड व अपारदर्शक आहे त्यातून आरपार जाऊन चेतन पाहण्या इतकी दिव्यदृष्टि प्राप्त होण्याचीच आवश्यकता असते तेवढे झाले की त्याच्या भक्तीला फक्त मोक्षाचे मधुर फळच येते. अर्थात भक्तीला योगाची जोड मिळाल्याने ज्याप्रमाणे भक्तीची परिपूर्णता होते त्याप्रमाणे योगाला भक्तीची जोड मिळाल्याने योगी सामान्य माणसात येऊन मिळूनमिसळून राहू शकतो तो एकान्तात राहण्याचा दुराग्रह न धरता प्रपंचात राहूनही परमार्थ साधता येतो हे प्रत्यक्ष स्वत च्या उदाहरणाने दाखवून देतो, आणि समाजाला आदर्शभूत होतो. समाजाला नेहमी भिवविणारे अध्यात्माचे भ्रम तो सहजसुलभतेने सोडवू शकतो. योगी माणसात सामान्यत दुर्गोत्पत्तीस येणारा दंभ आणि हेकटपणा तर भक्ती मधल्या लीनतेच्या आणि नम्रतेच्या भावनाजलाने धुवून जातोच पण योगाबद्दलच्या, त्यातील यम नियमाच्या चौकटीबद्दलच्या आणि योगाचरणातील कष्टप्रद जीवनाच्या भ्रामक कल्पना तो लीलया दूर करतो अष्टांगयोगातील यमनियमादिक भाग म्हणजे भक्ताच्या दैनंदिन जीवनातच प्रत्यही अनुभवाला येणाऱ्या स्वाभाविक आचाराचे नामान्तर आहे. हे तो अधिकारवाणीने आणि स्वानुभवाने सांगू शकतो व त्यामुळे सामान्य जनातील योगाबद्दलची अढी दूर करून योग म्हणजे सहजासहजी आचरता येण्याजोगी एक जीवनावश्यक प्रवृत्ती आहे हे तो समाजाला पटवून देऊ शकतो

## एक अर्वाचीन दर्शन

तात्पर्य, योग आणि भक्ति ही जरी स्वतंत्र अंगे असली तरीपण त्याच्यात मूलभूत विरोध नाही, किंबहुना वरील विवेचनावरून ती एकमेकांची काही अंशी पूरकच आहेत आणि म्हणून "योग-भक्ति-दर्शन" हे असा तऱ्हेने त्याची सांगड घालून प्राचीन दर्शनांच्या मुखवादित्वाभधून निर्माण होणारे एक अर्वाचीन दर्शन आहे असे म्हटले तर ते मान्य होण्यास प्रत्यवाय नसावा योग त्याज्य आहे अगर भक्ति उणी आहे असे म्हणण्याचा मानस या ठिकाणी नाहीच हे सुज्ञाना विदित व्हावं पण अनुभवी विद्वान आणि अधिकारी मन जर त्या दोहोंच्या समन्वयातून स्वसामर्थ्याने नवा मार्ग दाखवून देत असतील तर त्याला विरोध होण्याचे खरोखर काही प्रयोजन नाही प. पू. महाराज अशाच एका संप्रदायाचे आज अध्वर्यु आहेत असे मला वाटते, आणि म्हणूनच परमेश्वरचरणी प्रार्थना की समाजाला अंधारातून प्रकाशाकडे नेण्यासाठी अशा संताना दीर्घ आयुरारोग्य द्यावे.

इतिशम्।

—ग. मा. पाटील, पैठण

# योगी - भक्तियोगी

### अंतःकरणाने योगी व्हावे

'योगी' हा शब्द ऐकला की सामान्य मनुष्याच्या डोळ्यापुढे दाढी व जटा वाढविलेला, कफनी धारण केलेला, कुठे डोंगरात ध्यान धारण करून राहणाऱ्या पुरुषाचे चित्र उभे राहते. हा पुरुष योगी आहे यात शंका नाही, पण योगी शब्दाची व्याप्ति तेवढ्यापुरतीच मर्यादित नाही. योगाचा अभ्यास करतो तो योगी हेच खरे आहे. 'युज्' म्हणजे जोडणे, हा त्यातील मूळचा शब्द आहे. व्यापक दृष्टीने पाहिले म्हणजे ज्याने देव जोडला तो योगी समजावा व या अर्थानेच गीतेत भगवंताने हा शब्द अनेक वेळा वापरलेलाही आहे. जीव व परमात्मा यांचा संगम ज्याच्या मनोधर्मात झाला आहे किंवा जीव व परमात्मा हे ज्याच्या हृदयभुवनात ऐक्यासनी येऊन बसले म्हणजे जो पुरुष स्वतः देव स्थितीप्रत पोहोचला आहे तो योगी होय. ज्याने देव आपलासा केला तो योगी होतो. जन्माला येऊन देवाची प्राप्ति करून योगी व्हावे हेच मनुष्याचे ध्येय आहे व त्यातच जन्माला आल्याचे सार्थक आहे. तपी, ज्ञानी व कर्म करणाऱ्यापेक्षा योगी श्रेष्ठ आहे असे सांगून देवाने अर्जुनाला योगी हो असाच उपदेश केला आहे. ज्याचे अंतःकरण भगवंतापाशी जडले आहे व जो पुरुष श्रद्धेने भगवंताची श्रेष्ठ भक्ति करतो तो सर्व प्रकारच्या योग्यांमध्ये श्रेष्ठ योगी आहे असे सहाव्या अध्यायाच्या शेवटच्या श्लोकात समारोप करताना भगवंताने आपला संदेश म्हणून सांगितले आहे.

### हा जन्मशतांचा वाहतपणा आहे

प्रत्येकाने देवाची प्राप्ति करून घ्यावी म्हणजे योगी व्हावे. हे ध्येय एकदा निश्चित झाले म्हणजे ही प्राप्ति कोणत्या मार्गाने करून घ्यावी असा प्रश्न उत्पन्न होतो. या जगात परमात्म प्राप्तीच्या उद्देशाने साधने करणारी अनेक साधक मंडळी आहेत. त्यात अधिकारपरत्वे भिन्नता असते. ज्यांची बुद्धि तीव्र आहे व ज्यांच्या अंतःकरणाचे मळ व विक्षेप हे दोष नाहीसे झाले असून केवळ स्वरूपाचे आवरण दूर होण्याचे राहिले आहे असे पुरुष ज्ञानाचे अधिकारी आहेत. त्या भाग्यवान साधकांना श्रीगुरूंनी 'तत्त्वमसि' महावाक्याचा उपदेश केल्यावर त्यांचे ठिकाणचे द्वैत नाहीसे होऊन त्यांची वृत्ति एकदम आत्मस्वरूपी स्थिर होते. सूर्य उगवताक्षणीच जसा अंधार नाहीसा होऊन सर्व प्रकाशच होतो किंवा मिठाचा खडा पाण्यात टाकल्याबरोबर तो जलमय होतो अथवा निजलेल्या माणसाला जागे केले असता त्याच्या ठिकाणची झोप संपते व झोपेत पडलेले स्वप्नही नाहीसे होते तशी गुरूने उपदेश केल्यावर आत्मस्वरूपी जागे झालेल्या पुरुषाची स्थिति होते. परंतु असा कर्पुरहृदय असलेला साधक विरळाच असतो. 'बहूनां जन्मनामन्ते' त्याला तपाचे डोंगर ओलांडून ही स्थिति मिळत असते. बाकीचे सर्व मंद बुद्धीचे साधक असतात. त्यांना महावाक्याच्या श्रवणानंतर बुद्धीतील असंभावनादिक ज्ञान प्रतिबंधक दोषामुळे वस्तुरूप होता येत नाही. त्यांना स्वधर्मरूपी अग्नि-

मध्ये व निषिद्ध कर्मांच्या आहुत्या देऊन रज तम हे दोष जाळावे लागतात. नंतर त्या विषयात तोंड घालून त्याची इंद्रिये विटाळलेली असतात त्या इंद्रियाना प्रत्याहाररूपी तीर्थात स्नान घालावे लागते. हे काम काही एकदोन दिवसाचे अथवा वर्षाचे नाही व त्यासाठी एक जन्म नव्हे तर जन्मशते प्रयत्न करावा लागतो. 'पी हळद व हो गोरी' असा हा मार्ग नाही. जितका कपडा जास्त मलीन तितका तो जास्तच धुवावा लागतो. निष्काम कर्मरूपी साबण घेऊन मन निर्मळ करण्याचे काम प्रथम शेकडो जन्म करीत बसावे लागते. त्याचे मन निरनिराळ्या वासनानी भासले आहे त्याला ज्ञानाचा उपदेश केला तर तो वाया जातो. साबण लावला तर कपडा स्वच्छ होतो हे खरे आहे पण ज्या पाण्यात धुवावयाचा ते पाणी मुख्य स्वच्छ पाहिजे. पण ते पाणीच जर निर्मळ नसेल तर साबण फुकट जातो, त्याप्रमाणे चित्त शुद्धि नसेल तर ज्ञानाचा उपदेश व्यर्थ होतो. ज्ञानाने मोक्ष होतो हे खरे पण ते ज्ञान उत्पन्न होण्यासाठी व ते उत्पन्न झाल्यावर टिकण्यासाठी मुख्यतः चित्तशुद्धि पाहिजे.

### मल व विक्षेप हे योगी होण्यातले प्रतिबंध

साधक परमात्म दर्शनासाठी निघाला म्हणजे त्याला खूप मोठमोठे अडथळे येतात. त्याचे मन मागील अनेक जन्माच्या विषयोपभोगाच्या संस्कारानी मलीन झालेले असते. ते प्रथम स्वच्छ करावे लागते व त्याचबरोबर ते स्थिरही करावे लागते. मलीन चित्त हे परमात्म दर्शनाच्या आड येते श्रीतुकाराम महाराज देवाकडे काकाळी करतात.

काम नेलें चित्त नेदी अवलोकू मुख ।
बहु वाटे दुःख फुले पाहे हृदय
का गा सासुरवासी मज केलें भगवता ।
आपुलिया सत्ता स्वाधीनता ती नाही
प्रभातेसी वाटे यावे तुमच्या दर्शना ।
येथे न चले चोरी उरली राहे वासना ॥

मनुष्याला जे दर्शन होत असते ते डोळ्यापुढील वस्तूंचे यथार्थ दर्शन होत नाही तर तो मनुष्य जसा असतो तसे दर्शन होत असते. एकच मनुष्य चोराला चोर दिसतो, दारुड्याला दारुड्या दिसतो व साधूला साधू दिसतो. देव सर्वत्र ओतप्रोत भरून राहिला आहे. फार काय आपण स्वतःच देव आहोत पण 'त्वमेव प्रत्यक्ष ब्रह्मासि' असे गुरुनी सांगितले तर ते पटत नाही. उलट आपण आजारी, दुःखी, मरणारे आहोत असेच आपणास खरे वाटते. हे बुद्धिवरचे दोष घालविणे, चित्ताला स्थिरता आणणे हे परमार्थातले मुख्य कार्य आहे. पाण्यातले प्रतिबिंब दिसण्यासाठी पाणी स्वच्छ हवे तसेच ते स्थिर हवे.

### परमार्थात उपायांची वाणी नाही

देव दर्शनाला निघालेल्या साधकाला प्रथम चित्त शुद्ध व स्थिर करावे लागते व त्यासाठी नाना प्रकारची साधने आहेत. कर्मयोग, भक्तियोग, अष्टांगयोग, ध्यानयोग, ज्ञानयोग इत्यादि अनेक मार्ग आहेत व त्याचा क्रमही ठरले आहे. ज्ञानमार्ग हा कर्म व उपासना मार्ग चालून झाल्यावरच आक्रमावयाचा असतो हे आपण आताच पाहिले आहे. साधक ज्या अधिकाराचा असेल त्याप्रमाणे त्याचे साधन ठरते. जे लहान मूल आईच्या अगावरचे दूध मोठ्या कष्टाने पित, त्यास जिल्बीचा रस पाजून काय उपयोग आहे! त्याप्रमाणे साधे सदाचरण करणे हेही ज्याला जमत नाही त्याला नैष्कर्म बोध सागून काय उपयोग होईल? या उपयात 'योग' आलेला आहे जो मार्ग या अर्थाने आलेला आहे. त्या मार्गात अष्टांग योग हाही एक महत्वाचा मार्ग आहे. त्याचे विवेचन गीतेच्या सहाव्यास आले असून श्रीज्ञानेश्वर महाराजानी जो त्यातील गूढ भाग स्पष्ट करून आपल्या टीकेत विस्ताराने सांगितला आहे. पचमहाभूतानी पचमहाभूताचा लय करावयाचा हे जे आदिनाथ शंकराचा अतरंग खुणेचे मर्म आहे ते श्रीविष्णुनी गीतेत दाखविले व ते मर्म गूढपणाची बंधने दूर करून ज्ञानेश्वर माउलीने स्पष्टपणे आपल्या टीकेत सांगितले आहे. अष्टांग योगाचा अधिकारी कोण आहे? त्याने योगाभ्यासाला कोणत्या स्थळी बसावे, कोणता व कसा अभ्यास करावा हे १६३ ते ३६६ ओव्यात आपणास वाचावयास मिळते त्या अभ्यासाच्या मर्यादा पाहून अधिकारी याचकाने या मार्गाचे आचरण केले त्याचे परमत्याचे

### अष्टांग योगाचा मार्ग

तसे म्हटले तर यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार ध्यान, धारणा, समाधि ही योगाची अंगे अत्यत महत्वाची आहेत. कर्म व भक्ती या मार्गाने जरी एखादा साधक गेला या अष्टांगापैकी काहीचे बळ त्याच्या पाठीशी असावेच लागते. शारीरिक व नैतिक तयारी असल्याशिवाय कोणत्याच

मार्गात प्रगति होणार नाही. म्हणून ज्ञानेश्वरीत या अष्टांग योगाचा उल्लेख अनेक ठिकाणी आलेला आहे. मोक्षरूपी लक्ष्मीला वरण्यासाठी जो साधक निघाला त्याला प्रतिबंध करण्यासाठी जे अहंकार, बल, दर्प, काम, क्रोध व परिग्रह हे षड्वैरी येतात. त्याचा साधक निःपात करतो, त्यात ध्यानाचा फार मोठा वाटा व आधार आहे विषयविषयानी भरलेला अगाध डोह आहे व सर्व दोषरूपी शत्रु आड येतात, पण ध्यानरूपी तरवारीपुढे त्याचा काय पाड लागणार आहे? पंचप्राण व मन हे वाटाडे बरोबर घेऊन बाहेरच्या बाजूला यमनियमांचे कांटेरी कुंपण साधक लावतो. त्या कुंपणाच्या आत मूळ बंधाचा कोट तयार करतो व त्या कोटावर प्राणायामरूपी तोफा ठेवतो. तेथे कुंडलिनीच्या प्रकाशाने मन आणि प्राणवायु यांच्या सहाय्याने सतरावी जीवनकला हेच कोणी एक तळे ते तो साधक हस्तगत करतो. प्रत्याहारामुळे विकार संपूर्ण नाहीसे होतात. इंद्रियांना हृदयाच्या आत बांधण्यात येते, संकल्पाने मन, बुद्धी, चित्त अहंकार हे जे चतुरंग सैन्य ते ठार होते व ध्यानाची नौबत वाजते व स्वरूप ऐक्याचे एक छत्र झळकते. यानंतर समाधिरूपी लक्ष्मीचे जे आत्मानुभावाचे राज्यसुख आहे त्याचा त्याला समरसतेने राज्याभिषेक होतो. ( ९ वा अध्याय २१७-२१८ )

ज्ञानदेवांनी अशा प्रकारची सुंदर वर्णने ठायी ठायी केलेली आहेत. आणखी एक वर्णन पहा आत्मज्ञानात योगाभ्यासाची कशी जरूरी आहे हे सांगताना ज्ञानदेव म्हणतात. गुद व उपस्थ या दोन द्वारामधील जी शिवण आहे तिचा मध्य टाचेने दाबून गुदाचे आकुंचन झाले. मूळ बंधादि तिन्ही बंध दिले आणि प्राण अपान आदि निरनिराळे वायु एकत्र केले. कुंडलिनी जागी करून सुषुम्ना नाडीचा विकास केला. आधारचक्रापासून तो आज्ञा चक्रापर्यंत चक्राचे भेदन केले. सहस्रदलरूपी मेघाच्या अमृताचा जो वर्षाव झाला तो प्रवाह मूलाधार चक्रापर्यंत आणला. आज्ञाचक्ररूपी पर्वतावर नाचत असलेल्या चैतन्यरूपी भैरवाच्या भिक्षा पात्रात मन व प्राण यांची ऐक्यरूपी खिचडी वाढून योगाभ्यास चांगला दृढ केला. मग हा तीन बंधाचा समुदाय पुढे करून मागल्या बाजूस ब्रह्मस्वरूपाचे ध्यान सिद्ध होते. ध्यान व योग दोन्ही निर्विघ्नपणे आत्मज्ञानाच्या ठिकाणी प्राप्त होतात. यासाठी वैराग्यरूपी सखा सोबत करीत असतो. ( अध्याय १८ ओव्या १०३७-१०४३ )

**भक्तिमार्ग मजिंजे :—**

भक्ति योगानेही हा अष्टांग योगाचा अनुभव येतो असे ज्ञानदेव म्हणतात. श्रीरामकृष्ण परमहंसही तसेच सांगतात. फळाच्या दृष्टीने दोन्ही मार्गात कोणताच फरक नाही. अष्टांग योगात कष्ट जास्त असतात, त्याला अधिकारही लागतो. भक्ति मार्गात भगवान सतत पाठीराखा असतो. श्रीरामकृष्ण हे तत्त्व माकडीची व मांजरीची पिल्ले या दृष्टान्ताने सांगत. उडी मारताना माकडीच्या पिल्लांना आपल्या आईला स्वतः धरावे लागत उलट मांजरीच्या पिल्लांना मांजरी दाताने धरते व रक्षण करते. भक्तिमार्ग हा मांजरीच्या पिल्लासारखा—देव काळजी करणारा असल्यामुळे सुलभ व सोपा आहे. म्हणून अर्जुनाला या भक्तिमार्गाची शिफारस केली आहे.

**मन व बुद्धि भगवंताला अर्पण करणे म्हणजे भक्ति**

भक्ति हा अंतरंगाचा विषय आहे. भक्तीची बाह्य लक्षणे देव पूजा, यात्रा करणे, ही एकटी काही निश्चित फल देणारी नाहीत, त्यांना अंतरंग साधनाची आवश्यकता आहे. मन व बुद्धि परमार्थाकडे लावणे हा एक अभ्यास आहे. एकदा का मन व बुद्धि परमात्म्याकडे लागली की साधक देवच होऊ लागतो. मन व बुद्धि अर्पण करणे म्हणजे मनाचा स्वभाव जो संकल्प करणे व बुद्धीचा स्वभाव जो निश्चय करणे ते दोन्ही स्वभाव परमात्म्याकडे लावणे. देवाविषयीच संकल्प करणे व देवाविषयीचा निश्चय करणे याचे नाव भक्ति आहे. अशी प्रेम ठेऊन मन व बुद्धि परमात्म्याकडे लावली तर साधक देवाप्रत पोहोचतो देव व तो यामध्ये द्वैत रहात नाही. दिवा मालवला म्हणजे दिव्याचे तेज नाहीसे होते अथवा सूर्यास्ताच्या वेळी सूर्यबिंबाबरोबर त्याचा प्रकाश जातो किंवा शरीरातून प्राण निघून गेल्यावर इंद्रिये त्याच्या बरोबर जातात. त्याप्रमाणे जिकडे मन व बुद्धि जातात तिकडे त्याच्याबरोबर अहंकार जातो. म्हणून मन व बुद्धि परमात्म्याकडे लावली तर साधक सर्वव्यापी परमात्माच होतो. ( अध्याय १२ ओव्या ९७-१०२ )

पण 'मन परमात्म्याकडे लाव' हे बोलणे सोपे आहे पण करणे फार कठीण आहे. कारण ते मन आपले आहे असे आपण म्हटले तरी ते विषयामध्ये अडकले आहे. ते तेथून सोडवून आणावे लागते. एखाद्या वस्तूचे दान'

करावयाच तर ती प्रथम वस्तू आपल्या हातात हवी. ती जर गहाण पडलेली असली तर ती अगोदर सोडवून आणावी लागते. आपले मन आधीच गहाण पडले आहे. तुकाराम महाराज पांगळ्याच्या रूपकाने या भक्तीचे उत्कृष्ट वर्णन करतात.

"पांगुळ झालो देवा । नाही हात ना पाय ।
बैसलो जयावरी सैराट ते जाय ॥"

ज्या मनरूपी अश्वावर आम्ही आरूढ झालो आहे तो घोडा आमच्या ताब्यात नाही. तर आम्हीच ताब्यात गेलो आहे. ज्याचे मन ताब्यात आहे त्याचा परमार्थ आहे. दुर्जनांना परमार्थ होणार नाही. म्हणून प्रथम मन ताब्यात आणण्यासाठी वैराग्याचा आधार घेऊन विषय बाहेर दवडावे लागतात. इंद्रियनिग्रह व वैराग्य यांशिवाय मन ताब्यात येणार नाही व ते ताब्यात आल्याशिवाय परमात्म लाभ होणार नाही. मन पवनाचे नियमन करून दाही इंद्रिये ताब्यात आणावी लागतात त्यासाठी प्राणायाम व मनोजय आहेत.

## शनै शनै: गोडी लावावी

पण मन व बुद्धि ताब्यात आली नाही तरी साधकाने निराश होऊ नये. प्रयत्न करीत रहावे. आठ प्रहरामध्ये एक निमिषभर तरी मन देवाकडे लावण्याचा अभ्यास करावा. एक क्षण परमात्म्याचे सुख मनाला लाभले तरी त्याची गोडी मनाला लागेल. मनाचा स्वभाव एक चांगला आहे. ज्या वस्तूची गोडी लावावी ती त्याला लागते. परमात्म्याची गोडी लावली तर त्यात ते रंगू लागते व विषयाचा कंटाळा करते. पौर्णिमेपासून चंद्रबिंब कमी कमी होत जाते तसतसे मन प्रपंचातून निघू लागते. अशा रीतीने प्रपंचात गुंतलेले मन हळूहळू भगवद्रूप होत जाते. या अभ्यासाने हलके हलके मजल मारीत गेल्यावर यश प्राप्त होऊन साधक देवच होतो. अशा रीतीने अभ्यासाने हवे ते साध्य होते. ( अध्याय ११ ओव्या १०५ ते ११६ )

## कर्मे देवाला अर्पण करावीत

पण असे काही दुर्बळ व दीन लोक आहेत त्यांना एक क्षण देखील परमात्म्याकडे चित्त लावता येत नाही. त्यांना इंद्रियांचा निग्रह करता येत नाही. विषयभोग टाकता येत नाही. त्यांची कणव करून भगवताने त्यांनाही उपाय सांगितला आहे. आपल्या वाट्याला आलेली कर्मे ( वर्णाश्रम धर्माप्रमाणे ) ती करावी, शास्त्राने निषिद्ध म्हणून जी करू नयेत म्हणून सांगितली ती करू नयेत. ही कर्मे करीत असताना ती मी करतो असे मात्र समजू नये. हे विश्व ज्या परमात्म्याचे सत्तेने चालले आहे तो परमात्मा ही कर्मे मजकडून करीत आहे अशी अंतरी दृढ भावना ठेवावी. माळी जिकडे नेतो तिकडे पाणी जसे बिनतक्रार जाते, कुरकुर करीत नाही. त्याप्रमाणे देव आपल्या पुढे जे कर्म आणून ठेवील ते कर्म निमूटपणे करीत जावे. प्रवृत्ति व निवृत्ति ही दोन्ही ओझी डोक्यावर घेऊ नयेत तर सर्व कर्मे करीत असताना अखंड त्या परमात्म्याचे स्मरण करावे, मग ती कर्मे सांग होवोत अथवा असांग होवोत, आपल्याला त्याशी कर्तव्य नाही. शरीर पातानंतर हा भक्त सायुज्य मुक्तीपर्यंत पोहोचतो

## कर्मांचे फळ तू घेऊ नको

पण ही कर्मे भगवताला अर्पण करणेही कित्येकांना जमत नाही. त्यासाठी आणखी एक उपाय भगवताने सांगितला आहे. ज्यावेळी कर्मफळ निर्माण होईल त्यावेळी त्याला साधकाने स्पर्श करू नये. झाडाला फळे येतात त्या फळांना झाड कोठे स्पर्श करते ? तशी कर्मे करताना साधकाची वृत्ति असावी. डोंगरावर पाऊस पडला अथवा अग्नीत बीज भाजले त्याप्रमाणे कर्मे करून निष्फळ करावीत. अशा कर्मफळ त्याग केला म्हणजे ज्या कर्मफळाने पुढील जन्म मिळावयाचा ते फळच शिल्लक राहिले नसल्यामुळे जन्म मरणाची येरझार खुंटते व तो भक्त ब्रह्मस्थितीपर्यंत पोहोचतो ( अध्याय १२ श्लोक ११ )

## साक्षात्कारी योगी पुरुषाची लक्षणे

असा जो योगी पुरुष आहे त्याचे गीतेमध्ये भगवताने मोठ्या आवडीने ठिकठिकाणी रंगून जाऊन वर्णन केले आहे. येथे अध्याय १२ च्या अध्यायातील काही भाग जो ज्ञानदेवांनी वर्णन केला आहे तो थोडक्यात सांगतो. बाह्य चिन्हे शरीरावर उमटतात त्यांचा उल्लेख येथे करीत नाही. या पुरुषाला आपले व परके शिल्लक रहात नाही तो कोणाचा द्वेष करीत नाही. आपल्या जवळचे दुसऱ्याला देताना तो निवडानिवड करीत नाही. पाणी हे गायीची व वाघाची तहान सारखीच भागवते हा भक्त स्वतः सुखदुःखात समान असतो. जगातील प्राणीमात्राविषयी दया त्याच्या अंतःकरणात असते. त्याला सद्गुरूंनी ओळखण्याची खूण म्हणजे तो सदा प्रसन्न असतो. कोणताही दुःखाचा

प्रसंग आला तरी त्याच्या वृत्तीत यत्किंचितही पालट पडत नाही. समुद्र खवळला तरी त्याचे भय त्यातील माशांना नसते व मासे जास्त झाले तरी समुद्र त्यांना कटाळत नाही तसे या भक्ताचे व लोकांचे नाते सख्याचे व प्रेमाचे असते. सदा निजानंदाने भरलेला असल्यामुळे त्याला कशाचीच अपेक्षा नसते. पंचपातक्यांना पुनीत करण्याचे दांडगे सामर्थ्य त्याच्या अंगी असते. गूढ परमात्म वस्तूच्या चिंतनात तो गढून गेलेला असतो. तो भक्त कोठेच चिकटलेला नसतो म्हणून त्याला कसलेच दुःख नसते. सर्वव्यापी परमात्म्याचा साक्षात्कार झाल्यामुळे त्याचे ठिकाणी कर्म उरत नाही. मोठा आत्मलाभ झालेला असतो. त्यामुळे त्याला इतर लाभ तुच्छ वाटतात व जे परमात्मतत्त्व त्याच्यापाशी आहे ते योगीच केव्हाही हिरावू शकत नाही. त्यामुळे त्याला जवळचे इतर काही गेले तरी त्याचे दुःख होत नाही. शत्रु मित्र, मान अपमान याठिकाणी तो सारखाच असतो. हे विश्वच माझे घर आहे हीच त्याची वृत्ति असते. आकाशात सहा ऋतु येतात म्हणून काय आकाशावर त्याचे परिणाम होतात ? हा भक्त तर आकाशाहून मोठा झालेला असतो. त्याच्यावर मृत्युही परिणाम करू शकत नाही. हा पुरुष व परमात्मा यात काहीच फरक नसतो. बाह्यतः दिसायला दोन पण आहेत एक, देवाला त्याच्यापेक्षा या जगात दुसरी प्रिय वस्तु नाही. या भक्ताची सेवा तो न सांगताही करतो. तो पहावा म्हणून हा निर्गुण परमात्मा डोळे धारण करून जन्म घेतो. त्या भक्ताला आलिंगन देण्यासाठी दोन भुजा कमी पडतात म्हणून आणखी दोन भुजा घेऊन चतुर्भुज होतो (अध्याय १२ वा श्लोक १३ ते १९)

भक्तीमार्गाने परमात्म्याचा योग झालेल्या पुरुषाचे वर्णन करताना देव व ज्ञानदेव अगदी वेडावून गेलेले दिसतात. सर्वसामान्य जनतेला सुलभ उपाय या संतांनी सांगितला आहे. दुर्बल व दीनासाठी संतांनी या भक्ति योगाचे स्वतः आचरण करून दाखविले. तुकाराम महाराजांनी नामस्मरणाच्या साधनाने-अष्टांग योगाने मिळणारे अनुभव प्राप्त करून घेतले. रक्त-श्वेत-पीत असे रंग त्यांना दिसले. अनुहताचा हलकल्लोळ ऐकू आला.

'ऊर्ध्व मुखे आळविला सोहं शब्दाचा नाद ।
अरूप जागविला दाता घेऊनी छंद ॥
घेऊनि आला दान निजतत्त्व निजबोध ॥
स्वरूपी मेळविले नाव ठेविला भेद ।'

## अधिकार तैसा करू उपदेश

जशी ज्याची अंगी शक्ति असेल, पूर्वजन्मींची पुण्य सामुग्री असेल तसा त्याचा साधनमार्ग राहतो. पक्षी एकदम झेप घेऊन झाडावरील फळाला बिलगतो तशी झेप काही माणसाला घेता येत नाही. त्यांना हळूहळू एका फांदीवरून दुसऱ्या फांदीवर सरकत सरकतच जावे लागते. तो एकदम उडी मारेल तर मरेल. तसेच परमार्थात आहे. ज्याला कर्ममार्गाचा अधिकार आहे त्याला अनेक जन्मात साधना करीत बसावे लागते. ध्यान करण्यासाठी मनुष्य मनाने खंबा असावा लागतो. तो तसा नसेल तर डोळे मिटल्यावर इष्ट वस्तु येण्याऐवजी आतले विषय मात्र स्पष्ट होऊ लागतात. म्हणून

'ध्यानेनाऽत्मनि पश्यन्ति केचिदात्मानमात्मना।
अन्ये सांख्येन योगेन कर्मयोगेन चाऽपरे ॥

असे साधनाचे निरनिराळे प्रकार गीतेत वर्णन करून आहेत. सर्वांना एकाच ठिकाणी जावयाचे आहे, व ते ठिकाण म्हणजे परमात्म्याचा योग. परंतु कोणत्या मार्गाने-कर्म, ध्यान, भक्ति, ज्ञान, अष्टांग-यापैकी कोणत्या योगाने जावयाचे आहे-हे ज्याच्या त्याच्या तयारीवर अवलंबून आहे. ज्याला गुरूचा लाभ झाला त्याला अडचण नसते. गुरु शिष्याची कुवत जाणून मार्गदर्शन करतात. अधिकार पाहून मार्गदर्शन करतात. मुंगीवर हत्तीचा ऐरावत घालीत नाहीत व हत्तीलाही मुंगीची गति देत नाहीत. गुरुलाभ ही परमार्थात फार महत्त्वाची गोष्ट आहे. नाहीतर आपल्या मतीने भलतेच करून पदरात लाभ पडण्याऐवजी नुकसान पडते व पश्चात्ताप करण्याची पाळी येते. गुरु हा एक सद्वैद्य आहे. वैद्य ज्याप्रमाणे रोग असेल त्याप्रमाणे औषध देतो, त्याप्रमाणे गुरु हे शिष्याच्या तयारीचा अंदाज घेऊन त्याला योग्य ते साधन सांगतात. गीतेत क्रमयोग सांगितला आहे. क्रमाने ब्रह्म व्हावयाचे आहे. अठराव्या अध्यायात दोन तीन वेळा हा क्रमयोग सांगितला आहे.

## अवघेचि त्रैलोक्य आनंदाचे आता

सातव्या अध्यायात साधकाचा साधनमार्ग ज्ञानदेवांनी सुस्पष्ट करून दाखविला आहे. विषयाच्या दाट झाडीत

जी कामक्रोधाची श्वापदे असतात त्याना चुकवून साधकाला प्रथम ईश्वरविषयक वासनेच्या पठारावर यावे लागते. तेथे त्याला साधुची सगत भेटते. आपल्या ठिकाणी सद्वासना निर्माण झाल्याशिवाय साधुची भेट होत नाही एखादा साधु यदाकदाचित भेटला तरी आपण त्याला साधु म्हणून ओळखूच शकत नाही. साधु भेटल्यावर आपल्या हातून सत्कर्मे घडू लागतात. कुकर्माना ओहोट पडत. शेकडो जन्मे हे निष्काम सत्कर्माचरण चालते व सत्कर्मानंतर अत करणा तले रज व तम दोष धुवून जात असतात अत करणातले रज, तम धुवून गेले म्हणजे सत्वशुद्धि प्राप्त होत. परमार्थ मार्गातली काळोखी रात्र सपत आलेली असते. श्रीगुरुकृपेची पहाट याच वेळी फुटते. श्रीगुरु त्याला ध्यानाचा उपदेश करतात. ध्यान करता करता, ध्येय ध्यान ध्याता। ही त्रिपुटी नाहीशी होईतोपर्यंत ही अहरह–मी ब्रह्म आहे–ही उपासना चालू राहते. या ध्यानाचा परिपाक झाला म्हणजे द्वैत सपूर्णपणे मावळत व जिकडे पाहील तिकडे त्याला आत्म दर्शनच होते. सूर्याला कधी अधाराचे दर्शन घडत नाही त्याप्रमाणे या साधकाला या भूमिकेवर आल्यावर द्वैतदर्शन होत नाही. पाण्यात बुडवलेल्या घटात जसे आत बाहेर पाणीच असते तसे या भक्ताला आत बाहेर देवच भरलेला असतो ' हे समस्तही श्रीवासुदेवो ' हा या मार्गातला शेवटचा टप्पा आहे. त्यापुढे काही करावयाचे उरत नाही. देवळाच्या कामाला कळस, गगेला समुद्रात प्रवेश किंवा सोन्याचा शेवटचा कस ही जशी परम सीमा असते त्याप्रमाणे साधक या दशेवर आल्यावर सिद्ध होतो तो कृतकृत्य होतो ' काम नाही काम नाही। झाले पाही रिकामा ' अशी त्याची स्थिती होते कर्माचा आरंभ करण्यासाठी जो अहकार लागतो तो अहकार द्वैत नाहीसे झाल्यामुळे त्याच्या ठिकाणचा नष्ट झालेला असते मग केवळ परमशांति–ब्रह्मस्थिती–उरते.

## आता उरलो लोका पुरता

असा कृतकृत्य सिद्ध पुरुष मात्र स्वस्थ राहत नाही. स्वतःच्या स्वार्थाचे कार्य सपलेले असते पण 'लोका पुरता' तो उरतोच. आता तो देवाच्या स्वाधीन झालेला असतो देवाच्या हातात तो बाहुल्या सारखा राहतो ' आता तुझी आज्ञा। सकळ देवाधि देव राज्ञा। करीन देई अनुज्ञा। भलते विषयी' हे त्याचे कार्य! देवाने युद्ध करावयास आज्ञा दिली तरी याची उत्साहाने तयारी असते. मी कसा रहू ही शका व सदेह पार मावळतो लोकाना सत्क्रिया कशी करावी याचे सामान्य पुरुषाप्रमाणे राहून तो आचरून दाखवितो पतोजी नाईका मुलासाठी हातात पाटी घेती पवन आहारी रात्राप्रमाणे ध्यानमग्न केले तरीही आनद असतो! विवेकानद, समर्थ याच्याप्रमाणे प्रगति करावयास लावले तरी त्याची ती भक्तिच असते किंवा तुकाराम महाराजाप्रमाणे पढरीच्या वाटेवर लोकाना कीर्तनाचा नटनाच दाखविण्याचे कार्य ते रात्रदिवस करीत राहतात. आह्निकियेने न करताही ही भक्ति होतच असते. ह्याला पचम पुरुषार्थ म्हणतात. त्यासाठी पुनः पुनः जन्म घ्यावे, गर्भवास सोसावे लागले तरी हरकत नाही, परतु भगवंताच्या निरुपाधिचे सुख भोगावे ही उत्कटता शिल्लक राहतेच.

## भक्त निजला तरी समाधि सुख

अशा पुरुषाने काही केले तरी ती भगवताची पूजाच असते तो काही बोलला तरी तो जपच असतो तो चालतो ती यात्राच होत असते व तो निजला तरी त्याची अखड समाधि असते, अतरी जपमाळ चाललेली असते व बाहेर कितीही बोलला तरी मौन मुद्रा बिघडत नाही असा काही विलक्षण प्रकार आहे. भगवताची इच्छा आहे तोपर्यंत हे पुरुष अशा सर्वोच्च स्थितीत राहतात व भगवताचा जाण्याचा आदेश आला की 'आम्ही जातो आपुल्या गावा' ( वैकुठाला ) म्हणून जगाचा हसत खेळत निरोप घेतात.

## बुडाली काठीत, बाधिली सोडीत

मानवी जीवनातली ही सर्वोच्च अवस्था आहे. जगताचे कल्याण या अवस्थेवर आरूढ झालेल्या पुरुषाकडूनच होत असते. बाहेर बाणाची रूणरूण व शस्त्राची खणखण चालू असली, स्वत ता युद्ध करीत असला तरी त्याची अतरीची परमात्म स्थिती यत्किंचितही ढळत नाही, या स्थितीला चालती बोलती समाधि म्हणतात मन आणि बुध्दिचे ऐक्य साधून जो स्थितप्रज्ञ देवात नाहीसा झालेला असतो त्या स्थितप्रज्ञाला ही समाधि स्थिती घरात घुसत येत असते. हा सर्वांत धुरेचा योग आहे.

सर्व योगी पुरुषात हा परमश्रेष्ठ योगी आहे. साधन मार्गातला योगी हा आरंभ आहे. व सिद्ध अवस्थेत भगवंतात विलीन झालेला योगी हा कळस आहे. अशा योगी पुरुषाची जगाच्या सुस्थितिसाठी नेहमीच आवश्यकता असते. किंबहुना, भगवंतच त्यांना निरोप व प्रेषित म्हणून वैकुंठातून मृत्यू लोकांत धाडीत असतो. नाहीतर असे योगी पुरुष पृथ्वीतळावर न येते तर अज्ञानांना योग म्हणजे काय हे कसे कळले असते! म्हणून योगी पुरुषाचे जगतावर अनंत व न फिटणारे उपकार आहेत. काळोखाने दाटलेल्या अंधाऱ्या रात्रीत ते प्रकाश दाखवित जात असतात. गंगा ही डोंगरातून निघून समुद्राला भेटण्यास जात असते परंतु वाटेत लोकांना तिचा मोठा उपयोग होत असतो त्याचे पापताप फेडले जातात, तीरावरील पादपाचे पोषण होते. किंवा सूर्य रोज प्रदक्षिणा करीत असतो पण जगाला अंधारातून उजेडात आणीत असतो. कमळाचा विकास करतो, त्याप्रमाणे योगी पुरुष आपल्या परमात्म योगात दंग राहून ही संसार सागरात बुडालेल्यांना हात देतो. आर्त जीवाची सावडी पेडतो. बद्ध जीवांना मुक्त करतो. जगतातर्फे सर्व सृष्टी नाहीशी व्हावयाची पाळी आली तरी योगी हा राहिला पाहिजे तो त्रैलोक्याचे जीवन व आधार आहे.

## संत मंडळी सुखी असो

परमपूज्य श्रीवामनरावजी गुळवणी महाराज यांच्या एक्याऐंशीव्या वर्षी त्यांच्या सन्मानार्थ जो गौरव ग्रंथ प्रसिद्ध होत आहे त्यात त्यांची या लेखाच्या द्वारां सेवा करण्याची संधि प्राप्त झाली हे मी माझे भाग्य समजतो माझ्या लेखणीला धन्यता वाटते व खऱ्या विश्रांतीचे सुख अनुभवास तिला मिळाले आहे श्रीगुळवणी महाराजांच्या सारखे पुरुष या जगात जितके जगतील तितका सुखाला चढावा मिळेल, अज्ञ जीवांना मार्गदर्शन दिले व खऱ्या सुखाचा या जगात उत्कर्ष होईल योगाचे क्षेम व्हावे हीच सर्वांची या प्रसंगी प्रार्थना आहे. सर्व योग्यांचा योगी जो प्रभु परमात्मा तो हे सर्व जाणत आहे, त्याचे चरणी ही सेवा भक्तिभावाने महाराजाच्या मंगल हस्ताने मी अर्पण करीत आहे.

—सदाशिव केशव मेहरगांवकर
आळंदी, गोकुळ अष्टमी १८८५



# मन्त्र योग

"मन्त्रो गुरुः पुनरस्तु" (ऋ. २ अ. २)

"नमऋषिभ्यो मन्त्र कृद्भयः" (तै. आर. अ. ४)

### भारतीय ऋर्षींचे लोकोत्तर सामर्थ्य

भारत देश हा आध्यात्मिक तत्वज्ञानाचा गर्भागार (गाभारा) म्हणून प्राचीन काळापासून प्रसिद्ध होत आलेला आहे. अलीकडचे अर्वाचीन परदेशातील पंडितसुद्धा भारताला आध्यात्मिकतेची मातृभूमीच मानतात. याला मुख्य कारण हेच की आमच्या सर्वज्ञ अशा प्राचीन महर्षींनी आपल्या तपोवैभवाने आध्यात्मिक शिखरावर चढून नित्याविनाशी असा जो आत्मा त्याचा साक्षात्कार करून घेतला होता. त्यायोगाने जीवन्मुक्ति, तसेच उपासना बलाने विदेहमुक्तिही संपादन करून घेतली होती. अशी ऐतिहासिक प्रसिद्दी आहे. व्यावहारिक प्रपंच भागातील सृष्टि, स्थिति, आविर्भाव, तिरोधान आणि लय वगैरे ईश्वरी क्रिया चालविण्यामध्येही ते समर्थ व तज्ञ होते. विश्वामित्र ऋषिवर्यांनी केलेली पुन. सृष्टि, अगस्त्य महर्षींचे समुद्रपान, भरद्वाज ऋषि श्रेष्ठाच्या आश्रमातील राजकीय पद्धतीच्या अतिथि सत्काराचा थाट याप्रमाणे हजारो महर्षींचे लोकोत्तर सामर्थ्य हे रामायण महाभारत वगैरे प्राचीन इतिहास व श्रीमद्भागवत, देवीभागवतासारख्या महापुराणात प्रसिद्धच होय. तश महानुभाव महर्षींच्या वंशामध्ये उत्पन्न झालेल्या या कालातील योग्य ब्राह्मणाच्या ठिकाणी त्या आध्यात्मिकतेचे काही अंश दिसून येत असल्यामुळेच तमले महात्मे आजही लोकांचे आदरपात्र होत असतात हे

'अगस्त्येन समुद्रः पीत इति
इदानींतना अपि ब्राह्मणाः पूज्यन्ते'

या भगवत्पाद श्रीशङ्कराचार्यांच्या वाक्याने ठरत आहे.

### आध्यात्मिक तत्वभूमि

या महर्षींनी आपल्या तपःसामर्थ्याने पुष्कळ अलौकिक व अघटित–घटना करून सोडल्या. देवानासुद्धा असाध्य अशी कार्ये केली. स्वर्गातील देवताच्या बरोबर मनुष्याच्या परस्पर व्यवहाराइतका सुलभ व्यवहार केला. याना इंद्रादि देव भीत होते.

"अस्त्येतदन्यसमाधिभीरुत्व देवानाम्–" शाकु.

सृष्टिकर्ता जो परमेश्वर त्यालादेखील प्रपंचाच्या कामी अनुकूल असे सहाय करीत होते. भगवान् अत्रि, ब्रह्मर्षि वसिष्ठ याचा तपःप्रभाव तर असामान्यच होता. हे पुराण-प्रसिद्ध आहेच. हे सर्व महर्षिगण पाश्चात्यादि देशात अद्यापि जन्मलेले नसून या भारतातच आविर्भूत झाल्या-कारणाने याला, पुण्यभूमि, कर्मभूमि,

"भारतमेव वर्षे कर्मक्षेत्रम्–" श्रीभाग. स्कं. ५

तथा आध्यात्मिक तत्वभूमि अशी नावे आली आहेत.

### तपसिद्धीचे रहस्य

अशा महर्षींनी तपःसिद्धि कशी उत्पन्न झाली? हा पुष्कळाना सहज येणे साहजिकच आहे. त्याला उत्तर सूत्र भाष्यात

"धर्मानुष्ठानापेक्षा हि तत्सिद्धि."

असे श्रीभगवत्पादानी दिले आहे. धर्मानुष्ठान—म्हणजे वेद विहित कर्मांचे आचरण हेच होय. वेदाचे लक्षण आपस्तंब-परिभाषा सूत्रात

"मन्त्र ब्राह्मणयोर्वेदनामधेयम्"

असे मानिलले आहे. तरी या वेदामध्ये "कर्मविधाय ब्राह्मण भाग व कर्मस्वरूप दाखविणारा (देवतादि प्रकाशक) मन्त्रभाग' असे दोन भेद होत. या दोन भेदातही कर्म काण्डाचे अन्तरंगसाधन म्हणून मन्त्र भागच प्रधान होतो. असे

"मन्त्रतस्तुविरोधे स्यात्'

या जैमिनी सूत्राने (५ अ.) पूर्व मीमांसा शास्त्रात ठरविले आहे. हा मंत्रभागच महत्वाचा तथा विस्तृत असल्याने समग्र वेदालाच 'मन्त्र" अशी संज्ञा आली म्हणूनच

"अमन्त्रानाममन्त्राणाम्"

या बौधायन धर्मसूत्रात "अमन्त्र" शब्दाचा अर्थ "वेदरहित" असा केला आहे.

"ऋद्धः स्पष्टाक्षरोमन्त्रः"

*या विष्णुसहस्र नामातील "मन्त्र" या पदाचे निर्वचन* भाष्यकार श्रीशङ्करभगवत्पादानी

"ऋग्यजुः सामाथर्वणा"

असे केलेले आढळते.

या मंत्राच्या योगाने तपःसिद्धि प्राप्त करून घेऊन सृष्टीच्या प्रारंभी अदृष्टरूप अशा अनंत मंत्राचे प्रकाशन केल्यामुळेच ऋषींना "मन्त्रद्रष्टे" "मंत्रकर्ते" अशी ख्याति आली. हे

"ऋषे मन्त्रकृतास्तोमैः" (ऋ. म. ९-११४)

"नमऋषिभ्यो मन्त्रकृद्भ्यो मन्त्रपतिभ्यः" (तै. आर.)

वगैरे वेदानी व

"अप्यग्रणीर्मन्त्रकृतामृषीणाम्"

अशा कवि शब्दानी ही स्पष्ट दिसून येते.

ह्या मन्त्राची श्रेष्ठता, आवश्यकता, व्यापकत्व, पावित्र्य, अघटित घटना, सामर्थ्य, अनुष्ठानोपयोगित्व, प्रयोग, नित्यात्म-प्रकाशकत्व वगैरे अनुत्तम गुणाबद्दल संक्षेपाने येथे निरूपण केले जाते.

### मंत्रांचे तीन विभाग

या मंत्रामध्ये सामान्यतः वैदिक, तान्त्रिक आणि लौकिक असे तीन विभाग आहेत. हे

"नमो मन्त्रिणे वाणिजाय कक्षाणा पतये"

या रुद्राध्यायातील "मन्त्रिणे" याचे व्याख्यान करताना सायण, भट्टभास्कर व शङ्करानन्दीय या तिन्ही भाष्यात एकेकाने एकेक असा अर्थ (वरील तीन भेद) केल्यामुळे समजते. व्यवहार पण तसाच आहे. वेदातील विशेषतः छन्दोबद्ध भागाला व काही गाथारूप यजूला मन्त्र अशी संज्ञा आहे. "छन्द" म्हणजे अक्षर संख्यांचा नियम. तान्त्रिक मन्त्राचे स्वरूप

"मननात्तत्वपदस्य त्रायत इति मन्त्र उच्यते भयतः"

या प्रपंचसाराच्या निर्वचनाने "मन्तारं त्रायते" अशा व्युत्पत्तीने—व

"पूर्णाहन्तानुसन्धात्मा स्फूर्जन्मननधर्मतः।
संसार क्षय कृत्त्राण धर्मतो मन्त्र उच्यते"

या नित्यातन्त्रवचनाने, संसार भयापासून संरक्षण करणारा तथा आत्मतत्व समजून देणारा मन्त्र होय, असे सिद्ध होते. आता लौकिक मंत्र शब्दाचा अर्थ 'मंत्रिगुप्तभाषणे' या धातूपासून घञन्त मंत्र शब्द हा 'राजनीतिशास्त्रातील रहस्य *विचारप्रदर्शक भाषण-लेखनादि व्यवहार*' वाचक आहे. असा होतो. तरी

'मन्त्रो वेद विशेषे स्याद्देवादीना प्रसाधने।
गुह्यवादेऽपिच तथा'

असे मेदिनी कोशात हे तीन भेद 'मन्त्र' पदाने सांगितलेले आहेत.

### वैदिक मंत्रांची लक्षणे

यातील वैदिक मंत्र हे वेदाधिकारी असे जे द्विज त्यांच्या कर्मकाण्डामध्ये प्रतिक्षणही उपयुक्त होत असून त्याबद्दल पूर्व मीमांसा शास्त्रात (जैमिनी सूत्र अध्याय १ ला पाद २ रा ३१ ते ५२ सूत्रात "तदर्थ शास्त्रात्" येथून सुरवात करून "ऊह" येथपर्यंत) तसेच शाबरभाष्य, तन्त्रवार्तिक, भाट्टदीपिकादि ग्रन्थांमध्ये विस्तृत रीतीने विवेचन केले आहे. त्यात मन्त्राच्या आनर्थक्याबद्दल पुष्कळ पूर्वपक्ष उठवून समाधान केलेले आहे. (मन्त्रार्थ जे कर्मस्वरूप देवतादिक त्याचे स्मरण मन्त्रानीच करून घ्यावे असा नियमविधी मानला आहे.) पुढे त्याचे लक्षण सांगताना

"तच्चोदकेषुमन्त्राख्या" (जै. सू. २-१-३२)

या सूत्रावरील तन्त्रवार्तिकात

"ऋष यो ऽपिहि मन्त्राणां नाल्नयान्ति पृथक्त्वशः।
लक्षणेन तु सिद्धानामन्तं यान्ति विपश्चितः।

वृत्तौलक्षणमेतेषा मसन्त त्वान्त रूपता ।
आशिषः स्तुति सङ्ख्येच प्रलप्त परिदेवितम् ।
प्रैषान्वेषण पृष्टाख्यानानुषङ्ग प्रयोगिताः ।
सामर्थ्यञ्चैव मन्त्राणा विस्तरः प्राथितोऽतः ।

असे अनेक कारणास्तव मन्त्राचे विशिष्ट लक्षण सागणे अशक्य असल्याने

" तस्मादभियुक्ताना मन्त्रोऽयमिती समाख्यान लक्षणम् "
( जै. न्या. वि. )

या वचनावरून ऋषींनी मन्त्र म्हणून ज्याला सज्ञा ठेविली असेल तोच मन्त्र होय, अर्थात मन्त्रत्व जातिमत्व हे लक्षण सिद्ध होईल. याचे प्रयोजनदृष्टार्थ व अदृष्टार्थ ( दृष्टार्थः- देवतादिकाचे स्मरण, ( कर्मकाळी ) करून देणे, अदृष्टार्थः- अपूर्वरूप पुण्य उत्पन्न करणे. ) असे दोन तऱ्हेचे असते.

**मन्त्रोच्चारातील पथ्ये**

वेदातील या मन्त्राचा उच्चार करताना काही विशिष्ट नियम घातले आहेत. ते हे की:—मन्त्र म्हणणारा स्नान चमन वगैरेनी शुचिर्भूत असावा. त्याला स्वर, वर्ण, विग्रह दि सह पदार्थांचे ज्ञान असणे व त्या त्या मन्त्राचे ऋषि, छद, देवता याचेही स्मरण करणे वगैरे

स्वरोवर्णोऽक्षरमात्रा विनीयोगोऽर्थ एवच ।
मन्त्र जिज्ञासमानेन वेदितव्य पदे पदे ।
ऋषिच्छन्दो दैवतानि ... स्वराधानि
अविदित्वा प्रयुञ्जानो मन्त्र कण्टक उच्यते ।
( सायण भाष्य भूमिका )

स्नानसंध्यादिकाने शुद्ध नसलेल्या माणसाने केले जाणारे मन्त्र प्रयोग फलकारी होत नसतात असे पुष्कळ अनुभव आहेत. उलट सोवळ्यातला मन्त्रोचार सफल असल्याची प्रचीति आहे.

वर सागितलेल्या स्वरादिविहीन मंत्रांपासून होणारा अनर्थ

' मन्त्रोहीन स्वरतो वर्णतो वा
मिथ्या प्रयोक्तो नतमर्थमाह ।
स वाग्वज्रो यजमान हिनस्ति
यथेन्द्रशत्रुः स्वरतोऽपराधात् । "

या शिक्षेतील वचनाने स्पष्ट दाखविलेले आहे. वृत्रासुराचे आख्यान तर या बाबतीत पुराणप्रसिद्ध एक उदाहरण झालेले आहे

" यो वा अविदितार्षेयच्छन्दो दैवतः "

इत्यादि प्रमाणानें ऋषि छन्दोदैवत याचे ज्ञानाशिवाय मन्त्राचा विनियोग करू नये असे सिद्ध होते. छद शब्दाचा अर्थ छान्दोग्य भाष्य ऐतरेयारण्यक वगैरे ठिकाणी

" अपमृत्यु वारयितु आच्छादयतीति छन्दः । "
छादयन्ति ह वा एन पापात् कर्मणः "

असा दाखविला आहे. ( अपमृत्यु व पापकर्माचे निवारण करणारे छन्द होय. ) वरील नियम न मानणारा वैदिक मन्त्रकण्टकत्व दोषाला पात्र होतो आणि मन्त्राचे फलही व्यवस्थित होणार नाही.

**पुरश्चरणाची आवश्यकता**

या मन्त्राना पुरश्चरण नामक साधन अत्यावश्यक आहे. यानी साधित केलेले मन अभीष्ट सिद्धिला उपयोगी पडतात असे बौधायन धर्मसूत्रात

" यान् सिषाधयिषुर्मन्त्रान् .. ।
मन्त्राणा कर्मसाधने । "

अशारीतीने व

' पुरश्चरणमादौ तु मन्त्राणा सिद्धीकारण '

या शौनकोक्तीने कळून येते.

यास्काचार्य आपल्या निरुक्त ग्रन्थामध्ये सागतात की,–

' पुरुषविद्याऽनित्यत्वात कर्मसम्पत्तिमन्त्रो वेदे । '

याचा अर्थ त्यानीच ' अदृष्ट व अपूर्व असा वैदिक धर्मामध्ये लोकाना स्वबुद्धीचा उपयोग योग्य रीतीने होणे अशक्य असल्याने बऱ्याच चुका होतात. त्या अपराधास्तव देवता विक्षुब्ध होऊन निग्रह करू लागतील. त्या योगाने यजमानाला अनिष्ट फल येण्याचा सभव असतो. तसे होऊ नये या हेतूने योग्य ज्ञान करून देण्यासाठी मन्त्राची आवश्यकता आहे. ते नित्यसिद्ध व सर्वज्ञ आहेत ' असा सागितला आहे.

' उपप्रयन्तो अध्वरमन्त्र वोचेमाग्नये '

या ऋचेतील मन्त्र शब्दाचा अर्थ सायण भाष्यात

' मननसाधन ' असा केला आहे.

**समन्त्रक कर्माचे साफल्य**

वैदिक धर्म हा वर्णाश्रम व्यवस्थेने युक्त असल्यामुळे प्रत्येक जातीच्या माणसाला त्याचा सबंध राहतोच. ही वर्णाश्रम व्यवस्था भारतीयाचे वैशिष्ट्यदर्शक आहे असे परदेशातील विद्वानही कबूल करतात. मनुष्याच्या जन्मापासून मरणापर्यंत केले जाणारे सर्व तऱ्हेचे धार्मिक विधी

त्याच्या त्याच्या अधिकाराला अनुसरून वैदिक अगर स्मार्त, पौराणिक अशा मंत्रांनी युक्त कर्मानेच होत असतात समनक कर्मांचे साम्निध्य मंत्ररहित क्रियांत दिसून येत नाही. याला प्रतिष्ठा करून ठेवलेल्या मूर्ति, वास्तुशांतीने शुद्ध व शांत झालेली घरे तथा उपनयनादि संस्कारांनी संपन्न असे नाना हीच निदर्शने होत निरनेक मुलांना उपनयनाच्यापूर्वी बुद्धिमान्द्य, शब्दस्खालित्य वगैरे दोष असून संस्कारानंतर ती मुले निर्दुष्ट झाल्याचे पुष्कळ ठिकाणी आढळून येते तसेच विवाहादि संस्कारांनी धर्षित असे दंपती सहसा आडमार्गी जात नसतात, हे हल्लीच्या काळातही विशेषत दिसून येते याचप्रमाणे मनुष्यांनी जिवंत असताना (मनुष्याच्या हयातीत) मंत्रपूर्वक अनेक संस्कार करून घेतल्यास संसारातील अनेक अभीष्ट प्रयोजन सिद्ध होतात. शिवाय मरणानंतरसुद्धा केवळ मंत्रांनी अदृष्ट व्यक्तीचे आवाहन, सत्कार वगैरेपासून सद्गती होत असल्याबद्दल या नास्तिक प्रचुर काळातही पुष्कळ अशी उदाहरणे सापडतात एकंदर विचार केल्यास मनुष्याच्या ऐहिक व आमुष्मिक धर्मकार्यामध्ये पदोपदी मंत्राची आवश्यकता आहे असे सिद्ध होते

**निरुपयोगी असा एकही मंत्र नाही**

सर्व वैदिक मंत्रांचा उपयोग विशेषत यज्ञयागादि कर्मांमध्ये होत असल्याने निरुपयोगी एकही मंत्र असणार नाही

'मन्त्रैरेव मन्त्रार्थं स्मर्तव्य '

असा शास्त्रकारांनी नियम करून वैदिक कर्मकांडामध्ये त्यांना अग्रस्थान दिले आहे यज्ञामध्ये तर एकही बारीक सारीकसुद्धा असे कर्म दिसणार नाही की ज्याला मंत्राचा संबंध असत नाही. एखाद्या वेळी या मंत्राचा अर्थ ध्यानात नाही आला तरी नुसत्या प्रयोगानीच ते आपापली कामे (पापनिवारण व पुण्योत्पादन) बजावीत असतात. म्हणूनच

'य य क्रतुमधीते तेन तेनेष्ट भवति '

या वेदवाक्याने मंत्रोच्चार (अध्ययन) पाठनही ती ती कर्मे केल्याचे फल मिळते, असे वर्णन केले आहे अशा स्वाध्यायाचे योगानेच आमचे पूर्वज, ऋषि व सत्पुरुष हे 'इन्द्रादि देवतांचे प्रत्यक्ष दर्शन करीत असत व त्यांच्या कृपाप्रसादाने मनोऽभीष्ट सिद्धीही करून घेत असत' असे

'स्वाध्यायादिष्टदेवता संप्रयोग '

या योगसूत्रात सांगितले आहे पुरुषसूक्त, शुचाभिमान वामनसूक्त वगैरे ऋग्वेदातील तसेच रुद्राध्याय, कूष्मांडमन वगैरे यजुर्वेदातील लहान लहान अशा हजारो मंत्रांच्या जप-पारायण, होमादिकांनी फलप्राप्ती होण्याबद्दल बरेच अनुभव आहेत.

**धर्मार्थ कामरूप त्रिवर्गाला उपयोग**

या मंत्राच्या पावित्र्याबद्दल शास्त्रात दर्शविलेला क्रम म्हणजे स्वच्छताद्रव्य लावून पाण्याने स्नान केल्यास जी शुद्धि शरीराला होते, अशाच स्थितीमध्ये मंत्रस्नानाने तेज पावित्र्य उत्पन्न होत असते असे 'आचाररत्न' 'प्रयोग पारिजात' प्रभृति धर्मशास्त्र ग्रंथात आहे

'अन्यॉश्चग्राणानन्त्रान कामत सम्प्रयोजयेत्

वगैरेनी दशविध स्नानापैकी मांत्रिक स्नान हेही विशेष महत्तर मानले गेले आहे मनुष्याला अनेक पापसंपर्क झाल्या वेळी मंत्राचे अघमर्षण, अपामार्जन, पठन, जप, आचमन वगैरे प्रयोगाने त्याचे पाप दूर केले जाते याशिवाय पूर्वजन्मातील पापरूप जे विविध रोग व अनिष्टे, आपत्ती ह्यांचेही निवारण केले जाते. याबद्दल अनेक ऋषि वचने तथा अनुभव आहेत. पूर्वी किरातार्जुनीय युद्धामध्ये आदिकिरात अशा श्रीशंकराने अर्जुनावर बाण सोडले त्यावेळी त्याच्या प्रहाराने अनिष्ट होऊ नये म्हणून रुद्रातील

'यात् इषु शिवतमाशिवनभूवतेधनु '

या मंत्राचा जप श्रीपार्वतीने केला असे

मनसायात इषु भूर्तिजजाप '

हे कवि वचन आहे. पुष्कळ औषधे मिसळून, नवीन पद्धतीच्या गाळणीने (फिल्टर) देखील पाणी, दूध, औषध वगैरे वस्तूमध्ये न उपजणारी शुद्धता केवळ मंत्रप्रयोगाने होत असल्याबद्दल निरनेक सत्पुरुषांच्या चरित्रामध्ये प्रसिद्ध आहे. (प. प टेंबे महाराज) हाच विषय रुद्राध्यायातील

'ये अन्नेषु विविध्यन्ति पात्रेषु पिबतो जनान्'

या मंत्राच्या सायणाचार्यभाष्यात स्पष्ट प्रतिपादित असा आहे एकंदर प्रपंचातील धर्मार्थकामरूप त्रिवर्गाला मंत्राचा उपयोग मनुष्याला कर्मकांडामध्ये कितपत होत असतो हे वरील निरूपणावरून स्पष्ट दिसते या मंत्राचे अर्थ ज्ञान, अनुष्ठान आणि विनियोग यांच्या बाबतीत शिक्षा, कल्पसूत्र, छन्द, ज्योतिष, निरुक्त, व्याकरण या षडंगांचा उपयोग असतो

**परम पुरुषार्थाचे प्रधान साधन**

आता शेवटच्या पुरुषार्थ जो मोक्ष-त्याच्याबद्दल वेदांत-शास्त्रात विस्तृत रीतीने प्रतिपादन केले आहे. ब्रह्मात्मैक्य-ज्ञान हे मुख्य मोक्षाचे साधन असून मानव जन्माचा प्रधान उद्देश होत आहे. अर्थात् मुमुक्षू माणसाला त्याच्या अभ्यासाची आवश्यकता असलीच पाहिजे. ते 'नामात्व' उपनिषत् नावाच्या वेदांतभागाने सांगितले जाते. त्याला वेदांतील ज्ञानकाण्ड म्हणतात. आत्मस्वरूप परब्रह्मामध्ये सगुण-निर्गुण असे दोन भेद असून त्यात निर्गुण ब्रह्मज्ञानाला सगुणाची उपासना मुख्य मानली आहे. हे दोन तत्त्वेच ब्रह्मपदार्थाही 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म' 'प्रज्ञानं ब्रह्म.' 'अयमात्मा ब्रह्म' वगैरे मंत्ररूप महावाक्यानी तसेच सगुण ब्रह्माविषयी ज्यांनाही दहर, शाण्डिल्य, उपकोसल, पंचाग्नि प्रभृती अनेक उपासना सांगितल्या आहेत, त्याही मंत्रानीच विवृत केलेल्या आहेत. ॐकारादि मंत्र हेच उपासनेला मुख्य साधन म्हणून ईक्षतिकर्माधिकरण, अक्षराधिकरण, व्याप्त्याधिकरणादिकामध्ये सूत्रभाष्यात सविस्तर प्रतिपादन केले आहे. उपासनातील अहंग्रह, प्रतीक, अङ्गावबद्ध वगैरे भेद त्या ग्रंथांच्या परिचयानेच अवगत होतील.

'औपनिषदं पुरुष'

या वाक्याने केवल उपनिषत् (महावाक्यादिरूप) प्रमाणानीच वेद्य असे ब्रह्मस्वरूप हे मत्यादि प्रमाणाना अगोचर आहे व शाब्दापरोक्ष ज्ञानाला शब्दरूप (महावाक्यरूप) मंत्रच मुख्य कारण होय, असे वेदांत शास्त्राचे तात्पर्य होते. हेच मागे

'पूर्णान्त्यानुसन्धात्मा'

या श्लोकात येथे सुचविले आहे. एकूण पहिल्या तीन पुरुषार्थांना व शेवटच्या मोक्षरूप परम पुरुषार्थाला मंत्रच प्रधान निदान (कारण) होते, असे सिद्ध झाले. पण तत्त्व समजावून देणारे गुरु तथा जिज्ञासू साधक शिष्य, हे दोघेही शास्त्रोक्त अधिकारपणे संपन्न असले तरच त्यांना सिद्धि होत असते. हा अत्यंत महत्त्वाचा मुद्दा आहे. यावद्दल अनेक प्राचीन ऋषि तसेच अर्वाचीन सत्पुरुष, आचार्य व श्रीपरमहंस वासुदेवानंदसरस्वती प्रभृती महात्मे हेच निर्देशक होत.

**पहिला ध्वनिरूप शब्द हाच मन्त्ररूप होय**

तान्त्रिक मन्त्रासंबंधी सांगणे तर फारच दुस्तर वाटते. कारण त्यांचे स्वरूप किती व्यापक आहे, हे विचार करताना मोठे मोठे तज्ज्ञही दिङ्मूढ होऊन गेले आहेत. मत्स्य, विष्णु, नारद, अग्नि वगैरे महापुराणामध्ये त्याबद्दल विशेष विवेचन आहे. मन्त्राच्या उत्पत्ति (प्रकार) बद्दल तान्त्रिक ग्रंथात असे सांगितले आहे की–

'तत्र चैतन्यरूपा सा सर्वगा विश्वरूपिणी'

येथून प्रारंभ करून

'सर्वदेवमयी, सर्वतत्वमयी, त्रिधामजननी,
पञ्चाशद्वर्णरूपिणी'

असे मध्ये सांगून शेवटी

'कुण्डलीपरदेवता। विश्वात्मना
प्रबुद्धासा सूते मन्त्रमयं जगत्॥

असे सांगितले आहे. यावरून जगातील प्राणिमात्राला मातेच्या गर्भापासून बाहेर पडल्यानंतर थोडक्या वेळाने रोदनादि (रडणे) ध्वनि जो होतो, त्याच्या उत्पत्तीचे मूळ 'कुण्डलिनी' शक्तीच कारण असते. या कुंडलिनीला उद्देशूनच

'महीं मूलाधारे...।
सुधाधारासारे..स्वपिषि कुलकुण्डे कुहरिणी॥'

या दोन श्लोकामध्ये सौंदर्य लहरीत श्रीभगवत्पादांनी वर्णन केले आहे. तो जो प्राणिमात्रांचा पहिला ध्वनिरूप शब्द हाच मन्त्ररूप होय, असे प्रतिपादन केले आहे. तात्पर्य–केवळ मनुष्याचाच शब्द नव्हे तर पशुपक्ष्यादि प्राण्यांचा ध्वनि हा सुद्धा मन्त्ररूपच होतो असे सिद्ध होईल. इतकेच नव्हे तर प्रत्येक जीवाला नियत अशी श्वासोच्छ्वास क्रिया चाललेली असताना जीवात्म्याचा सारखा मंत्रोच्चार होत असतो हे

'हंसः सोऽहमिमं मन्त्रं जीवो जपति नित्यशः।
अजपा कथिताताभ्यां जीवाज्येमुपतिष्ठति॥'

'हकारेण बहिर्याति सकारेण विशेत्पुनः।'

वगैरे वचनानी स्पष्ट होते. यालाच 'अमन्त्रमक्षरंनास्ति' ही उक्ती पुष्टि देणारी ठरते. म्हणूनच प्राकृत भाषातील शब्दही मन्त्ररूपच होत असे साप, विंचू, घाटक, पूडक वगैरे मंत्राचा तपास केल्यास सिद्ध होते. पण त्यांना (शब्दाना) एक विशिष्ट योजना पद्धतीची आवश्यकता असते. याविषयी उत्तर प्रदेशातील अलिकडचे एक निश्चनीय आख्यान ऐकण्यात येते. ते असेः—

### एक विश्वसनीय आख्यान

विंध्याचलामध्ये एका सिद्धपुरुषाकडे मन्त्रोपदेश घेण्यासाठी एक भाविक असा शिष्य राहात होता. तो भक्तिपुरस्सर गुरुशुश्रूषा करीत असे. कित्येक वर्षे राहिले तरी गुरूंनी उपदेश केला नाही. तरी विमनस्कतेने उपदेशाची वाट तो बघत होता. एके दिवशी आपले गुरु गंगेतून स्नान करून हातामध्ये पाण्याने भरलेला तांब्या घेऊन येत असतांना त्याचे दृष्टीस पडले. लगेच हीच संधि म्हणून यानेंच साष्टांग प्रणाम करण्यास तो पडला, तो पुष्कळ वेळपर्यंत उठेना हे पाहून त्या सिद्धांनी जोरात ओरडून 'होंसे मार्गा उठते कीं नहि' असे म्हटले. लगेच शिष्याने हाच उपदेश मानून उठून एका निवांत रानाच्या कोपऱ्यात तो गेला व निष्ठेने त्या मंत्राचे पुष्कळ वर्षे पुरश्चरण करून गुरुपेक्षाही प्रसिद्ध होता झाला. तसेच मृतसंजीवनादि अघटित घटनाही करू लागला.

### ब्राह्मणपुत्र 'अलर्क'

याचप्रमाणे 'त्रिपुरारहस्य' नावाच्या ग्रंथाच्या माहात्म्य खंडामध्ये असा उल्लेख आहे—सुमति नामक–ब्राह्मणाचा मुलगा 'अलर्क' हा लहानपणी आपल्या वडिलांनी आईला उद्देशून संबोधन नेलेला 'अयि' (अगे) हा संस्कृत शब्द ऐकून पुढे 'ऐ ऐ' असे त्याचे अनुकरण करू लागला. बालकांना अनुकरण करण्याचा स्वभाव असतोच. पुढे तो अकस्मात् मरण पावला. नंतर त्याला उत्तम जन्म प्राप्त झाला. त्यावेळी पूर्वजन्मी त्याने अनुस्वाररहित बालाबीज उच्चारल्या कारणाने अर्थज्ञान नसूनसुद्धा केवळ पठनप्रभावाने तो त्या ग्रंथाचा (त्रिपुरारहस्य) निर्माता म्हणून देवीच्या अनुग्रहाने प्रसिद्ध झाला.

### संस्कृत प्राकृत सर्वच शब्द मन्त्ररूप

अशा तऱ्हेच्या कित्येक आख्यायिकेवरून संस्कृत अगर प्राकृत सर्व शब्द हे पञ्चाशत् (५०) वर्णरूप (मुळाक्षरे) मातृकांपासूनच उत्पन्न झाल्याकारणाने मन्त्ररूपच होत व पुढे वैखरी सृष्टीमध्ये उतरले. यासंबंधी मन्त्रशास्त्रग्रन्थच प्रमाण होत आहेत. या शब्दराशीला त्या विशिष्ट रूपाने नियमित अशा महात्मा श्रीपरमेश्वर हा सृष्टि प्रारंभी आपल्या सद्योजात, वामदेव, अघोर, तत्पुरुष आणि ईशान या पांच मुखांतून बाहेर काढून प्रकट करिता झाला असे 'सद्योजात मुखोद्भूता' 'ईशानमुखसम्भूता' 'स्वात्मानन्द प्रदायकाः' या शब्दांत रुद्रयामळ ग्रन्थामध्ये तसेच अनेक तन्त्रग्रन्थ व श्रीमगवत्पादकृत 'प्रपञ्चसार' वगैरे ग्रंथांत सांगितले आहे. पूर्वाम्नायादि षडा–प्रकरणांनी कित्येक मंत्र 'मन्त्रमहोदधि' 'मन्त्र ज्ञानार्णव' वगैरे ग्रंथांत

'सप्तकोटिमहामन्त्रान् द्वादशारे विचिन्तयेत्'

या रीतीने सूचित केले आहेत.

### शब्द व अर्थ एकरूप होत

'म्ना अभ्यासे' या धातूपासून उत्पन्न होणारा आम्नाय शब्द हा मन्त्रवाचक म्हणून विशेषतः प्रसिद्ध आहे. शैव-दर्शनामध्ये 'पति, पशु, पाश' असा मुख्य तीन पदार्थांचे निर्वचन करतांना त्यातही पशु पदार्थापैकी 'मन्त्र, मन्त्रेश्वर, विद्येश्वर' या भेदांनी मन्त्राविषयी फार विस्ताराने सांगितले आहे. त्याचे तात्पर्य, 'परमेश्वरा (पशुपती)च्या उपासनेने त्याच्या अनुग्रहाला पात्र झालेले साधक उत्तमोत्तम गतीस प्राप्त होत होते. शेवटी संसारमळापासून मुक्त होऊन शिव सान्निध्यात जातात, असे

'आयानन्तु यदा शिवो विधेशत्वे निदेशयत्यहो।
मन्त्रांश्चकरोत्यपरांस्ते चोक्ताः कोट्य सप्त॥'

या श्लोकांनी सांगितले आहे. आम्नाय, मन्त्र, मनु, विद्या हे शब्द संस्कृत भाषेत एकार्थ वाचकच आहेत. शब्दात्मक जे मन्त्र त्यामध्ये बीज व वर्ण या उभयरूपाने अर्थ प्रकाश होत असल्याकारणाने शब्द व अर्थ याचा संबंध नित्य आहे; तसे त्या योगाने ते दोन्ही (शब्द, अर्थ) एकरूप होत, असा तान्त्रिकांचा सिद्धान्त आहे. पूर्व मीमांसकांनीसुद्धा देवता ही शब्दस्वरूप आहे व शब्द अपौरुषेय 'अनादिनिधना-नित्या' असे मानून वेदमन्त्रांना अत्यंत गौरव केला आहे. देवताधिकरण, शब्दापौरुषेयत्वाधिकरण वगैरे ठिकाणी जैमिनीसूत्र, शाबरभाष्य, तन्त्रवार्तिकादि ग्रंथांमधून विशेष समजून घ्यावे.

### देवतास्वरूप मन्त्र

यावरून देवता व मंत्र दोन्ही अभिन्न असल्यामुळे '*मूलमन्त्र*' *तथा देवता वैभव प्रकाशक असे* '*मालामन्त्र*' हे देवतास्वरूपच होत म्हणूनच पौराणिक व तान्त्रिक आख्यायिकांचे पारायण, जप वगैरे करणे देवता संतोष कारक तथा पुण्यदायकही होत असते. कारण तान्त्रिक भाष्यकार श्रीभास्करराचार्य (भास्करराय) हे जिकडेतिकडे 'देवीमन्त्रयोरभेदात्' (गुप्तवती) असे, आणि

'उपास्यायाः परमेश्वर्यास्त्रीणिरूपाण्युपासित योग्यानि ।
स्थूल सूक्ष्म परश्चेति '

असे सुरू करून

'द्वितिय मन्त्रात्मक पुण्यवता श्रवणेन्द्रियमार्गेन्द्रियस्यो
योग्यम् ।

असे नित्याषोडशिकार्णव टीकेत, तसेच

' श्रीमद्वाग्भवकूटैक स्वरूप मुखपङ्कजा ।
सर्वमन्त्रस्वरूपिणी '

वगैरे सहस्रनाम श्लोक व्याख्येमध्येही देवीचे द्वितीय म्हणजे सूक्ष्म जे रूप त्यातही सूक्ष्म, सूक्ष्मतर, सूक्ष्मतम असे भेद आहेत असे सागतात. दत्तमालामन्त्रांत ' सर्वमन्त्रस्वरूपाय ' हे पद याच अर्थाने दत्तोपनिषदामध्ये योजले आहे

## उत्तम गुरु, अधिकारी शिष्य व दीक्षादि विधि

इतके व्यापक व महत्वपरिपूर्ण मन्त्राचे लोकोत्तरत्व, सकलसिद्धि दातृत्व, ससारमृत्युमोचकत्व वगैरे असाधारण गुणाबद्दल सागणे आवश्यक असले तरी स्थळ सकोचास्तव विशेषत. दाखविले जात नाही हे मन्त्र वीर्यवत्तर होण्यासाठी उत्तम गुरु, अधिकारी शिष्य व दीक्षादि विधि याची जरुरी असते. " दीक्षा " शब्दाचा अर्थ त्यातील आणवी, शाक्तेयी, शाम्भवी, मान्त्री वगैरे अवातरभेद हे सर्व ग्रन्थान्तरापासून विदित होईल. याशिवाय मन्त्रांना आवश्यक असे " जनन, जीवन, ताडन, बोधनादि " दहा संस्कार व हस्तागुलानी सूचन केल्या जाणाऱ्या मुद्रा ह्या विशेष रीतीने साधक होत. त्याविषयी पुष्कळ ग्रंथ प्रसिद्ध आहेत. " न्यास, जप, पूजा, होम, स्तोत्र " असे पाच खण्ड असून पहिल्या न्यासखण्डाने आपल्या शरीरामध्ये मन्त्राचे आवाहनाने मन्त्रमय शरीरी अशा देवताचे स्वरूप बनून जप पूजादि पुढील खण्डाचे अनुष्ठान करणेचा मुख्य विधि आहे. हे " ना देवो देवमर्चयत् " या वाक्याने कळविले जाते.

वैदिक अगर तान्त्रिक मन्त्राचा उपदेश गुरुकडून करून घेतला पाहिजे. केवळ पुस्तकादि पाहून अनुष्ठान करणे निष्फळ तसे अनिष्टकारकही होते असे शिक्षादि ग्रंथामध्ये

" गुरुनुक्ताः क्रियाः सर्वा निष्फला स्युर्यतो ध्रुवम् "

वगैरे वाक्यानी सांगितले आहे. जसे आयुर्वेदातील औषधे चिकित्सा, निदाने ही गुरुमुखावाचून सरहस्य अशा समजत नाहीत, केवळ पुस्तक शिकण्याने अनर्थ दायक ठरतात, तसेच या मन्त्रातले रहस्यही स्वतःला कळत नसते. याचप्रमाणे सिद्धादि चक्राचा उपयोग करून दंणे मन्त्रशास्त्रातील 'छिन्न, रुद्ध, शक्तिहीन' इत्यादि ४८ प्रकारच्या दोषांचे निवारण तेथे सांगितलेल्या रीतीने करणे हेही आवश्यक होय. अशा पूर्वोक्त सर्व प्रकारानी युक्त मन्त्रापासून वाटेल ती सिद्धि होऊ शकेल असे

' सम्यक्सिद्धैकमन्त्रस्य नासाध्यमिहविद्यते ।
बहुमन्त्रवतः पुंसः का कथा हरिरेव स. । '

या वचनानी दाखविले आहे एक एक मन्त्राची ही शक्ति, तर अनेक मन्त्र सिद्धि करून घेतलेला पुरुष प्रत्यक्ष देवच होय असा अर्थ आहे. हे मन्त्राचे काम्य फलाचे प्रमाण झाले. अर्थात् काम्यमन्त्रजपाची पद्धत झाली.

## मोक्षफलक मंत्रांचा विचार

आता मोक्षफल मन्त्राच्या बद्दल विचार करणे म्हणजे कोणत्याही मन्त्राचा जप निरपेक्षबुद्धि अर्थात् ईश्वर प्रीत्यर्थ केल्यास चित्तशुद्धि होऊन देवताप्रसादतद्वारा ज्ञानसाधन वगैरे ( ज्ञाननिष्ठा ) प्रयोजने होतात. वास्तव योगशास्त्रामध्ये

' तस्यवाचकः प्रणव. ', ' तज्जपस्तदर्थभावनम् '

या दोन सूत्रात ' साधक वर्गाला अनुग्रह करणारा परमेश्वर हा आपल्या स्वरूपाचा वाचक जो प्रणवमन्त्र त्याच्या जप, ध्यानादिकानी संतुष्ट होऊन योग्याला चित्तवृत्ति निरोधरूप योग व तत्फलभूत जी समाधिसिद्धि तिची प्राप्ति करून देतो.' असे भोजवृत्ति, *राजमार्तंड व्याख्या* यावरून समजते.

' ॐप्रणव नित्य ब्रह्मविष्णुशिवात्मकम् ।
कोटिसूर्यसम तेजो ध्यायेदात्मनिनिर्मलम् । '

वगैरे वर्णन आहे. तसे मन्त्रामध्ये वाचिक, उपांशु, मानस हे तीन भेद असून यात उत्तरोत्तर प्रकाराला प्राबल्य मानले आहे. मन्त्रापासून जप व त्याच्या अर्थाचे अनुसन्धान हे अधिक फलकारी होय असे " तदर्थ भावनम् येथे सागतात शिवाय पौरुष, स्त्रैण, क्लीब, असे पुन. मन्त्रात तीन प्रकार आहेत. त्याचप्रमाणे एके कामध्ये अक्षर सख्यावरून " पिण्ड, कर्तरी, बीज, मन्त्र, माला " असे अवांतर भेद असून या १५ प्रकाराचे ज्ञान असल्याखेरीज अनुष्ठान व्यवस्थित होणार नाही यातील

बीज मंत्रांची योजना अनुलोम प्रतिलोम पध्दतीने करून मूलमंत्राचा अगर दुसऱ्या मंत्राचा जप, पारायण वगैरे केल्यास फलसिध्दि सुलभ रीतीने होते असे दुर्गाप्रदीप, दुर्गोपासना, कल्पद्रुम वगैरे ग्रंथात निरूपण केले आहे, याच रीतीनें "गायत्री" प्रभृति वैदिक मंत्राचाही उपयोग ब्रह्मास्त्रादि प्रयोगांमध्ये करीत असत असे उल्लेख आहेत. विश्वामित्र महर्षींने श्रीरामलक्ष्मणांना "बलातिबल" मंत्र सांगून भूक, तहान यांचीसुध्दा बाधा होणार नाही असे केले, हे रामायणात प्रसिध्द होय. हल्ली असे मंत्र लुप्त झाल्याने राज्यात अन्नपाण्याचे हाल, सीधा पध्दतींची *कुचंबणा वगैरे सर्वांना अनुभवावे लागते. धनुर्वेद, अथर्वण वेद यातील असंख्य मंत्र प्रयोगाबद्दल तर सांगणेच* अशक्य होत आहे. त्याची अध्ययनाध्यापन परंपरा धारणसामर्थ्य, उपदेश हे सर्व लुप्त झाल्याने भारताची अवनती होत चालली आहे, यात नवल काय आहे !

## पूर्व व दक्षिण भारतातील मन्त्र विद्या

पण हिंदुस्थानातील पूर्व व दक्षिण प्रदेशामध्ये आजही आश्चर्यकारक घटना करणारे मांत्रिक आहेत हें किंचित् समाधानजनक वाटतें.

बंगाल–आंध्र, केरळ (मलियाळ) व गैरेकडे एक दीड वर्षापूर्वी येथे (धारवाडात) एक मलियाळी आला होता. तो नुसते डोळ्यांनी माणसाला पाहिल्याबरोबर त्याच्या हालचाली बंद करून सोडीत असे. हे येथील एका प्रसिद्ध दुकानदाराकडे पुष्कळांना पाहण्यास मिळाले. याचप्रमाणे अनेक क्षुद्र मंत्रांच्या योगाने 'कृत्या प्रयोग व त्यांचे निवारण' करणारे बरेच असे मान्त्रिक तिकडे आढळतात.

म्हणूनच

'ज्ञानिनामपि चेतांसि' 'इति श्लोकस्य जपमात्रेण
सद्यो मोहनमित्यनुभवसिद्धम्'

असे श्रीभास्करराय सांगतात. श्रीशंकराचार्यांच्यावर अभिनवगुप्तादि प्रतिवाद्यांनी आभिचारिक केला होता. त्याचे वारण श्रीगौडपादाचार्यांच्या मंत्रप्रभावांमुळे झाले, हे श्रीशंकरदिग्विजयातील गोष्ट प्रसिद्ध आहे. महाराष्ट्राचे संत जे श्रीज्ञानेश्वर, समर्थ रामदास, एकनाथ महाराज, तुकाराम प्रभृती महात्मे, त्यांनी देखील [illegible] गुरुमंत्राचा प्रभाव व उपदेश ज्यांच्याकडे [illegible], [illegible] आपल्या ग्रंथांमध्ये विशेष रीतीने [illegible]

## मंत्र व गुरु हे दोघे एकरूपच

मंत्रातील वर्ण हे सर्वसाधारण असे दिसले तरी त्यांचे अनुष्ठान व भावना, एकाग्रता यांमुळे ते सामर्थ्ययुक्त होतात. सारखे त्यांचे उच्चार करण्याने श्वास निरोधरूप जो कुंभक प्राणायाम तो सहजतः सिद्ध होतो, असे योगी लोक सांगतात. मंत्रांची ही सर्व रहस्ये, केवळ अनुभवसंपन्न सद्गुरुपासूनच समजून घेणे योग्य असते. तसे गुरुपण या भ्रष्टाचार काळात दिसेनासे झाले, हे भारताचे दौर्भाग्यच होय. मंत्र व गुरु हे दोघेही एकरूपच होत असे

*'मन्त्रोगुरुः पुनरस्तु'*

*या मन्त्रवर्णलिंगाने पूर्वाचार्यांनी दाखविले आहे.* श्रीसायणाचार्यांनी याच्या भाष्यामध्ये कायिक मंत्र अनुष्ठानरूप होतो असेही वर्णन केलेले आहे. मंत्रांचा अर्थ काही ठिकाणी वेगळा (प्रकृत कर्माला असंगत) होत असला तरी, विनियोग प्रमाणाने त्याचे अनुष्ठान सफळ होत असते असे शास्त्र आहे. तात्पर्यः– एकंदर वैदिक अगर तांत्रिक मंत्रांबद्दल त्यांचा एकेक *विषय सांगणेच कठीण होते.* यांचे व्यापकत्व, श्रेष्ठत्व व आवश्यकत्व या गुणांचे प्रकाशन आजकालही भारतामध्ये *अंशतः का होईना दिसून* येते हे भारतीयांना अभिमानास्पदच होय.

## 'मंत्र' आणि 'मंत्री'

मागे सांगितल्याप्रमाणे 'गुप्तभाषणरूप' अर्थ सांगणारा मंत्र हा शब्द राजनीतिशास्त्रातील व्यवहारांमध्ये उपयोग केला जातो, हे

*'मन्त्रोनन्त्रिणे'*

*या ऋग्भाष्यात* श्रीसायणाचार्यांचे

पूर्ण असले पाहिजेत. म्हणजेच त्यांच्याकडून राज्यतंत्र व्यवस्थित चालविण्यात येईल. या काळात तसले सर्वगुणसंपन्न असे मंत्रीलोक दुर्लभ झाल्याकारणानेच सर्व देशात विशेषतः भारतामध्ये चहुकडे अवनती, हाहाःकार माजत आहे. यांचे धोरणी विचार हे राज्याच्या उत्कर्षाला मुख्य कारण असतात. राज्याच्या अभिवृद्धीला सांगितलेल्या तीन कारणांपैकी 'मन्त्रिमन्त्राभिमन्त्रितम्' असे सांगून योग्य मंत्र्यांची सांगड राजाशी घालून दिली आहे.

(अमात्योत्पत्तिप्रकरण, काले अर्थ०)

याचप्रमाणे 'मन्त्रपूर्वाः समारम्भाः' या अर्थशास्त्रातील मंत्राधिकारिक नियमाचे महत्त्व जास्ती आहे. या प्रकरणामध्ये मंत्रण करण्याची पद्धत, मंत्राचे विषय, मंत्रण करणारे लोक हे सर्व कसे असावे याचे निरूपण कौटिलीय, कामन्दकीय, घटकर्पर, पाराशरीय, वगैरेत विस्तृत कळविले आहे.

'नकश्चिदवमन्येत सर्वस्य शृणुयान्मतम्।
बालस्याप्यर्थवद्वाक्यमुपयुञ्जीत पण्डितः।

हे सारभूतवचन सर्व मंत्र्यांनी लक्ष्यात ठेवण्यासारखे आहे. यात आरंभोपाय द्रव्य, संपत्ति, देश-काल-विभाग, विनिपात प्रतिकार, कार्यसिद्धि या षड्वर्गाचे निरूपण करून यांच्यापैकी एकेकाची अंमलबजावणी करणाऱ्यालाही मंत्री असे सांगितले आहे. आणि योग्य तऱ्हेचे मंत्री हेच राजकारणाचे डोळे होत. देवेन्द्राला हजार 'ऋषि' हे मंत्री असल्याकारणाने 'सहस्राक्ष' या नावाला तो पात्र आहे असेही वर्णन केले आहे. (विवेकाकार कौ. अ.)

तसेच पुढे 'आबलीयस' प्रकरणामध्ये 'मन्त्रयुद्ध' नावाच्या अधिकरणात शत्रूंच्यासाठी कोणकोणत्या प्रसंगात कसले कसले मंत्रप्रयोग करावेत व त्यांचा व्यवहार कसा असावा हे दाखविले आहे. विशाल अशा राज्यक्षेत्रामध्ये व्यापक दृष्टीची मंत्रपद्धतीची जितकी जरूरी असते तितकीच गाव, घराणे, कुटुंब, वगैरेतही त्याची आवश्यकता आहे. त्या योगाने मनुष्याला एकमुखीय व्यवहार करण्यास लागणारे सौहार्द, सौमनस्य, सहिष्णुता, जनप्रियता इत्यादि जे सद्गुण यांचा लाभ होऊन गौरव, कीर्ति, सहज संभवत असतात यात काहीच संशय नाही.

याप्रमाणे मंत्र शब्दाचा अर्थ, त्यातील अवांतर भेद, त्यांचे वैशिष्ट्य, हे सर्व यथामती संक्षेपतः सांगितले आहे. अशा प्रभावशाली मंत्रांचा उपयोग 'आध्यात्मिक, आधिदैविक व आधिभौतिक' या कर्मांकरिता करून घेणे हाच '**मन्त्रयोग**' होय. यातील विशेष विषयाबद्दल प्रतिपादन करीत गेल्यास एक मोठे पुस्तकच होईल असे वाटते. पण यामध्ये परिपूर्ण ज्ञान करून घेऊन विवेचन करण्यास सर्वभूतभावन अशा श्रीपरमेश्वराचा अनुग्रह व त्याचप्रमाणे तदभिन्न श्रीसद्गुरूची कृपाच लागते, असे ध्यान करून विश्रांति घेतो. या अल्प प्रमाणाच्या लेखालाही प्रचोदक असे श्रीगुरुचरणी अनंत प्रणामपूर्वक कृतज्ञता अर्पित आहे.

श्रीशके १८८७ विश्वावसुसंवत्सर
श्रावण कृष्णाष्टमी गुरुवार

— भालचंद्रशास्त्री उप्पिनबेटगेरी
(श्रीमद् जगद्गुरु शंकराचार्य, संस्कृत-पाठशाळा-धारवाड)

# राजयोग

### अर्थात्

# अपरोक्षानुभूतिपथ

## प्रास्ताविक

पृथ्वीतलावरील समस्त प्राण्यांच्या हालचालींकडे आपण बारकाईने पाहू लागल्यास आपल्या असे निदर्शनास येते की प्रत्येक प्राणिमात्र सुखप्राप्तीसाठीच अखंड धडपड करीत असतो. त्यातल्या त्यात मनुष्यप्राणि बुद्धियुक्त असल्यामुळे त्यास अनंत सुखे सर्वत्र भरलेली दिसतात आणि ती प्राप्त करण्यास्तव तो आपले शरीर व बुद्धि ह्यांचा उपयोग नित्य करताना दिसतो. थोडक्यात सांगावयाचे म्हणजे मनुष्य-देहातच धर्म, अर्थ, काम व मोक्ष असे चार पुरुषार्थ साधण्यासाठी त्याची धडपड सुरू असते. धर्म, अर्थ व काम ह्या पुरुषार्थांतून प्राप्त झालेली सुखेही जेव्हा त्यास खरे सुख, खरा आनंद, खरे समाधान देत नाहीत असे अनुभवाने दिसते, तेव्हाच त्यास त्या सुखाची अनित्यता पटून तो खऱ्या व अक्षय सुखासाठी धडपडू लागतो. ते खरे व अक्षय सुख म्हणजेच मोक्षसुख अथवा कैवल्यसुख होय व म्हणूनच

'चतुर्विधपुरुषार्थेषु मोक्ष एवपरमपुरुषार्थः ॥'

असे शास्त्र गर्जना करून आपणास सांगते, आणि म्हणूनच वेळोवेळी ऋषिमुनी व संतांनी ह्या चवथ्या पुरुषार्थाचा पुनरुच्चार केलेला आपणास आढळतो. श्रीमज्जगद्गुरु शंकराचार्यांनी देखील ह्या चवथा पुरुषार्थ 'मोक्ष' प्राप्त करून घेण्यासाठीच मनुष्यांच्या कल्याणास्तव 'अपरोक्षानु-भूति' नामक लहानसा ग्रंथ निर्माण केला आहे.

**अपरोक्षानुभूति म्हणजे काय ?**

भगवान् वेदव्यासविरचित ब्रह्मसूत्रातील चतुःसूत्रातील पहिल्या दोन सूत्रात (अथातो ब्रह्मजिज्ञासा। जन्माद्यस्ययतः।) सांगितल्याप्रमाणे–ज्याच्यापासून अखिल जगताची उत्पत्ति झाली, ज्याच्यायोगे ते जगते व अंती ज्याच्यामध्ये सर्व जगताचा लय होतो, अशा ब्रह्माचे ज्ञान म्हणजेच मोक्ष होय. अर्थात् ऐकलेले, वाचलेले असे जे अनुभवरहित शब्दज्ञान ते खरे 'ज्ञान' नव्हे – त्यास 'परोक्ष-ज्ञान' म्हणतात. 'मी ब्रह्म आहे' असे नुसते शब्दाने म्हणणाऱ्यास ब्रह्मज्ञान होत नसते. पण 'मी ब्रह्म आहे' असे जे प्रत्यक्ष अनुभवणे त्यास 'अपरोक्ष ज्ञान' म्हणतात.

शास्त्रकार म्हणतात —

अस्ति ब्रह्मेति चेद्वेद परोक्ष ज्ञानमेव तद्।
अहं ब्रह्मेति चेद्वेद साक्षात्कारः स उच्यते ॥

अर्थः– 'ब्रह्म आहे' असे शब्दाने जाणण्यास परोक्षज्ञान म्हणतात; परंतु 'मी ब्रह्म आहे' असे प्रत्यक्ष अनुभवण्यास

पूर्ण असले पाहिजेत. म्हणजेच त्याकडून राज्यतंत्र व्यवस्थित चालविण्यात येईल. या काळात तसले सर्वगुणसंपन्न असे मंत्रीलोक दुर्लभ झाल्याकारणानेच सर्व देशात विशेषतः भारतामध्ये चहुकडे अवनती, हाहाःकार माजत आहे. यांचे धोरणी विचार हे राज्याच्या उत्कर्षाला मुख्य कारण असतात. राज्याच्या अभिवृद्धीला सांगितलेल्या तीन कारणांपैकी 'मन्त्रिमन्त्राभिमन्त्रितम्' असे सांगून योग्य मंत्र्यांची सांगड राजाशी घालून दिली आहे.

(अमात्योत्पत्तिप्रकरण, काले अर्थ०)

याचप्रमाणे 'मन्त्रपूर्वाः समारम्भाः' या अर्थशास्त्रातील मंत्राधिकारिक नियमाचे महत्त्व जास्ती आहे. या प्रकरणामध्ये मंत्रण करण्याची पद्धत, मंत्राचे विषय, मंत्रण करणारे लोक हे सर्व कसे असावे याचे निरूपण कौटिलीय, कामन्दकीय, घटकर्पर, पाराशरीय, वगैरेत विस्तृत कळविले आहे.

'नकश्चिदवमन्येत सर्वस्य शृणुयान्मतम्।
बालस्याप्यर्थवद्वाक्यमुपयुञ्जीत पण्डितः।

हे सारभूतवचन सर्व मंत्र्यांनी लक्ष्यात ठेवण्यासारखे आहे. यात आरंभोपाय द्रव्य, संपत्ति, देश-काल-विभाग, विनिपात प्रतिकार, कार्यसिद्धि या पद्वर्गाचे निरूपण करून यांच्यापैकी एकेकाची अंमलबजावणी करणाऱ्यालाही मंत्री असे सांगितले आहे. आणि योग्य तऱ्हेचे मंत्री हेच राजकारणाचे डोळे होत. देवेन्द्राला हजार 'ऋषि' हे मंत्री असल्याकारणाने 'सहस्राक्ष' या नावाला तो पात्र आहे असेही वर्णन केले आहे. (विवेक

तसेच पुढे 'आथर्वणीयस' प्रकरणा नावाच्या अधिकरणात शत्रूंच्यासाठी को कसले कसले मंत्रप्रयोग करावेत व त्यांच असावा हे दाखविले आहे. विशाल अश व्यापक दृष्टीची मंत्रपद्धतीची जितव तितकीच गाव, घराणे, कुटुंब, वगैरेता रचना आहे. त्या योगाने मनुष्याला ए करण्यास लागणारे सौहार्द, सौमनस्य, प्रियता इत्यादि जे सद्गुण यांचा लाभ कीर्ति, सहज संभवत असतात यात काही

याप्रमाणे मंत्र शब्दाचा अर्थ, त्याती त्याचे वैशिष्ट्य, हे सर्व यथामती संक्षेपतः अशा प्रभावशाली मंत्रांचा उपयोग 'आध दैविक व आधिभौतिक' या कर्मांकरिता 'मन्त्रयोग' होय. यातील विशेष विषय करीत गेल्यास एक मोठे पुस्तकच होईल यामध्ये परिपूर्ण ज्ञान करून घेऊन ि सर्वभूतभावन अशा श्रीपरमेश्वराचा अ प्रमाणे तदभिन्न श्रीसद्गुरूची कृपाच ला करून विश्रांति घेतो. या अल्प प्रमाणा मचोदक असे श्रीगुरुचरणी अनंत प्रणामपू अर्पीत आहे.

श्रीशके १८८७ विश्वावसुसंवत्सर
श्रावण कृष्णाष्टमी गुरुवार

— बालचंद्रशास्त्री दप्ति
(श्रीमद् जगद्गुरु शंकराचार्य, संस्कृतपाठशा

या प्रपंचाचा कर्ता आहे, असा विचार करावा. ज्याप्रमाणे घटादींचे उपादान कारण मातीच आहे, त्याप्रमाणे या अज्ञानाचे व त्याच्या कार्याचे उपादानकारण एक सूक्ष्म अविनाशी तत्त्व आहे–सत् आहे–तेच मी आहे, त्यात तिळमात्र संदेह नाही असा विचार करावा. असा विचार करू लागले असता, श्रीसमर्थ म्हणतात—

आपणासी ओळखों जाता। आणी बाणे सर्वज्ञता।
तेणें एकदेसी वार्ता। निःशेष उडे॥
मी कोण ऐसा हेत। धरून पाहता देहातीत।
अवलोकिता नेमस्त। स्वरूपचि होये॥

(दासबोध ५।६।२०–२१)

सर्वत्र एकच अविनाशी सत् भरलेले असून तेच मी आहे असे पटू लागते. आता ह्याच विचार उत्तरोत्तर खालील गोष्टींचा विचार करून अभ्यासाने वाढवावाः–

(१) आत्मा नात्मविवेक—(अ) आत्मा मलहीन असून एक आहे तर देह अनेक तत्त्वांचा झालेला आहे

(आ) आत्मा नियामक असून अन्तरवर्ती आहे तर देह बाह्यवर्ती असून पराधीन आहे.

(इ) आत्मा ज्ञानस्वरूप व पवित्र आहे, तर देह मसमय असून अपवित्र आहे.

(ई) आत्मा सर्वांचा प्रकाशक असून निर्मळ आहे, तर देह तमोमय म्हटला जातो.

(उ) आत्मा नित्य असून सत्स्वरूप आहे तर देह अनित्य व असत् आहे. थोडक्यात म्हणजे आत्म्याला देहापासून पृथक् करावयास शिकावे. मी देह नसून आत्मा आहे हे पाहण्यास ज्ञानाने शिकावे.

(२) ज्ञानाचे स्वरूप—देहाला आत्मा मानू नये. देह अत्यापासून निराळा करून आत्मस्वरूप पहावे. देहापासून देहज्ञ अलग ठेवावा व ह्यासाठी ज्ञानचक्षूचा उपयोग करावा

समर्थ म्हणतात हे ज्ञान म्हणजे—

ऐक ज्ञानाचे लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।
पाहावें आपणासि आपण। या नाव ज्ञान॥

आचार्य म्हणतात त्याप्रमाणे, मी सम, शांत, सच्चिदानंदस्वरूप, निर्विकार, निराकार, निर्मळ, अविनाशी, दुःखहीन आभासहीन, क्रियाहीन, व्यापक, निर्गुण, निष्क्रिय, नित्य, मुक्त, अच्युत, निश्चल, अनन्त, शुद्ध, अजर, अमर आहे परंतु असत् स्वरूप देह मात्र मी नव्हे-असे जे जाणणे ते 'ज्ञान' समजावे.

(३) द्वैत–मिथ्यात्व व सर्वात्मक ब्रह्म :– वरील प्रमाणे अभ्यासाने आपण आत्मा आणि देह पृथक मानू लागलो तरी देहभेदसुद्धा असत्यच आहे. चैतन्य सर्वत्र एकच असल्यामुळे त्यात कुठल्याही प्रकारचा भेद मानू नये. रज्जूमध्ये होणारी सापाची प्रतिती जशी मिथ्या आहे त्याप्रमाणे जीवभावसुद्धा मिथ्यात्व आहे. दोरीच्या अज्ञानामुळे ती सापाची आहे असे भासू लागते. त्याच प्रमाणे साक्षात शुद्ध चैतन्य विश्वरूपाने खरे वाटू लागते – भासू लागते. समस्त प्रपंचाचे उपादान कारण ब्रह्मा व्यतिरिक्त दुसरे काहीही नाही, म्हणून हा प्रपंचसुद्धा ब्रह्मच असून दुसरे काहीही नाही. म्हणूनच जगत् मिथ्या आहे असे म्हटले जाते – म्हणजे ते ब्रह्मच असून ब्रह्मापेक्षा निराळे भासते! त्यास कारण म्हणजे माया या अविद्या होय अत जगत् व ब्रह्म ह्यांचा व्याप्य–व्यापक भावसुद्धा मिथ्याच होय.

(४) प्रारब्ध–निराकरण :— अशा अभ्यासाने सर्व स्थावर-जंगम जगतात आत्मस्वरूपाने ओळखल्यावर-सर्व भावाचा अभाव झाल्यावर, देहाचे अस्तित्व रहाणारच नाही म्हणजे आत्मा हा देहरूप आहे ही कल्पनाच शिल्लक राहणार नाही. तेव्हा बुद्धिमान् पुरुषानी आपल्या आत्मस्वरूपास निरंतर ओळखून व प्रारब्ध आहे असे मानल्यास प्रारब्धाचा भोग भोगीत कालक्रमणा करावी. प्रारब्धाचा जोर पाहून उद्विग्न होऊ नये. कारण आत्मज्ञान झाल्यानंतर प्रारब्ध भोगायाही सुटत नाही ही, कल्पनाच चुकीची आहे. पूर्वजन्मात केलेले कर्म म्हणजेच प्रारब्ध होय. आता ज्ञानाच्या दृष्टीने सर्वच ब्रह्म असल्यामुळे अन् ब्रह्म जन्म–मृत्युरहित असल्यामुळे पुनर्जन्माचाच अभाव ठरतो. पुनर्जन्मच नाही तर प्रारब्ध कुठले! फक्त अज्ञानी लोकास समजाविण्यासाठीच श्रुति प्रारब्ध दाखविते. ह्यासाठीच ब्रह्माच्या सर्वात्मरूपणाचे ज्ञान होईतो देह प्रारब्धावर टाकावा असे संत सांगतात. एकदा का मी ब्रह्म आहे-सर्वत्र ब्रह्मच असे ज्ञान झाले की मग मात्र प्रारब्धाचा मागुलवुगा शिल्लक राहत नाही

राजयोगाची १५ अंगे

आता पावेतो कथन केलेल्या ज्ञाननिष्ठेच्या प्राप्तीसाठी

साक्षात्कार – अपरोक्षज्ञान – असे म्हणतात.

एवंच, ईश्वराची प्रत्यक्ष, अपरोक्ष, प्रतिभ अनुभूति म्हणजेच साक्षात्कार – अपरोक्षानुभूति. प्रतिभा ह्या नावाची बुद्धीच्या पलीकडची एक शक्ति मनुष्याला असून तिला ईश्वराचे – ब्रह्माचे – आत्म्याचे प्रत्यक्ष ज्ञान होऊ शकते असे उपनिषदे सांगतात. भगवद्गीतादि 'आत्मा' कोणाला म्हणतात हे सांगताना भगवान गोपाळकृष्ण अर्जुनास म्हणतात

इंद्रियाणि पराण्याहुरिन्द्रियेभ्यः परं मनः।

मनसस्तु परा बुद्धिर्यो बुद्धेः परतस्तु सः ॥ (३-४२)

**अर्थ** – विषयापेक्षा इंद्रिये श्रेष्ठ, इंद्रियापेक्षा मन श्रेष्ठ, मनापेक्षा बुद्धि श्रेष्ठ आहे आणि जो बुद्धीपेक्षाहि श्रेष्ठ तो आत्मा होय.

अर्थातच क्रियाशक्ति, भावना (मन) व बुद्धि ह्या सर्वांपेक्षा श्रेष्ठ असणारा जो आत्मा (ब्रह्म), त्याचे दर्शन होण्यासाठी मनुष्यास बुद्धीच्या वर प्रतिभाशक्ति आहे हे मानावेच लागते. गुरूदेव रानडे म्हणतात की या प्रतिभा शक्तीचा क्रियाशक्ति, मन व बुद्धि या तीन शक्तींशी विरोध नाही, उलट, त्याच्या साह्यानेच प्रतिभेस ब्रह्मज्ञान आत्मदर्शन होते. कारण हे ब्रह्मज्ञान दीर्घकाळ प्रयत्नाने होते. ते तर्कविहित असल्यामुळे त्याचा बुद्धीशी विरोध नाही, शिवाय मन अत्यंत शुद्ध झाल्याशिवाय आत्मज्ञान शक्य नाही. अस्तु. आता हे आत्मदर्शन या अपरोक्षानुभूति अनुभवण्यास कोण अधिकारी व्यक्ति पात्र आहे ते बघू.

## साधन चतुष्टयसंपन्न व्हावे

आचार्य सांगतात की, स्ववर्णाश्रमधर्माचाराने व तपस्येने श्रीहरिला प्रसन्न केले असता मनुष्यांना साधनचतुष्टयाची प्राप्ति होते मनुष्याच्या स्वधर्माचे दोन भाग आहेत. एक बदलणारा व दुसरा स्थिर यानाच आश्रमधर्म व वर्णधर्म म्हणतात मनुष्य ब्रह्मचारीपद सार्थक करून गृहस्थ होतो, पुढे गृहस्थाचा वानप्रस्थ होतो व नंतर वानप्रस्थाचा संन्यासी होतो अशा रीतीने त्याचे आश्रमधर्म बदलत असतात, परंतु वर्णधर्म मात्र बदलत नाही. कारण आपली नैसर्गिक मर्यादा मनुष्यास सोडता येत नाही या तत्त्वावरच वर्णधर्मांची योजना आहे श्रुतिशास्त्राने म्हणूनच चातुर्वर्ण्य व्यवस्था सयमीत केली असून प्रत्येकाने स्ववर्णोचित व स्वाश्रमोचित कर्मे करण्यातच स्वतःचे कल्याण आहे

आता, स्वधर्म आचरायला कधि कधि कठीण वाटेल पण म्हणून का आपण तो सोडून द्यावा ? ज्ञानेश्वरमाउली म्हणतात, "निंबाचा कडुपणा मनात न आणता तो जसा आपण औषध म्हणून घेतो तसा आपण स्वधर्मच आचरिला पाहिजे. आपली आई कुब्जा असली तरी ज्या तिच्या प्रेमावर आपण वाढतो ते प्रेम काही वाकडे नसते. अहो, परनारी रंभेहून सुंदर असल्या तरी बाल्कास त्यांचा काय उपयोग ?" म्हणून विहित कर्माचरणच तारक आहे असे आचरण करीत असतानाच प्रत्येकाने खालील चार गोष्टींनी संपन्न व्हावे —

**(१) नित्यानित्यविवेक** —आत्म्याचे स्वरूपच काय ते नित्य (शाश्वत) असून हे समस्त दृश्य (जे जे दिसते ते) अनित्य आहे–नाशिवंत आहे असा दृढ निश्चय करावा

**(२) वैराग्यः**—आत्म्याव्यतिरिक्त इतर सर्व वस्तु अनित्य आहेत असे पटताच त्याचेविषयी साहजिकच आकर्षण नष्ट होऊन तिटकारा उत्पन्न होतो.

**(३) षट् संपत्ति.**—शम, दम, उपरति, तितिक्षा, श्रद्धा व समाधान मिळवावेत. वासनांचा त्याग म्हणजे शम, बाह्यवृत्तींचा निरोध तो दम, विषयपराङ्मुखता म्हणजे उपरति, दुःख सहन करणे ती तितिक्षा, शास्त्र व गुरु-वचनावर भक्ति ती श्रद्धा व स्वतःच्या लक्ष्याकडे चित्ताची एकाग्रता करणे म्हणजेच समाधान होय.

**(४) मुमुक्षुता.**—संसारबंधातून सुटण्याचा दृढ विचार म्हणजे मुमुक्षुता.

अशा साधनचतुष्टयसंपन्न मनुष्यच अपरोक्षानुभूति घेण्यास पात्र होय. अशा मनुष्यच ज्ञानप्राप्तीचा विचार करण्यास अधिकारी होय

## ज्ञानप्राप्तीचा विचार कसा करावा ?

आचार्य म्हणतात की, ज्याप्रमाणे कुठल्याही वस्तूचे अस्तित्व प्रकाशाशिवाय होत नाही, त्याचप्रमाणे योग्य विचाराशिवाय अन्य कुठल्याही साधनाने ज्ञानप्राप्ती होत नाही मी कोण आहे ? हे जगत् कसे उत्पन्न झाले ? ह्याचा कर्ता कोण ? ह्याचे उपादान कारण कोणते ? पंचमहाभूतांचा देह मी नव्हे, इंद्रियांचा समूह मी नव्हे परंतु या सर्वांहून मी कुणीतरी निराळा आहे, असा विचार करावा. संपूर्ण प्रपंच अज्ञानातूनच उत्पन्न होतो असे ज्ञानाने कळताच तो प्रपंचच नष्ट होतो–नाहीसा होतो विविध प्रकारचा संकल्पच

या प्रपंचाचा कर्ता आहे, असा विचार करावा. ज्याप्रमाणे घटादींचे उपादान कारण मातीच आहे, त्याप्रमाणे या अज्ञानाचे व संकल्पाचे उपादानकारण एक सूक्ष्म अविनाशी तत्त्व आहे–सत् आहे–तेच मी आहे, त्यात तिळमात्र संदेह नाही असा विचार करावा. असा विचार करू लागले असता, श्रीसमर्थ म्हणतात—

आपणासी वोळखो जाता। आगी याणे सर्वज्ञता।
तेणें एकदेसी वार्ता। निःशेष उडे॥
मी कोण ऐसा हेत। धरून पाहता देहातीत।
अवलोकिता नेमस्त। स्वरूपचि होये॥

(दासबोध ५।६।२०–२१)

सर्वत्र एकच अविनाशी सत् भरलेले असून तेच मी आहे असे पटू लागते. आता हाच विचार उत्तरोत्तर खालील गोष्टींचा विचार करून अभ्यासाने वाढवावाः–

**(१) आत्मानात्मविवेकः**—(अ) आत्मा अवयवहीन असून एक आहे तर देह अनेक अवयवांचा झालेला आहे.

(आ) आत्मा नियामक असून अन्तर्वर्ती आहे तर देह बाह्यवर्ती असून पराधीन आहे.

(इ) आत्मा ज्ञानस्वरूप व पवित्र आहे, तर देह मांसमय असून अपवित्र आहे.

(ई) आत्मा सर्वांचा प्रकाशक असून निर्मळ आहे, तर देह तमोमय म्हटला जातो.

(उ) आत्मा नित्य असून सत्स्वरूप आहे तर देह अनित्य व असत् आहे. थोडक्यात म्हणजे आत्म्याला देहापासून पृथक् करावयास शिकावे. मी देह नसून आत्मा आहे हे पाहण्यास ज्ञानाने शिकावे.

**(२) ज्ञानाचे स्वरूप**—देहाला आत्मा मानू नये. देह व त्यापासून निराळा करून आत्मस्वरूप पहावे. देहापासून विचाराने अलग ठेवावा व यासाठी ज्ञानचक्षूचा उपयोग करावा.

समर्थ म्हणतात हे ज्ञान म्हणजे—

ऐक ज्ञानाचे लक्षण। ज्ञान म्हणिजे आत्मज्ञान।
पाहावें आपणासि आपण। या नाव ज्ञान॥

आचार्य म्हणतात त्याप्रमाणे, मी सम, शांत, सच्चिदानंदस्वरूप, निर्विकार, निराकार, निर्मळ, अविनाशी, दुःखहीन आभासहीन, निरवयवी, व्यापक, निर्गुण, निष्क्रिय, नित्य, मुक्त, अच्युत, निश्चल, अनन्त, शुद्ध, अजर, अमर आहे परंतु असत् स्वरूप देह मात्र मी नव्हे–असे जे जाणणे ते 'ज्ञान' समजावे.

**(३) द्वैत–मिथ्यात्व व सर्वात्मक ब्रह्म :–** वरील प्रमाणे अभ्यासाने आपण आत्मा आणि देह पृथक् मानू लागलो तरी देहभेदसुद्धा असत्यच आहे. चैतन्य सर्वत्र एकच असल्यामुळे त्यात कुठल्याही प्रकारचा भेद मानू नये. रज्जुमध्ये होणारी सापाची प्रतीती जशी मिथ्या आहे त्याप्रमाणे जीवभावसुद्धा मिथ्याच आहे. दोरीच्या अज्ञानामुळे ती सर्पिणी आहे असे भासू लागते. त्याचप्रमाणे साक्षात शुद्ध चैतन्य विश्वरूपाने खरे वाटू लागते –भासू लागते. समस्त प्रपंचाचे उपादान कारण ब्रह्माव्यतिरिक्त दुसरे काहीहि नाही, म्हणून हा प्रपंचसुद्धा ब्रह्मच असून दुसरे काहीही नाही. म्हणूनच जगत् मिथ्या आहे असे म्हटले जाते – म्हणजे ते ब्रह्मच असून ब्रह्मापेक्षा निराळे भासते ! त्यास कारण म्हणजे माया या अविद्या होय. अत जगत् व ब्रह्म ह्यांचा व्याप्य–व्यापक भावसुद्धा मिथ्याच होय.

**(४) प्रारब्ध–निराकरण :—** अशा अभ्यासाने सर्व स्थावर-जंगम जगतास आत्मस्वरूपाने ओळखल्यावर-सर्व भावांचा अभाव झाल्यावर, देहाचे आत्मत्व रहाणारच नाही-म्हणजे आत्मा हा देहरूप आहे ही कल्पनाच शिल्लक राहणार नाही. तेव्हा बुद्धिमान् पुरुषानी आपल्या आत्मस्वरूपास निरंतर ओळखून व प्रारब्ध आहे असे मानल्यास प्रारब्धाचा भोग भोगीत कालक्रमणा करावी. प्रारब्धाचा जोर पाहून उद्विग्न होऊ नये. कारण आत्मज्ञान झाल्यानंतर प्रारब्ध भोगावयाचे सुटत नाही ही, कल्पनाच चुकीची आहे. पूर्वजन्मात केलेले कर्म म्हणजेच प्रारब्ध होय. आता ज्ञानाच्या दृष्टीने सर्वच ब्रह्म असल्यामुळे अज ब्रह्म जन्म–मृत्युरहित असल्यामुळे पुनर्जन्माचाच अभाव ठरतो. पुनर्जन्मच नाही तर प्रारब्ध कुठले ! फक्त अज्ञानी लोकांस समजाविण्यासाठीच श्रुति प्रारब्ध दाखविते. यासाठीच ब्रह्माच्या सर्वात्मकपणाचे ज्ञान होईतो देह प्रारब्धावर टाकावा असे संत सांगतात. एकदा का मी ब्रह्म आहे-सर्वत्र ब्रह्मच असे ज्ञान झाले की मग मात्र प्रारब्धाचा मागुल्मुगा शिल्लक रहात नाही.

राजयोगाची १५ अंगे

आता यापूर्वी कथन केलेल्या ज्ञाननिष्ठेच्या प्राप्तीसाठी

शंकराचार्यांनी साधकाच्या सोईसाठी पंधरा अंगानी युक्त असलेला मार्ग सांगितला आहे. तेव्हा साधकांनी ह्या पंधरा अंगाचा अभ्यास करून चिरकाल ब्रह्म चिंतन करण्यास शिकावे. आता आपण एकेक अंगाचा विचार करून अभ्यासास सुरुवातच करूया. ती पंधरा अंगे म्हणजे—

यमो हि नियमस्त्यागो मौनं देशश्च कालतः ।
आसनं मूलबंधश्च देहसाम्यं च दृक्स्थितिः ॥
प्राणसंयमनं चैव प्रत्याहारश्च धारणा ।
आत्मध्यानं समाधिश्च प्रोक्तान्यंगानि वै क्रमात् ॥

अर्थः—यम, नियम, त्याग, मौन, देश, काल, आसन, मूलबंध, देहसाम्य, नेत्रस्थिति, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान व समाधि—ही राजयोगाची पंधरा अंगे होत.

## १ ले अंग—यम

लक्षण.—

सर्वं ब्रह्मेति विज्ञानादिन्द्रियग्रामसंयमः ।
यमोऽयमिति संप्रोक्तोऽभ्यसनीयो मुहुर्मुहुः ॥

अर्थः— ' सर्व ब्रह्मच आहे ' हे जाणून त्या ज्ञानानेच सर्व इंद्रिये संयमित करणे ह्यास यम म्हणतात. याचा वारंवार अभ्यास करावयास हवा.

कृति.—ब्रह्माव्यतिरिक्त सर्व अनित्य असल्यामुळे सर्व इंद्रियास आपापल्या विषयापासून आवरून धरण्याचा अभ्यास करावा. संत तुकाराम महाराज म्हणतात तसे—

(अ) वाचेने ' ॐ तत् सत् ' इ. असेच बोलत असावे. परनिन्दा, काथ्याकूट इ. अवश्य टाळावेत.

(आ) डोळ्यानी आत्मस्वरूप पाहण्याचा अभ्यास करावा—हृदयात तसे बाहेर सर्वत्र ब्रह्मच पाहण्याचा अभ्यास ठेवावा.

(इ) कानानी फक्त ' ब्रह्माभ्यास ' वाढेल असेच श्रवण करावे. आपली स्तुति, बडेजाव, मान असले प्रसंग कटाक्षाने टाळावेत.

(ई) कराचा उपयोग फक्त सर्वत्र ब्रह्म पाहून नमस्कार करण्यासाठीच करावा

(उ) जिह्वेने फक्त ब्रह्मरसच प्राशन करण्यास शिकावे.

थोडक्यात म्हणावयाचे म्हणजे इंद्रियांना कोंडून न ठेवता त्यांचे फक्त ध्येय बदलणे यास इंद्रिय संयम साधणे म्हणतात

## दुसरे अंग—नियम

लक्षण :—

सजातीयप्रवाहश्च विजातीयतिरस्कृतिः ।
नियमो हि परानंदो नियमात् क्रियते बुधैः ॥

अर्थः— सजातीय वृत्तींचा प्रवाह व विजातीय वृत्तींचा त्याग ह्यास परमानन्दरूप नियम म्हणतात.

कृति :—' सर्वत्र ब्रह्मच भरलेले आहे ' ह्या श्रद्धेस बाध आणणाऱ्या सर्व (विजातीय) वृत्ति मनात उठू न देण्याचा अभ्यास करावा. त्यासाठी चिरकाल ब्रह्मचिंतनाचाच अभ्यास करण्यास मनास शिकवावे.

## तिसरे अंग—त्याग

लक्षण :—

त्यागः प्रपंचरूपस्य चिदात्मत्वावलोकनात् ।
त्यागो हि महतां पूज्यः सद्यो मोक्षमयो यतः ॥

अर्थ :—सर्व प्रपंच चेतनस्वरूप आहे असे जाणून त्याच्या दिसणाऱ्या रूपाचा त्याग म्हणजे महात्म्यांनी केलेला वंदनीय त्याग होय. त्याने चटकन् मोक्ष प्राप्ती होते.

कृति :—प्रपंचाचे रूप जसे भासते तसे नसून (ते मिथ्या आहे असे जाणून) अखिल प्रपंचच चेतनस्वरूप आहे हे जाणून, प्रपंचाच्या मिथ्या-रूपाचा त्याग करण्यास शिकावे. अशा त्यागात दारा पुत्र वित्त, वासनात्याग इत्यादि त्याग समाविष्ट आहेत हे जाणावे.

## चौथे अंग—मौन

लक्षण :—

यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह ।
यन्मौनं योगिभिर्गम्यं तद्भजेत्सर्वदा बुधैः ॥
वाचो यस्मान्निवर्तन्ते तद्वक्तुं केन शक्यते ।
प्रपंचो यदि वक्तव्यः सोऽपि शब्दविवर्जितः ॥
इति वा तद्भवेन्मौनं सतां सहजसंज्ञितम् ।
गिरा मौनं तु बालानां प्रयुक्तं ब्रह्मवादिभिः ॥

अर्थ — ज्याची प्राप्ति न झाल्यामुळे मनासहित वाणी माघारी फिरून स्वस्थ बसते (म्हणजे योगीजन मौन धारण करतात) व त्यामुळे जे मौन फक्त योगीच मिळवू शकतात, त्याचाच अंगीकार ज्ञात्यांनी करावा. जेथून वाणिसुद्धा माघार घेते, त्या ब्रह्माचे वर्णन कोण व कसे करू शकणार बरे!

तरी प्रपंचही वर्णन करण्याचा विषय आहे असे मानले तरी तोही शब्दरहितच आहे थी ! म्हणूनच सत्पुरुषाचे दुसरे स्वाभाविक मौन म्हणजे प्रपंचाचे हे 'अशब्दत्व'ही म्हणता येईल. ब्रह्मवादींनी ( नुसते ) वाणीचे मौन तर अज्ञजना साठीच सांगितले आहे. एवच ज्या ठिकाणी वाणी अथवा मनाचीसुद्धा प्रवृत्ति होत नाही—म्हणजेच ज्याला वाणी व मनसुद्धा जाणू शकत नाहीत असा आत्मा आहे म्हणून त्याला मौन म्हणतात.

कृतिः—असे ते ब्रह्म मीच आहे असे सतत अनुसंधान ठेवावे. जगत् हे निर्विवाद त्यास जाणारे आहे असे जाणून त्याविषयी मौन धारण करावे.

## पांचवे अंग-देश

लक्षण :—

आदावन्ते च मध्ये च जनो यस्मिन्न विद्यते ।
येनेदं सततं व्याप्तं स देशो विजनः स्मृतः ॥

अर्थ :—आत्म्याच्या पूर्वि, मध्ये किंवा शेवटी जगत् नसून आत्माच जगताच्या पूर्वि, मध्ये व सृष्टीच्या त्या-नंतर असे जाणून, ब्रह्मच सर्वत्र आहे, ब्रह्मावाचून दुसरी कोठलीही वस्तु नाही. असा निश्चय करून असणे ह्यास निर्जन देश म्हणतात.

कृति :—'ब्रह्मच सर्वत्र भरलेले आहे' असा अभ्यास ठेवावा. ब्रम्हाने व्यापलेले अखिल जगत् हाच देश होय. 'न लगती सायास जावे वनांतरा' ही संत तुकाराम महाराजांची उक्ती ध्यानात ठेवावी.

## सहावे अंग-काल

लक्षण :—

कल्नात्सर्वभूताना ब्रह्मादीना निमेषतः ।
कालशब्देन निर्दिष्टो ह्यखण्डानन्द अद्वयः ॥

अर्थः—ब्रह्मदेव आदि सर्वभूतमात्राची एका निमिषात गणना करता येते. यावरून काल म्हणजे आत्म्याहून कोणी निराळा आहे असे नसून काल म्हणजेच साक्षात् 'परब्रह्म' होय असा पक्का निश्चय करणे यास योग करण्यास अनकूल काल म्हणतात.

कृति :—'कालोऽस्मि' हे भगवताचे वचन लक्षात ठेवून काल हेच परब्रह्म आहे अशी सतत धारणा ठेवावी.

## सातवे अंग-आसन

लक्षणः—

सुखेनैव भवेद्यस्मिन्नजस्रं ब्रह्मचिंतनम् ।
आसनं तद्विजानीयान्नेतरत्सुखनाशनम् ॥
सिद्धं यत् सर्वभूतादि विश्वाधिष्ठानमव्ययम् ।
यस्मिन् सिद्धाः समाविष्टास्तद्वै सिद्धासनं विदुः ॥

अर्थः—ज्या स्थितीत सुखाने निरंतर ब्रह्मचिंतन होऊ शकते ते आसन होय. सुखनाशक असे दुसरे कोणतेही आसन आसन नव्हे ! जे भूतमात्राचे आदिकारण आहे, विश्वाचे अविनाशी अधिष्ठान आहे व सर्व सिद्धपुरुष ज्यात स्थित असतात तेच सिद्धासन होय.

कृतिः—कसेही आसन घालावे पण ते सहज स्थिर-तेने घालावयास शिकावे व 'मी अखंडानंद ब्रह्म आहे' असे त्यात निरंतर चिंतन करावे.

## आठवे अंग-मूलबंध

लक्षणः—

यन्मूलं सर्वभूतानां यन्मूलं चित्तबंधनम् ।
मूलबंधः सदासेव्यो योगोऽसौ राजयोगिनाम् ॥

अर्थः—जो सर्व भूताचे मूळ आहे व ज्याच्या आश्रयाने चित्त स्थिर करता येते ते ब्रह्मच मूलबंध आहे. तोच आपण साधला पाहिजे. राजयोग्याचा योग तो हाच.

कृतिः—ब्रह्मच सर्वत्र अखिल चराचरात भरलेले असून त्याचे मूळ आहे, असा सतत अभ्यास करावा.

## नववे अंग-देहसाम्य

लक्षण.—

## दहावे अंग – दृक्स्थिति

लक्षण :–

दृष्टिं ज्ञानमयीं कृत्वा पश्येत् ब्रह्ममयं जगत् ।
सा दृष्टिः परमोदारा न नासाग्रावलोकिनी ॥
द्रष्टृदर्शनदृश्यानां विरामो यत्र वा भवेत् ।
दृष्टिस्तत्रैव कर्तव्या न नासाग्रावलोकिनी ॥

**अर्थ** :– ज्ञानमयी दृष्टीने सर्व जगत् ब्रह्मस्वरूप आहे असे पाहणे – ही उत्तम दृष्टि होय. त्याचप्रमाणे द्रष्टा, दृश्य व दर्शन या त्रिपुटीचा ज्याठिकाणी लय होतो अशा ब्रह्माच्या ठिकाणी दृष्टि स्थिर करावी. नाकाच्या शेंड्यावर नव्हे !

**कृति** :– समस्त जगत् ब्रह्मभावनेने पाहण्याचा अभ्यास करून चित्तवृत्ती ब्रह्मचिंतनात स्थिर ठेवण्याचा अभ्यास करावा. नासाग्री किंवा अन्य स्थानकात दृष्टि स्थिर करण्याची जरूरी नाही.

## अकरावे अंग-प्राणायाम

लक्षण

चित्तादिसर्वभावेषु ब्रह्मत्वेनैव भावनात् ।
निरोधः सर्ववृत्तीनां प्राणायामः स उच्यते ॥
निषेधनं प्रपञ्चस्य रेचकाख्य समीरणः ।
ब्रह्मैवास्मीति या वृत्तिः पूरको वायुरीरितः ॥
ततस्तद्वृत्तिनैश्चल्यं कुम्भकः प्राणसंयमः ।
अयं चापि प्रबुद्धानामज्ञानां घ्राणपीडनम् ॥

**अर्थ** – चित्तादिक वृत्तींत ब्रह्मत्वाची भावना करून इतर सर्व वृत्तींचा निरोध करणे हाच प्राणायाम होय. प्रपञ्चाच्या मिथ्या स्वरूपाचा त्याग करणे म्हणजे रेचक, मी ब्रह्म आहे ही वृत्ति म्हणजे पूरक व हीच वृत्ती निश्चलपणे टिकविणे हाच कुंभक प्राणायाम होय. ज्ञानी पुरुषासाठी हाच खरा प्राणायाम होय. नाक दाबून श्वास श्वास देणे हा प्राणायाम अज्ञासाठीच होय.

**कृतिः** — (अ) सर्व अनात्म वस्तूंचा त्याग करावा.

(आ) ब्रह्मापासून सर्व दृश्य नाशिवंत आहे, हे सदैव ध्यानात ठेवणे म्हणजे 'रेचक' करणे.

(इ) 'मी ब्रह्म आहे' ही वृत्ती ठेवून 'पूरक' साधा.

(ई) वरील वृत्ती टिकविण्याचा अभ्यास करावा व कुंभक साधावा.

(उ) नाकपुड्या दाबून प्राणायाम करू नये.

## बारावे अंग-प्रत्याहार

लक्षणः—

विषयेष्वात्मतां दृष्ट्वा मनसश्चितिमज्जनम् ।
प्रत्याहारः स विज्ञेयोऽभ्यसनीयो मुमुक्षुभिः ॥

**अर्थः**— सर्व विषयात आत्माच स्थित आहे असे जाणून मनाला चैतन्य तच बुडवून टाकणे प्रत्याहार होय.

**कृतिः**— सर्वत्र आत्माच स्थित आहे अशी भावना धरा. मनाला चैतन्यात बुडविण्याचा अभ्यास करावा.

## तेरावे अंग-धारणा

लक्षणः—

यत्र यत्र मनो याति ब्रह्मणस्तत्र दर्शनात् ।
मनसो धारणं चैव धारणा सा परा मता ॥

**अर्थ** — जेथे जेथे मन जाईल तेथे तेथे ब्रह्माचा साक्षात्कार घेत घेत मनाला त्याच स्थितीत स्थिर करणे हीच उत्तम धारणा होय.

**कृति** — (अ) सर्व वस्तूंचे ठिकाणी ब्रह्मच आहे हे पाहावे.

(आ) मिथ्या वस्तूंची उपेक्षा करण्यास शिकावे.

(इ) सत्यस्वरूप आत्म्याच्या दर्शनाचे अनुसंधान ठेवावे.

## चौदावे अंग-ध्यान

लक्षण —

ब्रह्मैवास्मीति सद्वृत्त्या निरालम्बतया स्थितिः ।
ध्यान शब्देन विख्याता परमानन्ददायिनी ॥

**अर्थ** — मी ब्रह्म आहे या वृत्तीने जी परमानंद देणारी वृत्ति होते तीच ध्यान शब्दाने प्रसिद्ध आहे.

**कृति** —(अ) देहादिकाचा अहंममताभाव सोडावा.

(आ) मी ब्रह्म आहे अशी चित्ताची निश्चल वृत्ति राखावी.

## पंधरावे अंग-ज्ञानसमाधि

लक्षण.—

निर्विकारतया वृत्त्या ब्रह्माकार तया पुनः ।

वृत्तिविस्मरणं सम्यक् समाधिज्ञानसंज्ञकः ॥
एवं चाकृतिमानन्दं तावत्साधु समभ्यसेत् ।
वश्यो यावत्क्षणात्पुंसः प्रयुक्तः संभवेत्स्वयम् ॥
ततः साधननिर्मुक्तः सिद्धो भवति योगिराट् ।
तत्स्वरूपं न चैकस्य विषयो मनसोगिराम् ॥

अर्थः— निर्विकार व ब्रह्माकार वृत्तीने जी पूर्ण वृत्ति-र्हिनता प्राप्त होते तीच ज्ञानसमाधि होय. या आनंदमय वृत्तीचा अशा प्रकारे अभ्यास करावा की चित्तात आणल्याबरोबर एका क्षणात ती आपणास वश होईल असे झाल्यानंतर तो योगिराज सर्व साधनांतून मुक्त होऊन सिद्धपुरुष होतो. तेच त्याचे स्वरूप होय की जे कोणाच्याही मनवाणीचा विषय होऊ शकत नाही.

कृतिः— ( १ ) सदा ब्रह्माकार वृत्तीने रहावे
( २ ) या योगे पूर्ण वृत्तीहीनता मिळवावी.
( ३ ) आनन्दमयीवृत्तीचा निरंतर अभ्यास करावा
( ४ ) स्वानंदसम्राट होऊन अपरोक्षानुभूति भोगावी.

## काही सूचना

[१] समाधीचा अभ्यास चालू असता आळस, भोग-वासना, लय, तम, विक्षेप, रसास्वाद, शून्यता इ. विघ्ने येतात. त्याना भिऊ नये. नेटाने अभ्यास चालू ठेवावा.

[२] समाधीचे वेळी 'जसा भाव तसे फळ' अनुभवास येते, म्हणून शून्यवृत्ती न होता पूर्णवृत्ती असावे. म्हणूनच मी पूर्ण आहे–ब्रह्म आहे हाच भाव ठेवावा.

[३] ब्रह्मज्ञानाच्या गोष्टी न सांगता मौनीवृत्तीत रहावे

[४] भृंगीकीटक न्याय अवश्य ध्यानात ठेवावा व अखंड ब्रह्मचिंतनच करावे

[५] गुरूच्या वचनावर श्रद्धा ठेवून त्यांच्या सूचनेप्रमाणे वागावे.

## उपसंहार

अपरोक्षानुभूतीच्या प्राप्तीसाठी पंधरा अंगानी युक्त असलेल्या या राजयोगाचा अभ्यास करून प्रत्येक मुमुक्षूने स्वानंदसम्राट व्हावे. हा राजयोग वाचल्यानंतर आपणास महर्षि पतंजलींच्या अष्टांग योगाची आठवण होतेच होते. अष्टांग योग आचरण्यास फार मोठे शारीरिक व मानसिक बळ लागते योग्य गुरु भेटावा लागतो पथ्ये कटाक्षाने पाळावी लागतात. एवढेच ते काम सामान्य लोकांचे नव्हे असा लोकांसाठी म्हणजे शरीराने सामान्य पण बुद्धिमतांसाठी आचार्यांनी अपरोक्षानुभूति प्राप्त करून घेण्यासाठी हा राजयोग आपणास कथन केला आहे त्याचा अभ्यास करून आपण स्वानंदसम्राट होण्याचा अभ्यास करूया. हा अभ्यास सुलभतेने होण्यासाठी साधकांच्या सोयीसाठी त्यांच्या कर कमलात धरण्यासाठी व कंठस्थ करण्यासाठी 'स्मरणी' खाली देत आहे. उपयोगी वाटल्यास साधकांनी तिचा स्वीकार करावा.

## स्मरणी
### अथवा
### अपरोक्षानुभूति पद्य

जीवन नौका दुस्तर ऐशा भवाब्धात पडता ।
काय करावे कुणा पुसावे ठाके नित चिंता ॥ १ ॥
मारी माझे म्हणता ओझे घेतो डोईवरी
सुख गवसण्या धावत जातो दुःखचि लाभे परी ॥२॥
दुःख सागरी बुडता बुडता मस्त कधी होई
'पाहि केशवा' 'त्राही केशवा' वदुनि नत होई ॥३॥
नित्य प्रार्थिता भगवंताही बुद्धियोग लाभे
'कोऽहं कोऽहं' सुखदुःखादि विचार करू लागे ॥४॥
उपजीची हाव टाकुनि आत्मनिष्ठ होता
विवेक–वैराग्यादि चतुष्टय, संपद ये हाता ॥५॥
साधन संपद् युक्त असा तो ज्ञानपात्र होई
ज्ञान परि ते विना विचारे साध्य कसे होई ॥६॥
'कोण कसा मी, कोठुनी आलो विश्वची झाले कसे
कर्ता आणि निमित्त कुठले' विचार मनीं हे वसे ॥७॥
देह नव्हे मी, नव्हे इंद्रिये, असे मात्र साक्षी
विवेकाची कांस धरुनिया विचार हा रक्षी ॥८॥
निर्मळ निश्चळ शुद्ध बुद्ध मी निराकार मुक्त
अनंत अच्युत अजरामर मी ब्रह्म शांति युक्त ॥९॥
अशी धारणा नित्य राखण्या साधन व्यवहार्य
पंचदशांगे दाविति आपणा 'शंकर' आचार्य ॥१०॥
'सर्व ब्रह्म हे' जाणुनि ज्ञाते जितेन्द्रिय झाला
सहज साधला 'यम' चि त्याचा प्रथम अंग बोला ॥११॥
द्वितीयांग ते नियमची वदति साधण्यास सोपे
मनोवृत्तीचा ताबा घेणे विकार–त्याग तपे ॥१२॥

प्रपंच तितुका चिन्मय जाणा त्यजुनि भव रूप
म्हणा ‘ त्याग ’ हा तृतीयांग जो भासे मार्ग छुपा ॥१३॥
चतुर्थ–अंगी ‘ मौन ’ धरावे कथिती आचार्य
मौन वाणिचे अज्ञासाठीं, महा विकट कार्य ॥१४॥
ब्रह्माचें जें वर्णन करिता वेद मुके झाले
मौन नसे ज साधा सत्वर सर्व संत त्याले ॥१५॥
शांति अर्ती मध्ये कोट मुळि न मिळती जन
पंचमांग जें ब्रह्मव्याप्त हिं ‘ देश ’ म्हणे विजन ॥१६॥
अंग सहावे वर्णिति ज्यासि ‘ काल ’ नाम जाणा
अखंड अद्वय ब्रह्म निरामय ज्यासि मनी जाणा ॥१७॥
विनाकष्ट जें घडे निरंतर ब्रह्मतत्वचिंतन
सप्तमांग त्या आसन वदति नेतर सुखनाशन ॥१८॥
अष्टम अंगी राजयोगी जैं ‘ मूलबंध ’ करिती
भूताचे जे मूळ ब्रह्म, तैं चित्तबंध करिती ॥१९॥
‘ देह साम्य ’ ते नवम साधन समता चित्ताची
विसलीन तव–करूनी पीडा त्यजुनि देहाची ॥२०॥

अखिल विश्वचि ब्रह्म देवता, विराम त्रिपुटीस
देतें ‘ दृष्टि ’ वदति योगी, दशम अंग जीस ॥२१॥
अन्य वृत्तिचा निरोध साधा, ब्रह्म भावनेनें
‘ प्राणायाम ’ हि अंग पुढील जें करा कुशलतेनें ॥२२॥
चैतन्यीं मन बुडवुनी टाका आत्मभाव करुनी
‘ प्रत्याहार ’ असा मग साधा, वृत्ती निरोधोनी ॥२३॥
जेथ जाते मन जव तेथे, ब्रह्म पहा चांग
स्थीर ‘ धारणा ’ करा मनाची त्रयोदशम अंग ॥२४॥
‘ ब्रह्म असे मी ’ नित्य धारणा धरी योगराणा
चवदावे मग ‘ ध्यान ’ अंग ते निरालंब जाणा ॥२५॥
ब्रह्मस्फूर्ति ही अशी सुरता चाले भैरव
वृत्तिहीनता ‘ ज्ञानसमाधि ’ शेवटचे अंग ॥२६॥
भोग वासना विक्षेपादि विघ्नें बहु येती
साधन समर्थी, टाळा त्यासी होण्या अनुभूति ॥२७॥
पंचदशांगे युक्त असा हा “ राजयोग ” चोख
रमा प्रार्थुनि विनती करितो अनुभूति चाखा ॥२८॥

— व द माहुलीकर
एम्. ए., बी एस्‌सी
घाटकोपर, मुंबई–७७



# गीतेतील अनन्यता

( एक चिंतन )

अनन्याश्चिन्तयन्तो मां ये जनाः पर्युपासते ।
तेषां नित्याभियुक्तानां योगक्षेमं वहाम्यहम् ॥

श्रीमद्भगवद्गीतेतील हा श्लोक म्हणजे सर्व साधकाना दिलेले एक महत्त्वाचे अभिवचन आहे. एकदा परमेश्वराशी अनन्य होऊन चिन्तन करू लागलो की त्याच्या सर्व योग-क्षेमाची काळजी देवच करतो. योग म्हणजे अप्राप्त वस्तूची प्राप्ति आणि क्षेम याचा अर्थ मिळालेले टिकविणे. जीव अनंत आहेत आणि त्यांच्या इच्छाही अनंत आहेत. त्या इच्छा अन्तवान्–विनाशी वस्तूंच्या मागे लागून पूर्ण होणार नाहीत. त्यासाठी त्यांनी अनंताशीच अनन्य झाले पाहिजे.

श्रुति म्हणते—

'योऽन्यां देवतामुपास्ते, अन्योऽसावन्योऽहमस्मीति न स वेद'

'येऽन्यथातो विदुरन्यराजानस्ते क्षय्यलोका भवन्ति'

गीतेत हेच पहा—

'येऽप्यन्यदेवताभक्ता यजन्ते श्रद्धयान्विताः ।
तेऽपि मामेव कौंतेय यजन्त्यविधिपूर्वकम् ॥
अन्तवत्तु फलं तेषां तद्भवत्यल्पमेधसाम् ॥'

कोही असो, पण लहान अथवा मोठ्या कोणत्याही फळाला मिळवायचे असेल तर अनन्यता लागते यात शंका नाही. अनन्यता ही एक आन्तरिक शक्ति आहे. बाह्य शारीरिक शक्तीने जसे आपण भारवहन, कुस्ती, युद्ध इत्यादि कामे करतो किंवा यांत्रिक शक्तीने जशी अचाट कार्ये होत असलेली आज आपल्याला दिसतात, तितकीच किंबहुना त्यापेक्षाहि अधिक कामे करून दाखविण्याची शक्ति आपल्या आत आहे ती म्हणजे अनन्यता. तिचा लाभ कसा घ्यायचा? यासाठीच योगशास्त्र आहे.

भगवद्गीता ही जगद्गुरु श्रीकृष्णाने अखिल मानवाचा उद्धार कसा होईल याकरिता गाइलेले एक अन्तरराष्ट्रीय महत्त्वाचे योगशास्त्र आहे. त्यामुळे ते केवळ हठयोग, कर्मयोग, ज्ञानयोग, भक्तियोगच सांगत नाही तर जगातील मानव ज्याअर्थी भिन्न भिन्न आवडी–निवडीचे व निरनिराळ्या अधिकाराचे आहेत त्याअर्थी त्या त्या साधकाला त्या त्या भूमिकेतून वर येण्याचा–उद्धाराचा मार्ग दाखविते. हे जे निरनिराळे उपाय त्यालाच गीता योग असे म्हणते. आचार्य म्हणतात

'युज्यतेऽनेनेति योगः । उपाय इत्यर्थः'

मात्र सर्वत्र अनन्यता समानतेने लागते.

'ये तु सर्वाणि कर्माणि मयि संन्यस्य मत्पराः ।
अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते ।
तेषामहं समुद्धर्ता मृत्युसंसारसागरात् ।'

याचा तात्पर्यार्थ असा साधकाने आपापल्या अधिकारा प्रमाणे कर्मे करावी, पण ती ईश्वरार्पण करून त्याच्याशी अनन्य योग साधावा म्हणजे परमात्मा तेथून त्याला वर काढतो. मग तो संसारसागराच्या तळाशी असो, मध्ये असो अथवा वर तरंगत असो. यामुळे भगवद्गीतेचा योग

ही योजना दिसायला सुरसुटीत आहे. पण अनुभवाती त्याची जी स्वाभाविक आवड आणि प्रवृत्ति तिलाच खत पाणी देऊन पोसले तर त्याची प्रगति लवकर होते हे लक्षात घेऊन शास्त्रात अनेक साधने सांगितली आहेत. ती योग्यच आहेत. मात्र आपण त्यातील कोणते तरी एकच स्वीकारले पाहिजे अशा वेळी श्रोत्रिय-ब्रह्मनिष्ठ गुरूच्या मार्गदर्शनाचा चांगला उपयोग होतो आपली वृत्ति आपल्यापेक्षा त्यानाच कळत असते. वैद्याने रोगाचे निदान करावे, त्याप्रमाणे सद्गुरूचे निदान व चिकित्सा आपल्याला 'न स्खलेत पतेदिह' अशा पद्धतीने आपली प्रगति करून देते. म्हणूनच

'सद्गुरु वाचोनि सापडेना सोय'

हे खरे आहे. पण सद्गुरूनी दिलेल्या साधनातच अनुभवा पर्यंत टिकले पाहिजे ही तिसरी साधनान्यता आहे.

असा योग्य मार्गदर्शक लाभणेहि कठीणच असते. कित्येक वेळा आपली परीक्षा चुकते नि साधक भलत्याच्याच आहारी जाऊन फसतो अशा वेळी 'ब्राह्मणाची मुख्य देवता गायत्री' तिचा आधार साधकाने सोडू नये किंवा आपल्या कुलदेवतेचे चिन्तन न टाळता करीत राहावे. उशीरा फल प्राप्ति होईल. पण पतनाचा-हानीचा धोका त्यात नाही

त्या दृष्टीने आमच्या एका मित्राचे उदाहरण लक्षात घेण्यासारखे आहे. घरची सधनी व श्रीमन्ती असूनही त्याला मॅट्रीक पास झाल्यावर समर्थ होण्याची इच्छा झाली व त्यासाठी गावातच एका मदिरी राहून माधुकरी वृत्तीने त्याने गायत्री पुरश्चरणे सुरू केली ६ पुरश्चरणे होऊनही तादृश लाभ दिसेना. तथापि त्याने साधनत्याग केला नाही पण साधननिष्ठेचा परिणाम २० वर्षांनी असा झाला की एक अक्कलकोटचा ब्राह्मण (?) त्याने त्याला दोन कानमन्त्र दिले व लगेच गायत्री मंत्र सिद्धीचा अनुभव येऊ लागला.

आमचे गुरुजी गोष्ट सांगत. दोन शिष्य चांगल्या गुरु पासून साधन घेऊन अनुष्ठान करू लागले. देव आठा दिवसातच प्रसन्न झाला व ब्राह्मण वेषाने येऊन त्याने एकाला विचारले. 'या साधनाने सिद्धि मिळेल असे तुला वाटते का?' तो म्हणाला 'का नाही मिळणार! गुरुजींनी सांगितले त्याप्रमाणे १ महिन्यात मला सगुण साक्षात्कार झालाच पाहिजे.' दुसऱ्यानेहि तेच सांगितले. पण कालाची मुदत मात्र त्याने केली नाही. तो म्हणाला माझी निष्ठा पूर्ण असेल तर आत्ताच दर्शन होईल नाहीतर जन्मजन्मातरी होईल. देव तात्काल तिथेच प्रगट झाले. पहिल्या साधकालाही त्यांनी दर्शन दिले. पण साधनाबरोबर कालाचेहि चिंतन तो करीत असल्यामुळे महिन्याने ते दिले. तात्पर्य साधननिष्ठा म्हणजे साधनातच-साधकाने गर्क असले पाहिजे त्यात कालादिकाचेही चिंतन नको.

गीतेने साधनैक्य सूचविण्यासाठीच 'कर्मण्येवाधिकारस्ते' तस्य 'शम कारणमुच्यते' इत्यादि सूचना दिल्या आहेत

(४) **ध्येयपरता** —साधनाच्या अनेकतेप्रमाणे 'उपास्यानामनियमः' हाही आपल्या धर्माचा विशेष आहे ज्याची जी जन्मजात मनोवृत्ति असेल त्याला तदनुरूप विशेष देवताच आवडते. भगवान म्हणतात—

यजन्ते सात्विका देवान् यक्षरक्षासि राजसा ।
प्रेतान्भूतगणाश्चान्ये यजन्ते तामसा जना ॥

या क्रमाने देवी, गणपति, महादेव, मल्हारी, राम, कृष्ण प्रभृति अनेक देवतांचे भक्त आपणास दिसून येतात. त्यांच्याकडे पाहून आपलेहि मन थोडे साशंक होते. जो तो आपापल्या देवतेची स्तुति करीत असतो. ते पाहून साधक आज राम, उद्या देवी, परवा गणपति, लगेच भोलाशंकर अशा देवता बदलत जातो आज आम्ही नागपंचमीला नाग पुजतो, लगेच श्रावणी शुक्रवारी जेष्ठा देवीची पूजा, भाद्र पदात वामनद्वादशी व अश्विनात नवरात्र पार पाडतो हे सर्व कुलधर्म म्हणून पाळावयास पाहिजेत हे निराळे, पण आपले जे परम साध्य असेल ते अशा व्यभिचारी भक्तीने साधणार नाही, हेहि 'अनन्या' या पदाने सुचवावयाचे आहे.

देव अनेक असणे वाईट नाही. उलट मनुष्य स्वभावाला अनुसरून असल्यामुळे सर्वांच्या सोयीसाठी ते आवश्यक आहे देवता भिन्न असल्यामुळे समाजात भेद पडतो, भांडणे वाढतात म्हणतात, ते बरोबर नाही. ज्याना उपासना करायची नसते तेच लोक भांडणे करीत असतात. खरा उपासक दुसऱ्याच्या पंचायतीत न जाता आपल्या इष्ट देवतेची पूजा करण्यात मग्न असतो.

शिवाय खऱ्या अर्थाने देव अनेक नसतातच मुळी. कारण गणपतीची उपासना करणारा गाणपत्य सध्येमध्येही केशव, नारायण न म्हणता वक्रतुंडायनम लंबोदरायनम इत्यादिच म्हणेल. पण त्या गणपतीला ओळखताना तो चिंतन असेच करील.

'नमस्ते गणपतये त्वमेव प्रत्यक्ष ब्रह्मासि ।
त्वं साक्षादात्मासि ..सर्वं जगदिदं त्वत्तो जायते ..
त्वयि लयमेष्यति ॥ '

म्हणजे हा गणपति आत्मरूप, ब्रह्मरूप असून तो सर्व सृष्टीच्या उत्पत्तिस्थिति लयाला कारण असून सर्वत्र सर्व शक्ति आहे. अर्थात नाममात्र भेद आहे. उपास्य तत्व एकच आहे.

'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति अग्निं यमं मातरिश्वानमाहु: ' इ. श्रुति वचने हेच सांगतात. त्यामुळे सर्व देव नमस्कार केशवं प्रति गच्छति ' म्हणतात. त्याप्रमाणे गीता घोष करते—

यो यो यां यां तनुं भक्त: श्रद्धयार्चितुमिच्छति ।
तस्य तस्याचलां श्रद्धां तामेव विदधाम्यहम् ॥
सतया श्रद्धयायुक्त: तस्याराधनमीहते ।
लभतेच तत: कामान् मयैव विहितान्हितान् ॥

गीतेची ही देवताविषयक अनन्यता आहे. अव्यभिचारिणी हे भक्तीला प्रत्येक वेळी विशेषण दिले जाते ते यासाठीच.

या दृष्टीने मध्व, रामानुज, वल्लभ, या संप्रदायांची एकेश्वरी भक्ति अत्यंत प्रशंसनीय व आदर्शभूत आहे. गाणपत्याचार्य भुशुंड ऋषींची अशी कथा आहे की त्यांच्या भक्तीने गणेश प्रसन्न झाले व म्हणाले, भुशुंडा! डोळे उघड मी तुला दर्शन देण्यासाठी उभा आहे. पण डोळे न उघडताच भुशुंड ऋषींनी उत्तर दिले 'माझा उपास्य येथ उभा नाही. मी तुला पाहू इच्छित नाही ' त्यांची ती अव्यभिचारी भक्ति पाहून देवानांहि तशा रूपाने दर्शन देऊन त्याला कृतार्थ करावे लागले इत्यादि उदाहरणावरून हेच लक्षात येते

याचा अर्थ मात्र असा नव्हे की सर्व देवता एक रूपच असल्यामुळे विष्णूच्या तुळशी गणपतीला आणि गणपतीच्या दुर्वा देवीला वहाव्या! जोवर आपण देहावर आहो तोवर व्यवहार जसाचा तसाच करतो तर देवाचेही उपचार त्या उपाधीच्या अनुसारच केले पाहिजेत. थोडक्यात—

'भावाद्वैतं सदा कुर्यात् क्रियाद्वैतं न कर्हिचित '

हे लक्षात असू द्यावे म्हणूनच गीतेनेही 'पण्डिता समदर्शिन ' असे म्हटले आहे 'सम वर्तिन ' असे सांगितले नाही तात्पर्य अशा अव्यभिचारी-अनन्य ध्येयपरतेनेच साधक कृतार्थ होतो

(५) अखिलं मदात्मकम् —ज्या प्रकारे आपल्या उपास्य देवतेची उपासना कुठवर करावी? वस्तुत उपासकाच्या उपासनेला स्थलकालाची मर्यादा नाही. "तथैवाऽमृति धारयेत् " मरेपर्यंत तेच करीत राहणे हेच साधकाचे इतिकर्तव्य आणि भक्ति ही परमप्रेमस्वरूप असल्यामुळे खऱ्या भक्ताला ती सोडून राहवणारही नाही तथापि या भक्तिरूपी परीक्षेत उत्तीर्ण होण्याची एक सीमा रामगीतेत सांगितली आहे.

"यावत् पश्येत्खिलं मदात्मकं तावन्मदाराधन तत्परो भवेत्।"

सर्वत्र आपल्या इष्ट देवतेचाच साक्षात्कार झाला पाहिजे गीता हेच म्हणते—

" अनन्येनैव योगेन मां ध्यायन्त उपासते "

अनन्य स्मरणाने-चिंतनाने देवता साक्षात्कार होतो त्या देवाशी आपण गुजगोष्टी करू शकतो त्याला जेऊ खाऊ घालू शकतो पण तरीहि उपासना पूर्णतेला पोचली असे होत नाही. सन्तवर्य नामदेवाचे उदाहरण याविषयी प्रसिद्ध आहे देवाचा लाडका भक्त असूनहि गोरोबा काकानी ते "कच्चे मडके" च ठरविले. औंढ्या नागनाथाला संत विसोबा खेचरानी दृष्टि देताच "यत्र यत्र मनो याति तत्र तत्र समाधय " असा अनुभव त्यांना आला. संत नरहरि सोनाराने पंढरीच्या विठोबालाही महादेवरूपच पाहिले, नि समर्थांनी "येथे का रे उभा रामा " म्हणूनच आळविले. भक्ताने एकाच ठाऊक विशिष्ट मूर्तीत देव पाहणे ही त्यामानाने पहिलीच पायरी आहे.

येते. नाहीतर "विभक्त" राहणारा भक्त कसा होऊ शकेल ? गीतेमध्ये सिद्धि प्राप्त झाली तरी ब्रह्मप्राप्ति कशी होते हे सांगताना—

"सम सर्वेषु भूतेषु मद्भक्तिं लभते पराम्–।
भक्त्या मामभिजानाति तत्त्वतो ज्ञात्वा विशते तदनन्तरं ॥

असा क्रम दिला आहे भक्तीचे पर्यवसान ज्ञानात व ज्ञानानंतर ब्रह्मप्राप्ति अनन्तर–अंतर न ठेवता होते असा निर्णय दिला आहे चौथ्या अध्यायात अनेक यज्ञाचा उल्लेख करून "श्रेयान् द्रव्यमयात् यज्ञात् ज्ञानयज्ञ परंतप्" हे ज्ञानाचे यज्ञरूपत्व जसे दाखविले तसे सातव्या अध्यायात 'चतुर्विध" भक्ताचा जो उल्लेख आहे तो "उदारा सर्व एवैते ज्ञानीत्वात्मैव मे मतम्" हे ज्ञानी–जीव व आत्मा–परमात्मा याचे ऐक्यच गीतेला दाखवायचे आहे हे भगवद्गीतेतील महावाक्य आहे. कारण देहादि संघाताला ज्ञानित्व किंवा विद्वत्ता नसून निरुपाधिक ज्ञान हेच आत्म्याचे स्वरूप आहे आणि न ज्ञान नि ब्रह्म दोन नाहीत यामुळेच जीवब्रह्मैक्यातच अनन्यतेचे पर्यवसान आहे

**गुरुदेवतात्मा** —हे खरे अनन्यत्वरूप जीवब्रह्मैक्य साक्षात्कार कशाने होतो, याबद्दल गीतेने एक गुह्यतम साधन सुचविले आहे ते गुरूच्या मुलाऱ्याच लक्षात येण्यासारखे आहे. सर्व गीतेचे आलोचन केले तर श्रीकृष्णाने आपला स्वत चा मोठेपणा गाइल्यासारखा दिसतो

"मयि सर्वाणि कर्माणि सन्यस्य"
"मन्मना भवमद्भक्तो"
"अहं सर्वस्य प्रभव मत्त सर्व प्रवर्तते"
"मामेक शरण व्रज"

अहत्वा सर्व पापेभ्यो मोक्षयिष्यामि अशा प्रकारे जे काय करायचे ते माझ्या उद्देशाने कर असे आपणच सांगणे कितपत प्रशस्त आहे ? असा एक प्रश्न आपल्यापुढे उभा राहतो "अहंकार बल्दर्प" "अहंकार माश्रित" असे म्हणून अहंकाराच्या वाऱ्याचाही सर्वस्वी त्याग करायला सांगणाऱ्या भगवन्ताने सर्व उपदेश अहं कारानेच केलेला दिसतो याचे रहस्य काय असावे ?

तेथील "अहं" हा शब्द 'शास्त्रदृष्ट्या तूपदेशो वामदेव वत्' या ब्रह्मसूत्रोक्त–न्यायाप्रमाणे शास्त्रीय दृष्टीने श्रीकृष्णोऽहं या अर्थाने वापरला नसून त्यातील ईश्वरतत्त्वाला उद्देशून वापरला आहे, हे त्याचे शास्त्रीय समर्थन आहे हे खरे, तरीपण—

'यच्छ्रेय स्यान्निश्चित ब्रूहि तन्मे"

म्हणून अनन्य शरणतेने नि श्रेयसाचा मार्ग विचारणाऱ्या अर्जुनाला "माझेच स्मरण कर व युद्ध कर, मीच सगळ्याचा कर्ता धनी आहे" इत्यादि स्वत चाच बडेजाव सांगण्या पेक्षा 'तू परमेश्वराला शरण जा, तो सर्व काही करील' असे भाषणच व्यवहार्थ वाटत नाही काय ? पण संपूर्ण गीतेत कोठे परमेश्वराचा पत्ता नाही सर्वत्र मी–मी–मी ही काय भानगड आहे ! नाही म्हणायला फक्त अठराव्या अध्यायात तवढे एक वाक्य आहे 'ईश्वर सर्वभूताना हृद्देशेऽर्जुन तिष्ठति' म्हणून पण तोहि 'अहमात्मा गुडाकेश सर्व भूताशयस्थित ' या वाक्याची आठवण ठेवून अर्जुन आपल्याशिवाय निराळा ईश्वर कोणी समजणार नाही ही खात्री झाल्यावरच शेवटी आलेले वाक्य आहे. तेव्हा त्याचे बृहत शोधले पाहिजे

पहिल्या अध्यायात अर्जुनाचा विषाद पाहून भगवन्तानी प्रथम व्यावहारिक उत्तराने त्याला उत्तेजन देण्याचा प्रयत्न केला पण जेव्हा अर्जुन—

'कार्पण्य दोषोपहतस्वभावा पृच्छामि
त्वा धर्मसमूढचेता ।
यच्छ्रेय स्यान्निश्चित ब्रूहि तन्मे शिष्यस्तेऽहं
शाधि मा त्वा प्रपन्नाम् ॥

अशा प्रकारे काकुळतीला येऊन शिष्यभावाने प्रपन्न झाला तेव्हा कोठे भगवन्ताने आपले खरे ताड उघडले यावरून भगवान येथे श्रीकृष्ण म्हणून किंवा ईश्वर म्हणून उपदेश करीत नसून गुरु–सद्गुरु या नात्याने ही गीता गात आहेत, हे सूचित होते. कारण 'गुरु. साक्षात् पर ब्रह्म' (म्हणजे इतर असाक्षात् आहे !)

या पद्धतीच्या उपदेशात एक परपरागत रहस्य आहे साधकाने प्रथम आपापल्या इष्ट देवतेची उपासना करून वास्तविक मुमुक्षुता मिळवावयाची असते. पण अन्तिम आत्मसाक्षात्कार 'गुरुदेवतात्मा' होण्यानेच प्राप्त होतो आधी 'जो जयाचा घेतला गुण तो तो म्या गुरु केला जाण' पण शेवटी 'परी मोक्षदाता गुरु वेगळाची' किंबहुना देवता एक, तिचा मन्त्र दुसरा, त्याचा उपदेश तिसरा व इतर साधन सामुग्री अनंत या द्वैतात मन फार

ठेले ठेवून अद्वैतात्मक अध्यात्मसाक्षात्कार होणे कठीण आहे. यासाठी सर्व सद्गुरुरूपच जाणून एकत्वानेच निधिध्यासन करणे हा आत्मानुभूतीचा सरळ सोपा व परंपरागत मार्ग येथे सुचविण्यासाठीच भगवताने हा सर्व गुह्यतम योग प्रकट केला आहे.

'नैषा तर्केण मतिरापनेया प्रोक्ता न्येनैव सुज्ञानाय प्रेष्ठ।'

'नायमात्मा प्रवचेन लभ्यो न मेधया न बहुना श्रुतेन।

यमेवैष वृणुते तेन लभ्य. तस्यैष आत्मा विवृणुते तनूं स्वाम्।'

'अनन्यप्रोक्ते गतिरत्र नास्त्यणीयान् ह्यतर्क्यं मणुप्रमाणात्॥'

इत्यादि कठकाठक मन्त्राचे भाष्य करिताना श्रीमदाचार्यांनी 'अन्येनैव' म्हणजे सद्गुरुणा 'यमेव' सद्गुरुम् 'अनन्य: सद्गुरु तेन प्रोक्ते' असाहि अर्थ दिला आहे. तो याच उद्देशाने.

कौषीतकीय उपनिषदात इन्द्र व प्रतर्दन यांची आख्यायिका आली आहे. ती हेच सुचविते. प्रतर्दनाच्या पराक्रमी साह्याने इन्द्राला असुरावर जय मिळविता आला. त्यामुळे इन्द्राने प्रसन्न होऊन प्रतर्दनाला 'वर वृणीष्व' म्हटले. प्रतर्दन म्हणाला

'त्वमेव मे वृणीष्व य त्व मनुष्याय हिततम मन्यसे'

तूच माझ्यासाठी हिततम वर मागून घे. तेव्हा इन्द्राने

'मामेव विजानीहि'

असा सद्गुरुपासनेचाच उपदेश केलेला दिसतो. याच दृष्टीने गुरु–देवता–शास्त्र आणि आत्मा यांची अनन्यता जाणून अखंड चिन्तन हाच अध्यात्म लाभाचा आन्तरिक मार्ग आहे व हेच भगवन्ताचे गीतारहस्य आहे. याप्रमाणे क्रमश: या अनन्यतेच्या मार्गाने खरे योगक्षेम प्राप्त होतात. हे

*'अनन्याश्चिन्तयन्तोमाम्'*

या भगवदीय अभिवचनाचे तात्पर्य आत्मलाभार्थ यथामति सद्गुरुचरणी सादर केले आहे.

—प. यज्ञेश्वरशास्त्री कस्तुरे
नांदेड

# भवरोग चिकित्सा

भव म्हणजे संसार ( संसार म्हणजे लग्न केल्यानंतर बायको मुलांसह प्रपंच करणे नव्हे ) कर्म गतीने एक शरीर टाकून दुसरे धारण करणे यालाच जन्ममरण संसार परंपरा म्हटले आहे. मनुष्याला ( जीवाला ) तीन शरीरे मानली आहेत. स्थूल, सूक्ष्म व कारण ही तिन्ही शरीरे रोगग्रस्त आहेत. हडामांसाच्या स्थूल शरीराला क्षय, उदर, अर्धांग अशासारखे मोठे व दमा, खोकला, ताप, डोकेदुखी अशासारखे प्रसंगोपात वातपित्तात्मक लहान असे अनेक रोग होत असतात. तसेच सूक्ष्म शरीरालाहि काम, क्रोध, मत्सर, चिंता, असूया, द्वेष, अभिनिवेश – इत्यादि विकार सूक्ष्म देहाला प्रसंगोपात हैराण करीत असतात. कारण शरीराला फक्त एकच पण मोठा रोग आहे व तो म्हणजे अज्ञान हे होय. हे अज्ञानच सर्व सुखदुःखाचे मूळ आहे. या प्रमाणे या जीवाच्या तिन्ही शरीराला त्या त्या रोगानी नेहमी हैराण केलेले असते. अशा रितीने हा जीवात्मा तिन्ही शरीराच्या त्रिविध रोगानी ग्रस्त होऊन अनेक योनीतून पुनः पुनः जन्ममरणाच्या फेऱ्यात अडकून चकरा मारीत फिरत असतो. हाच तो मोठा भवरोग जीवाच्या पाठीस लागला आहे. अर्थात या रोगातून त्याला कायमचा मुक्त करण्याकरिता त्याला कोणती मात्रा लागू पडेल याची चिकित्सा ( चर्चा ) केली पाहिजे.

रोगाचे निदान करावयाचे खरे ! पण तत्पूर्वी हा जीव नावाचा प्राणि कोण ? तो कसा निर्माण झाला हे अगोदर पाहिले पाहिजे आणि मग त्याला रोग का झाला ? कसा झाला व त्याला त्यातून कसे मुक्त करावयाचे हा नंतरचा प्रश्न आहे. आरंभी काहीच नव्हत. सत्‌हि नाही व *असत्‌हि नाही असे नासदीय सूक्त म्हणते. मग तेथे* जीवाच्या नाव-गावाचा ठावठिकाणा तरी कुठला ! पण जुन्यातील जुनी एक म्हातारी तिने अशाच शून्य व शांत वेळी प्रथमच एक वाणी ऐकली—

एकोऽहं बहू शाम्प्रजायेय '

असा उच्चार झोपेतून जागं यावी व तोंडातून आपोआप शब्द निघावेत त्याप्रमाणे आवाज ऐकला, पण या म्हातारीने त्या शब्दकर्त्याला पाहिले नाही. म्हातारीने आपल्या खुणेकरिता त्याचे नाव ब्रह्म असे ठेविले आहे. त्या म्हातारीला श्रुति असे म्हणतात. आरंभापासूनच सर्वांचा पूर्ण विश्वास-श्रद्धा या म्हातारीवर असल्यामुळे सर्व ऋषिमुनींनी त्याला ब्रम्ह म्हणूनच संबोधिले. ही म्हातारी आपल्या श्रेष्ट गुणानी मानवाना परमश्रध्देय व वंदनीय ठरली आहे

अज, अनादि, अनामरूप अशा ब्रह्माचा 'एको अहं' हा जो पहिला संकल्प उद्गार यातच जीवाचे मूळबीज आहे 'संकल्पन मनोबंध' 'निःसंकल्पो मोक्ष उच्यते'— असे म्हटले आहे शिवाय—

'अनेन जीवेन आत्मना अनुप्रविश्य
नामरूपे व्याकरवाणि'

या ब्रह्माने जीवरूपाने अनेक नामरूपे धारण केली असे ही श्रुतीच सांगते या ब्रह्माजवळ आज्ञाधारक पण अघटित शक्ति असलेली माया या नावाची एक स्त्री आहे ती उपाधीने युक्त झाली की तिला अविद्या म्हणतात समुद्रामध्ये वादळ झाले की मोठ्या लाटा निर्माण होतात सामान्य वाऱ्याने लहान लाटा उत्पन्न होतात लाटा अनेक लहान मोठ्या दिसल्या, पण पाण्यात भेद नाही ते एकच—तसे उपाधिने जीव अनेक निर्माण झाले तरी ते ब्रह्माचेच अंश होत कागदाचे अनेक फुगे तयार केले व ते स्वैर सोडून दिले ते कागदाच्या उपाधीने भिन्नभिन्न दिसले तरी त्या प्रत्येकातील पोकळी (आकाश) भिन्न नाही फुगा फुटला की फुग्यातील आकाश व बाहेरील आकाश एकच दिसते कागदाच्या उपाधीने आकाशातील भेदाचा भास होतो मनुष्य, कुत्रे, मांजर, गाढव, पक्षी हे भेदही उपाधीचेच होत

'शुनि चैव श्वपाके च पंडिता समदर्शिन'

असे गीता सांगते

प्राथमिक संकल्पाने आत्मस्वरूपापासून च्युत झालेले ब्रह्मच जीवभावाला कसे प्राप्त होते हे थोडक्यात येथे पाहिले आता या जीवाला जन्ममरण–संसार–कसा प्राप्त होतो ते पाहू मी एकटा आहे–एको अहं प्रजारूपाने पुष्कळ व्हावे हा जो अहंकार बीजांकुर तो स्वयं गतीने वाढू लागतो, जसा एखाद्या धान्याचा अंकुर प्रथम जमिनीतून वर येतो नंतर त्याचे द्दल बनते व पुढे त्याला पाने फुटू लागतात तसेच जीवाच्या अहं अंकुरातून प्रथम बुद्धि व मन या दोन पाकळ्या निर्माण होतात नंतर ज्ञानेंद्रिय व रूप पाने निर्माण होतात पाटाने पाणी जसे वाफ्याकडे वहात जाते त्याप्रमाणे हा जीव बुद्धीने, विचार मनाने संकल्प विकल्प करीत त्या त्या ज्ञानेंद्रियेवाटे त्या त्या विषय लोभाने बहिर्मुख बनतो व मूळचे ब्रह्मस्वरूप विसरतो

'पराचि खानि व्यतृणत् स्वयंभू
तस्मात् परा पश्यति नांतरात्मन्'

असे कठवल्लीत म्हटले आहे याप्रमाणे बहिर्मुख झालेल्या जीवाच्या हातून विषय लोभाने धर्माधर्म, नीति अनीति व तन्मूलक पाप पुण्ये घडत गेल्याने ते भोगण्याकरिता स्वर्ग-नरक तसेच उर्वरीत व पुनः घडलेली कर्मे भोगणे करिता जन्ममरण संसार फेरे याप्रमाणे जीवाच्या पाठीमागे लागत गेले आहे

आता या जीवाच्या जन्ममरण परंपरेला मुख्य कारण कोण ते पाहू! ब्रह्माचे स्वरूप सच्चिदानंद मानलेले आहे जीव हा त्याचाच अंश आहे तो स्वतः आनंदरूप निर्गुण असल्यामुळे त्याला बाह्य विषयाच्या आनंदाची जरूर काय, शिवाय सगुण विषय निर्गुण ब्रह्मापर्यंत पोचूच शकत नाहीत जीवाचे शरीर तर हाडा–मासाचे जड ठरलेले! गाढ झोपेत असलेल्या मनुष्याच्या नाकापुढे अत्तर नेले किंवा त्याच्या तोंडात पेढा घातला तर त्यावेळी त्याचा वास वा गोडी कळत नाही अर्थात जिव्हा, नाक इ. ज्ञानेंद्रियहि जडच ठरली! मग त्या त्या ज्ञानेंद्रियाला त्या त्या विषयाचे ज्ञान व सुख कसे होते हा प्रश्न उत्पन्न होतो जागेपणी अत्तराचा सुगंध येतो जिलबी गोड लागते. याप्रमाणेच त्यांचे विषयही अनुभूत होतात हे कसे व कशामुळे घडते? याला कारण कोण? असा प्रश्न पडतो पण याबद्दल सूक्ष्म दृष्टीने विचार केल्यास याला कारण मनच आहे असे दिसून येईल झोपेत इंद्रियांचे ठिकाणी मन नसते, जागृत अवस्थेत इंद्रियाचे ठिकाणी मनाचे सानिध्य असते म्हणून त्या त्या इंद्रियांना त्यांच्या विषयाचा अनुभव येतो पण हे मन मात्र स्वतः स्वतंत्रपणे कोणताच विषय घेण्याला असमर्थ आहे त्याला इंद्रिये नाहीत ते ज्ञानेंद्रियांचेद्वारा जीवाला विषयसुख देऊ शकते मन हे चैतन्यरूप आत्म्याचे दृष्टीने पाहिल्यास जड व देहाच्या दृष्टीने पाहिल्यास चेतन असल्यासारखे भासते हे मनच आत्मा व देह या दोहोमध्ये झोपाळ्याप्रमाणे किंवा घड्याळातील लंबकाप्रमाणे दोन्हीकडे डोलत असते आणि जड देह व चेतन आत्म्याची सांगड तयार करून व आपणच त्या सांगडीवर स्वार होऊन या जीवाला भवसागरात फिरवीत असते अर्थात् यावरून या भव रोगाचे मूळ कारण हे मनच आहे हे आपण आता शोधून

वाढले आहे. आणि आमचे हे रोग निदान बरोबर आहे त्याबद्दल याला उपोद्बलक असे शास्त्राचे आधारही खाली थोडे दिले आहेत.

मन एव मनुष्याणा कारण बंधमोक्षयोः।

बंधाय विषयासंगि मुक्त्यै निर्विषयं स्मृतम्॥

मनच मनुष्याच्या बंधमोक्षाला कारण आहे. विषयासक्त बंधाला व निर्विषय मोक्षाला कारण होते.

चित्तायत्तमिदं सर्वं जगत् स्थिर चरात्मकम्।

चित्ताधीन व तो राम बंधमोक्षावपिस्फुटम्॥

हे स्थिर चरात्मक चित्ताधीन आहे. हे रामा बंधमोक्ष देतील चित्तामुळेच हे स्पष्ट होय.

बद्धोहि वासना बद्धो मोक्षः स्यात् वासनाक्षयः।

( जीव ) वासनेने बद्ध होतो. वासना नाशाने मुक्त होतो.

यावरून मनच भवरोगाला कारण आहे. म्हणून एखाद्या रोगाप्रमाणे त्याचाहि नाश केल्याशिवाय जीवाचा जीवभाव नष्ट होऊन तो मुळच्या ब्रह्मरूपाला प्राप्त होणार नाही हे उघड आहे. अर्थात् आता आपणाला मनोनाशाच्या औषध उपचाराकडे वळले पाहिजे.

शास्त्रकारानी व पारमार्थिक साम्प्रदायीकांनी मनो निग्रहपूर्वक मनोनाशाचे अनेकानेक उपाय, मार्ग दाखवून दिलेले आहेत. त्यातील प्रमुख म्हणजे ज्ञान, भक्ति, योग हे मार्ग होत शिवाय ध्यान, अजपाजप, अखंड नाम स्मरण, वैदिक कर्मानुष्ठान, आत्मानुसंधान अशासारखी आणखी उदंड साधने सांगितली आहेत त्यातील काही पर्यायाने व काही साक्षात् मनोनाशाला उपयोगी पडणारी आहेत. ज्याना जे साधन आवडेल, करण्यास सोपे वाटेल त्यांनी ते आवश्य करावे. आमच्या मते मनोनाशाचे सर्वात परिणामकारी साधन म्हणजे ध्यान हेच होय कारण मनाशीच साक्षात् त्याचा संबंध येतो. मन हे संकल्प विकल्पात्मक चंचल आहे. त्याला युक्तीनेच हळूहळू ताब्यात आणले पाहिजे सर्व बाजुनी धावणाऱ्या मनाला सर्व तऱ्हेने कोंडण्याचा निग्रह करू नये त्याला प्रथम एका बाजूने खुले सोडावे. त्याला प्रथम तशी सवय लावावी. ध्यानाकरिता प्रतीक उपास्य देवतेचे असावे. बुद्धीने त्याचे चित्र निर्माण करावे व मनाच्या डोळ्यानी ते पहात रहावे. प्रथम प्रथम जमत नाही पण सवयीने सोपे होते. आसनावर कमर, पाठ व मान ताठ ठेऊन एका रेषेत बसावे. मूर्तीचे प्रतीक डोळे झाकून खालून वर व वरून खाली पहात जावे मधून मधून सर्व मूर्तीही डोळ्यापुढे आणावी. मन प्रथम स्थीर रहात नाही. ते ध्यान सोडून भेल्हा निसटून गुंगारा देते हे कळत नाही त्याला प्रत्याहार करून पुनः ध्यानास जुंपावे लागते. जितके एकाग्र होईल तितके ते शुद्ध होत जाते. शुद्ध झालेले मन निर्बल होते. त्यामुळे त्याचे चांचल्य कमी होते. ध्यानाच्या वेळीच मनात संकल्पविकल्प मागील गोष्टीचे स्मरणीय चिंतन व भावी गोष्टीबद्दल मनोराज्य इ. सुरू होते चेंडू आपटला की वर उडतो तसे मनाला कोंडू लागले की एरवी स्वस्थ असलेले मन बाहेर पडू लागते. मनाचा स्वैराचार म्हणजे त्याला खुराक दिल्या-सारखे होते. ते जितके संकल्परहीत व स्थीर ठेवावे तितके निर्मल निर्वासन होते. म्हटले आहे –

सयोजित परोन्वित शुद्ध निर्वासन भवं।

ततस्तू कल्पना शून्य आत्मता याति राघव॥

परब्रह्माचे ठिकाणी चित्त लावण्याने ते शुद्ध वासनारहीत, कल्पनाशून्य होऊन आत्मरूपाला प्राप्त होते तमोगुणामुळे आळस, झोप, रजोगुणामुळे संकल्प, विकल्प, मनोराज्य, आणि सत्वगुणामुळे स्थैर्य प्राप्त होत असते. एरवी स्वस्थ असलेले मन ध्यानाचे वेळी चंचल होते. कारण बंधनाने आत्म नाश होणार हे जणू ओळखून ते जिवंत राहाण्याकरिता बाहेर पळण्याची धडपड करीत असते. ध्यान अभ्यासाने जसजसे स्थीर होत जाते, त्याप्रमाणात मनस्थैर्यामुळे मनाला आनंद व शांती प्राप्त होत जाते हे ध्यानच काही दीर्घ काळाच्या अभ्यासाने समाधीमध्ये परिणत होते व समाधीच्या निरंतर अभ्यासाने कापूर किंवा सिपरीट उघडे राहिले म्हणजे आपोआप जसे नाहीसे होते तसे समाधीच्या अभ्यासाने मनोनाश प्राप्त होतो.

भवरोग चिकित्सा करणे एवढीच लेखाची मर्यादा ठरली असल्यामुळे यथामती करून भवरोगाला मनच कारण आहे व ते नष्ट करणे हाच त्याला उपाय आहे ते नष्ट करण्याच्या उपायापैकी ध्यान हे एक महत्वाचे साधन आहे हे दाखवून त्याच्या अभ्यासाचे यथामती दिक्दर्शन केले आहे. त्याकडे विद्वत्‌जनानी क्षीर नीर न्यायाने पहावे

—काव्यतीर्थ वामनबुवा ब्रह्मचारी, जयसिंगपूर

# सांख्यातून भक्तीकडे

## प्रकृति आणि पुरुष

प्रकृति आणि पुरुष या कपिल महामुनींच्या सांख्यशास्त्रातील संज्ञा असून परमेश्वर वा परमात्मा याचे स्वरूप समजाऊन घेण्यासाठी त्या उपयुक्त आहेत. सांख्य हा शब्द स+ख्या या धातूपासून निघाला असल्यामुळे त्याचा पहिला अर्थ 'मोजणारा' असा होतो. कापिल शास्त्रातील मूलतत्त्वे मोजकी २५ सच असल्यामुळे त्यास 'मोजणारे' या अर्थी सांख्य हे विशिष्ट नाव प्राप्त झाले. सांख्य शास्त्राचा पहिला सिद्धांत असा आहे की या जगात नवे असे काहीच उत्पन्न होत नाही. या सृष्टीतील पशु, मनुष्य, दगड, धातु, पाणी, वायु इ. अनेक पदार्थ आपल्या इंद्रियास गोचर होतात आणि त्यांची रुपे आणि गुण ही निरनिराळी आहेत. हा निरनिराळेपणा मूळचा किंवा कायमचा नसून मुळात सर्व वस्तूंतील द्रव्य एकच आहे असा सांख्याचा सिद्धांत आहे. जगातील सर्व पदार्थांतील हे जे मूलभूत द्रव्य त्यास सांख्यशास्त्रात 'प्रकृति' असे म्हणतात. प्रकृति याचा अर्थ 'मूळचे' असा असून त्या प्रकृतीपासून पुढे होणाऱ्या पदार्थांस 'विकृति' किंवा 'मूलभूत द्रव्याचे विकार' असे नाव देतात

परन्तु सर्व पदार्थांत द्रव्य जरी एकच असले तरी निरनिराळ्या पदार्थांत निरनिराळे अनेक गुण आहेत म्हणून पदार्थांच्या गुणांचे प्रथम निरीक्षण करून त्या गुणांचेच सांख्यांनी सत्त्व, रज व तम असे तीन वर्ग केले आहेत. या तीन गुणांपैकी ज्ञान किंवा जाणतेपणा हे सत्त्वाचे लक्षण आहे. अज्ञान हा तमाचा धर्म आहे आणि रजोगुण हा बऱ्या किंवा वाईट कार्याला प्रवृत्त करणारा आहे. हे तिन्ही गुण कधीही निरनिराळे असू शकत नाहीत. सर्व पदार्थांत सत्त्व, रज आणि तम या तिघाही गुणांचे मिश्र अस्तित्व आहे. किंबहुना हे तीन गुण म्हणजेच प्रकृति होय

या तीन गुणांच्यापैकी प्रत्येकाचा जोर आरंभी सारखाच असल्यामुळे प्रथमतः प्रकृति साम्यावस्थेमध्ये असते ही साम्यावस्था जगाच्या आरंभी होती व जगाचा लय झाला म्हणजे पुन्हा होईल. साम्यावस्थेत सर्व स्तब्ध-शांत असते. पण पुढे हे तीन गुण कमीजास्त होऊ लागले म्हणजे प्रवृत्त्यात्मक रजोगुणामुळे मूळ प्रकृतीपासून निरनिराळे पदार्थ उत्पन्न होऊन सृष्टीला आरंभ होतो

सत्त्व, रज व तम हे तीन गुण प्रथम साम्यावस्थेत असतात. कमीजास्तपणा कसा उत्पन्न होतो या प्रश्नास सांख्यकार 'हा प्रकृतीच्या अंगचा मूळ धर्म आहे' असे सांगतात

साम्यावस्थेत असणारी मूळ प्रकृती अव्यक्त म्हणजे इंद्रियांना अगोचर असणारी असते. तिच्यातील सत्त्व, रज व तम या तीन गुणांच्या अन्योन्य संयोगाने उत्पन्न होणारे जे अनेक पदार्थ आपल्याला इंद्रियगोचर होतात त्यास व्यक्त असे सांख्यशास्त्रात नाव आहे. सृष्टीच्या मुळा

रुपी प्रलयकर पदार्थ व्यक्त प्रकृतीच्या रुपाचा स्मृ नतर ता व्यक्त म्हणज इंद्रियगोचर हातो प्रलयकाली या व्यक्त स्वरुपाचा नाश झाला म्हणज पुन्हा अव्यक्त प्रकृतीत मिळून जाऊन अव्यक्त बनतो

ज्ञाता व ज्ञेय, पहाणारा व पहाण्याची वस्तु हे दोन पदार्थ मुळातच भिन्न भिन्न आहेत असा साख्याचा सिद्धात आहे ज्याला आपण आत्मा म्हणतो त्यालाच 'पुरुष' किंवा 'ज्ञ' (ज्ञाता) असे म्हणतात हा ज्ञाता प्रकृतीहून भिन्न असल्यामुळे स्वभावत च तो सत्त्व, रज व तम या प्रकृतीच्या ३ गुणाच्या पलीकडचा म्हणजे निर्गुण, निर्विकार आणि जाणणे व पहाणे (ज्ञाता व द्रष्टा) याखरीज दुसरे काही न करणारा असून जगात जी काही घडामोड चालते ती सर्व एकट्या प्रकृतीचीच होय साराश, प्रकृती अचेतन तर पुरुष सचेतन, प्रकृति त्रिगुणात्मक तर पुरुष निर्गुण अशी ही दोन तत्त्वे या सृष्टीत अनादिसिद्ध, स्वयम् आहेत असे साख्यकार सागतात प्रकृति व पुरुष याचा संयोग सुरू झाला म्हणजे सृष्टीतील कर्में सुरू होतात ज्याप्रमाणे नाटकात विविध स्त्रीपात्रे प्रेक्षकाच्या मनोरजनार्थ विविध सोंगे घेऊन नाचतात त्याप्रमाणे 'पुरुषाकरिता' सत्त्व रज, तमाच्या कमीजास्तपणाने अनेक सोंगे घेऊन विश्वपटलावर प्रकृति त्यापुढे नाचत असते प्रकृतीच्या या नाचास भुलून मोहाने किंवा वृथाभिमानाने प्रकृतीचे हे कर्तृत्व 'पुरुष' आपल्या अगावर फुकट ओढून घेऊन सुखदु खाच्या पाशात आपणास जोपर्यंन्त गुतवून घेत असतो तोपर्यन्त त्याला कधीही मोक्ष मिळावयाचा नाही पण ज्या दिवशी त्रिगुणात्मक प्रकृति निराळी आणि मी निराळा असे ज्ञान 'पुरुषास' होते त्यादिवशी तो 'मुक्तच' आहे

## शिव आणि शक्ति

या प्रकृतीलाच माया, महामाया, देवी, महादेवी, शिवा, पार्वती, भगवती शक्ति, माता इत्यादि नावे आहेत तसेच साख्यकार ज्याला पुरुष म्हणतात त्याला भगवान्, नारायण शिव, महादेव, परमेश्वर, परमात्मा, परब्रह्म इत्यादि नावे दिली जातात या सज्ञामुळे गोंधळून जाण्याचे कारण नाही वरवर ही दोन वेगळी वाटली तरी ती वास्तविक एकच आहेत 'शिवशक्त्यारभेद ' शिव आणि शक्ति अभेदात्मक आहेत हा इत्यर्थ

'न शिवेन विना देवी न देव्या च विना शिव ।
नानयोरन्तर किंचित् चन्द्रचन्द्रिकयोरिव ॥'

असे आगमानी सागितले आहे चन्द्र आणि त्याचे चांदणे हे जसे अभेदात्मक तसेच शिव आणि शक्ति ही अभेदात्मक समजावी

शिव आणि शक्ति याचे ज्ञान होण्यासाठी

'प्रसर भासयत् शक्ति सकोच भासयत् शिव ।'

असे सागितले आहे शक्तीची प्रवृत्ति विस्तारवादी व शिवाची सकोचवादी असे म्हटल्यास वावगे होणार नाही किंवा शक्ति ही प्रवृत्त्यात्मक तर शिव निवृत्त्यात्मक ही सृष्टि म्हणजे सकोच व विकास (विस्तार) याचा खेळ आहे शक्तीमुळे सृष्टीचा विस्तार होतो (प्रसर) असे भासते आणि शिव तिला आपल्यात सकुचित म्हणजे लीन करतो याला उदाहरण कोळ्याचे देता येईल कोळी आपल्या शरीरातून तन्तू बाहेर काढतो व एकादे विस्तृत जाळे निर्माण करतो हाच तन्तू तो पुन्हा आपल्यामध्ये गिळून टाकल्याप्रमाणे विलीनही करतो तात्पर्य शक्ति जेव्हा बलवान् म्हणजे प्रभावी असते तेव्हा ती बहिर्मुख होऊन ससाररचना करते हाच ससाराचा पसारा वा प्रपच होय आणि शिव प्रबल होऊन शक्तीला आपल्यात लीन विलीन करतो त्याला येथे संकोच म्हटले आहे तेव्हा प्रलय होतो विश्वाची उत्पत्ति, स्थिति आणि लय या क्रिया एका चक्राप्रमाणे सतत चालणाऱ्याच आहेत विश्व निर्माण होण्यापूर्वी काय स्थिति होती हे भगवान् मनूने व इतर शास्त्रकारानी मोठे मार्मिकपणे सागितले आहे

आसीदिद तमोभूत अप्रज्ञात अलक्षण ।
अप्रतर्क्यं अविज्ञेय प्रसुप्तमिव सर्वत ॥

सामान्य माणसाची बुद्धि जेथपर्यन्त चालते त्या दृष्टीने हे सर्व विश्व निर्माण होण्यापूर्वी अशी एक अवस्था होती की त्याचे ज्ञान ज्ञात नाही त्याचे काही लक्षण नाही त्याविषयी काही तर्क चालत नाही अविज्ञेय म्हणजे जाणण्यास अशक्य जणू काही प्रसुप्त म्हणजे झोपलेल्या माणसाच्या अवस्थेसारखे सर्व काही होते परन्तु या बाबतीत आपल्या अध्यात्मशास्त्राने त्या अवस्थेत 'परमेश्वर, परमात्मा' नामक अविनाशी स्वरूप असल्याचे ज्ञान देऊन त्यावर विस्तृत प्रकाश टाकला आहे

सदैकत्वं न भेदोऽस्ति सर्वदैव ममास्य च।
योऽसौ साहमहं योऽसौ भेदोऽस्ति मति विभ्रमात्॥

शिव आणि शक्ति या दोन संज्ञामुळे त्यांच्यात भिन्नता आहे असे समजू (देवी भागवत) नये. जो भेद भासतो तो मतिभ्रमामुळे होय. असो.

शक्तीचे स्वरूप विविध आहे व त्या विविध स्वरूपात ही सृष्टि नटलेली आहे. म्हणूनच

'शक्त्या व्याप्तमिदं जगत्'

असे शास्त्राने म्हटले आहे. शक्तीच्या त्या विविध स्वरूपाचा विविध दृष्टिकोनातून विचार करता येतो. त्यापैकी एक दृष्टिकोन असा. गायत्री, सावित्री व सरस्वति या तीन संज्ञा आपण नेहमीच ऐकतो. त्यापैकी गायत्री म्हणजे इच्छाशक्ति, सावित्री म्हणजे क्रियाशक्ति व सरस्वति म्हणजे ज्ञानशक्ति असे शास्त्रांनी सांगितले आहे. प्रभातकाळी सूर्योदय होतो त्यावेळी गायत्रीचा प्रभाव, माध्यान्ही सावित्रीचा प्रभाव व सायंकाळी सरस्वतीचा प्रभाव विशेष करून वर्णिला आहे.

आपल्या देशात 'शक्ति' उपासना पुरातन आहे. या विषयावर शेकडो ग्रंथ झाले आहेत. त्या ग्रंथांचे वर्गीकरण चार प्रकारे केले आहे. अर्थात् हा वेदांचाच भाग आहे. वेद म्हणजे श्रुति, ती वैदिक व तांत्रिक अशी दोन प्रकारची आहे. वैदिक भागाला 'निगम' व तांत्रिक भागाला 'आगम' अशी संज्ञा आहे. वर उल्लेखित चार प्रकार म्हणजे या 'आगमात्मक' भागाचेच होत. ते म्हणजे शैवागम, वैष्णवागम, वैखानसागम, शाक्तागम. हे चार प्रकार म्हणजे चार संप्रदायच होत.

## शक्ति आणि भक्ति

लिंगायत संप्रदायाच्या अनुभव सूत्र ग्रंथात (१।२०) एके ठिकाणी या विषयाचे मोठे मार्मिक विवेचन आहे.

शक्तिरप्रतिमा साक्षात् शिवेन सहधर्मिणी।
साक्षिणी सत्यसम्पूर्णा निर्विकल्पा महेश्वरी॥

तिला शिवाची 'सहधर्मिणी' म्हटले आहे. तिला विविध नावानी संबोधिले जाते. तत्त्व म्हणजे परशिव व त्याची सहधर्मिणी म्हणजे पराशक्ति वा चिदंबरा असे आगमांनी म्हटले आहे. माणसाच्या देहाचे स्थूलपणे अवलोकन केल्यास हे पुढीलप्रमाणे मांडता येईल.

मस्तक हे श्रेष्ठ स्थान. त्या स्थानी शिवशक्ति अभेद रूपाने आहेत. तेथून शक्तीचा प्रपंच सुरू होऊन संसाराचा विस्तार सुरू झाला म्हणजे वरून खाली अशी अनुलोम – प्रवृत्ति होय. ती मूलाधारापर्यन्त येऊन पोचली. अशा स्थितीत ती मूढावस्थेत तेथे निद्रिस्त झाल्यासारखी भासते. तेथून पुन्हा प्रतिलोम मार्गाने म्हणजे निवृत्त होऊन पुन्हा ती शिवाला भेटावयास जाते. याप्रमाणे पहिली प्रवृत्त्यात्मक ती 'शक्ति' व दुसरी प्रतिलोम पद्धतीची निवृत्त्यात्मक ती 'भक्ति' असे अनुभव सूत्रावरून दिसून येते. सारांश, शक्ति ही प्रवृत्त्यात्मक तर भक्ति ही निवृत्त्या'



# श्रीतुकाराममहाराजांचा

# नामयोग

जगाच्या कल्याणाकरिता संतांचे अवतार होत असतात. देवाच्या अवतारात 'धर्मरक्षण', 'साधूंचे परित्राण' आणि 'दुष्टांचा नाश' ही तीन कार्ये होतात. त्यापैकी 'दुष्टांचा नाश' हे तिसरे कार्य वगळून पहिली दोन कार्ये 'संत' करीत असतात. काही अधिकारी संत विदेह मुक्तीतून प्राप्त न होता भगवान् महाविष्णूच्या आज्ञेने वैदिक धर्माच्या रक्षणाकरिता व लोकांना भगवत्प्राप्तीचा मार्ग दाखविण्याकरिता पुनः पुनः अवतार घेतात. असे—

'यावदधिकारमवस्थितिराधिकारिकाणाम्'

(ब्र. सू. ३।३।१९)

या सूत्रावरील भाष्यात श्रीभगवान् शंकराचार्यांनी म्हटले आहे. या नियमाप्रमाणे अखिल भारतात अनेक संत होऊन गेले. त्यातहि महाराष्ट्राच्या वाट्याला तर पुष्कळच संत आले आहेत. महाराष्ट्रातील संत परंपरा अद्यापहि खंडित नाही. अगदी परवापर्यंत—शके १८३६ च्या पूर्वी श्रीदत्तावतारी, महान योगी, धर्मनिष्ठ व भक्त प. प. वासुदेवानंद सरस्वती स्वामी महाराज होऊन गेले. तसेच शके १५७१ च्या पूर्वी वारकरी संप्रदायातील अधिकारी संत श्रीतुकाराममहाराज होऊन गेले. श्रीतुकाराममहाराज सामान्य संसारी नव्हते, तर ते भगवदाज्ञेने मृत्यू लोकात अवतीर्ण झालेले *मार्गदर्शक संत होते. हे त्यांच्याच उक्तीवरून सिद्ध होते.* महाराज म्हणतात—

आम्ही वैकुंठवासी। आलों याची कारणासी।
बोलिले जे ऋषि। साच भावें वर्ताया॥

(गाथाभाष्य २३६)

धर्म रक्षावयासाठीं। करणें आटी आम्हांसी॥
वाचा बोले वेदनीति। करूं संतीं केलें तें॥

(गाथाभाष्य १३७)

धर्माचें पाळण। करणें पाखांड खंडन।
आम्हां करणें हेंचि कामें। बीज वाढवावें नाम॥

(गाथाभाष्य २०६३)

सारांश, वरील उक्तीवरून श्रीतुकाराममहाराज जगाच्या कल्याणाकरिता अवतीर्ण झालेले एक महान् संत होते, हे स्पष्टच दिसते. महाराजांनी गाथेच्याद्वारा जो जगाला उपदेश केला तो मुख्यतः नामयोगाचा केला आहे. मूळ गाथेत 'नामयोग' शब्द नाही परंतु 'यज्ञ' शब्द हा जसा व्यापक अर्थाचा आहे तसा 'योग' शब्दहि आहे. म्हणूनच गीतेत 'द्रव्ययज्ञ', 'तपोयज्ञ' हे शब्द जसे आले आहेत तसे 'कर्मयोग', 'सांख्ययोग' असे शब्द आले आहेत. योग शब्दाचा सामान्य अर्थ 'युज्यते येन इति योगः' ज्या साधनाने जीव परमात्म्याशी संबद्ध होतो त्याला 'योग' म्हणतात. हरीचे नाम घेणे हासुद्धा योगच आहे. *कारण नामाचा आणि हरीचा* तादात्म्य संबंध आहे. कारण, 'नाम' शब्दरूप

आहे. आणि 'हरि' हा शब्दरूप नामाचा अर्थ आहे. शब्दाचा अर्थाशी वृत्तिरूप संबंध या तादात्म्य संबंध असतो हे सर्व शास्त्रकाराना मान्य आहे. संबंध नसेल तर शब्दापासून अर्थाचे ज्ञानच होणार नाही. सारांश, नामाचा आणि हरीचा तादात्म्य संबंध आहे. आणि नामाचा व नामधारकाचा वैखरीद्वारा 'अभिव्यंग्य अभिव्यंजक संबंध' आहे. म्हणून नामधारकाचा आणि हरीचा नामद्वारा 'अभिव्यक्त तादात्म्य संबंध' आहे. याप्रमाणे नामाला 'योग' म्हणावयास मुळीच हरकत नाही म्हणूनच मी या लेखात बुद्धिपुरस्सर 'नामयोग' हा शब्द वापरला आहे.

श्रीतुकाराम महाराजानी गाथेत मुख्यत नामयोगाचा उपदेश केला याचे कारण महाराज असे सांगतात की,

'अवघ्या वाटा झाल्या क्षीण। कधि न घेउ साधन।
(गाथा भाष्य)

'या कलियुगामध्ये हरिप्राप्तीच्या सर्व वाटा क्षीण झाल्या आहेत. राजकीय व सामाजिक परिस्थितीच्या प्रतिकूलतेमुळे कोणतेहि साधन यथाविधि घडत नाही. लोक दिवसे दिवस मदभ्रष्ट होत असल्याने वेदाने सांगितलेली साधने कळणे शक्य नाही, मग घडणे तर दूर राहिले.' कारण—

१. यज्ञादि कर्मे त्रैवर्णिकावाचून आणि अनुकूल देशकाल परिस्थितीवाचून करता येत नाहीत.

२. अष्टांग योग अपरिग्रही साधकावाचून इतराना झेपणे शक्य नाही.

३. ब्रह्मज्ञान तर विवेक, वैराग्य, शमादि, मुमुक्षुत्व, गुरुसेवा, श्रवण इत्यादि साधनावाचून होणे शक्य नाही. म्हणूनच महाराजानी अधिकारनिरपेक्ष, इतर साधननिरपेक्ष व फलप्राप्तीची निश्चितता ज्यात आहे, असा सोपा नामयोग सांगितला आहे.

याचा अर्थ असा नाही की श्रीतुकाराममहाराजाना 'यज्ञादि कर्मे', 'अष्टांग योग', 'ब्रह्मज्ञान' मान्य नव्हते! कारण—

वेदविहित तुम्ही ऐका हो कर्म।

या अभंगात वर्णाश्रम सांगितले आहेत.

योगाचे ते भाग्य क्षमा। आधी दमा इंद्रिये॥
(गा. भा. ५६)

रक्तश्वेत कृष्ण पीतप्रभा भिन्न। (गा मा. ३३३१)

या दोन अभंगात योगाचा व योगातून ज्या ज्योतीचा साक्षात्कार होतो, त्याचा उपदेश केला आहे.

तात्पर्य—श्रीतुकाराममहाराजाना सर्व मान्य होते व सर्वच कळत होते, पण ते सामान्य लोकाकडे नव्हत, तेव्हा त्याना असे वाटे की, 'हे लोक कसे उद्धरून जातील? याना ही कठीण साधने कशी झेपतील?' या विचारानेच महाराजानी नामयोगाचा राजमार्ग झाडून स्वच्छ केला व या मार्गाने येण्याविषयी

'यारे यारे लहान थोर।'

असे सर्वांना निमंत्रण दिले एवढेच नव्हे तर स्वत देखील हरि भजनाने सर्व जग धवळून काढले.

हा 'नामयोग' महाराजानी नवीन सांगितला असे नाही, तर श्रुतिस्मृति पुराणप्रणीत जनाच आहे

आस्य जानन्तो नाम (ऋ २-२-२६)

सततं कीर्तयंतो मा (भ गीता ९-१४)

नामसंकीर्तन यस्य (श्रीमद्भागवत् १२-१३-२३)

याप्रमाणे वेदात, गीतेत, श्रीमद्भागवत्, महापुराणात नामाचा उल्लेख आहे. महाभारतान्तर्गत 'विष्णुसहस्रनाम' तर सुप्रसिद्धच आहे. सारांश, श्रुत्यादिप्रणीत जुनाच असलेला नामयोग त्यानी आपल्या भाषेत आपल्या पद्धतीने सांगितला आहे आणि असा विश्वास दर्शविला आहे की इतर साधने करण्यापासून जे पुण्य, जे साध्य प्राप्त होते, ते एका नामसंकीर्तनाने प्राप्त होते.

काय नोहे केले। एका चिंतितता विठ्ठलें॥
सकळ साधनांचे सार। भवसिंधु उतरी पार॥
अवघे होती लाभ। एका या चिंतन।
नामसंकीर्तने गोविंदाच्या॥

नामयोगाच्या चार अवस्था आहेत, —

१ नामात सर्वांचा अधिकार आहे. त्यामुळे पापी मनुष्य किंचित् मद श्रद्धेने पाप करीत करीत संकीर्तन करू लागतात. तरीहि कालांतराने त्याच्या बुद्धित परिवर्तन होऊन त्याची संचित पापे नष्ट होतील व क्रियमाण घडणार नाही.

२. संसारी मनुष्य संसारात राहूनहि कामात काम म्हणून हरिनाम घेईल तर त्याची संसारासक्ती हळू हळू कमी होईल.

३ मुमुक्षु इंद्रियनिग्रह करून नाम घेईल त्यावर हरीनी

न संताची कृपा होऊन तो मुक्त होईल

४. मुक्त हरीनाम घेतील तर त्याना इद्रिय-विषय संयोगापासून होणारे दुःख न होता अधिक सगुण भक्तीचे विलक्षण सुख प्राप्त होईल.

याप्रमाणे प्राप्यापासून मुक्तापर्यंत नामयोगाचे अधिकारी आहेत. नामयोगाचे अनुष्ठान करण्याकरिता अधिकार व इतर उपांगे यांची आवश्यकता नाही, हे खरे असले तरी सुद्धा नामयोगाचे याच देहात फळ मिळण्याकरिता हरि-विषयक प्रेम, श्रद्धा, चित्तशुद्धि, इंद्रियनिग्रह सतसंगति, पढरीची वारी, एकादशी, सोमवार, व्रते, गगास्नान, एकातवास, देवपूजा, वेदनिष्ठा, यांची आवश्यकता आहे, असे महाराजाच्या अनेक अभगावरून स्पष्ट दिसून येते. वरील अगोपागासह दीर्घकाल, अखड व श्रद्धापूर्वक नाम घेतल्यास त्यापासून मुख्य अशी तीन फले वर्तमान देहातच प्राप्त होतात. १. समाधि, २. सगुण साक्षात्कार, ३. मोक्ष अष्टाग योगाने जी समाधि, तीच नामयोगाने प्राप्त होते. ही गोष्ट श्रीपतजलीमुनींनाही मान्य आहे म्हणूनच

'ईश्वरप्रणिधानद्वा' (यो. सू. १।२३)

या सूत्रातील 'वा' शब्दाने समाधीचें वैकल्पिक साधन 'ईश्वरभक्ति' आहे. हे स्पष्ट सागितले आहे. ईश्वरभक्तीचे नऊ प्रकार असले तरी नामसंकीर्तनातच समाधि प्राप्त करून देण्याचे विशेष सामर्थ्य आहे म्हणून समाधि करता साधे पद्मासन घालून चित्तशुद्धिपूर्वक नामचिंतन करता करता नामी जो 'हरि' त्याचे ठिकाणी चित्ताची धारणा झाल्यानतर ध्येय जो हरि त्याचे ठिकाणीं एकतान चित्त करून ध्यान केले तर ध्याता आणि ध्यान हे दोन्ही जाऊन केवळ ध्येयाशी सामरस्य प्राप्त होते.

'तदेवार्थ निर्भासस्वरुपशून्यामिवसमाधिः'

(यो सू. ३।३)

ही योगशास्त्रात सागितलेली 'समाधि' अनायासे प्राप्त होते

'तुका म्हणे सुख समाधि हरिकथा निणे भवव्यथा
गाईल तो ॥ (गा भाष्य)

या समाधीत देह, देश, काळ व प्राणाचे क्षुधातृषादि धर्म याचा विसर पडतो

असो ऐसा कोठें आठवीवचि नाही।
देहींच विदेशी भोगृ दशा ॥ (गा. भाष्य)

व्युत्थान अवस्थेतदेखील वैष्णवांच्या संगतीत नाम गाता येते. गाता गाता नाचता येते. त्या आनदात उड्या मारता येतात. मृदग वीणा सुस्वर लावून समाधीत जो रस आहे तोच रस व्युत्थान अवस्थेतदेखील टाळ्याच्या घोषात सेविता येतो.

नामाचे दुसरे फळ सगुण साक्षात्कार आहे. देव-वैकुठा तील ऐश्वर्य टाकून नामधारकाच्या जवळ येतो. त्याचा योगक्षेम वाहतो त्याच्या घरातील सर्व कामें न सागता करतो

नामाचे तिसरे फळ मोक्ष आहे.

'मुखी नाम हातीं मोक्ष!' (गा. भाष्य)

येथे एक शका येणे स्वाभाविक आहे. ती अशी की, ज्ञानाशिवाय मोक्ष नाही, मोक्षाचा प्रतिद्वद्वी बध अध्यस्त असल्यामुळे अध्यस्ताची निवृत्ती ज्ञानानेच होत असते. मग 'मुखी' नाम हाती मोक्ष' हे कसे!

याची तीन उत्तरे आहेत.

१. नाम हे चित्तशुद्धीद्वारा मोक्षाचे साधन आहे, म्हणून या अभगात नामाचा व मोक्षाचा परपरेने साध्य-साधनभाव सागितला आहे.

२ किंवा नामोच्चारण ही एक वाचिक क्रिया आहे, त्यामुळे कर्ता जेव्हा नामाचा उच्चार करतो तेव्हा क्रियात्वावच्छेदाने ते नामोच्चारण चित्त शुद्धीत आहे तसेच नाम 'शुद्धरुप' आहे त्यामुळे गुरूने उच्चरलेल्या नामाचा लक्ष्यार्थ श्रोत्यास कळला तर ते नाम शब्दत्वाच्छेदाने ज्ञानाम कारण आहे आणि ज्ञान आणि मोक्ष याच्यात कालान्तराचे व्यवधान नसल्यामुळे ज्या क्षणात नामाने अपरोक्ष ज्ञान, त्याच क्षणात मोक्ष म्हणून मुखी नाम हाती मोक्ष' असे म्हटले आहे. यासबधी अधिक विचार हरिपाठ भाष्यात पृ. १८ पासून पुढे पहा.

अथवा नामधारकावर देवाचा कृपाप्रसाद होतो देवच त्याचा गुरु होऊन त्यातून ज्ञान सागून मुक्त करतो.

माझ्या विठोबाचा कैसा प्रेमभाव।
आपणचि होय देव गुरु ॥ (गा. भाष्य ५०५)

देवच त्याचा गुरु होतो असे श्रीतुकाराम जसे सागतात तसे देवदेखील स्वत म्हणतात.

तेषां सतत युक्तानां भजतां प्रीतिपूर्वकम् ।
ददामि बुध्दिं योगं तं येन मां मुपयाति ॥
( भ. गीता १०।१० )

याप्रमाणे नामाने मोक्ष प्राप्त होतो आणि जीव ब्रह्मरूप होतो. तसा देहदेखील ब्रह्मरूप होतो. पाण्यापासून मुक्तापर्यंत सर्वांना नाम घेण्याचा अधिकार आहे. जे मुक्त पूर्व संस्कारानुसार वाणी अनावर होऊन आवडीने व लोकसंग्रहार्थ नाम घेतात. त्यांना ज्ञानी भक्त ही संज्ञा प्राप्त होते.

याप्रमाणे श्रीतुकाराम महाराजांनी जगाच्या कल्याणाकरिता गाथेत ' नामयोग सांगितला आहे.

— श्रीशंकरमहाराज खंदारकर



# श्री वा म ना स श र णा र्थ

वामनास शरणार्थ जा तसा।
वामना सशरणार्थजातसा ॥
वा ! मनास शरणार्थ जातसा ? ।
वामनासशर नार्थजातसा ॥ १ ॥
वा मना, सशरनांग जो जसा।
वामनास शरणार्थ जा तसा ॥
वामनास शरणार्थ जातसे।
वामनाश शरणार्थ होतसे ॥ २ ॥
सार्थ हा स्तव असो, नसो तसा।
वामनास शरणार्थ जातसा ॥
व्हा कृतार्थ शरणार्थ वंदनें।
वामनास शरणा न बंधनें ॥ ३ ॥

स्पष्टीकरण—

सर्वाद्यं सर्ववन्द्यं च सर्वद गणनायकम्।
एक वागीश्वरं वन्दे वागर्थप्रतिपत्तये ॥१॥
ध्वनि-शब्दार्थ व सूक्तास्त्रिगुणा एकरूपकाः।
यस्मिंस्तम्प्रणवाकार ध्यायामि श्रीगजाननम् ॥२॥
प्रणवादेव सञ्जाता शब्दसौन्दर्यसम्पदा।
तदर्थे प्रार्थनामेना शृणुयाच्छूर्पकर्णकः ॥३॥
यत्प्रसादा ज्जायमान काव्य स्यात्काव्यभूषणम्।
धारयन्तु मुदा सर्वे रसिकाः शुभहेतवः ॥४॥

'वामनास शरणार्थ' या स्तोत्राचे निमित्तमात्र कर्तृत्व माझेकडे आहे. म्हणून त्या स्तोत्राचे स्पष्टीकरण मी करावे अशी सूचना विद्यावाचस्पति कवीश्वरशास्त्री यांच्या पत्रातून आल्यानतर, तसे करण्यात औद्धत्य आणि अहंमन्यता या दोषाना मी पात्र होईन, अशी भीति निर्माण झाली. तथापि माझे परम मित्र श्री. भालेराव यानी 'आपलेच स्पष्टीकरण जास्त उचित होईल' असे महाराजाचे व स्वतःचे मत कळविल्याने, ज्यांच्या कृपेने हे स्तोत्र निर्माण झाले, त्याची प्रार्थना करून, गुर्वाज्ञेचे पालन व्हावे या हेतूने, स्तोत्राचा थोडा पूर्वेतिहास प्रथम सांगतो व नतर जमेल तसे स्पष्टीकरण.

एका प्रात.काळी जागृतीबरोबर पहिली ओळ उदेली व पुढे चारपाच दिवस ती अवशतेनं मनात घोळत राहून अर्थांची विविध वैचित्र्ये त्यातून निर्माण होऊ लागली. त्याच सुमारास लेख पाठविण्याविषयी पत्र आले. अधिक अधिकारी सज्जनाचा एक उत्तम लेख पाठवून पत्राचा परामर्ष घेतला. तरीही स्तोत्राचे गूजन चालूच राहिले. शेवटी, ते स्तोत्र लिहून पाठविल्यावर ही जरा अवघड आणि आवाक्या आगळी कामगिरी अंगावर आली !

'हीं निःश्वसितें। कोण सोडितें।
मम हृदयीं तें। विचारुनी भिउनी त्याला।'

स्तोत्राच्या अर्थांचा काही उकल करण्याचा प्रयत्न करीत आहे.

खरे म्हणायचे तर, स्तोत्रात गूढ-भाव फारसा नाहीच.

'सद्गुरूंच्या आश्रय करावा' हा पहिल्या ओळीचा सरळ अर्थच स्तोत्र मुख्यार्थ आहे सद्गुरुनामवाचक शब्दाने मगलारभ केला आहे आणि सद्गुरु वाम म्हणून सन्मार्ग दाखविणारे, वाम मार्गा नसणारे, असा सकारण अर्थ 'वामनास' या शब्दाने व्यक्त होतो अशा सद्गुरूकडे 'शरणार्थ तसा जा' असे सागून 'तसा म्हणजे कसा?' हा उत्सुकतेचा भाव रसिकाच्या मनात उत्पन्न व्हावा, असा हेतु व्यक्त होतो प्रश्नाचे एक उत्तर 'शरणार्थ' या शब्दातच आहे. परतु थोराचा दाखला दुसऱ्या ओळीत देऊन ते उत्तर जरा जास्त प्रभावी ठरते 'शरणाथ जातसा' म्हणजे अर्थ जात पराक्रमाने प्राप्त करून घेणाऱ्यासारखा – धर्म, अर्थ, काम हे तीन पुरूषार्थ स्वपराक्रमाने स्ववश करून घेतलेला बळीराजा 'वामनास' शरण गेला तसा सद्गुरूच्या आश्रयाला जा, असा पहिल्या दोन ओळींचा भावार्थ

हा सल्ला 'आधी केले मग सागितले' या न्यायाने प्रथम मनाला दिलेला आहे, असे पाचव्या ओळीतील सबोधन विभक्तीवरून दिसते मनाच्या आहारी जाणारी इद्रिये!

'मन षष्ठाणीन्द्रियाणि प्रकृतिस्थानि कर्षति'

असा मनाचा इद्रियावर पगडा आहे उलट

'इद्रियाणि प्रमाथीनि हरति प्रसभ मन'

असाहि अनुभव आहे म्हणून, आणि

'तस्मात्त्वमिद्रियाण्यादौ नियम्य'

या वचनानुसार, तिसऱ्या ओळीतील उपहास–गर्भ निर्भर्सना इद्रियाना उद्देशून समजावी मनाचा आश्रय करून अनर्थ परपरा ओढविणाऱ्या इद्रियाना सावध करण्याच्या हेतूने, दुरासद शत्रूच्या शरसधानाचे स्थायी स्थान, 'सुकुमार प्रहरणम्' म्हणून प्राचीन कवींनी जिचे वर्णन केले आहे अशी वाम–नासा स्त्री, तिच्या शरसधाना मुळे अनर्थ–परपरा ओढवते, तशीच विफल अवस्था मनाच्या आश्रयाने मनोसक्त वावरणाऱ्या इद्रियाची होईल, असा इशारा तिसऱ्या व चौथ्या ओळीत देऊन, अष्टाग साधनापैकी 'यम' हे प्रथम साधन सुचविले आहे '*वाम' या शब्दाचा अर्थ 'सुदर' असा येथे आहे*

'मनसैवेन्द्रियग्राम नियम्य' हे वचन पाचव्या आणि *सहाव्या ओळीतील भार आहे मनाला बोध करण्याची* थोराची–समर्थांची शिकवण आहे त्या परपरेनुसार या पाचव्या ओळीची सुरवात करून, ज्ञानदात्यापुढे विकार कसे भस्मसात् होतात हे दाखविण्यासाठी, पूर्वी उद्दे पित केलेल्या दुरासद शत्रूचे अत्यत प्रभावी रूप म्हणून मानलेल्या मदनाचा–तो शर सज्ज असताना अनग कसा झाला, हा दाखला मनाला आठवून दिला

'तावस वन्हिर्भव नेत्र जन्मा।
भस्मावशेष मदन चकार'

हा अभगाचा इतिहास रसिकाच्या माहितीत आहेच

*शिवाय तीक्ष्ण एकाग्र शर 'तीव्र सवेग' सुचवीत* असून, अनगत्व अहता–ममता याचा अत्यत अभाव *दर्शविते अशी चित्तस्थिति झालेला साधक जसा सद्गुरूला* शरण जातो तसा, 'बा मना,' तू शरणार्थ जा म्हणजे 'तीव्र सवेगानामासन्न' या पातजल वचनानुसार तुला त्वरित लाभ होईल, असा अर्थ पाचव्या आणि सहाव्या ओळीत होतो

अनग होऊन शरण गेल्यावर भगवान् शकराच्या अनुग्रहाने अनगही प्रभावी असलेल्या मदनाचे वर्णन

"कर्पूर इव दग्धोऽपि शक्तिमान्यो जने जने।
नमोऽस्त्ववार्य वीर्याय तस्मै मकर केतवे॥"

असे कवींनी केले आहे मनाला पराक्रमाची फार आवड असते हे ओळखून, सद्गुरूला शरण गेल्याने प्रभावी सामर्थ्याची प्राप्ति होते, हे सुचविण्याच्या हेतूनेसुद्धा अनगाचा दाखला समजता येईल

तथापि सद्गुरूच्या आश्रयाला गेल्याने काय फलप्राप्ती खरोखर होते, हे सातव्या आणि आठव्या ओळीत सागितले आहे बळी महाबली होता तरी तो वामनाला शरण का गेला? हा प्रश्नही विचार करण्यासारखा आहे बळी गेल्यानेच परम प्राप्तीच्या मार्गाला लागावे हे तत्व

*'नायमात्मा बलहीनेन लभ्य'*

या शास्त्रसिद्धाताने सागून ठेवले आहे वामन मूर्तीने *लहान रूप धारण करून 'अणोरणीयान' वामनाच 'महतो* महीयान्' असा विश्व व्यापी त्रिविक्रम असल्याचे सिद्ध केले आहे *त्याला जो शरण जातो त्याच्या दुर्वासना–* अज्ञानादि वाम प्रवृत्तींचा नाश होतो व त्याच्या आश्रयाला *(शरण) धर्मार्थ काम, मोक्ष हे पुरुषार्थ स्वयमेव येतात,*

अशी फलश्रुति सातव्या आणि आठव्या ओळीत सांगितली आहे.

मनाला वरीलप्रमाणे शिकविल्यानंतर जनांना नम्र भावाने विनंति नवव्या आणि दहाव्या ओळीत केली आहे. वरील विवरणात काय अर्थ आहे ! कोणाला असे वाटणे असंभवनीय नाही. शब्दांच्या कोल्हाटउड्या मारून यातून आणखीसुद्धा अर्थ जरी काढून दाखविले तरी काय झाले? अशाही प्रश्न महापंडित करू शकतील. म्हणून या स्तवात अर्थ असो वा नसो; हा स्तव परम पुरुषार्थां सह ( सार्थ ) असो आणि अर्थ ( वित्त ) लाभार्थ नसो. त्याचा मुख्यार्थ 'वामनास' ( लघ्वाशी ) होऊन परमार्थाचा आश्रय घेऊन ( शरणार्थ ) जात असा-वागत व्हावे. आणि शरण जाण्याच्या अर्थाने शरण्याला वंदन भक्तीने भजून कृतार्थ व्हावे. अशी प्रार्थना पुढील ओळीत आहे. शेवटच्या ओळीत सद्गुरूंच्या सामर्थ्यांचे दर्शन आहे. त्या सामर्थ्यांचे वर्णन करायला लेखणी असमर्थ आहे.

यतो वाचो निवर्तन्ते अप्राप्य मनसा सह'
तिथे लेखणी काय चालणार ! म्हणून

'य ब्रह्म वेदान्तविदो वदन्ति ।
पर प्रधान पुरुष तथान्ये ॥
विश्वोद्गतेः कारणमीश्वर वा ।
तस्मै नमः सद्गुरू वामनाय॥'

असे संताच्या उच्छिष्ट वचनाने वन्दन करून कृतार्थ-कवितेचा अर्थ लावून मोकळा – होतो.

ना. मो. मोघे, मिरज

# योगिक अलंकार

योगिक भाषा में तीन सर्वप्रमुख नाडियाँ होती हैं। ये कटि प्रदेश के आसपास निकलती हैं और रीढ के समानान्तर चलकर शिर से होती हुई मस्तक पर आकर रुकती हैं। इडा, पिंगला आसपास और सुषुम्ना बीच में कही जाती है। कटि प्रदेश के उद्गम को युक्त त्रिवेणी कहा है और मस्तक के संगम को मुक्तत्रिवेणी। साधना




के साथ साथ मुक्तत्रिवेणी का महत्त्व बढता जाता है और इडा, पिंगला मन्द पडकर समस्त क्रिया स्थल सुषुम्ना में अंगीभूत हो जाता है। कार्यहीन इडा, पिंगला को यदि हम बाईंदाईं नोकें समझें और सुषुम्ना को बीच की शलाखा तो एक अच्छाखासा त्रिशूल बन जायेगा। यही योगी का त्रिशूल है। भ्रुवोर्मध्य मुक्त त्रिवेणी का स्थान है। वहाँ यदि इस त्रिशूल को रख दें तो वैष्णवों की श्री बन जायगी।

जब इडा, पिंगला मन्द पड जाती है और समस्त कार्य सुषुम्ना में ही चलने लगता है तब नाडीशुद्धि की स्थिति आ जाती है तथा नाद का स्फुट आविर्भाव होता है। इस नाद को डमरू से इंगित करते हैं।

नाद से वर्णमाला की उत्पत्ति है। वर्णों से शब्द और शब्द से भाषा बनती है। भाषा मस्तिष्क में अंकुरित होकर मुख से निकलती है। मस्तिष्क और मुख शिर के अंग हैं। अतः वर्णोंकी संख्या के बराबर मुंडो की माल योगी के वक्षस्थल पर शोभायमान होती बनाई गई है।

ऐसा योगी त्रिगुणातीत हो जाता है। ललाट पर तीन रेख भस्म की अथवा चन्दन की तीन गुणों को सूचित करती है तथा उनपर बिन्दी यह कहती है कि वे गुण शून्य कर दिये गए हैं।

योगी में शान्तता का उद्रेक होता है। वह सदा अमृत पान किया करता है। शान्तता चन्द्र से तथा अमृतस्राव गंगा से इंगित किया गया है।

फणपति गले पर और सर पर दिखाये जाते हैं। कुंडलिनी महाशक्ति की जागरुक अवस्था तथा उनके

सम्यागर् में क्रीडाविहार का यह संकेत है।

योगी विषम से विषम स्थिति का सामना कर सकता है। सब को पचाने की उसमें सामर्थ्य है, यही कण्ठ पर विष का महत्त्व है।

भस्मोध्दूलित उसका शरीर होता है। जिसने सर्व वासनाओं को तथा समस्त जंजाल को भस्मसात कर डाला है, उसके ही शरीर की यह शोभा है।

नन्दी उसके योगबल का प्रतीक है। योगी साक्षात परमात्मा माना गया है। परमात्मा का निवासस्थल मानव शरीर है। मानव समस्त सृष्टि का सिंह है। इसी से योगी का आसन व्याघ्रचर्म है।

योगी यज्ञोपवीत धारण करता भी है और नहीं भी करता है। यज्ञोपवीत ९६ चौवों का बनता है। ९६ ही तत्त्व वेदान्त में कहे गये हैं। इन्हीं तत्त्वों के अन्तर्गत मनुष्य का शरीर एवं उसकी क्रियायें हुआ करती हैं। सूत को बटकर तीन लड़ों मे विभाजित कर दिया जाता है। क्योंकि त्रिगुणात्मक ही समस्त जगत है। इन तीन लड़ों को एक गाँठ के द्वारा मिला दिया जाता है जिसका तात्पर्य त्रिगुणातीत स्थिति से है। ऐसी स्थिति का पुरुष जनन, पालन और हननात्मक क्रियाओं का उसी दृष्टि से करता है, जैसे कि ब्रह्मा, विष्णु और महेश। यह उसमें ईश्वरत्व के अंश को सम्बोधित करता है और इसके लिये यज्ञोपवीत की ब्रह्मगाँठ की बनावट को देखा जाय। वहाँ तीन गाँठयुक्त तार इसी त्रिमूर्ति का प्रतीक बनाए गये हैं। फिर उनके ऊपर भी एक शिरमौर गाँठ होती है। यह त्रिमूर्ति के अन्तर्निहित एकत्व को बताती है, इस सूत्र का कन्धे से कटि तक पहना जाता है। क्योंकि मानव शरीर और मानव कार्यों का सिंचन धड के अन्दर बन्द मानवकल्प पर ही निर्भर होता है। ऐसे गूढ तत्त्व का प्रतिपादन करनेवाला सूत्र योगी पहने तो भला (क्योंकि उसमें ये सब गुण होते ही हैं) और न पहने तो भला क्योंकि उसका वास्तविक यज्ञोपवीत तो इडा, पिंगला और सुषुम्ना का बना होता है।

कैलाश के अतिरिक्त ऐसे योगी की शान्ति को और उसके उच्चस्तर को कौन समानता दे सकता है? इसी कारण उसका वास कैलास समझा जाता है।

ऐसा योगी साक्षात् शिव है। साक्षात शंकर है। हम उसे प्रणाम् करते है।

—अज्ञात



# संतांचा अखंड योग

परमपूज्य गुरुदेवांच्या आदेशानुसार नित्यपाठ म्हणून एकनाथी भागवत ग्रंथाचे रोज एक पान वाचावयाचा नियम माझ्याकडून केला गेला. रोज स्नानसंध्येनंतर एक पान वाचावयाचे व सर्व दिवसभर त्याचे होईल तसे चिंतन करावयाचे असा चाळ मनास लागला. हळू हळू पूर्णार्थाने ग्रंथातील ओव्यांचा परिचय होऊ लागला. आतापर्यंत वाचनात आलेल्या ओव्यांपैकी खालील ओवी श्रीएकनाथ महाराजांचे जीवनसूत्र असावे असे मनाला वाटू लागले व म्हणून ह्या ओवीची निवड या लेखासाठी केली गेली. हाही एक गुरूंचा आदेशच होय असे मला खात्रीलायकपणे वाटते.

एकनाथी भागवत या प्रासादिक ग्रंथाच्या एकोणीसाव्या अध्यायातील ही अनुक्रमाक २४२ वी ओवी आहे. ती अशी—

साडुनी अहंकार दुजा, सर्वभूतीं भावो माझा।
हे उत्तमोत्तम माझी पूजा मज अधोक्षजा पढियती ॥

या अध्यायात प्रतिपाद्य विषय ज्ञान विज्ञान भक्ति रहस्य हा आहे. यथार्थ वस्तुज्ञान (आत्मज्ञान) म्हणजे खरे ज्ञान होय. विज्ञान म्हणजे दृश्य सृष्टीचा अनुभव, किंवा इंद्रिय गोचर अशा संसाराचा किंवा प्रपंचाचा अनुभव आणि भक्ति म्हणजे ज्ञान व विज्ञान यांचा एकात्मभाव होय. हे रहस्य शब्दार्थाने विद्वानाच्या किंवा सामान्या वाचकाच्या प्रत्ययास येते. परंतु लक्षार्थाने याचे खरे ज्ञान सत्पुरुषानाच होते म्हणूनच ते त्यांच्या प्रत्यक्ष जीवनात पूर्णांशाने उतरलेले दिसते. या ओवीचा सरळ अर्थ असा आहे की, दुजा अहंकार जो देहात्मक किंवा अज्ञानदृष्टी देहाभिमान, तो सोडून, त्याचा त्याग करून सर्व चराचर सृष्टीच्या ठिकाणी मीच (परमात्मस्वरूप) भरलेला आहे असे समजणे, हीच माझी आवडती व सर्वोत्तम पूजा होय.

सर्वभूतेषु मन्मतिः

फार मोठे तत्त्वज्ञान अगदी सुटसुटीत शब्दात सांगितले आहे.

एका जनार्दनीं भावही निका।
जो देखो सो राम सरिका ॥

हे श्रीएकनाथांच्या साक्षात्काररूप पूजेचे वर्णन आहे यालाच चिद्विलास दर्शन म्हणतात. जेथे इतराना नामरूपात्मक विनाशी जग दिसते, तेथे ज्ञानी भक्ताला चिद्विलास दिसतो असा त्याचा दिव्य स्वानुभव असतो. यालाच उत्तमोत्तम पूजा म्हणतात. ही देह अहंकार जाऊन येणारी आत्म प्रतीति. हिलाच निर्विकल्प समाधी अवस्था म्हणतात.

पुढील मजकूर पान २३१

गायत्री जप चालवयाचा या क्रमाने छत्ती वर्षे गायत्रीची सेवा झाली. एक दिवस झोपायच्या वेळी तळमळ झाली. त्यामुळे आई गायत्रीला प्रार्थू लागला

'आई गायत्री किती धीर धरू ? केव्हा दर्शन देशील ? वियोगाने हिंपुटी जीवाला शीतलता देशील ?

या हुरहुरीत झोप लागली. तो दिव्य स्वप्न पडले. गायत्री माता प्रकट झाली वियोगी भक्ताच्या मस्तकावर करुणाद्र करकमल ठेवून 'वर' माग म्हणाली

'आदिशक्ति माते, मला आत्मज्ञान दे' आणि वर मागितला.

'तू त्र्यंबकेश्वरी जा तेथे आत्मज्ञानाचा उपदेश गुरूकडून मिळेल' येवढा वर देऊन गायत्री माता अंतर्धान पावली.

त्र्यंबकेश्वरी वैराग्यमूर्ति ब्राह्मण गेला

श्रोत्रिय ब्रह्मनिष्ठ गुरूचा लाभ झाला सन्यास दीक्षा झाली. नाव श्रीब्रह्मानंद असे ठेविले महासिद्ध ते ब्रह्मानंद स्वामी आत्मानंदी काळ कठू लागले.

श्रीब्रह्मानंदाची आराधना अद्यापि श्रीपरशुराम मंदिरात श्रीगोवाशी चिमावन मंडळी करतात. कोठुरलामुद्धा ही आराधना पौष मासी होत असते. पिंपळगाव बसवंतचे श्रीमंत दाजीमहाशय ठकले यांचेकडून कोठुरच्या आराध नेची व्यवस्था होत असे

या कथेवरून गायत्री मंत्राचा प्रभाव

गायत्री मात्रसारोऽपि वर विप्र सुयंत्रित ।
नायंत्रितास्त्रिवेदोऽपि ॥

या श्लोकी सांगितलेला खरा आहे. यांत शंका नाही. असे साधन श्रीमंत असून साधनभिकारी बनलेल्या आम्हा भार तीयांच्या मनास वेदमाता गायत्री प्रकाश देवो अशी प्रार्थना करतो व अल्पमतीची ही सेवा श्रीगायत्रीरूप श्रीगुरुदेवा नंदाच्या पदारविंदी अर्पण करितो. इतिशम् ॥

— प. विष्णुशास्त्री खरे,
सातारा

# श्रीगायत्री प्रशस्तिः

श्रीगायत्रीवेदमात्रे नमः

'कलियुगामध्ये साधूंच्या शोधात बहुजनसमाज व्याकूळ होऊन धावपळ करील' असे पुराणात वर्णन आहे. ही भविष्यवाणी मानसशास्त्र जाणणाऱ्या सर्वज्ञ ऋषींची यथार्थच आहे. भगवान् शंकराचार्यांनीसुद्धा

'दीर्घेण कालेन अनुष्ठातॄणा कामोद्भवात् हीयमान विवेकेन अधर्मेण अभिभूयमाने धर्मे प्रवर्धमाने च अधर्मे'

असाच कार्यकारणभाव अधर्म वाढण्याचा सांगितला आहे. श्रीमान् उदयनाचार्यांनीसुद्धा एक एक युगात मानसिक वृत्तीचा ऱ्हास होता होता कलियुगात तर माणसाची मने अगदी दुर्बल होतात, असेच 'न्याय-कुसुमांजलि' या अपूर्व ग्रंथात सांगितले आहे.

'या भारतातील अग्रजन्मा-ब्राह्मणाचे चरित्र सर्व जगाला आदर्श आहे' असे श्रीमनूने भारताचे महात्म्य आत्मविश्वासाने गाईले आहे. ते महात्म्य त्याला गेले

साधनसंपत्तीचा ऋषिमुनींचा अभिमान आमचा युरोपीय वैभवाच्या मोहाने लोपला. याचे कारण श्रीशंकराचार्यांच्या निरूपणाप्रमाणे मने कमकुवत झाली हेच आहे. मनो दौर्बल्यामुळे आमच्या धर्मात मनाला समाधानकारक साधनेच नाहीत असा मूर्खपणा सर्वत्र पसरला.

वास्तविक गायत्रीमंत्र हा मनाला शांति देणारा आहे हे लक्षात येईनासे झाले. भगवान मनु सांगतो—'गायत्रीचीच केवळ उपासना करणारा त्रिवेदी ब्राह्मणाहून श्रेष्ठ आहे. एक कोटि गायत्री जपाने जे जे इच्छावे ते मिळते' असेहि एका ठिकाणी म्हटले आहे.

गायत्री निरक्षरालाही जगद्वंद्य करते, हे खरेच आहे. याकरिता एक सत्य कथा लिहून हा लेख श्रीवासुदेवानंद चरणी वाहणार आहे.

श्रीशिवाजीचे स्वराज्यवैभव धुळीला मिळाले त्या पेशवाईतल्या पानिपतच्या अखेरच्या युद्धात लाखो भारतीयांची कत्तल झाली मोठी धावपळ माजली. त्यावेळी एक तरुण ब्राह्मण सैनिक पानिपतहून परतला. पराभवाच्या निराशेने त्याचे मन सुन्न झाले. एकटाच वणवण हिंडत असता विचार सुरु झाले—

मी ब्राह्मण असुन आजवरचे आयुष्य सदाचार सोडून फुकट घालविले. कसे माझे होणार ? आत्मकल्याण साधावयाची वेदविद्या मजजवळ नाही, मी असाच एक दिवस मरून जाणार. काय करूरे श्रीहरी दयाळा ?

निराशेच्या पोटीच स्फूर्ति झाली. मला गायत्री मंत्र येत आहे. मी गायत्री मातेची सेवा करणार. हिंडता हिंडता तो ब्राह्मण गोदावरीच्या तीरी कोढूर नावाच्या गावी आला. ते रमणीय स्थान बघून येथेच निरंतर रहावे असे मनात ठरले

नित्याची गायत्री सेवा सुरू झाली. ब्राह्ममुहूर्तावर स्नान करून जपाला बसावे. तो दुपारी बारा वाजेपर्यंत सारखा

पुढील मजकूर पान २६०

देहात आत्मा ही सत्य वस्तु आहे, तशी बाह्य जगात परब्रह्म ही सत्य वस्तु सर्व ठिकाणी आहे. त्यावर अलंकाराचे नामरूपाप्रमाणे नामरूपात्मक सृष्टि आरोपित आहे. हे सर्व जगत् ब्रह्मस्वरूप आहे. यालाच सर्वभूती भगवत्भाव असे म्हणतात. हे जे उत्तमोत्तम परमात्म रहस्य तेच या ओवीत श्रीएकनाथ महाराज सांगतात. ही सर्वात्मभावाने केलेली पूजा आहे. यात पूज्य, पूजक इत्यादि भेद नाहीत. या दिव्यपूजन आत्मस्थितीत अथवा ब्राह्मी स्थितीत नित्य, शुद्ध, बुद्ध, मुक्त असे अथवा ब्रह्माधिष्ठान एकमेवाद्वितीय असे आहे. त्यावरील अध्यारोपित नामरूपात्मक जगाचा नाश न होता तत्संबंधी सत्यत्व बुद्धीचा समूळ लोप होतो. ह्यालाच नित्य निरातिशयानंदप्राप्ति व दुःखाची अत्यंत निवृत्ति म्हणतात. हेच सच्चिदानद रूप होय.

श्रीएकनाथाच्या हरीपाठात असे म्हटले आहे की—

सद्रूप ते ब्रह्म, चिद्रूप ती माया।
आनंदी पदीं जया म्हणती हरि॥
सत्पद निर्गुण चित्पद निर्गुण।
सगुण निर्गुण हरि पायीं॥
आस्ती भाति प्रिय ऐसी पदें तिन्हीं।
एका जनार्दनीं तेंचि झाले

अशा प्रकारे हे उत्तमोत्तम, एकनाथी भागवतातील रहस्य शब्दाने समजले, पण श्रीएकनाथानी जसे ते आपल्या जीवनात मुरविले तद्वतच आज ती प. पूज्य महाराजांच्या जीवनात या ओवीचा पुरेपुर प्रत्यय अनुभवास येतो व म्हणूनच श्रीमहाराजाच्या जीवनाचे यथार्थ दर्शन घडविणारी ही ओवी माझ्या डोळ्यासमोर नाचू लागली. असा एकात्मभाव झालेले थोर महात्मे, थोर विभूति आज आपल्या दर्शनाने जनतेला पुनीत करीत आहेत. संताचे मोठेपण आपण सामान्य जीव कसे ओळखणार! त्याच्या हृदयाची खोली आपणास कशी कळणार हे तर खरेच, परंतु तरीही त्याच्या सहवासात राहण्याचे भाग्य पूर्वसुकृतान ज्याना लाभते त्याना त्याचे जीवन खरच दिव्य आहे, निरपेक्ष आहे त्याची खात्री अनुभवाने येऊ लागते.

ती–परम पूज्य गुळवणी महाराजाच्या दिव्यत्वाचा परिमल आता किती दूर आसमतात पसरलेला आहे! त्या सुगंधाकडे पूर्वसुकृत असलेले अनेक भाविक ओढले जात आहेत. पाणपोई घालावी तद्वत् प. पू. महाराज भाविकाची तहान भागविण्यासाठी तृप्तीचे अमृतपात्र हाती घेऊन बसले आहेत.

तुम्ही कसेही असा, तुमच्या दोषासह तुमचा स्वीकार करून, तुम्हाला दिव्य शक्तीचे दान एक ईश्वरभाव ठेवून व ईश्वराचे कार्य समजून ते अव्याहतपणे करीत आले आहेत.

एक अर्ध्या तपापूर्वी ती. प. पू. महाराजाची गाठ पडण्याचे भाग्य मला लाभले. दिनांक १९ मे हा तो दिवस! त्यावेळी प्रथमदर्शनीच त्याची कल्पना आमच्यासारख्या अज्ञ जीवांना कितीशी येणार! परंतु हळूहळू ती कल्पना येऊ लागली.

'सहज बोलणे हितोपदेश' ह्या उक्तीप्रमाणे त्याचेकडे जाऊन थोडा वेळ जरी बसले तरी इतराशी व माझ्याशी बोलतानादेखील पुष्कळ गोष्टीवरून त्याचा देहभाव नष्ट झाला असला पाहिजे व एका ईश्वराशिवाय ह्या चराचर सृष्टीकडे पाहताना त्याचा दुसरा कोणताच भाव नसावा असे कळून आले.

असेच ते एकदा म्हणाले होते की, "सेवा करताना असा भाव ठेवावा की सारे जग उपास्य असून आपण एकटेच उपासना करणारे आहो. असे समजून वागावे म्हणजे जे घडेल ती ईश्वराची पूजाच होय. कोणाचाहि मत्सर करू नये. कारण या सृष्टीत एका चैतन्याशिवाय दुसरे काहीच नाही त्यामुळे आपण एका व्यक्तीचा जरी द्वेष केला तरी ते ईश्वराला आवडत नाही व त्यामुळे त्याची पूजा निष्फळ होते. एक ईश्वराशिवाय या जगात काही नाही, तोच नादतो आहे ही भावना वाढविणे हीच त्याची महापूजा होय." हा गुण ती. प पू. महाराजाच्या अंगी पूर्णपणे बाणलेला आहे. ते चुकूनसुद्धा कोणास वाईट म्हणत नाहीत मग मत्सराचे नावच सोडा. अमूक व्यक्ती ना फार चांगली आहे" असेच सर्वांविषयी नेहमी ते म्हणत असतात.

तिसरी गोष्ट महाराज सागत असतात, "कोणाचेही अतःकरण दुखवू नका. सर्वांशी गोड बोला. एकाच्याही अतःकरणास दुःख झाले तरी ते ईश्वरास दुःख देण्यासारखे आहे" हे ते पुन्हा पुन्हा सागत असतात. ते लहान असो

मोठे असो सर्वांशी गोडच बोलतात. देहाचा अहंकार नष्ट झाला की, मनुष्याची होणारी सहज वागणूक ही पूजाच घडत असावी असे सारखे त्यांच्या चालण्या बोलण्यावरून वाटत असते.

प्रत्यक्षात सतत अशी वागणूक ठेवणारे महाराज हे सर्वकाळ त्या ईश्वराची पूजाच करीत असतात. पण नित्य व नैमित्तिक पूजन करतेवेळी ही ईश्वरार्पण बुद्धीनेच त्यांची सारी पूजा, उपासना होत असत. तुळजापूरला, वाडीला, अनेकदा त्यांच्याबरोबर जाण्याचा योग आला. सर्व ठिकाणी त्यांची महापूजा पाहिली. ती यथासांग तर असतेच, पण एकरूपतेची भावना रोमारोमात भिनलेली दिसून येते. त्यांचे भावमुद्रा काही वेळा उफाळून बाहेर पडतात व श्रीरामकृष्ण परमहंसाप्रमाणे ते भावसमाधीत मग्न होऊन जातात. हीच गोष्ट त्यांच्या गुरुभावनेबद्दल दिसून येईल. ते ज्ञान्याच्या इतक्या उच्च अवस्थेला पोचलेले आहेत तरी त्यांची गुरुभक्ति ही वाढतच आहे.

मोठ्यांच्या चरित्रावरून असे दिसते, की ब्रह्मरूपता आली तरी गुरुभक्ति ही वाढतच असते, तसेच महाराजांचे झाले आहे. 'श्रीवासुदेवनिवास योगाश्रम' हे त्यांच्या गुरुभक्तीचे आलेले फळ आहे. या वासुदेवनिवासात आता अनेक चांगल्या गोष्टी घडत असतात. अनेक साधक साधन करून आपला फायदा करून घेत असतात. अनेक श्रद्धावान लोक येथे सेवा करीत असतात. नामसप्ताह, कीर्तने, प्रवचने व गीतरामायणासारखे अनेक चांगले कार्यक्रम होत असतात. लोकांची श्रवणाची भूक भागते व प. पू. महाराज स्वतः ऐकण्यासाठी बसत असल्याने सर्व वातावरण कसे पवित्र बनते, दर्शनाचा लाभ मिळतो आणि एक प्रकारचा आगळाच आनंद अनुभवून, भाविक श्रद्धावान, आस्तिक, सारे लोक बाहेर पडतात

आज ऐंशी वर्षांच्या तपश्चर्येनंतर श्रीवासुदेवनिवास योगाश्रम ही स्थापन झालेली इमारत त्यांच्या साऱ्या जीवनाचे गोड फळ होय. याचा उपयोग कितीतरी साधकांना वर्षानुवर्षे होत राहील. त्यांचा फायदा घेऊन आपला विकासाचा मार्ग, आपले अंतिम ध्येय की आपले खरे स्वरूप ओळखणे आणि ईश्वरी सत्ता चराचरात भरली आहे. याचा खरा अनुभव घेणे हेच आपले कर्तव्य होय. आपल्या दिव्य जीवनाचा अनुभव आपण खरा घेणे तोहि अत्युत्तम मार्गदर्शकाच्या हाताखाली घडणे यापेक्षा अधिक भाग्याची गोष्ट कोणती! हे सारे आपणास हा योगाश्रम देऊ शकेल. पण महाराजांनी घालून दिलेल्या एकात्मरूपतेच्या भावनेने करावयाच्या पूजेचा आदर्श आपल्यापुढे ठेवला तरच ते शक्य आहे.

महाराजांच्या वागण्यावरून आपल्यास शिकण्यासारखे खूपच आहे. मुमुक्षू साधकांनी कितीतरी खबरदारी आपल्या वर्तणुकीत घ्यावयास हवी. कोणतेही शिक्षण घेताना त्यांचे नियम ठरलेले असतात. त्यांची बंधने आपणास पाळावीच लागतात. हे नियम ती-महाराजांचे दीक्षित स्वीकारताना आपण दुर्लक्षित करतो वागण्याचे नियम दोन प्रकारचे असू शकतात. एक, शरीराच्या शुद्धता, सोवळे, ओवळे इ. दुसरे म्हणजे मनाची शुचिता, पवित्रता, क्षुद्रपणा सोडून वागणे. मनाच्या सुधारणेकडे अधिक लक्ष द्यावयास हवे आपले बोलणे नम्र, अहंकाररहित व मित असणे जरूरीचे असते.

'सांडुनी अहंकार दुजा सर्वांभुती भावो माझा' ह्या चरणाचा आदर्श आपल्या जीवनात उतरविणारी महान संताची वागणूक पाहिली की, आपण काय घ्यावयाचे? त्याकरिता कोणता प्रयत्न केला पाहिजे? हा प्रयत्न करणे तरी आपल्या हातात आहे का? असे अनेक प्रश्न सामान्य माणसापुढे उभे राहतात. आपल्या जीवनात त्यांचे अगदी गुण उतरविण्याचा जास्तीत जास्त प्रयत्न करणे इकडे सारे लक्ष गेले पाहिजे. सिद्धांची जी लक्षणे ती साधकांनी अंगी उतरविणे हाच त्यांचा खरा अभ्यास असतो.

आत्मस्वरूप ओळखल्यावर कोणती अवस्था येते व कोणते गुण प्रकर्षाने बाहेर दिसू लागतात त्यांचे चित्रण वरील लेखात आहे. त्यांच्या जीवनाचे चिंतन म्हणजेच आत्मचिंतन होय. विचार करता करता आपल्या जीवनावर तोच ठसा उमटावा, आपल्याला जितके घेता येईल तितके घ्यावे हाच प्रस्तुत लेखाचा उद्देश आहे.

ही एक छोटी पूजाच आहे असे मानून हे सारे त्यांनीच दिलेले कृपालेखणीचे साहित्य घेऊन केलेली ही पूजा श्रीमहाराजांनी गोड मानावी. हीच त्यांच्या चरणी नम्र प्रार्थना!

संताचे मोठेपण आपण सामान्य जीव कसे ओळखणार?

हिमालयापेक्षा उत्तुंग हे पुरुष श्रेष्ठ ! त्यांची उंची पहावयास जावी तो तो मति कुंठीतच होते. हृदय अत्यानंदाने व आदराने ओतप्रोत भरून जाते आणि वाहते. सूर्यासारखे तेजस्वी तपश्चर्येचे, चंद्रासारख्या अमृतमय, आल्हाददायक सुमधूर वृत्तीचे, महासागरासारख्या अथांग, अगम्य अशा खोलीच्या परमपूज्य श्रीसद्‌गुरु महाराजांच्या अस्तित्वाने आपले जीवन अंतर्बाह्य भरून जावे. हीच आपल्या जीवनाची कृतार्थता, परिसीमा होय.

॥ श्रीगुरुसमर्पणमस्तु ॥

—कृ. ह. जोशी, बी. ए. (ऑनर्स)



# दिव्यत्वाची जेथ प्रतीती
# तेथे कर माझे जुळती !

परमपूज्य वंदनीय गुळवणी महाराजांचा व माझा परिचय होऊन एक तपावर काळ उलटला आहे. प्रथम परिचय झाला तो एका मनोज्ञ अवस्थेत अभ्यासात पदोपदी येणाऱ्या अडचणी वाढत होत्या. मन एकाग्र होत नव्हते. एक अनोखी बेचैनी वाटत होती–परंतु खरे म्हणजे एका अर्थी हा प्रगतीचाच काळ होता असे आता म्हणावयास पाहिजे. माझे वयोवृद्ध स्नेही व आमच्या कुटुंबाचे हितचिंतक मान्यवर गो. वा. मराठे ह्यांना मी माझ्या शंका विचारल्या. त्यांनी मला परम पूजनीय महाराजांचे नाव व पत्ता सांगितला. त्यांचा व महाराजांचा परिचयही मोठ्या गमतीचा झाला होता. त्यांना गुरुभेटीची आत्यंतिक तळमळ लागली असताना स्वप्नात महाराजांचे दर्शन होऊन–२० नारायण पेठ, पुणे २, हा पत्ता सुवाच्य अक्षरात लिहिलेला दिसला. नाव व पत्ता मिळाल्यावर जणू अमोल ठेवाच सापडल्याची मला भावना झाली. मन शांत झाले. मागला पुढला विचारही न करता, आपल्या पात्रापात्रतेचा मनात एवढाही किंतु न ठेवता–मिळालेल्या पत्त्यावर पत्र टाकले. आलेल्या पत्रांना आपल्या सुवाच्य व वळणदार अक्षरात उत्तर लिहिण्यात महाराज जराही दिरंगाई करीत नाहीत. मला त्वरित उत्तर आले. एका थोर लोकोत्तर व्यक्तीचे हस्ताक्षरात उत्तर आलेले पाहून मी अक्षरशः नाचलो. पत्रात अति विनयाने होईल तितकी मदत करण्याचे आश्वासन होते. पत्र आल्यापासून गुरुभेटीस आत्मा किती आतुरतेने तळमळत असतो त्याची कल्पना माझ्यासारख्या असंख्य साधकांनाच येईल.

माझ्या आयुष्यातील सुवर्णक्षण जवळ आला. एका निराळ्याच ओढीने मी पुण्यास आलो. जीवाशिवाची भेट झाली. मातेच्या वात्सल्याने स्वागत झाले. लहान बालकाच्या निर्व्याज हास्याने स्वागत झाले पौर्णिमेच्या चांदण्यात दुधाने न्हाल्यासारखेच पवित्र व सुखदायी वाटले. प्राथमिक चौकशी होऊन दोन दिवसांनीच दीक्षा समारंभ पार पडला व दक्षिणेची कांडी फिरवावी असा आमूलाग्र बदल चित्तात–विचारात–आचारात झाला. मी माझा नव्हतोच. दोन अडीच तास स्वर्गीय आनंदात पोहत होतो. अंगात विद्युत्प्रवाह सुरू व्हावा अशी चालना मिळाली. डोळे उघडले तो मस्तक गुरुचरणावर विसावलेले होते. महाराजांचा अनुग्रह झाला व पुनीत झालो. काय वाटले–काय झाले हे शब्दात वर्णन करण्यापलीकडे आहे. शब्दच अपुरे आहेत. ह्या मार्गात कडक बंधने नाहीत. विशिष्ट गंडाचा आग्रह नाही. आपण आचरत असलेला मार्ग बोट धरून नीट व्यवस्थित मार्गावर आणला जातो. ईप्सित दैवताचा धावा सुकर होतो. यमनियमांचे पालन व्यवस्थित होते. बैठक स्थिर होते.

सरावैरा धावत असलेले मनोविकार स्थिरावले जातात. ध्यान धारणा विनासायास होते-बरे, काही कारणाने खंड पडला तरी पुन: अभ्यास सुरू झाल्यावर मागील अवधानातून एकदम अभ्यास पुढे सुरू होतो

मार्गदर्शन झाले. प्रगति ज्याची त्याने करुन घ्यावयाची आहे. मला आलेले दोन तीन विशिष्ट अनुभव कथन केले असता अप्रस्तुत होणार नाही असे वाटते.

काही शारीरिक उपाधींचा भोग भोगीत असता मन तळमळत होते गुरुदर्शनाकरता. जवळ जवळ महिनाभर भेट नाही की दर्शन नाही. एका सायंकाळी ह्या अगतिकतेची परमावधी झाली व मन फारच बेचैन झाले कितीही त्रास झाला तरी महाराजाना भेटावयास जाण्याचा निश्चय घरात बोलून दाखविला. परंतु सर्वज्ञ गुरुमाऊलीलाही आर्त हाक ऐकू गेली व त्याच दिवशी सायंकाळी महाराज माझ्या घरी विचारपूस करण्यास प्रत्यक्ष दत्त म्हणून हजर. अरेरे!-केवळ माझ्या दौर्बल्यामुळे ह्या महात्म्यास माझ्या घरी येण्याचा त्रास सहन करावा लागला मी हा चमत्कारच समजतो. किती बरे वाटले असेल ह्याची कल्पनाच केलेली बरी. पुनः सांगावयाचे काय, की मुद्दाम नाही आलो, तुमची बरेच दिवसात भेट नाही म्हणून ह्या बाजूस फिरावयास आलो. डोळ्यात अश्रू उभे राहिले माझ्यासारख्या दीन पामराकरता केव्हढा हा त्रास! अस्तु दुसरा अनुभव ह्यापेक्षाही मनोज्ञ आहे

आतड्याकडील सुजेमुळे मला भयंकर पोटदुखी लागली होती. जीव तळमळत होता. डॉक्टर वगैरेंचे उपचार चालू होते सर्व शारीरिक तपासणी होऊन अपेंडिक्स वाढल्याचे निदान डॉक्टरानी केले व ऑपरेशनचा दिवस ठरवला. घरातील सर्व जणानी तयारी केली एक्सरे वगैरे काढून रोग निदान निश्चित झाले. परंतु अंतर्मन मा। महाराजाना भेटावे असे सांगत होते माझे कोणीच ऐकून घेण्याच्या मन:स्थितीत नव्हते. परंतु दृढ निश्चयाने महाराजाची परवानगी घेतल्याशिवाय ऑपरेशन करून घेण्याचे मी साफ नाकारले व महाराजाच्या भेटीस गेलो. सकाळची पूजाअर्चा चालू होती नेहमीप्रमाणेच उत्साहाने व प्रेमळपणे स्वागत झाले डॉक्टराचे म्हणणे सांगितले महाराज हसले म्हणाले, कापाकापीशिवाय डॉक्टराना काय दिसतय व सुचतय!-तुम्ही मी सांगतो ते करा-रोज थोडा वेळ शीर्षासन करा व मग महिन्या-दोन महिन्यानी डॉक्टराना दाखवा अपेंडिक्स वगैरे असलाच तर पाहू म्हणावे' गुरुवाक्य प्रमाण मानून त्या दिवसापासून आजपर्यंत रोज नियमित शीर्षासन करीत आहे. एकही दिवस पोट दुखले नाही की अपेंडिक्स वाढले आहे ही भावना नाही-आमचे डॉक्टर अजूनही मला ऑपरेशन टेबलावर नेण्याची भाषा करीत आहेत. बिचारे डॉक्टर! त्याना काय कल्पना की काही काही वेळा भौतिक शास्त्रे ह्या प्रकारच्या कृपादृष्टीपुढे दुबळी ठरतात व अतर्क्य, अनाकलनीय असे चमत्कार अनुभवास येतात.

शीर्षासनाचे नुसते निमित्तच असे मी मानतो. माझ्यावरील त्याच्या कृपाप्रसादाचेच हे चिन्ह आहे अशी माझी भावना आहे.

अशा प्रकारचे कितीतरी अनुभव वर्णावे! मनात अनेक शंकाकुशंका उद्भवायच्या व त्याचे निरसन आपोआपच होत असते. त्याला वादविवाद करण्याची जरूरीच वाटत नाही. अनेक कठिण समस्याची उकल केवळ महाराजाच्या निष्ठापूर्वक स्मरणाने झालेली आहे.

अशा दिव्य विभूतीच्या सहवासात आयुष्यातील एक तप गेले मनाला खेद एवढाच होतो की एकसारखा सहवास मिळत नाही-' पण असे तरी का म्हणावयाचे?' आठवण केल्याबरोबर महाराजाच्या सान्निध्याचा भास होतोच व पुढील काव्य पंक्तीची सत्यता मनाला पटते-

दिव्यत्वाची जेथ प्रतीती, तेथे कर माझे जुळती ॥

—स वि देवधर, पुणे

प्रभु के पास आने वाले चार प्रकार के कहे जा सकते हैं। अर्थात अर्थार्थी, आर्त, इष्टापूर्त अथवा जिज्ञासु। प्रभु के सान्निध्य से और कुछ न सही तो कम से कम अर्थार्थी बहकने से बच जाता है, आर्त को समाधान मिलता है तथा इष्टापूर्त को प्रोत्साहन। जिज्ञासुओं पर उनकी विशेष दृष्टि रहती है। अधिकारी मिल जाने पर साधक की प्रगति के साथ साथ उनके मापदण्ड दृढ और अमिन्न होते जाते हैं। उनका उपदेश आकस्मित वार्तालाप का रूप धारण कर लेता है। वे समयानुसार अपने गुप्त से गुप्त रहस्य भी प्रकट करने लगते हैं। इस स्थिति के उत्पन्न होने पर ही प्रभु के महान् स्तर का सच्चा अनुमान लग पाता है। शनै शनै साधक और साध्य में सामीप्य एवं सायुज्य स्थापित होने लगता है तथा अन्ततोगत्वा बाह्य स्पर्शादि-रूपी अन्तर की समस्त शृंखलाएँ छिन्नभिन्न हो जाती हैं। तब द्वैत विलीन होता है और एकत्व का प्रत्यक्ष अनुभव होता है।

आर्द्र इंधन प्रज्ज्वलित नहीं हो पाता, शुष्क के लिए स्पर्श आवश्यक होता है। तथा पेट्रोल व हाइड्रोजन सरीखे तीव्र पदार्थ दूर ही से भभक उठते हैं। ऐसा ही विभाजन साधकों का भी होता है। इस कारण से, यद्यपि अपनी ओर से प्रभु सभी के लिए उदार हैं, तथापि हमें यह विचारना श्रेयस्कर है कि क्या हम उन तक जाने के योग्य भी हैं। उनके अनुग्रह को पाने और उसे सरक्षित रख सकने के लिये यह परमावश्यक है कि हम न्यूनतम प्रयास तो करें ही और तब उनके समीप जायें।

प्रभु का विश्वास है कि प्रत्येक व्यक्ति का पारमार्थिक पथ उसके अपने प्राकृतिक झुकाव पर निर्भर रहता है। अतः उसके प्राकृतिक चाव को विकसित होने के लिए उसको शास्त्रीय परंपरा के अन्तर्गत पूर्ण रूपेण स्वच्छन्द रूप से बढ़ने देना चाहिए। ऐसा करने से समय पाकर उसका अपना मार्ग स्पष्टरूप से स्वयमेव झलकने लगता है। इस कारण साधनाओं की तुलना सर्वथा निरर्थक है। सभी साधनायें समान प्रयास चाहती हैं। यहाँ हमें तितली से पाठ लेना है। यह पखेरू प्रथम रेंगने वाला कीड़ा होता है। उसके आठ जोड़ी पैर होते हैं, काटने वाले मुख अवयव होते हैं और यह पत्तियों को खा खा कर बढ़ता है। बढ़ने पर यह अकर्मण्य हो जाता है और अपने को एक खोल में बन्द कर लेता है। तब इसके सभी अवयव परिवर्तित होने लगते हैं। सिकुड़ कर यह आधा रह जाता है। पंजे केवल तीन जोड़ी रह जाते हैं। काटने के स्थान में चूसने वाले मुख अवयव हो जाते हैं और इसके पर निकल आते हैं। इतना घोर परिवर्तन क्या बिना कष्ट के साध्य है? भांति भाँति की तितलियां को क्या एक जैसा कष्ट इस क्रिया में नहीं होता होगा? यदि रेंगने वाले कीट को पतंगा होना है तो वह किसी भी जाति का क्यों न हो, उसे परिवर्तन क्रिया का कष्ट तो सहना ही पड़ेगा। इसी प्रकार मनुष्य को यदि परम पद प्राप्त करना है तो कोई भी साधन क्यों न हो, भारी तपस्या तो करनी ही होगी।

हमारे प्रभु पुष्टि करते हैं कि भक्ति तो सभी साधनों का फल है। सामान्यरूप से भक्ति से नाम जप समझा जाता है। यह तो साधन मात्र है, परन्तु इसके अभ्यास से जो अवस्था प्राप्त होती है, वह परा भक्ति कहलाती है और वह सभी ही साधनों का निर्दिष्ट स्थान है।

— अज्ञात



# भक्ति

# — एक जीवन दर्शन

भक्ति हे एक स्वतंत्र दर्शन आहे. तो एक दिव्य अन् भव्य व मनोरम असा विचार प्रवाह आहे. माणूस ज्या-वेळी जन्माला येतो त्यावेळी तो इच्छा, आकांक्षा, भावना, विकार यांचे सुप्त संस्कार घेऊन येतो व या सर्वांचे मन हे केंद्र आहे असे मानसशास्त्रवेत्ते सांगतात. माणसाचे मन ही खरोखर एक अजब वस्तू आहे. या मनामुळेच विचार केला जातो दैनंदिन व्यवहारात अनेक गोष्टी कराव्या लागतात. त्यात काही भल्या तर काही बुऱ्या असतात व त्या सर्वांचा ठसा मनावर उमटत असतो. पुष्कळ वेळा या वाईट गोष्टींचे प्राबल्य होते व त्याचाच पगडा मनावर जास्त प्रमाणात बसतो. जसा घरात कचरा बराच साठला की घराची शोभा, पावित्र्य या सर्व गोष्टी दूषित होतात, मनाची अगदी तशीच अवस्था होते. मनही अशा प्रकारच्या कचऱ्याने भरून जाते व त्यामुळे त्याचे शुद्ध, पवित्र व मंगल स्वरूप झाकून जाते.

चिंतन करणे हाही एक मनाचाच भाग आहे. या चिंतनरूप कार्यामुळे या मनालाच 'चित्त' असे म्हटले जाते. हे चिंतनही विविध प्रकारचे असते. या चिंतनात स्वत चा व स्वतःच्या हिताचा (शाश्वत हिताचा) जवळ जवळ विचार नसतोच. हे चिंतन शेजाऱ्याविषयी, नाते वाइकाविषयी, मित्राविषयी, गावाविषयी, देशाविषयी तसेच जगाविषयी चालू असते व त्यातही दोष दर्शनाचीच दृष्टि असते यामुळे आपल्याला स्वत.कडे पहायला वेळच मिळत नाही. पण या अशा प्रकारच्या विविध चिंतनाने मनाची शक्ति खर्च होते. या सर्वांचा साकल्याने असा परिणाम होतो की हे चित्त मलिन होते. या मलिन चित्तात त्यामुळे सुविचाररूपी सूर्याचे किरण चांगल्या रीतीने पडत नाहीत. त्यामुळे व्यक्तीच्या जीवन प्रवाहाला वेडे-वाकडे वळण लागते. चित्तात सतत अशिवाचाच ठसा उमटायला लागल्यावर शिव, सुंदराकडे आपण जाणारच कसे? अशा रीतीने माणूस ईश्वरापासून – आपल्या मूल स्थानापासून – वेगळा होतो, त्याला विसरतो. एका पायरीवरून घसरल्याबरोबर तो इतर सर्व पायऱ्या वरूनही घसरतो

यासाठी मन.शुद्धि किंवा चित्तशुद्धिची आवश्यकता शास्त्रकारांनी सांगितलेली आहे. पण ही चित्तशुद्धि कशी करायची हा प्रश्न आहे. यासाठीच सगुणोपासनेची निर्मिति झाली आहे. सगुणोपासना ही एक अत्यंत शास्त्रीय कल्पना आहे व ही कल्पना ज्या आपल्या पूर्वजांनी शोधून काढली त्या पूर्वजांचे जेवढे कौतुक करावे तेवढे थोडेच आहे. मलिन चित्त व्यक्तीच्या चित्तशुद्धीसाठी इतकी कोणतीही समर्पक योजना नसेल! या एका कल्पनेत अनेक कल्पनांचा समावेश झालेला आहे मलीन चित्त शुद्ध करणे ही अत्यंत कठीण गोष्ट आहे. निर्गुण निराकार ईश्वराची कल्पना या मनाच्या अवस्थेत मनात दृढमूल होणेच शक्य नाही.

सुंदर मूर्ति हा त्या अलौकिक शक्तीचा साकार अवतार आहे सगुणमूर्ति व तिच्यामुळेच सगुणोपासनेचा अशा रीतीने अविष्कार झाला निर्गुणोपासना ही कल्पना कितीही रम्य असली तरी ती करायला अत्यंत कठीण आहे ज्याचे चित्त अनेक ठिकाणी गुतले आहे त्याचे मन जे काही दिसत नाही तिथे एकाग्र कसे होणार? सगुणोपासना ही खुशामत नव्हे ती एक अत्यंत शास्त्रीय कल्पना आहे भगवन्मूर्तीशिवाय प्राथमिक अवस्थेत चित्तैकाग्र्य शक्य नाही व त्याशिवाय चित्तशुद्धि होणेच शक्य नाही

उपासनेसाठी असलेली मूर्ति त्या सर्व गुणसंपन्न प्रभूच्या गुणांचे निधान आहे. ही भावना सतत प्रयत्नाने दृढ होते. गीतेत हीच कल्पना भगवान् श्रीकृष्णानी अनेक वेळा सांगितली आहे 'मय्यावेश्य मनो ये मां, मयिचानन्य योगेन' 'भक्तिरव्यभिचारिणी', 'मय्यासक्तमना पार्थ,' 'मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु,' 'मां च योऽव्यभिचारेण भक्तियोगेन सेवते,' 'मय्येव मन आधत्स्व,' इत्यादि श्लोकात भगवतानी ही गोष्ट आवर्जून सांगितली, पुन्हा पुन्हा सांगितली यातील हेच रहस्य आहे सगुणोपासनेने ऐश्वरीय गुणाविषयी व ईश्वराविषयी प्रेम निर्माण उदात्तीकरणासाठी भक्ति करण्याशिवाय अन्य मार्गच नाही म्हणून भक्ति करायला पाहिजे पुष्कळाना वाटत भक्तीची एवढी आवश्यकताच काय आहे? मी माझे कर्म करीन व देव त्याला योग्य तो न्याय देईल कदाचित् हे ठीक असेल, पण केवळ त्याने चित्त एकाग्र होऊन त्याचा विकास होणे या गोष्टी होणार नाहीत म्हणून या गोष्टीसाठी भक्तीचीच आवश्यकता आहे

तत्त्वज्ञानाच्या दृष्टीने विचार केला तर या जगात दोन तत्त्वे आहेत 'Matter आणि Spirit,' किंवा 'Self आणि not Self' अथवा 'प्रकृति आणि पुरुष' या नावानी त्यांचा उल्लेख केला जातो परंतु याच्यात एक 'Higher Self' किंवा ज्याला 'उत्तम पुरुष' म्हणतात तो मानण्याची प्रवृत्ति आहे याला गीतेचा हा आधार आहे

'उत्तम पुरुषस्त्वन्य परमात्मेत्युदाहृत ।

तत्त्वचिंतक ज्यावेळी सर्व समस्यांचा विचार करू लागतात त्यावेळी या 'Self' चे ज्ञान अत्यंत आवश्यक आहे या 'Self' ला किंवा जीवाला जर Higher Self उत्तम पुरुष बनायचे असेल तर भक्तीशिवाय तरणोपाय नाही

दिलेले आहे.

विश्वात विश्वंभराला पाहाण्याची एकदा दृष्टी आली की त्याची सृष्टि संपूर्णपणे बदलते. ही सृष्टि माझ्या उपभोगाकरिता नाही असे त्याला वाटायला लागते. ही दृष्टि येण्यापूर्वी तो सृष्टीकडे उपभोगाच्या किंवा उपयुक्तता वादाच्या दृष्टीने पहात असतो. पण आता त्याचा हा डोळा संपूर्णपणे बदललेला आहे. तो आता भोगवादी राहिलेला नाही तर तो भक्तिवादी झालेला आहे. यावरून कल्पना येईल की भक्ति ही एक जीवनवृत्ति कशी आहे माणसाची ही दृष्टि एकदा बदलली की ती केवळ या जगापुरतीच बदलत नाही तर वासनांकडे, विकाराकडेही तो वेगळ्याच दृष्टीने पहातो. माणूस वासनाशून्य कधीच होऊ शकत नाही. जर तो वासनाशून्य झाला तर त्याला माणूसच म्हणता येणार नाही. या स्थितीत वासना या वासनारूप राहातच नाहीत. आपण अपूर्ण आहोत. आपल्याला काहीतरी हवे आहे अशी अस्पष्ट भावना म्हणजे वासना. वासनेत स्वतःच्या अपूर्णतेची जाणीव असते व त्यामुळे उत्पन्न होणारी अस्वस्थता या दोन गोष्टी वासनेत असतात. म्हणून वासना निर्माण होणारच, परंतु त्या वासना संपूर्णपणे बदललेल्या असतात. त्यांचे उपद्रवकारित्व त्याला गेलेले असते. इतकेही करून वासना राहिल्या तर त्या देवाच्या आहेत असे भक्त समजतो.

परंतु केवळ चित्तैकाग्र्य, चित्तशुद्धि, चित्तविश्राम आणि भावनांचे उदात्तीकरण इतक्या गोष्टी झाल्या म्हणजे भक्तीची परिपूर्णता झाली असे होत नाही हा भक्तीचा एक भाग झाला. भक्तीचा दुसराही एक अत्यंत महत्वाचा भाग आहे. त्याशिवाय भक्ति पूर्ण होत नाही. किंबहुना हे भक्तीचे दोन पंख आहेत. एक अंतर्भक्ति व दुसरी बहिर्भक्ति. अंतर्भक्ति ही वैयक्तिक असते व बहिर्भक्ति सामाजिक असते. या भक्तिमय जीवनात जितके चित्तैकाग्र्याचे महत्व आहे तितकेच बहिर्भक्तीचेही महत्व आहे. आपल्या सर्व संतामध्ये भक्तीचे हे द्विविध रूप आढळते. खरा संत केवळ टाळकुट्या कधीच असत नाही, म्हणूनच संतांनी कधीही समाजाचा त्याग केलेला नाही. कारण बहिर्भक्तीचा समाज हा आधार असतो. कारण अंतर्भक्तीने एकदा दृष्टिकोन बदलल्यावर त्याची वृत्ति काही वेगळीच होते.

'भद्रं तद्भिश्च यदचति देवाः'

असे त्याला वाटायला लागते.

पण बहिर्भक्ति म्हणजे काय ? विश्वात सगळीकडे विश्वंभर आहे, मग तो सर्वांमध्ये आहे. जर तो सर्वांमध्ये आहे तर मग माणसे अशी लाचार, दीन, दु:खी का ? असावीत ? समाजात सात्विकता का दिसत नाही ? म्हणून समाजात सात्विकता वाढविणे, सत्कारिता निर्माण करणे, ईश्वराविषयी प्रेम निर्माण करणे, पूज्याविषयी आदरभाव निर्माण करणे याचे नाव बहिर्भक्ति.

आपल्या साधुसंतांना या द्विविध भक्तीशिवाय जीवनात काही सारच वाटत नव्हते. याशिवाय जीवन त्यांना अळणी वाटत होते. एकदा अंतर्भक्ति दृढ झाली की तिचे गमकच हे की माणूस मग स्वस्थच राहू शकत नाही. तो लोकांच्या आवडीनिवडीची स्तुतीनिंदेची पर्वाच करीत नाही. लोकांनी दिलेली प्रमाणपत्रे त्यांना नको असतात. म्हणूनच तुकाराम महाराज या बहिर्भक्तीत पूर्णपणे रंगलेले होते व त्यामुळेच ते

'देव घ्या कोणी देव घ्या कोणी ।
देव घ्या फुका, देव घ्या फुका ।
नलगे रुका मोल काही ॥'

असे म्हणत घरोघरी हिंडले. तुकारामांनी इंद्रायणीत सारी दु:खे बुडवून टाकली व या एकाच ध्येयाने प्रेरित होऊन वेडे झाले.

श्रीमदाद्यशंकराचार्य आपल्या प्रखर बुद्धिमत्तेने हिमालयासारखे होते. बौद्धांचे खंडन करताना व अद्वैताचे प्रतिपादन करताना त्यांच्या बुद्धीची तेजस्विता, धार, प्रखरता पहिल्यानंतर आपण अगदी स्तिमित होतो. व्यवहारात प्रखर बुद्धिमत्ता ही सूर्यासारखी मानली जाते. तिच्या प्रखरत्वाने भावनारूपी पुष्प कोमेजते असे दिसते. परंतु शंकराचार्यांच्या बाबतीत हे सर्व उलटच दृष्टीला पडते. पण हेच शंकराचार्य ज्यावेळी भक्तिरसाने रंगलेले दिसतात, त्यावेळी त्यांचे अंतःकरण काही वेगळ्याच दर्शपत्तीला येते व क्षणभर हिरीरीने अद्वैताचे प्रतिपादन करणारे शंकराचार्य ते हेच काय असा संदेह निर्माण होतो. ज्ञानाच्या उच्च भूमिकेवर गेलेल्या शंकराचार्यांची भक्तिरसाने ओथंबलेली स्तोत्रे ज्यावेळी वाचतो, त्यावेळी आपणही तल्लीन होऊन जातो

"भजेव्रजैक मण्डन समस्त पाप खण्डन ।
स्वभक्त चित्त रञ्जन सदैव नन्द नन्दनम् ।
सुपिच्छ गुच्छ मस्तक सुनाद वेणुहस्तक ।

अनङ्गरङ्ग सागर नमामि कृष्ण नागरम् ॥"

'भवत्स्या मयाचे जननि जनन यातु मम वै।

मृडानी रुद्राणी शिव शिव भवानीति जपत ॥"

"परब्रह्म लिंग भजे पाण्डुरङ्गम् ॥"

अशा प्रकारच्या स्तोत्रांच्या काव्यपूर्ण पंक्ति वाचल्यानंतर

'ज्ञानादेव तु कैवल्यम्,

'यदहरेव विरजेत् तदहरेव प्रव्रजेत्।'

अशा प्रकारचे प्रतिपादन करणाऱ्या शंकराचार्यांच्या विरक्तीतही केवढी महान अनुरक्ति किंबहुना शंकराचार्यांचे जीवन म्हणजे विरक्ति व अनुरक्ति यांचे सुमधुर मीलनच स्तोत्रात गाणारे शंकराचार्य काही वेगळेच भासतात. भगवंताशिवाय माझे स्वतंत्र अस्तित्व राहूच शकत नाही अशा प्रकारचा केवलाद्वैताचा सिद्धांत प्रतिपादन करणाऱ्या शंकराचार्यांनाही स्वस्थ बसवले नाही. संपूर्ण देशभर हिंडले. माणसातली दैवी शक्ति जागृत केली व त्यासाठी चार दिशांना चार मठांची स्थापना केली. ज्या शरीरामध्ये भगवंत राहतो ती शरीरे निस्तेज व लाचार राहता कामा नये. यासाठी आसेतु हिमालय हिंडले. वस्तुतः त्यांना काय मिळवायचे होते ? दुसरे त्यांना काहीही मिळवायचे नव्हते. त्यांना ईश्वराचे काम करायचे होते विसरल्या दिव्यतेची करून आठवण,' ही गोष्ट त्यांना करायची होती

अशा प्रकारे ही भक्ति द्विविध रूपानेच पुरी होते. एवढेच भक्ति याचा अर्थ भगवंताशी एकरूप होणे, त्याला चिकटून राहणे असा होय. जीवनातल्या प्रत्येक गोष्टीत ही वृत्ति कायम ठेवली पाहिजे. आपल्या सर्व वासना, संकल्प, कृति सर्व त्या शक्तीमुळे होत आहेत असे प्रामाणिकपणे वाटायला हवे व याचेच नाव भक्ति होय. या भक्तीच्या बागेत नेहमी प्रेमाचा सुगंध दरवळत असतो व तो लोकविलक्षण असतो व एकदा याची गोडी लागली की मग माणूस इतर गोष्टींकडे वळतच नाही किंवा वळलाच तर त्याविषयी त्याच्या मनात प्रेम निर्माण होत नाही. त्यामुळे आसक्तीही वाटत नाही अशा प्रकारची वृत्ति झालेला माणूस ईश्वर म्हणजे आपले सर्वस्व मानतो. जगात त्याच्याशिवाय त्याला दुसरे काहीही दिसत नाही व यातच तो स्वतःलाही विसरत असतो शेवटी या जगात ईश्वर हीच एकमेव वस्तु शिल्लक राहते अशा प्रकारची वृत्ति झालेल्या भक्ताच्या मनात ईश्वराशिवाय दुसरा काही विचारच नसतो. मोहात किंवा आसक्तीत द्वैत असते परंतु या अवस्थेत तन्मयता असते व त्यामुळे एक अनिर्वचनीय आनंद मिळतो.

अशा प्रकारची ही वृत्ति निर्माण झाली की ती संपूर्ण जीवनव्यापी असते. जीवनाचे सर्व व्यवहार करीत असतानाही ही वृत्ति नाहीशी होत नाही. किंबहुना ही वृत्तीच सर्व कर्मांना प्रेरक व मार्गदर्शक होत असते. या वृत्तीचा वियोग म्हणजे भक्ताला मरणच वाटते एकनाथ महाराज म्हणतात

'काया वाचा मनसा। माझे भक्तीचा पडला ठसा।

भजना नाठवे दिवस निशा। भक्तीची दशा या नाव ॥'

(एक भाग)

अशा प्रकारची वृत्ति झालेला भक्त दुःखाचेही स्वागत करतो दुःखाला एक वेगळी चव असते असे त्याला वाटते किंबहुना हे दुःख माझ्या प्रभूने माझ्यासाठी पाठविलेले आहे. त्यात त्याचा काहीतरी हेतु असेल म्हणून तो दुःखाचेही स्वागत करतो, ते आपल्या कल्याणासाठीच आहे असे तो मानतो जिथे प्रेमवृत्ति असते तिथे स्वागत असते तिथे तक्रार नसते. ज्ञानेश्वर व तुकाराम यांना दुःख वाटलेच नाही. जिथे आत्मीयता आहे, ममत्व आहे तिथे तक्रारीला जागाच कशी उरणार ? विकृत दृष्टिकोण झालेल्या व्यक्तींना हे जग वाईट दिसते. ज्यांना जग वाईट दिसते त्यांच्या ठिकाणी जगण्याची खरी कल्पना नाही असे म्हणावे लागते.

बौद्धिक दृष्टीने पाहिले तर हे दृश्यमान जगत् खरे आहे. पण भक्तिपूर्ण भावाने पाहिले की जग खोटे ठरते. ईश्वराकडे एकाग्रतेने पाहायला लागल्यावर भक्ताला दुसरे काही दिसतच नाही, आठवतच नाही व त्या दृष्टीने हे जग खोटे आहे. वैषयिक प्रेमाची उत्कटताही जग विसरल्याशिवाय प्राप्त होत नाही मग जग विसरल्याशिवाय आध्यात्मिक सुख तरी कसे मिळणार ?

अशा प्रकारच्या दिव्य सुखाचा आस्वाद मिळाल्यावर त्याची गोडी काही वेगळीच असते व तो स्वानुभूतीचा विषय आहे तो वर्णना पलीकडचा विषय आहे त्याची तुलना कोणत्याही लौकिक गोष्टीशी होऊच शकत नाही.

एवढेच देवापासून विभक्त न झालेला जो तो भक्त व ही जी वृत्ति तिचे नाव भक्ति होय. ही वृत्ति निर्माण झाली की त्याची दृष्टि बदलते. दृष्टि बदलली की कृतीत फरक होतो म्हणूनच भक्ति हे एक जीवनदर्शन आहे असे म्हटले

जाते. एकदा देवाशी जवळीक साधली गेली की मरणाचीही भीति वाटत नाही. मृत्यूचा डंख जीवनातून जर काढायचा असेल तर त्याला भक्तीची झालर लावायला पाहिजे. म्हणून निर्भयता आली की तेजस्विता येते व अपूर्णता नाहीशी होते व यातच खऱ्या आनंदाची प्राप्ति होते. आनंदाचा झरा आपल्याजवळ आहे याचा त्याला साक्षात्कार होतो. अशा तऱ्हेने सर्वेंद्रियांतून या आनंदवृत्तीचा प्रकार हीच भक्तीची परितृप्ति होय.

जीवनातली भोगाची वृत्ति बदलली की वृत्तीत माधुर्य येते, रमणीयता येते, सौंदर्य येते. मी सृष्टीकडे बघेन पण ते भक्तीच्या डोळ्यांतून बघेन, अशी लोकोत्तर दृष्टि होते व सर्वत्र प्रभुदर्शनाचा प्रत्यय असतो व त्यातच तल्लीनता, जीवनसर्वस्व याचा लाभ होतो. हा लाभ झाला की इतराची पर्वा राहात नाही.

'यं लब्ध्वा चापरं लाभं मन्यते नाधिकं ततः'

अशी स्थिति होते.

—पांडुरंगशास्त्री आठवले,
श्रीमद्भगवद्गीता पाठशाला,
माधवबाग, मुंबई.
प्राचार्य-तत्त्वज्ञान विद्यापीठ, ठाणा.



# मला माहीत असलेला

# "ईश्वर"

श्रीसद्गुरुदेवाना ( श्री. वा. द. गुळवणीमहाराज ) याना हजारो भक्त आहेत व त्यातला मी एक आहे. असे असून सुद्धा मी रोज त्याना भक्तीभावाने प्रार्थना करितो की,

"उदंड भक्त तुम्हाला आम्हाला कोण पुसतो ?
हे बीद राखणे आधी बुद्धी दे रघुनायका"

श्रीगुरुदेवाना हे लहानसे कृतज्ञतेचे फूल वाहताना मला अतिशय आनंद होत आहे आणि त्याचा श्रीगुरुदेवानी स्वीकार करावा अशी त्यांच्या चरणी नम्र प्रार्थना आहे.

रामाने सेतू बांधला, तेव्हा खारीने आपल्या शक्तीप्रमाणे सेतू बांधनाला मदत केली त्यातलाच हा प्रकार आहे. कारण श्रीसद्गुरुमाउलीच्यावर अनेकानी काव्ये केली आहेत त्याची बरोबरी मी काय करणार ? परंतु मी गुरुदेवाचे स्मरण करून लिहीत असल्यामुळे मला काही शब्दसृष्टीची वाण पडणार नाही. आणि शब्दसृष्टीची वाण पडणार नाही या माझ्या आत्मविश्वासावर विसंबून मी गुरुदेवाचे चरित्र लिहीन किंवा शब्दसृष्टीचे ढीग उभे करीन, परंतु स्वामी विवेकानंद म्हणतात "ईश्वर ही अनुभविण्याची वस्तु आहे. हा काही तत्त्वज्ञानाचा विषय नाही." त्यामुळे भाराभर लिहीण्यात काय स्वारस्य मात्र तरीसुद्धा माझ्या मनात येते की मला गुरुदेवानी अशी शक्ति द्यावी की त्यायोगे मी जगातील प्रत्येक मनुष्याच्या कानावर श्रीगुरुदेवाचे नाव घालू शकेन

आता गुरुदेवाविषयी मन मोकळे दोन शब्द लिहीतो. मला साधारण ७॥ वर्षापूर्वी गुरुकृपा झाली. तेव्हापासून दिवस अतिशय लहान वाटू लागला आहे. दिवस हा हा म्हणता निघून जातो. "दिवस भराभर जातात असे वाटणे म्हणजे मनुष्य आनंदात आहे." हे मानवी जीवनातील सत्य आहे उदाहरणच द्यावयाचे झाले तर काही प्रसंग असे घडतात की त्यामुळे मनुष्याला दिवस फारच मोठा वाटू लागतो हे सर्वांच्या अनुभवातील आहे.

मला गुरुकृपा झाल्यापासून माझे सर्व जीवनच पालटून गेले. आधी मी सद्गुरूचे पाय दिसावे म्हणून चार ठिकाणी चौकशी केली. स्वामी विवेकानंद यांच्या बेल्लूर मठात गेलो. तेथे उत्तर मिळाले 'तुमची तळमळ वाढली की मग तुम्हाला सद्गुरुचे दर्शन होईल.' हरिद्वार-हृषीकेश येथे गेल्यावर माझी नकळत ओढ असे की योगी लोक कोठे असतील ? त्याचे कसे दर्शन होईल ? हे असे का वाटावयाचे हे माझे मलाच सांगता यावयाचे नाही. पण जीवनातील अशी ओढ वाढता वाढता मला एक दिवस अचानक गुरुकृपा झाली. म्हणजे काय झाले ? असा प्रश्न काहीजण विचारू लागतील त्याला उत्तर एकच की जसे निर्धन माणसाला अचानक लाखो रुपयाचे लॉटरीचे बक्षीस मिळावे. त्यातलाच हा प्रकार आहे. तो अनुभविण्याचा विषय असल्यामुळे मी त्याविषयी काय लिहू ? ते माझे मलाच समजत नाही मी फक्त माझ्या व्यवहारी जगात रुसा फरक पडत गेला ते सांगतो म्हणजे झाले

कोणतेही काम करावयास घ्या त्यात निराशेला जागाच

वाटत नाही अर्थात् आपापल्या वैयक्तिक कार्य करण्याच्या शक्तीवर या सर्व गोष्टी अवलंबून आहेत मी एकदम देशाचा महामंत्री होईन किंवा राष्ट्राध्यक्ष होईन असे म्हणणे वेडेपणाचे ठरेल मात्र तरीसुद्धा एवढी खात्री आहे की गुरुदेवाचा जर आशिर्वाद असेल तर ह्या गोष्टीसुद्धा अशक्य नाहीत कारण त्याची भक्त मंडळी म्हणतात ना ?

" जी जी उठे कामना अंतरात ।
ती ती सदा शीघ्रही प्राप्त होत ।
भक्तांशी चिंतामणी प्राप्त झाला ।
नमस्कार माझा श्रीवामनाला । "

मला काही तशी जागा मिळावी असे वाटत नाही. कारण गुरुदेवाचे स्मरण झाले की माझा मीपणाचा संपूर्ण लोप होतो तर मग आता काय मागावयाचे ? मनुष्याला जीवनात मन शांति पाहिजे असते ती संपूर्णपणे मला मिळाली आहे गुरुमाऊलींच्या कृपेने सर्व काही मिळाले आहे मी गुरु देवाना म्हणतो,

' आता मागणं काही नाही
तुला आवडे ते ते देई '

असे एकदा माझ्या मनाने ठरविल्यावर आपणास काही मागावयाचे आहे अशी भावना कशी होणार ?

स्वामी विवेकानंद म्हणतात 'गुरूच्या काही श्रेणी असतात त्यामध्ये नुसत्या संकल्पाने जे दिक्षा देतात ते अवतारी पुरुष असतात ' मला माझ्या गुरुदेवानी नुसत्या संकल्पाने पुण्याहून मुंबईच्या ह्या यांत्रिक जीवनात दीक्षा दिली व त्यावेळी माझा मीपणा लोपला मग वाचकहो तुम्हीच सांगा अशा सिद्ध पुरुषांची जर मुमुक्षू, आर्त व साधकावर कृपा झाली तर त्यांना काही कमी पडेल का ? मग वृथा ईश्वराच्या शोधात काय फिरता ? आता जास्त काही न लिहिता ज्या ना जिज्ञासा असेल त्यानी प्रत्यक्ष अनुभव घ्यावा अशी विनंति करतो, नाहीतर तुम्ही सर्वजण त्याच्या दर्शनाला गर्दी कराल व मग मला माझ्या देवाची भेट घ्यावयास उशीर होईल

आता शेवटचे गुरुचरणी हेच मागणे आहे,

' हेचि दान देगा देवा । तुझा विसर न व्हावा ॥

— न. द. जोगळेकर



# श्रीसमर्थांची उज्ज्वल शिकवण

अखंड योग म्हणोनी योगी । योग नाही तो वियोगी ।
वियोगी तोही योगी । योगबळे ॥ दास०

श्रीसमर्थांचे चरित्र आणि त्यांची शिकवण याचा आपण जितका खोल विचार करू तितका त्यातील रसपरिपाक आपल्या प्रचीतीस येईल. ते चरित्र जितके रसाळ आहे तितकेच स्फूर्तिप्रद आहे सर्व प्रकारची उत्कटता समर्थांच्या वागणुकीत साठविलेली दिसते श्रीसमर्थांचा जन्म जांबेस मराठवाड्यात झाला. अनेक पिढ्यांची रामोपासना समर्थांच्या रूपाने प्रगट झाली वयाच्या पाचव्याच वर्षी त्यांनी आपल्या वडील बंधूस अनुग्रह मागितला. वय लहान असल्याने श्रेष्ठांनी जरा चालढकल केली समर्थांना ते मानवले नाही. त्यांनी मारुतरायाच्या मंदिरात जाऊन त्याचे पुढे हट्ट धरला, तीन दिवस उपास केला. मारुतीराय प्रगट झाले व रामनामाचा उपदेश दिला. श्रीसमर्थांच्या वैराग्याला तर जोडच नाही श्रीगिरिधर म्हणतात— श्रीसमर्थांचे ‘धगधगीत’ वैराग्य, अखंड एकांताची आवड, जनसंसर्गाचा मनापासून कंटाळा. त्यांच्या अभ्यास काळी ते आपल्या मनाला उपदेश करतात—

निघोनी जावे कठिणा वनाला ।
अखंड गावे मग पावनाला ॥
स्मरणी करावे जगजीवनाला ।
प्रीति धरावी पदसेवनाला ॥ स्फुट

त्यांना म्हणून अन्य काही आवडतच नव्हते.

उत्कट भक्ति उत्कट ज्ञान ।
उत्कट वैराग्य उत्कट भजन ।
उत्कट योग अनुष्ठान । ठायीं ठायीं

अशी त्यांची शिकवण होती.

उत्कट भक्तीशिवाय परमात्म चरण कमळी चित्त दृढ कसे होईल ! घोर अरण्यात जावे आणि अखंड तहान, भूक विसरून त्या जगज्जीवन प्रभू रामचंद्राला गावे अशी त्यांच्या मनाची पौगंड अवस्थेतील भूक होती किशोर अवस्था नुकतीच ओलांडलेली होती. श्रीसमर्थांचा अवतार होता आणि ईश्वरी अचाट शक्तीखेरीज जे कार्य होऊ शकणार नव्हते अशा विशिष्ट कार्याकरिताच ह्या अवताराची योजना होती असे आपणास त्यांच्या पुढील कर्तृत्वावरून सहज ध्यानात येण्याजोगे आहे. आपला मुलगा बराच वेळ दिसेना म्हणून राणूबाईंना चिंता वाटू लागली. इकडे तिकडे पाहू लागल्या तो त्यांना एका कोपऱ्यात बसलेला नारायण दिसला. ‘अरे बाळा ! अंधारात काय करतोस ! ’ असे राणूबाईंनी विचारताच

‘आई, चिंता करतो विश्वाची ’

हे त्या लहान नारायणाने उत्तर दिले. ह्या दिव्य उत्तरात श्रीसमर्थांचे सर्व दिव्यत्व साठविलेले आहे. इतके लहानपणीच ते विश्वरूप झाले होते. विश्वाचे कोडे त्यांना सोडवावयाचे होते, लोकांना सन्मार्गाला प्रवृत्त करावयाचे होते. शारीरिक दुःख हे दुःख नसून स्वत्वाचा

विसर हेच खरे दुःख हे त्याना समाजाला समजून सांगायचे होते, त्याकरिता धर्मप्रवृत्ति जागृत व्हावयास हवी,पण धर्माचे आचरण स्वातंत्र्यावेरीज, सुराज्यावेरीज सुतरा अशक्य, शिवाय तेही जनमनाची घडण तयार करून चैतन्ययुक्त करावयाचे होते. कामसुख किती तुच्छ आहे हे विचाराने पटवावयाचे होते.

यच्च कामसुखं लोके यच्च दिव्यं महत्सुखम् ॥
तृष्णाक्षय सुखस्यैते कलां नार्हन्ति षोडशीम् ॥ म-स्मृति

ह्या जगातले जे कामसुख आहे किंवा स्वर्गात जे मिळते, ते सर्व जरी एकवटले तरी कामाच्या त्यागाने अथवा कामवासनेच्या त्यागाने जे सुख मिळते त्याच्या षोडशांशसुद्धा भरणार नाही. तात्पर्य इतके ते अल्प आहे. त्याकरिता सारासार विचार करावयास हवा. श्रीसमर्थ म्हणतात–

निराकार जाणावा नित्य । आकार जाणावा अनित्य ।
यास बोलिजे नित्यानित्य । विचारणा ॥
सारीं भासे असार । आणि असारीं भासे सार ।
सारासार विचार । शोधुन पहावा ॥ (दास)

निराकार असे जे ईशस्वरूप ते नित्य आणि शाश्वत असून हा दिसणारा आकार अनित्य आहे, नाहीसा होणारा आहे. अर्थात साकार असा आपल्याहून भिन्न असलेल्या प्रत्येक बाह्य पदार्थापासून लाभणारे कितीही सुख वाटले तरी अंती ते नाशवंतच असल्याने अविचारी जीवाला दुःखातच लोटणारे आहे. म्हणून विचाराने आपण विषयाविषयी अनासक्तच राहिले पाहिजे. सुखाचे लक्षण वर्णन करताना

'सुखं स्यादात्मनोरूपम्'

असे म्हटले आहे आत्माच सुखरूप आहे. हा सारासार विचार नित्य शोधून पाहिला पाहिजे. आणि हेच पढण्या साठी व जगाला उपदेश करण्यासाठी श्रीसमर्थ बयाच्या बाराव्या वर्षी लग्नमंडपातून निघून गेले. प्रचंड तपाचरण केले, योगाची साधना केली. इंद्रिय निग्रह योगाच्या अभ्यासावेरीज शक्य कोटीतला नाही. आसन जय व्हावयास पाहिजे अखंड नामस्मरण करणे, चित्तवृत्तीचा ब्रह्मरूपात लय करणे हा योगच होय, भागवतात म्हटले आहे—

'दान स्वधर्मो नियमो यमश्च श्रुतानि कर्माणि च सद्व्रतानि ।
सर्वे मनो निग्रह लक्षणान्ताः परो हि योगो मनस समाधिः॥

दान, स्वधर्म, नियम, यम, वेदांत श्रवण, शुद्ध कर्माचे आचरण, नाना प्रकारच्या व्रताचे आचरण सर्वांचा परिपाक मनोनिग्रह होण्यामधेच झाला पाहिजे. श्रेष्ठ प्रकारचा योग त्यालाच म्हणायचे की ज्यामधे, ब्रह्मस्वरूपाचे ठिकाणी *मन स्थिर पावले आहे. ज्यावेळी मिळाला गावातले लोक* त्रास यावयास लागले त्यावेळी स्व-स्थैर्याकरिता त्याने गायिलेली ही गाथा आहे. व या गाथेनेच तो योगारूढ झाला. श्रीसमर्थही तेच म्हणतात—

'अखंड योग म्हणोनी योगी'

आपल्या स्वरूपाचे अखंड चिंतन, अनासक्त बुद्धीने बाह्य विषयाशी वर्तन, आपण अखंड एकजिनसी ब्रह्मस्वरूप आहोत–ह्याचे कधीही विस्मरण न होणे ह्याला 'योग' समर्थांनी म्हटले आहे. त्याकरिता अनंत साधने आहेत व तीच टाकळी येथे श्रीसमर्थांनी केली. त्याना आळस ठाऊक नव्हता.

आळसें करंटपणाच्या खुणा । प्रगट होती ॥

असे ते म्हणतात.

आळस उदास नागवण । आळस परमार्थ बुडवण ॥

म्हणून आळस टाकून त्यानी १२ वर्षे चंदनासारखा देह झिजवला. ' समर्थ म्हणतात—

देवाच्या सख्यत्वासाठी । पडाव्या जिवलगासी तुटी ।
सर्व अर्पावे सेवटी । प्राण तोही वेचावा ॥
देव म्हणजे आपला प्राण । प्राणासी न करावे निर्वाण ।
परम प्रीतीचे लक्षण । ते हे ऐसे असे ॥

देवाचे सख्य जोडण्यासाठी जिवलग सुटले तर अवश्य सोडावे, सर्व सोडावे, फार काय प्राणसुद्धा सोडावा. आपला प्राण म्हणजे देवच इतकी निष्ठा असावी. खरे प्रेमाचे लक्षण हेच होय. 'तत्सुखे सुखित्वं' असे नारद भक्तिसूत्रामधे नारद गोपींच्या प्रेमाचे वर्णन करतात.

'सखा मानावा भगवंत । मातापिता गणगोत ।
विद्या लक्ष्मी धन वित्त । सर्वही परमात्मा ॥

अशी भावना असावी. सख्य भक्तीचे वर्णन करताना

आपल्या मनासारखें न घडे । तेणें गुणे निष्ठा मोडे ।
तरी गोष्टी आपणाकडे । सहजचि आली.

आपले मन निराळे असेल, आपण कोणी निराळे असू, पदार्थ पूर्णतया सत्य आहेत अशी भावना आपण केली

चुकले कोणाचे आपल्या ईश्वराला वाल नाही
' सुखदु ख प्रदो न पुरुषस्यात्मविभ्रम ।
मित्रोदासीनरिपव ससारस्तमम कृत ॥ भाग० ॥
तात्पर्य दुसरे कोणी सुखदु ख देणारे आहे हा भ्रम आहे हा अज्ञ जीवाचा भ्रम आहे हा मित्र, हा शत्रू हे अज्ञानाचे लक्षण आहे हे सर्वकाळ स्मरण पाहिजे अभ्यासकाल आहे क्वचित् स्मरण होणारच, परतु ईश्वरा शिवाय तरणोपाय नाही, तोच एक त्राता हे खरे आहे ना समर्थ म्हणतात
मेघ चातकावरी वोळेना । तरी चातक पालटेना ।
चद्र वेळस उगवेना । तरी चकोर अनन्य ॥
एस असावे सख्यत्व । विवेक धरावे सत्व ।
भगवतावरील ममत्व । साडूच नये ॥
चातक पक्षाला मेघाच्या पाण्याशिवाय गती नाही, म्हणून तो त्याच पाण्याची वाट पहातो, त्याचप्रमाणे चकोरालाही चद्राच्या उदेवाशिवाय दिसत नाही म्हणून विचाराने धीर धरावा, राग आवरावा व भगवतावरील ममत्व सोडू नये विषयावरील ममत्व भगव प्रेमाच्या आड येते म्हणून खूप विचार पाहिजे कारण—
काम एष क्रोध एष रजोगुण समुद्भव ।
महाशनो महापाप्मा विद्धेन इह वैरिणम् ॥ गीता ॥
साधकाला अभ्यासापासून परावृत्त करणारे कोणी असेल तर हे दोन प्रमुख वैरी आहेत, महादुष्ट, महापापी आहेत रजोगुणापासून ह्याची उत्पत्ती आहे—ह्याचा सग टाळ
अशा ममता देहीं वेडा । सुखरी करताती तडातोडी ।
नेऊन दु खाच सावडीं । माजी घालिती ॥
विषयजनित ज जे सुख । त ते सवेचि होते दु ख ॥
असा साधकाला अभ्यास पाहिजे
' सर्व साडून शोधा मजला । ऐसे देवचि बोलिला ।
लाकीं शब्द अमान्य केला । भगवताचा ॥
म्हणोन नाना दु खे भोगिती । सर्वकाळ कष्टी होती ।
मनीं सुखचि इच्छिती । परी ते कैचे ॥
उदड सुख नया लागले । वेडे तयास चुकले ।
सुख सुख म्हणताच गेले । दु ख भोगिता ॥
म्हाण्याने ऐसें न करावे । सुख होय तेचि करावे ।
देवास धुडीत जावे । ब्रह्माडापरते ॥
विवेकाचे फळ ते सुख । अविवेकाचे फळ ते दु ख
मात मानेल ते आवश्यक । फल पाहिजे ॥
नाश दु खे का भागतात ह्याचे समर्थांनी किती मार्मिक वर्णन केले आहे सुखाच्या मार्गाचा अवलब म्हणे करतात ज्याला दु ख पाहिजे त्याने विषयसुखात रा हावे ता पण समर्थांचा मोठा कटाक्ष की अभ्यास परिपक्व होईपर्यंत, आत्मस्वरूपाचा पूर्ण अनुभव येईपर्यंत विषयाचा मोह टाळलाच पाहिजे
श्रीमत भगवत् पूज्यपाद शकराचार्यांनी शतश्लोकीमध मायेचा प्रबळपणा वर्णिला आहेच
' चत्वाराऽस्या वर्णा युवतिरथ भवेभूतनानित्यमना ॥
इत्यादि ती नित्य तरुणी, नित्य नूतन, घटित घटना पाटव शक्तीची असल्यामुळ साधकाला पुढे सरकू देत नाही श्रीसमर्थही तच सागतात—
' सत्य शोधाया कारण । केली नाना निरूपणे ॥
तरी उठेना धरणे । असत्याच ॥
असत्य अतरीं बिंबले । न सागता ते दृढ झाले ।
आणि सत्य असाना हरपले । नेथील तेथे ॥
ऐस मायचे—
नाना प्रकारची निरूपणे सत्य स्वरूपाचा बोध होण्या करताच केलेली आहेत व करतात, परतु, अतरात असत्याचे जे ठाण आहे ते हलत नाही कारण अनेक जन्माच्या सस्काराने, विषयाच्या ससर्गाने अत करण भरून गेले आहे आणि सत्य सर्वत्र व्यापून असून तेथच हरपून गेले आहे आपणास प्रत्यय येत नाही असा हा मायेचा उत्कर्ष आहे ती चागल्या चागल्याला फसवित विश्वामित्रासारख्या तपस्व्याची उदाहरणे याच करिता प्रसिद्ध आहेत भागवतातही असा एक रूढ प्रवाह आहे की—
बलवान् इद्रियग्रामो विद्वासमपि कर्षति ॥ भाग
इद्रियग्राम बलवान असून मी मी म्हणणाऱ्या विद्वानालासुद्धा तो फसवितो भगवान् व्यासानी हे चरण लिहितेवेळी त्याचे शिष्य प्रसिद्ध आचार्य जैमिनी हजर होते ते म्हणाले, महाराज ! ' हा प्रयोग योग्य नाही, विद्वानाना—विषय बाधा नाही तरी हा प्रयोग बदला आणि
' बलवानिंद्रियग्रामो विद्वास नाप कर्षति
असा प्रयोग घाला व्यास म्हणाले, 'तुमची इच्छा असेल

तर माझा आग्रह नाही, परतु माझा प्रयोगच अनुभवाने बरोबर आहे शेवटी व्यासानी थोडी मौज केली सुदर मोहिनीचे रूप घेतले व मध्यान्हकाळच्या वेळी जैमिनी याचेकडे आले, जैमिनी स्नान करून साय अग्निउपासन करीत होते एवढे ज्ञानी, आचारनिष्ठ परतु व्यासाचे ते रूप पाहून त्याचे चित्त चलबिचल झाले व्यासानी आपले रूप प्रगट केले व विचारले तुमचा पाठ बरोबर का माझा पाठ बरोबर ते सागा जैमिनींनी आपल्या गुरूना वदन केले व आपलाच पाठ कायम ठेवण्यास समति दिली जैमिनींना अवघड काहीच नव्हते साधकाने किती सावध रहावे याबद्दल हा उहापोह आहे अशा घोर जाज्ज्वल्य निष्ठेने श्रीसमर्थांनी बारा वर्षे टाकळीला काढून रामरायाला प्रसन्न करून घेतले

उपासना मूर्ति ध्यानी। अथवा आत्मानुसंधानी।
नाहीं तरी श्रवण मननीं निरतर ॥ दास

अशा रामाचा ध्यास घेतला अनेक मोह झुगारून दिले व आता आम्हाला भीति नाही कळीकाळ काही करू शकणार नाही अशा त्याना विश्वास निर्माण झाला प्रभु रामचद्रांचे दर्शन झाले ते म्हणतात—

' आम्हा नाही चाड ते काणी येकाची।
दृढ राघवाची कास धरू ॥

कास धरू जणे पावननि केले। तेथ माझे झाले समाधान ॥
समाधान झाले प्रत्ययासी आले। धन्य ती पाऊले राघवाची ॥
राघवाची पाउले मानसी धरीन। विश्व उद्धरीन हेळामात्रे ॥
हेळामात्रे मुक्त करीन या जना। तरीच पावना राघवाचा ॥
राघवाचा दास मी झालो पावन। पतीत तो कोण उरो शके ॥
उरा शके ऐसे कल्पाती घडेना। जो कोणी पुसेना त्यासी उणे ॥
आम्हा नाही उणे राघवाच्या गुणे। ब्रीदचि राखणे पावनाचे॥
कितीएक जन ज्ञाने उद्धरीले। कृतकृत्य झाले तत्काळचि ॥
येणे काळें मोक्ष जरी मी देईना। दास म्हणवीना राघवाचा ॥
राघवाचा वर पावलो सत्वर। जनाचा उद्धार करावया ॥

उतारा लागडा आहे परतु उतरावयाचा मोह आवरेना म्हणून घेतला आहे ह्यात समर्थांच्या पुरश्चरणाचे महत्व आहे बयाच्या पाचव्या वर्षी जे चिंतन केल त्याला मूर्त स्वरूप निश्चित येणार याबद्दल पूर्ण विश्वास आहे रामाचा पाऊले मानसी धरीन आणि विश्वाचा उद्धार करीन अशी प्रतिज्ञा केलेली आहे आता पतित कोणी रहाणार नाही. राघवाचे ब्रीद आता निश्चित राखले जाणार राघवाचा आता मला वर मिळालेला आहे. जनाचा उद्धार करणेस मी मोकळा झालो आता उद्धार करीत असताना कोणत्याही मोहात गुतणार नाही, असा त्याना विश्वास निर्माण झाला कार्यकर्त्यांना श्रीसमर्थांनी उदाहरण घालून दिले आहे अगोदर आपली बुद्धि स्थिर करा, कोणत्याही प्रकारचा मोह आल्यावर आक्रमण करणार नाही इतकी प्रभूची कृपा सपादन करून घ्या नतरच सामुदायिक कार्य हाती घेण्याचे साहस करा

पहिले दिसे परी नास ॥ असे हातु नये

पुरश्चरण सपल्यावर सव जगभर हिंडून समर्थांनी कवढा अचाट व्याप केला, हजारो मठ स्थापन केले लोकामध्ये, समाजामध्ये चैतन्य निर्माण केले आणि त्याच्याच उपकाराचे फळ म्हणून आपण हिंदु म्हणून कसे आज जिवंत आहात हा इतिहास सर्वांना विदितच आहे आजही श्रीसमर्थांच्या तेजस्वी शिकवणीची अवश्यकता आहे विचाराची वागणूक असावी ते म्हणतात—

पर्णाळि पाहून उचले। जीवसृष्टि विवेकें चाले।
आणि मनुष्य होउन भ्रमले। यासी काय म्हणावे ॥

जीवसृष्टि विचाराने चालते आणि बुद्धिवान माणसान अविचारी व्हावे ह्याचा अर्थ काय?

घालूनि अक्लेचा पवाड। व्हावे ब्रह्मांडाहून जाड।
तेथे कैचे आणले द्वाड। करटेपण ॥

अशी तेजस्वी शिकवण देणारा महापुरुष आज पाहिजे आहे योग सामर्थ्याने वियोगी ईश स्वरूपाहून दूर झालेले योगी निश्चित होणारच तस्मात् योगी भवार्जुन हा भग वताचा आदेश श्रीसमर्थांनी पुढे दिला श्रीमत् शकरा चार्यांच्या पश्चात् इतका कार्यक्षम अवतार दुसरा झाला नाही वर्णाश्रम धर्मांचा पुरस्कार करणारा हा समर्थ सप्रदाय आहे. नाशीकच्या रामोपासक याना लिहिलेल्या पत्रात त्यानी सप्रदायाचे लक्षण सांगितले आहे. ते म्हणतात—

शुद्ध उपासना विमल ज्ञान। वीतराग आणि
ब्राह्मण्य रक्षण। गुरुपरपरेचे लक्षण। शुद्ध मार्ग ॥
ऐसे पचविधा बोलले। इतुके पाहिजे यत्नें केले।
म्हणजे सकळही पावले। म्हणे दासानुदास ॥

वरील पाच लक्षणे श्रीसमर्थ सांप्रदायाचा आधार होत स्थलाभावामुळे स्पष्टीकरण देता येत नाही. शेवटी श्रीसमर्थ

आपल्याकरिता रामाची प्रार्थना करतात ती करून हा लांबलेला लेख संपवितो.

रघुनाथ दासा कल्याण द्यावे।
अति सौख्य द्यावे आनंदवावे॥
उद्वेग नासो वर शत्रु नासो।
नाना विलासें मन तो विलासो॥
क्रोडे नको रे कलही नकोरे।
कापट्यकर्मी सहसा नकोरे॥
निर्वाण चिंता निरसी अनंता।
शरणागता दे बहुधात माता॥
भजयो न होरे जयवंत होरे।
आपदा नकोरे बहु भाग्य होरे।
श्रीमंतकारी जनहीतकारी॥
पर ऊपकारी हरिदास तारी॥

असा दयाळु मायबाप पुन्हा आम्हाला दर्शन देईल का!

—आण्णाबुवा कालगावकर
संपादक "सज्जनगड"



# पुण्यपुंज जो हिमवंत

हृषीकेशला जाण्यासाठी हरिद्वार सोडले. हरीच्या द्वारातून गेल्यावर आता हरीचे दर्शन होणार. हो नक्कीच होणार. पण हरीचे दर्शन घेण्याआधी ऋषींची भेट व्हावी, त्याचा आशीर्वाद मिळावा म्हणून ही हृषीकेशाची भेट. नावे तरी काय सुदर आहेत पहा. पहिले हरीचे द्वार. आता हृषीकेश. नावापासून मजा आहे बघा !

हरिद्वारचा निरोप घेऊन दुसऱ्या दिवशी हृषीकेशला निघालो. वाटेने निसर्गसौंदर्याची लयलूट होती. इथला निसर्ग समृद्ध आहे. उधळ्या नि थोडा बेफिकीरही आहे. हरिद्वार ते हृषीकेश अतर १४ मैल आहे. मोटारीने हे अतर कापायला कितीसा वेळ लागणार ! सभोवार पसरलेली वनश्री पाहता पाहता प्रवास केव्हा सपला ते कळलेही नाही.

हृषीकेश म्हणजे बाजारपेठ नि धर्मशाळा ह्याचेच गाव आहे असे प्रथम वाटले पण गगेकाठी उभे राहिल्यावर बाजूचे डोंगर नि त्याना झाकणारी झाडी पाहून मात्र मन पालटले. इथला गगेचा आकार लक्ष्मणाच्या धनुष्यासारखा आहे सध्याकाळी बाहेर फिरायला पडणाऱ्या स्त्रीप्रमाणे इथली गगा नीटनेटकी आहे. जास्त देखणी आहे. हरिद्वार रमणीय आहे तर हृषीकेश सुदर आहे. अबोला धारण केलेल्या स्त्रीसारखे कमनीय नि शात आहे. जिकडे पहावे तिकडे दाट झाडी, लहान मोठे डोंगर नि गगेचे दुधाळ हिरवे पाणी ! ह्या गावाचा रग हिरवा आहे; पण ते हिरवे असले तरी हिरवट नाही. असे शात गाव मी तर पाहिलेच नाही. माणसे इथे मुग्ध होतात नि मत्रमुग्धहि. तपाला नि आराधनेला अशी सुदर जागा दुसरीकडे शोधून सापडणार नाही. त्रिवेणी घाट, ध्रुव घाट, शकराचार्यांचे मदिर, शत्रुघ्न मदिर, भरत मदिर, मुनी–के–रेती, स्वर्गाश्रम पहाताना वाटेत अनेक लहान लहान झोपड्या लागतात त्यात साधु नि सन्यासी अतिम सत्याचा शोध घेत बसले आहेत. इथे आहेत इतके साधु नि सन्यासी अन्यत्र कुठेहि नसावेत. त्याच्या गाठीभेटी घेऊन त्याना जीवनविषयक प्रश्न विचारावेत, त्याची दर्शने घेऊन त्याचे आशिर्वाद घ्यावेत अशी फार इच्छा होती, पण वेळेच्या अभावी ते जमले नाही.

हरिद्वारला जशी गगेची आरती पहावी तसा हृषीकेशचा लक्ष्मणझुला पहावा. त्या पुलाला खाली कोठे पाय नाहीत खऱ्या अर्थाने तो झुला आहे. लोखडाच्या बळकट तारावर लोंबकळणारा नि जातायेताना मदसा हालणारा खालून गगा उफाळत, फेसाळत नि घोंगावत वाहते आहे. दोन्ही बाजूचे डोंगर ह्या पुलाने जोडले गेले आहेत. वरती निळे आकाश आहे. खाली हिरवे निळे पाणी नि बाजूला गर्द झाडी आहे. निसर्गाचा रगीतसगीत खेळ इथे डोळे भरून पहावा

इद्रजीत वधामुळे हातून घडलेल्या ब्रह्महत्येच्या पातक क्षालनासाठी लक्ष्मणाने इथेच घोर तपश्चर्या केली. भरत

स तिन रामभंदिर पुरात आहेत, पण रामाने नि भीम प्रम करणाऱ्या नि सर्व सुखांचा त्याग करून त्याच्यासाठी वनात जाणाऱ्या आदर्श लक्ष्मणाचे मंदिर मात्र इथेच आहे

रद्वारला जाण्यासाठी पुन्हा मोटारीत बसलो तरी या गावाचे सौंदर्य डोळ्याने टिपीत नि मनात साठवीत. माझ्या मनामध्ये नि ह्या निसर्गसुंदर गावामध्ये मी अंतर पण सुंदर लक्ष्मणझुला बांधायचा थांबून राहिलो त्या पुलावरून गंगातटाकी नि हिमालयाच्या पायथ्याशी वसलेल्या त्या निसर्गरम्य गावात मनाने मला कधीही जाता येईल

मोटार आता वनाच्या वाटे न लागली !

दर वर्षी उन्हाळ्यात असंख्य लोक, प्रवासी, भाविक यात्रिक नि साहसी हिमालयाची वाट चालतात कुणी धार्मिक हेतूने वाट चालतो, कुणी प्रवासाच्या पायाने भर करतो तर कुणी शास्त्रीय ज्ञानाच्या हेतूने रमलेला असतो

एका बाजूला प्रचंड कडा तर दुसऱ्या बाजूला खोल दरी समोर मोठी दाट झाडे, कुठे रुंद वाट तर कुठे अरुंद मधून गंगा वाहत आहे हरिद्वारपासून हिच सोबत केली आहे धाकट्या भावाला बहिणीने सोबत करावी ना तशी हरिद्वारला गंगा आईसारखी वाटली इथे बहिणीसारखी वाटते अवखळ नि थोडीशी पारखट !

एका डोंगरावरून रुंद वळण घेत मोटार चालली आहे वाट अरुंद असल्यामुळे जीवाचा थरकाप होतो आहे मधून गंगा वाहत आहे नि पलिकडच्या डोंगरावरून रस्ता होण्या पूर्वी यात्रेकरू पायी जात ती पाऊलवाट आहे आमची तिघांची एकमेकांना सोबत आहे

मोठमोठी पर्वतांची शिखरे, खळाळणारे झरे, फेसाळत वाहणारे ओढे, चित्ताकर्षक धबधबे, घोंगावत वाहणारी गंगा, कुठे पाणी खोल तर कुठे उथळ, कुठे फेसाळ पांढरा रंग तर कुठे गद काळा कुठे हिरवा निळा एकाच माणसाच्या स्वभावाचे अनेक कंगोरे असावेत तसे इथे गंगेचे पाणी अनेक रंगी आहे

उत्तर प्रदेशातील असा हा निसर्गरम्य भाग नुसत्या भाविकांनाच वेड लावणारा नव्हे, तर प्रवासी योगी तपस्वी यांनाहि आकर्षित करणारा आहे भाविकांचा तो वैकुंठ आहे तर प्रवाशांच ते नंदनवन आहे

क्षणात डोंगर चढून आम्ही वर जात होतो, तर क्षणात खाली येत होतो असे कितीतरी वळणे झाली गंगा कितीतरी वेळा जवळ आली नि दूर गेली तिचे जवळून दर्शन झाले आणि लांबूनहि. कितीतरी डोंगर चढलो नि उतरलो. गुलर पुढे गेलो व्यासी येथे गेलो आनंदवाडी नि गोडियाल मागे पडले. निसर्ग-सान्निध्यात दिवस कसा गेला ते कळलेही नाही सूर्यास्त होऊन दिशा काळवंडल्या नि गंगेचे खोल दरीतले पाणी काजळामध्ये काळे दिसू लागले शेजारी शेजारी काळोखात पाणी हिमनास झाले नि नुसताच खळखळ कानी पडू लागला

मोटार थांबली ६४ मैल प्रवास झाला. १५५० फूट उंचीवर आलो 'आता इथे थांबायचे' ताई म्हणाली आम्ही सगळेच खाली उतरलो देवप्रयाग आले होते नि रात्रीचा मुक्काम इथे होता

रस्ता ओलांडून गावाकडे निघालो तर गंगा आडवी आली लगेच पुलाच्या लहान भावाने 'या' म्हटले नि मार्ग करून दिला तो झुलता पूल ओलांडून देवप्रयागला आलो

एक भला मोठा डोंगर उतरत उतरत नदीकडे आलो होतो आता लगेच कडेवर घ्यावे तसे हे देवप्रयाग या डोंगराच्या कडेवर बसले होते छोटी मोठी मातीची घरे, वरती रंगीत पत्र्यांची छपरे नि आतमध्ये लुकलुकणारे दिवे

वरती उभा राहून खालच्या त्रिवेणी संगमाकडे मी पहात होतो आपल्या गावात हा कोण पाहुणा आला आहे म्हणून गरम कपडे घातलेली गोरीपान लहान पोरे माझ्याभोवती गोळा झाली होती पण अंधारात त्यांचे सौंदर्य मला जास्त दिसले नाही किंवा मी पाहिलेच नाही त्यांच्याकडे मी पहात होतो देवप्रयागच्या संगमाकडे भाइ सांगत होते, 'इथे अलकनंदा-भागिरथी (गंगा) ह्यांचा संगम झाला आहे नि सरस्वती गुप्त आहे'

दुसऱ्या दिवशी वैशाख शुद्ध एकादशी होती-मोहिनी एकादशी ! इथेही पुण्यपावन संगमावर उगवत्या सूर्याच्या साक्षीने पूर्वजांना नि पुण्यपुरुष पितरांना पिंडदान केले

त्रिवेणीजवळील देवप्रयाग पहाताना वाटले की, हरीच्या द्वारातून आत आलो नि काय ही एक एक सौंदर्य दालने दृष्टीस पडत आहेत !

फार दिवसांनी भेटणाऱ्या जिवलग मैत्रिणींनी एकमेकींना प्रेमाने मिठी मारावी तशा अलकनंदा नि गंगा इथे एकमेकींना भेटल्या आहेत भेट अशी उत्कट आहे की इथून पुढे

अलकनंदेने आपले नावहि टाकले नि गंगा म्हणूनच ती हृषीकेशपर्यंत वहात गेली. त्यांचे प्रेम-मीलन नेत्री साठवीत देवप्रयागचा निरोप घेतला.

मोटार चालू झाली. वस्त्राच्या घड्या उलगडाव्यात तसा निसर्ग आमच्यापुढे उलगडला जात होता. निसर्गाचे ते महावस्त्र खरोखरीच भरजरी होती. पर्वत शिखरांवर झाडांच्या हिरव्या शेंड्यांवर, अलकनंदेच्या फेसाळल्या पाण्यावर सोनेरी उन्हे पडली होती. मल्हीया-निसर्गाची कीर्ति गाणारे कीर्तिनगर, श्रीनगर, रुद्रप्रयाग, अगस्ती-मुनींचा आश्रम मागे टाकीत मोटार भरधाव चालली होती. कुंड आले. मोटारचा प्रवास संपला होता. दुपारचे तीन वाजले असतील. पण दिशा ढगाळ हवेने धुंदावल्या होत्या. झोपेला आलेल्या मुलाप्रमाणे दिवस मरगळला होता. आमची अंगेहि मोटारच्या प्रवासाने आंबली होती. पूल ओलांडून पलिकडे गेलो. गरमगरम चहा घेतला नि वाट चालू लागलो. दिवे लागायच्या आत गुप्तकाशीला पोहचायलाच हवे होते.

वाटेत चालताना प्रथम हिमशिखराचे दर्शन झाले. सौ. कुसमीला दाखवायला गेलो तर गोषातल्या स्त्रीप्रमाणे त्याने लागलीच तोंड झाकून घेतले. चालताना वळण आले नि ते एका भल्या मोठ्या डोंगरामध्ये झाकले गेले. मध्येच ते उन्हात चमकताना दिसे, तर मध्येच नाहीसे होई. असा बराच वेळ आमच्याशी लपंडाव खेळत होते ते.

इथला निसर्ग सुंदर खराच! पण सुंदर स्त्रीप्रमाणे लह-रीही आहे. असे बघता बघता ते हिमशिखर दृष्टीआड झाले, तसे पाहता पाहता ते सुंदर सोनेरी उन्हहि नाहीसे झाले. दिशा काळवंडून गेल्या. जणू निसर्गाला कुणाची दृष्ट लागली. थोड्याच वेळात दृष्ट लागलेल्या लहान मुलाप्रमाणे आकाश रडू लागले. भाईनी बरोबर रेनकोट ठेवायला सांगितला होता. तसा आम्ही तो ठेवलाही होता; पण पाऊस असा झराट्याने नि अचानक आला की पिशवीतला रेनकोट काढून अंगावर चढविण्याच्या आधीच त्याला आम्हाला भिजवून टाकायचे होते. पण खट्याळ पावसापेक्षा आम्ही जास्त चपळ होतो. तरीसुद्धा थोडे भिजवलेच त्याने! पाऊस थोडाच पडला, पण प्रभाव दाखवून गेला. रस्ते निसरडे केले. आलेल्या पाहुण्याचे असे का स्वागत करायचे! का स्वागत करण्याची पहाडी पद्धत ही असेल!

गुलाबपाणी शिंपडावे तसे तो चार थेंब शिंपडून गेला खरा पण हवा मात्र गार करून गेला. बडी मजा आली. ह्या धामधुमीत गुप्तकाशी केव्हा आली ते कळलेही नाही.

गुप्तकाशीला आलो, तर करकरीत तिनसांजा झाल्या होत्या. तिनसांजा झाल्या तरी दिवस रेंगाळत होता. चंद्र जणू सूर्यास्ताचीच वाट पहात होता. दिवस पूर्ण मावळलाहि नव्हता, तर लागलीच चंद्रिकेने आपला अंमल बसविण्यास सुरुवात केली होती. काळोख नि गारठा बरोबर वाढू लागला. कढत कढत चहा घेऊन बाहेर गॅलरीत आलो. समोर हिमा-च्छादित शिखराची रांगच्या रांग दिसत होती. वैशाख शुद्ध द्वादशीचे शुभ्र चांदणे बर्फावर पडले होते. आकाशातील चंद्रबिंब कुणाची तरी वाट पहात थबकले होते. ते दृश्य पाहून डोळे तृप्त झाले होते. ते अनुपम दृश्य बघताना थकवा निघून गेला.

चाल अशी व्हावयाची की बिछान्यावर अंग टाकण्याची खोटी, डोळे मिटलेच म्हणून समजा. झोप पूर्ण झाल्यावर सकाळी उठावे नि घड्याळात पहावे तर फक्त पाचच वाज-लेले असावेत. पण बाहेर मात्र लख्ख उजाडलेले असायचे. आपल्याकडे ६॥-७ ला उजाडावे ना! तसे. दिवसभराच्या चालीने नि श्रमाने जीव थकून जायचा. पण सकाळी उठ-ल्यावर वाटायचे की छे, काल आपण काही चाललोच नव्हतो. अशी मजा बघा हवेची!

गुप्तकाशीला काशीविश्वेश्वर गुप्त आहे. इथे गुप्तदान कर-ण्याची पद्धत आहे. दान करायचे नि बोलायचे नाही. उपकार करावयाचा नि सांगायचे नाही. सुवास देता देता चंदनासारखे झिजूनहि जावयाचे, पण तोंडून ब्र काढायचा नाही. केवढी उदात्त शिकवण आहे गुप्तकाशीची!

गुप्तकाशी सोडली नि पुढे चालू लागलो, नालाचट्टी मागे टाकली. ओझ्याने वाकलेल्या दोनतीन सुंदर स्त्रिया सामोऱ्या आल्या. गोऱ्यापान, देखण्या, तरतरीत नाकाच्या नि कानानाकातील अलंकाराने नटलेल्या. आमच्याकडे त्यांनी सुईदोरा मागितला. भरपूर थंडी म्हणून इथे कपडा खूप पाहिजे नि तो फाटला तर शिवायला सुईदोरा हवाच. म्हणून इथे त्याला मागणी फार. त्यांना सुईदोरा दिला, तर सशासारखी पोरे धावत आली. त्यांनी पै पैसा मागितला. सबंध जगाने ह्या पैशाभोवती कसा फेर धरला आहे बघा!

निसर्ग सुंदर, माणसे सुंदर, हवा सुंदर पण ह्या पैशाने

इथल्या माणसानाहि ग्रासून टाकले आहे. पोटाकरता–पैशा करता केवढी धडपड चाललेली असते इथेहि ! डोंगर चढताना स्वतःचा जीवही नकोसा होतो तिथे ही गढवाली माणसे दुसऱ्याचा जीव सांभाळीत तो उभा पहाड चढताना दिसतात. पाहिलात तो गढवाली ? केवढी लट्ठ बाई त्या टोपलीत बसलेली आहे नि त्या टोपली सगट तिला घेऊन तो कसा पहाड चढत आहे तो ! तुम्हाला इथे थंडी वाजते आहे ना ? नि श्रममुळे तो मात्र घामाने कसा निथळून गेला आहे पहा

' पोटासाठी दहाहि दिशा । फिरवीसी तू जगदिशा

अगदी खरे आहे माणसाच्या मागे हे पोट नसते तर ! पण विचार करीत असे वाटेत उभे राहून चालणार नाही. ती पहा घोड्यावरून माणसे आली ज्याना चालवत नाही ती घोड्यावर बसतात नि ज्याना घोड्यावर बसता येत नाही ती कंडी, डंडीत बसतात

चालता चालता तीन मैल झाले की. नारायणकोटी आले. ती पहा उजव्या हाताला किती जुनाट नि पुरातन देवळे आहेत नवग्रहाची ती फार मोठी प्राचीन नि पुरातन मंदिरे आहेत त्याच्यापुढे पायऱ्यापायऱ्यानी वर चढत गेलेली ती पठारे. व्यगतल्ला नि व्यगमल्ला गावे तरी किती देखणी आहेत नाही ? वाटेतला हा पहा नेपाळ मेंढ्याचा कळप. त्याच्याहि पाठीवर ओझी माणसाच्या श्रमातला वाटा ती मुकी जनावरे ओझी उचलून कमी करीत आहेत आम्हाला मात्र मुक्या जनावराची कदर नाही !

वाटेत किती तरी प्रकारची झाडे आहेत जर्दाळू, चिऱ्या, तमालपत्रे, भूर्जपत्रे, त्या झाडावर फुललेली तांबडी, पिवळी, जांभळी, टिकल्यासारखी नि चांदण्यासारखी ती इवली इवली फुले त्या फुलाकडे पाहिले की इथे दिवसाच जमिनीवर चांदण्या उगवल्या आहेत असे वाटायचे. काही झाडावर निसर्गदेवतेने शेवाळ्याचा स्वेटर चढविला होता झाडाना थंडी वाजू नये ना, म्हणून हो ! थंडीमुळे काही झाडे एकमेकाना कशी बिलगून वाढली होती. काही झाडे खुजी होती, तर काही उंच होती काही झाडात माणसासारखी व्यंगे दिसली. काही बहिरी, तर काही मुकी वाटली. काही रागीट तर काही प्रेमळ भासली काही आनंदी होती, तर काही दु:खी काही झाडे वृद्ध होती, तर काही तरुण काही भितरी, नाचरट, तर काही शाळेत जाणाऱ्या मुलासारखी निरागस वाढतानाहि ती एका रागेत उभ्या असलेल्या मुलासारखी सरळ रेषेत वाढली होती. काही माकडासारखी दिसत होती, तर काही दिव्याच्या धुरासारखी. काहीत क्रौर्य एकवटले होते, तर काहीत देवत्वाचा साक्षात्कार होत होता. झाडाची अशी मजा कधी पाहिलीच नव्हती. वनस्पतीचे असे दर्शन कधी झालेच नव्हते. असे बोलके नि डोळे दिपविणारे ! जशी वनस्पती तशीच माती पायाखाली बघावे तर कुठे सोनेरी मऊ माती, तर कुठे चांदीसारखी पांढरी शुभ्र माती कुठे तांबडे दगड, तर कुठे हिरवे. कुठे अभ्रकाचे खडक तर कुठे काळाकभिन्न खडक. रंगीत चित्र काढल्या सारखा इथला निसर्ग रंगीत आहे. काय म्हणता ? काही दगड ओले नि पाझरल्यासारखे वाटतात ना ? बरोबर आहे. इथला निसर्ग पाहून दगडालाहि इथे पाझर फुटला आहे

निळे आकाश, हिरवी रानी, पांढरे पाणी, चंदेरी बर्फ, सोनेरी ऊन्ह नि दोन मध्ये त्याताना झुला टांगलेला. मैनडा आणि गुलाबाच्या हसऱ्या ताऱ्यानी आमचे सहर्ष स्वागत केले त्या झोपाळ्यावर बसून आम्ही झोके घेतले झोका सोडताना जीवावर आले होते, पण पुढच्या मुक्कामाला लवकर जाणे आवश्यक होते. तो झुला सोडताना सारखे वाटत होते, दिवसा जर इथे इतकी शांतता आहे, तर रात्रीच्या वेळी किती शांतता असेल ? त्यावेळी ह्या दऱ्याखोऱ्यातून वनराणी येत असेल, पऱ्या येत असतील, इथे झोपाळ्यावर बसत असतील, खेळ खेळत असतील नि गाणी म्हणत असतील त्याचे दर्शन मला कधी होईल का ? तो खेळ मला कधी दिसेल का ?

फाटाचट्टी, बडासु, सीतापूर, रामपूर मागे राहिले नि डाव्या हाताने ही त्रिजुगीनारायणाची चढण सुरू झाली इतकी वाटचाल झाली तरी चालीचे काही वाटले नाही पण त्रिजुगीनारायणाच्या चढाईने मात्र तोंडाला फेस आला निसर्ग रिझवीत होता जसजसे वर जात होतो तशी पहाडी शोभा व निसर्गाची भव्यता वाढत होती मधून मधून खालच्या गावातल्या झोपड्यातून निघणारे धुराचे लोट वर आकाशात जाताना दिसत होते. मध्येच वाहणारे झरे खळा ळून हसत विचारीत, "दमलात ? छे छे आता चढण काही फार नाही काही " धीर देत त्या हसऱ्या निर्झराचा निरोप घेऊन पुढे जावे तर गोलाकी दिसे राजचंद गप्प असल्या

मुळे उशीर झाला. उन्ह खूप झाले तरी झाडांच्या फांद्यांनी त्याला वर पकडून ठेवल्यामुळे वाटसरूंना त्याचा त्रास होऊ शकत नव्हता. त्या झाडांवर किती सुंदर पक्षी आहे, पाहिलात ! आकार चिमणीचा नि रंग पोपटाचा. कसा सुंदर नाचतो आहे. किती छान माना डोलावीत चालतो आहे फांद्याफांद्यावरून. पहा, पहा, पाण्यात सूर मारावा तसा त्या खोल दरीत सूर मारीत निघूनही गेला की.

आले. त्रिजुगीनारायण आले. इथे शंकर-पार्वतीचा विवाह झाला त्या दिवसापासूनचा अग्नि अजूनहि जळतो आहे इथे. त्यात लज्जाहोमाच्या लाह्या टाकल्या. तो पवित्र अग्नि अखंड जळत रहावा म्हणून पैसे देऊन त्यात काष्ठेहि टाकली.

दुसऱ्या दिवशी पुनः निसर्गाच्या सुंदर सुंदर दालनातून आमचा पायी प्रवास सुरू झाला. काल चढताना तोंडाला फेस आला होता. आज उतरताना अशी मजा वाटली की विचारू नका. बघता बघता अंतर कापले गेले. शाकांबरी देवी तर बरीच मागे पडली.

सोनप्रयाग ! इथे त्रिजुगीनारायणापासून आलेली सोन नि केदारापासून आलेली मंदाकिनी यांचा सुरेख नि रेखीव संगम झाला आहे. इथे निसर्गाचे सोने झाले आहे. सोनप्रयाग हे नाव बिल्कूल समर्थ आहे. संगम ! नद्यांचा संगम ! देवभक्तांचा संगम. मनामनाचा संगम. वृक्षवेलींचा संगम. भावभक्तीचा संगम. आकाश नि गिरिशिखरांचा संगम. फळाफुलांचा संगम. संगमाच्या ठिकाणी पावित्र्य असते नि इथे तर सारेच संगम झालेले. पावित्र्याचा रंग पांढरा असतो. इथे तर पांढरा शुभ्र बर्फ चहूकडे पसरला आहे. प्रभूचा रंग नीळा असतो, तर इथे आकाशाचा रंग निळा आहे. स्वच्छ निळा आहे. कधी ढगाळ झालेच तर ते मथुरेतल्या सावळ्या कृष्णाचा वर्ण धारण करते. भक्तीचा रंग हिरवा तर इथे झाडे हिरवीगार आहेत.

दचकलात का ? अति पवित्र नि विघ्नहर्त्या गणराजाला इथे मस्तक नाही म्हणून ना ! त्याचे मस्तक कुणी छाटले !

ऐका तर, पार्वती स्नानाला बसलेली. महादेवजी बाहेरून येतील म्हणून त्यांना सांगण्याकरता पार्वतीने आत्मशक्तीने निर्माण केलेला गणपती दारावर बसविला. वास्तविक पार्वती स्नान करताना शंकर आले तर कुठे बिघडले ! पण भारतीय नारींची स्त्री-लज्जा मोठी मोहक आहे हेच खरे. एरवी पतीला सर्वस्व देण्यात तिला काही वाटायचे नाही, पण तोच पति स्नान करताना समोर आला तर तिला खपायचे नाही. दिसायला वेड्यासारखे दिसले नि चमत्कारिक वाटले तरी त्यातली गंमत खऱ्या रसिक मनालाच कळावी. हं, तर काय सांगत होतो—शंकरजी बाहेरून आले. गणराज त्यांना आत जाऊ देईनात. हा कोण उपटसुंभ आपल्या घरात जाण्यास आपल्याला अडविणार ! म्हणून क्रोधायमान होऊन महादेवांनी गणराजाचे मुंडके उडविले. तोच हा मुंडकाटा गणेश !

ज्याप्रमाणे सबंध भारतात ऋषीकेशशिवाय लक्ष्मणाचे देऊळ अन्यत्र कुठेहि नाही, त्याप्रमाणे शीर नसलेल्या गणपतीचे मंदिर भारतात अन्यत्र कुठेहि नाही. 'पवित्राणां पवित्र' अशा मंगलमूर्तीची शिर नसलेली प्रतिमा पाहताना कसेसेच होते. बिचाऱ्या पार्वतीला त्यावेळी काय झाले असेल !

आलेच गौरीकुंड ! शंकराच्या लाडक्या गिरिजेने इथेच स्नान केले. त्या रूपवंतीच्या स्नानाची ही जागा किती सुंदर आहे ! उगाच नाही श्रीमंत माहेर सोडून ती सांबसदाशिवाची स्वामिनी झाली ! बर्फाच्या टोप्या घातलेल्या डोंगरांच्या फेऱ्यात असे कढत कढत पाण्याचे कुंड तिला माहेरी कधी तरी लाभले असते का ? कैलासाच्या वैभवाची सर का तिच्या माहेराला येणार आहे ? तिचा सांब भोळा नि दरिद्री असला तरी त्याचा कैलास देखणा नि श्रीमंत आहे. गिरिजे, खरोखरच तू थोर भाग्याची आहेस !

त्या दिवशी सगळ्यांनी गौरीकुंडाच्या कढत कढत पाण्यात स्नान केले. थकलेली शरीरे शांत झाली. नव्या दमाने वाटचाल पुनः सुरू झाली.

त्या रात्री जंगलचट्टीला मुक्काम झाला. फाटक गुरुजींचे मंगल प्रवचन झाले. बारा ज्योतिर्लिंगाचा श्लोक म्हटला गेला.

वद वद वद रसने, शिव सांब सांब सांब सांब
विश्वेश बद्रिनाथ महांकाल.........

प्रवचन झाल्यावर बाहेर आलो. समोरच्या कड्यावरून पाण्याचा प्रवाह धो धो वहात होता. आम्ही थांबलो तरी तो थांबला नव्हता. आकाशातले चांदणे नि डोंगरावरचे पाणी घेऊन इतक्या ओढीने तो रात्रीचा कुठे जात होता कोण जाणे !

केदारच्या ओढीने सकाळी नेहमीपेक्षा लौकरच जाग आली. चट्टीतून बाहेर आलो. अजूनहि तो अवखळ निर्झर पित्याच्या खांद्यावरून अंग झोकून देतच होता. त्याच

वेगाने नि उत्कटतेने उचाडू लागले तसे मोतीया रंगाचे चांदणे हळूहळू मावळत गेले. यांत्रिक ओढीने वाट चालू लागले!

पुन चढणे, उतरणे. दुःसह थंडी. दुर्गम पहाड. दऱ्या खोरी नद्यानाले, भयाण अरण्ये नि मनात केदारनाथाच्या भेटीची अपार उत्कंठा!

वाटेत एक चिंध्या भैरवाचे छोटेसे मंदिर लागते. यात्रिकाची यात्रा सुफल व्हावी म्हणून त्याला चिंध्या वाहण्याची चाल आहे. तेथे विसावा घेतला पाणी प्यायलो नि पुढे चालू लागलो.

वाटेत मंदाकिनी पुन पुन दर्शन देतच होती मला वाटले की एखाद्याकडे आपण गलो की त्याची ल्हान मुलगी पाहुण्याचे स्वागत करायला जशी धावत धावत येते नि आपले बोट धरून आपल्याला घेऊन जाते, तशी ही मंदाकिनी यात्रेकरूंचे स्वागत करण्याकरता धावत धावत आली आहे. आपले बोट धरून तीच आता आपल्याला केदाराला घेऊन जाणार आहे.

आज चार दिवस वाटचाल झाली आता आजचा शेवटचा टप्पा. आता चाल संपणार. भक्ताचे मंदिर येणार मनाला पूर्ण विराम मिळणार. घेतलेल्या श्रमाचे नि कष्टाचे, झालेल्या उपासमारीचे नि सहन केलेल्या थंडी-उन्हाचे सार्थक होणार!

जी हिमशिखरे दूर होती ती आता जवळ जवळ येऊ लागली जवळ जवळ ९७ मैल चाल झाली. ११७०० फूट चढाव चढलो. गरुडचट्टी मागे टाकली. सारी जमीन शुभ्र दिसू लागली. सगळीकडे बर्फच बर्फ पांढरा शुभ्र बर्फ. चांदीच्या रंगाचा बर्फ. चुन्यासारखा, दुधासारखा! खाली मंदाकिनी कापूस पिंजीत वाहते आहे देवदेखणीवरून तर शिवाचे मंदिरही दिसू लागले

तो उत्तुंग हिमालय. त्याची ती हिमधवल गगनचुंबी शिखरे नि त्यात बर्फाची शाल पांघरून बसलेले ते शिवालय.

सर्वच तीर्थयात्रा पुण्ययात्रा आहेत, पण बद्रिकेदार ही पुण्यतम यात्रा आहे. वैदिक कालापासून बद्रिकेदाराचे स्थान अढळ आहे ती एक अमृतयात्रा आहे ११७०३ फूट उंचीच्या बर्फमय व्यासपीठावर नसून केदारनाथ हिंदुस्थानातल्या सर्व भागातून असंख्य भ विकाना आपल्याकडे खेचून आणीत आहे मंदाकिनीला गाट नाही नि यात्रेकरूंची रीघही कधी तुटत नाही साऱ्या वाटभर 'केदारनाथजी की जय' म्हणून गजर चालूच असतो.

हिवाळ्यामध्ये बर्फाची शाल पांघरून बसलेला हा सांब सदाशिव वसंताच्या चाहुलीने खडबडून जागा होतो. बर्फ फोडीत पुजारी येतो साडेतीन मुहूर्तांपैकी अक्षय्य तृतीयेला देवळाचे दार उघडले जाते. लांबून आलेले यात्रेकरू दारातून आत येत त तर एकदा तेल घालून लावलेला दिवा सहा महिने तसाच जळत राहिलेला दिसतो. ती जिवंत साक्ष पाहून त्याना कैलासपतीचा साक्षात्कार होतो व आदराने त्यांची मस्तके नम्र होतात. खडतर वाटेतून जगवलेल्या भक्तीच्या वेलीला सुंदर फळ आलेले असते

केदारचे मंदिर फार मोठे नाही, पण त्याची बांधणी मजबुतीची नि शिलाप्रधान आहे हिमालयातील वादळे, हिमवृष्टि, यांच्या दु सह माऱ्यापुढे ते आज हजारो वर्षे अभग उभे आहे भोवतालचा हिमप्रदेश जसा देखणा आहे, तसे एक मानवी कलाकृति म्हणून हे देऊळहि मोठे कौतुकास्पद आहे. हे मंदिर पाडवानी बांधले असे म्हणतात

पांडवाचा विषय निघाला तशी सौ. कुसमी सागू लागली नि आम्ही ऐकू लागलो आयुष्याच्या "संध्याकाळी पांडव इथे आले नि इथून स्वर्गाला गेले पण वाटेत द्रौपदी प्रथम पडली. पाच नवऱ्यावर सारखे प्रेम न करता अर्जुनावर तिने जास्त प्रेम केले, म्हणून स्वर्गात जाण्यास तिचे पुण्य कमी पडले नंतर पडले नकुळ नि सहदेव आपल्या रूपाचा नि ज्ञानाचा त्याना गर्व झाला म्हणून. नंतर पडले भीमदेव अति खादाड! 'माझ्यासारखा दुसरा धनुर्धर नाही' म्हणून गर्व झालेला अर्जुनहि पडला. आणि शेवटी सुख नि दुःख सारख्याच नि स्थिर स्थितीने भोगणारा धर्मराज मात्र स्वर्गात गेला." संध्याकाळी वाढत जाणाऱ्या गार वाऱ्याच्या झुळका अंगाला झोंबू लागल्या संध्याकाळच्या आरतीची घंटा वाजू लागली तशी आम्ही उठलो नि केदारेश्वरापुढे उभे राहिलो

केदारनाथ स्वयंभु नि निराकार आहे भक्त जसा कल्पक नि प्रतिभासंपन्न असेल तसे त्याला दर्शन मिळते कर्पूरार्तीच्या प्रकाशात शंकराचे दर्शन घेतले नि बिऱ्हाडी वळलो

ज्याच्यासाठी अट्टाहास केला होता, त्याचे दर्शन झाले डोळ्यांचे पारणे फिटले मनाचे समाधान झाले

धरलेली जिद्द संपली नि थंडीने घेरून टाकले. भराभरा दारे, खिडक्या बंद केल्या. होते नव्हते तेवढे कपडे अंगावर चढविले. दोन दोन दुलया अंगावर घेतल्या नि समोर ठेवलेल्या शेगडीची ऊब घेत फादर गुरुजींचे रसाळ प्रवचन ऐकू लागलो. रात्री भजन झाल्यावर गादीवर अंग टाकले नि क्षणार्धात नेत्र-कमळे मिटून गेली.

सकाळ उल्हासाने नि प्रसन्नतेने उगवली. बाहेर आलो तर आसमंत हिमराशींनी वेढलेला होता. हिमगौर पर्वतावरून वहात येणारे चांदीचे जलप्रवाह, शंकराच्या गळ्याला विळखा घालणारे सर्पच भासले. उन्हे पडली तेव्हा मंदिरामागील हिमालंकृत शिखरांना काही आगळीच शोभा प्राप्त झाली. कुशल सोनाराने आपल्या हाताने चांदीच्या मुकुटांना जसे सोन्याचे पाणी द्यावे, त्याप्रमाणे रविकिरणांनी पांढरी गिरिशिखरे सोनेरी मुलाम्याने मढविली होती.

प्रसन्न मनाने शिवमंदिरात प्रवेश केला. सुस्नात देहाने नि सुमनाने त्याच्या पाठीला तूप चोळले व बरोबर आणलेले सोन्याचे बिल्वपत्र महादेवाला वाहिले. हातावर प्रसाद देत पुजारी सांगत होता, "ज्याला तुम्ही तूप चोळलेत ती शंकराची पाठ आहे. त्याचे मस्तक नेपाळात आहे. पुढच्या वर्षी पशुपतीला जाऊन त्याचे दर्शन घ्या" "जरूर जाऊ नि पशुपतेश्वराचे दर्शन घेऊ" असे म्हणून देवळाबाहेर आलो. सभोवार पांढरा शुभ्र बर्फ पाहून आतली शिवभावना ज्ञानदेवाची ओवी म्हणू लागली—

*स्थावरां गिरीं आंतु । पुण्यपुंज जो हिमवंतु ।*
तो मी म्हणे कांतु । लक्ष्मियेचा ॥

—म. कृ. जोशी
डोंबिवली, जि. ठाणे

# शक्तिपात साधनेने रोगनिवारण होते काय?

## —एक अनुभव

त्यावेळी मी हताश मनस्थितीत होतो. जीवनात आता काही स्वारस्य उरले नाही, आयुष्यात काहीच राम उरला नाही अशा विफल अवस्थेत मी वावरत होतो. शरीर हेच सर्व प्रगतीचे साधन आहे, तेच जर जर्जर झाले व तो दुरुस्त करण्याचे सर्व मार्ग खुंटले. अर्थात् येथेच आता आयुष्याला पूर्णविराम मिळणार असे वाटू लागले. ह्या भीषणतम अशा शारीरिक व मानसिक गर्तेतून सहीसलामत बाहेर पडून आता वयाच्या ५५ व्या वर्षी पुन्हा नमुनेदार आरोग्यावस्था कशी प्राप्त झाली? हा कायाकल्प कोणता? त्याची थोडक्यात कथा खाली निवेदन केली आहे

१९५० सालपर्यंत माझी प्रकृति निकोप व सुदृढ होती. एके दिवशी सकाळी पाठीत डाव्या बाजूला तीव्र कळा येऊ लागल्या. खाली वाकले तर जास्त कळा येऊ लागत. इतर हालचाली व व्यायाम करीतच होतो पण खाली वाकणे कठिण. पाठीत दुखण्याचे कमी होण्याचे चिन्ह दिसेना. उलट डाव्या पायाची शक्ति कमी जाणवू लागली मालिश मर्दन, शेक देणे वगैरे घरगुती उपाय हरले व डॉक्टरची पायरी चढण्याचा आयुष्यात पहिलाच प्रसंग आला. मला फॅमिली डॉक्टर असा कोणीही नव्हता. एका मित्राच्या सांगण्यावरून आमच्या भागातील हुशार गणल्या गेलेल्या डॉक्टराकडे गेलो. त्यांनी 'युरिनरी स्टोन' म्हणून उपचार केले. सुमारे सहा महिने वाट पाहून त्यांनी (एक्स रे) फोटो काढण्यास सांगितले. त्याप्रमाणे दोन फोटो काढले व 'रोग असाध्य आहे. जन्मभर भोगीत राहावे लागेल' असा दिलासा दिला.

ह्याचा नाद सोडून जुन्या पिढीतले एक आयुर्वेदाचार्य भिषग्रत्न यांचे उपचार सहा महिने करून काहीच फरक पडला नाही. २ वर्षे अशी गेली.

कैवल्यधाम योगाश्रमामध्ये प्रमुखांना भेटून सर्व कथा कथन केली त्यांनी केवळ "विश्रांतीनेच आराम वाटेल. इतर काही यौगिक उपाय करणे धोक्याचे आहे. वाटल्यास डॉक्टराचे औषध घ्या" असा सल्ला दिला.

३–४ वर्षे अशा परिस्थितीत गेली. तेव्हा सायन येथील टिळक हॉस्पिटलमध्ये तथाकथित संपूर्ण तपासणी करून घेण्याचे ठरविले व १९५७ ची दिवाळी बाजूला ठेऊन रुग्णालयात दाखल झालो तेथील नामवंत तज्ञामध्ये माझ्या व्याधीविषयी मतभेद झाला. कोणी म्हणे "किडनी स्टोन" तर कोणी म्हणे "पाठीच्या मणक्याच हाड वाढले असावे." शेवटी लाईट देण्याचे ठरले व सुमारे एक महिना 'शॉर्टवेव्ह डाय थर्मी' हा लाईट देण्यात आला अजून बरे वाटण्याचा योग नव्हता म्हणा अगर वैद्यकीय ज्ञानाची अपूर्णता म्हणा पण मला रुपयातला एक

भाणाही गुण आला नाही. तेव्हा ' डीप एक्स-रे ' देण्याचे त्यानी निश्चित केले व नायर हॉस्पिटलमध्ये तो दिला गेला. डीप एक्स रेमुळे पाठीच्या खाद्न दुसऱ्या मणक्याचे सभोवार त्वचा जळून काळी झाली होती. परतु व्याधि-निवारणार्थ त्याचा काही उपयोग झाला नाही. सर्व उपचारानंतर पूर्ण निराशा पदरी पडली होती. डॉक्टरी आधुनिक उपचाराचे आता सर्व मार्ग खुंटले होते. मनःस्थिति शरीराबरोबरच दुबळी झाली होती. सुधारणेची काही आशा दिसेल असा किरणही दिसत नव्हता. ' सायटिका, मस्क्यूलर पेन, नर्व्ह पेन, किडनी ट्रबल, ऑस्टिओ अर्थ्राश्टिस ' वगैरे अनेक प्रकारची नामाभिदाने माझ्या ह्या रोगास देणारे एकही भिषगतज्ञ रोग मात्र किंचितही हटवू शकले नाहीत. सर्व उपचार बद करून सतत तीन वर्षे त्या स्थितीत काढली. आता एकूण ८ वर्षे ही व्याधी शरीरात बद्धमूल झाली होती. तिला जुनाट ( Chronic ) स्वरूप प्राप्त झाले होते. माझ्या अनेक मित्राना ही गोष्ट कळली. त्यानीही विविध उपाय सागितले.एका मित्राने मला मुबईच्या प्रख्यात बॉबे हॉस्पिटलमध्ये नेले. तेथे सुमारे बारा दिवस राहून सुमारे दोन डझन ( एक्स-रे ) फोटो व सर्व प्रकारची आधुनिक अद्ययावत् तपासणी करण्यात आली. नामवत डॉ. दाते व कै. डॉ. एम. जी. फडके यानी खूप विचार व सशोधन करून कोणतेही उपचार न करता मला परत पाठवले. मानवी शरीर व त्याच्या क्रियाप्रक्रियाचे ज्ञान अद्ययावत् शास्त्रीय साधनानीही पूर्णपणे अवगत झालेले नाही हाच निष्कर्ष माझ्या अल्पमतीने मी काढला. अशा प्रकारे व्याधीग्रस्त अवस्थेत माझी सुमारे १० वर्षे गेली. मध्यतरी सातामृझ, (मुबई) येथील योग इन्स्टीटयूटमध्ये सुमारे एक वर्ष यौगिक व्यायाम करून पाहिले. पण निराशा पदरी आली.

अलोपथी, आयुर्वेद, होमिओपाथी, योगासने व हवापालट वगैरे सर्व मानवी प्रयत्नावर मात करून रोगव्याधी सतत वाढत जात होत्या. कोणताही आशेचा किरण दिसत नव्हता. म्हणून आता व्याधीवर दैवी उपाय करण्याचे ठरले.

ठाणे जिल्ह्यातील प्रसिद्ध देवीचे स्थान वज्रेश्वरी येथे श्रीनित्यानद स्वामींचे वास्तव्य होते. अनेकाची विविध सकटे व आधिव्याधी नष्ट करण्यासाठी लोक मुद्दाम त्याना भेटत असत. तसाच मीहि गतानुगतिकाप्रमाणे भगतिक होऊन त्याचे दर्शन घेतले व आपली शोक कथा त्याना निवेदन केली, ' वज्रेश्वरीला पाच दिवस राहून गरम पाण्याच्या कुंडात स्नान करा म्हणजे तुम्ही बरे व्हाल ' असा त्यानी सल्ला दिला. तदोतत त्याच्या आदेशाप्रमाणे सतत पाच दिवस वास्तव्य करून वज्रेश्वरीच्या गरम पण्याच्या कुडात स्नान केले. स्नानाचे वेळी सर्वांग शेकून निघत असे. त्यामुळे त्या चार पाच दिवस बरे वाटले. परतु परत घरी आल्यावर जैसे थे परिस्थिती होती. इतक्या दीर्घ कालावधीच्या व्याधीमुळे माझे शरीर जर्जर व दुर्बळ झाले होते. शरीराची डावी बाजू सपूर्ण अपू झाल्यासारखी होती. डाव्या कानाने कमी ऐकू येऊ लागले. डाव्या डोळ्याची शक्ति क्षीण होऊन त्या डोळ्याचा चष्म्याचा नबर वाढला होता व डावे हात व पाय गळल्यासारखे वाटत असत.

१९६१ मध्ये श्री. प्रभाकर दीक्षित ह्याच्यामुळे योग श्रेष्ठ सद्गुरु श्रीगुळवणी महाराज याची भेट झाली. त्याना सर्व कर्मकहाणी कथन केली. पण त्यानी निश्चित असा काहीही अभिप्राय व्यक्त केला नाही. ' श्रीकृपा असेल तर बरे वाटेल ' असेच उद्गार त्यानी काढल्याचे स्मरते. कोणत्याही प्रकारे आशा अगर दिलासा त्याच्या भेटीमुळे प्राप्त झाला नाही. मला १९६२ च्या मे महिन्यात प्रत्यक्ष गुरुकृपा झाली. सर्व साधकाना परिचित अशा शारीरिक क्रिया सुरू झाल्या. त्यात योगमुद्रा साधारणपणे ५०।६० वेळा होऊ लागली. पाठीत दुखत असल्यामुळे पुढे वाकता येत नव्हते, पण साधनेत तीच क्रिया शेकडो वेळा पुनः पुनः होत होती. पाठीतल्या कळा असह्य होऊ लागल्या. प. पू. महाराजाना पत्राद्वारे सर्व वृत्तात कथन करीत गेलो. ' श्रीकृपेने अवश्य बरे वाटेल. आपले साधन उत्तम चालू आहे'. असा अभिप्राय ते व्यक्त करीत. असे म्हणतात की ' श्रद्धेने फार मोठे चमत्कार होतात ' परतु माझ्या वैयक्तिक बाबतीत खरी वस्तुस्थिती अशी होती की, जरी मी दीक्षा घेतली होती, तरी अतर्यामी माझी श्रद्धा नव्हती. साधनेत होणाऱ्या शारीरिक क्रिया पाहून मी 'आश्चर्यवत् पश्यति ' प्रमाणे दिङ्मूढ होऊन त्या क्रियाकडे पाहात असे. महाराजाना सविस्तर पत्र लिहिले तरी त्याचे उत्तर दीड ओळीत येत

असे त्यानंतर योगीराज श्री श्रीरंग देशपांडे यास एक पत्र लिहिले शक्तिपात मार्गावर इतका दृढ विश्वास असणारे व त्या मार्गाचे श्रेष्ठत्व हिरीरीने पटवून देणारा त्यांच्यासारखा पुरुष विरळाच. त्यांनी मला वाटणाऱ्या आश्चर्याचे रूपांतर आपल्या प्रभावी लेखणीने व वाणीने श्रद्धेत केले. असे सुमारे दहा महिने सपले. शरिरात झालेल्या शक्तीचा संचार जोमाने कार्य करीत होता. पाठीतले दुखणे कमी कमी होत असावे असे मला वाटू लागले. आणि सरोसरच रोगाला उतरती कळा लागली. झोप स्वस्थ लागू लागली. बद्धकोष्ठाचा विकार नष्ट झाला पक्षिणीची बाधी विरावी त्याप्रमाणे रोगाच्या प्रत्येक लक्षणाचे उच्चाटन होऊ लागले. अतिशय जोरदार होणारी भस्त्रिका, अनेकवार होणारी योगमुद्रा व सबंध धडाची अति वेगाने गोलाकार होणारी हालचाल यांनी शरीरातील प्रत्येक नस नी नस हालवून टाकली. मोकळी केली. डाव्या हाताची कमजोरी नष्ट झाली. डावा पाय दुखत असे व चालताना वाकडा पडे, तो सरळ पडू लागला. सबंध डाव्या बाजूची बधिरता व जाड्य नाहीसे झाले. त्या भागात चैतन्य खेळू लागले जवळजवळ एक तपपर्यंत मला जर्जर करणाऱ्या रोगाला विजेच्या वेगाने हा शक्तीने बाहेर काढून फेकून दिले गेली दोन वर्षे मी संपूर्ण निरोगी स्थितीत वावरत आहे हा कशाचा प्रभाव आहे ?

सर्व प्रकारची अद्ययावत् व अत्याधुनिक रोगनिवारक साधनसामुग्री जे करू शकली नाही. ते या शक्तिपात साधनेने घडवून आणले. हठयोगावरही मात केली.

शक्तिपात साधनेने शरीराच्या जीवनशक्तीला ( Vital force ) हात घातला. सर्व शरीराच्या क्रिया-प्रक्रिया ज्या केंद्रातून नियमित होतात ते केंद्र हाती घेऊन हा मूलभूत फरक घडवून आणला. बुद्धिवादी शास्त्रीय ज्ञानाची अपूर्णता त्या मार्गाने सिद्ध केली.

'शक्तिपात योग' साधनेमुळे पारमार्थिक फायदे काय होतात त्या मुद्याकडे मी वळत नाही. परंतु सर्व प्रकारची प्रगति आपण ज्या शरीराच्याद्वारे करतो, ते हे शरीर पूर्ण निरोगी व कार्यक्षम असणे नितांत आवश्यक आहे हे कोणीही कबूल करील म्हणून हे शरीर रोगरहित करण्याच्या दृष्टीने माझा हा अनुभव उपकारक ठरला तरी मला हे चार शब्द लिहिल्याचे सार्थक झाले असे वाटेल. शेवटी अश्विनीकुमार धन्वंतरी प. पू. गुळवणी महाराज हेच ठरले

—श. वा. देवधर, मुंबई

# भगवत्प्रेम योग

'भगवत्प्रेम योग' या शब्दातील सच्चिदानंदस्वरूप अशा भगवताबद्दल प्रेम म्हणजे भक्ति हाच योग म्हणजे उपाय स्वीकारून परमेश्वरास आपलासा करणे यालाच भगवत्प्रेम योग असे म्हणता येईल. भगवंतानी भगवद्गीतेत नवव्या अध्यायात

मन्मना भव मद्भक्तो मद्याजी मां नमस्कुरु ।
मामेवैष्यसि युक्त्वैवमात्मानं मत्परायणः ॥

हे अर्जुना ! तू माझे ठिकाणी आपले मन ठेव. माझा भक्त हो, माझे यजन कर आणि मलाच नमस्कार कर. याप्रमाणे माझे ठिकाणी चित्त स्थिर करून मत्परायण झालास, म्हणजे मज परमेश्वरासच येऊन मिळशील. या नवव्या अध्यायातील शेवटच्या श्लोकावर श्रीज्ञानेश्वर माऊलीही या श्लोकावरील अनेक ओव्यात भक्त कनवाळू भगवंताचे हृदय खालीलप्रमाणे स्पष्ट करीत आहे.

ऐसा मिया आथिला होसी ।
तेथ माझियाचि स्वरूपा पावसी ।
हे अतःकरणीचे तुजपासी ।
बोल्जित असे ॥

भक्तीची व्याख्या नारद भक्तिसूत्रात 'तस्मिन् परम प्रेमरूपा' अशी केली आहे. कै. श्रीमंत नारायणराव बाबासाहेब घोरपडे, जहागिरदारसाहेब इचलकरंजी यांनी छापून घेतलेल्या 'नारद भक्तिसूत्र' या पुस्तकाचा प्रकाशक म्हणून मला ही सूत्रे सूक्ष्मपणे अभ्यासण्याचा अनेक वर्षांपूर्वी सुयोग आला होता. त्यावेळेपासूनच सामान्य संसारी माणसाला कर्मयोगाचे काठिण्य व ज्ञान योगाचे अगम्यत्व किंवा अनाकलनीयत्व अशा या दोन्ही योगाचा समन्वय साधणारा सोपा मार्ग म्हणून भक्तियोगच श्रेष्ठ वाटणे हे साहजिक आहे. असेच माझ्या अल्प समजुतीला वाटत आले आहे. जगन्नियामक परमेश्वराच्या ठिकाणी अत्यंत प्रेमरूप अशी जी अंतःकरणवृत्ति तिलाच भक्ति असे म्हणतात. श्रीमद्भागवतात

'या प्रितिरविवेकाना विषयेष्वनपायिनी ।
त्वा मनुस्मरतः सा मे हृदयान् मापसर्पतु ॥'

अशी महाभगवद्भक्त प्रल्हादाने श्रीलक्ष्मीनृसिंह देवापाशी मागणी केली आहे की 'अविवेकी संसारी माणसांची स्त्रीपुत्रादि आणि गृहधनादि अनेक विषयावर जी प्रेमपूर्ण अंतःकरणवृत्ति रंगते, त्याप्रमाणेच माझी मनोवृत्ति तुमच्या चरणकमलापासून दूर जाऊ नये' यावरूनहि परमेश्वराच्या ठिकाणी परमप्रेमरूप वृत्ति स्थिर राहणे हीच भक्ति होय. प्रथमतः भक्ति हे ब्रह्मज्ञानाचे साधन म्हणता येईल. परंतु वंदनीय विरागी शुक्राचार्यांच्या सारखे ब्रह्मज्ञानीहि ज्या अर्थी भगवताची निरपेक्ष भक्ति करतात त्या अर्थी भक्तीची श्रेष्ठता देह असेपर्यंत मान्यच करावी लागेल. म्हणजे भक्ति हे ज्ञानाचे साध्यही मानता येईल. 'अद्वैतसिद्धी सिद्धान्तसार' या तत्त्वज्ञानप्रधान श्रेष्ठ ग्रंथाच्या पहिल्याच श्लोकात

स्वस्ति श्रीकृष्णतत्त्व, श्रुतिनिश्चितमना ।
य द्वितीय विशुद्ध, मिथ्या दृश्यातिरिक्त ॥
परमसुख मखिल प्रत्यगात्मैक्य रूपम् ।
श्रुत्या मत्वा तुर्नित्यानुभव दृढतया स्वप्रकाश ॥

यावरूनहि अद्वैतसिद्धीचे सार हे हरिभजनमय आहे, म्हणजे भगवत्भक्ति हेच सार ज्ञानोत्तरही आचरिले जात असत यावरून भक्ति व ज्ञान हे जरी प्रथमत जरी भिन्न दिसले तरी श्रीमत् आद्यशंकराचार्यही "विवेक चूडामणी" या ग्रथात 'स्वस्वरूपानु संधानम्, भक्तिरित्यभिधीयते' असेच म्हणतात. श्रीज्ञानेश्वर महाराजहि भक्तीची चैठक अद्वैत तत्त्वज्ञानच मानतात म्हणून 'ज्ञानी चैत स्वसवेति। चैर म्हणती शक्ति, आम्हि परमभक्ति आपली म्हणो।' असे 'ब्रह्मभूत प्रसन्नात्मा न शोचति न काक्षति। सम सर्वेषु भूतेषु मद्भक्ति लभत पराम्। या ठिकाणी याच ज्ञानोत्तर भक्तीचे अव्यभिचारी भक्ति, गुर्वी भक्ति, अनन्य भक्ति परमभक्ति असे वर्णन केलेले आहे भक्ताचेही आर्त, जिज्ञासु, अर्थार्थी आणि ज्ञानी असे चार भेद भगवतानीच भगवद् गीतेत सागितलेले आहेत हे भक्त आपआपल्या पूर्व कर्मानुसार प्राप्त झालेल्या श्रवणकीर्तनादि नऊ प्रकारच्या भक्तियोगामध्ये रगून जात असतात नारद भक्तिसूत्रात या भक्तिप्रकाराचे भेद अकरा सागितले आहेत या भक्तीमध्ये ही सद्गुणस्वरूपाची भक्ति व निर्गुण स्वरूपाची भक्ति असेहि दोन भेद मानलेले आहेत निर्गुण स्वरूपाच्या भक्तीयोगात कष्ट अधिक आहेत म्हणून आपण सर्व सामान्य ससारी माणसे नामरूपाने नटलेल्या देहधारी झालेल्या सगुण परमेश्वराचीच उपासना करीत असता भगवद्गीतेच्या बाराव्या अध्यायात ही सगुण भक्ति भगवतानाहि मान्य झालेलीच आहे ही सगुणभक्ति शुकाचार्यासारख्या विरक्त ज्ञानी पुरुषालाही आवश्यकच वाटत असते अध्यात्मविचार करणाऱ्या ज्ञानी उपासकाला अव्यक्ताच्या उपासनेने जे परमेश्वराचे ज्ञान प्राप्त होते तेच सगुण भक्तीनेहि लाभू शकते असे गीता अध्याय बारा श्लोक ०५ यात वर्णन केलेले आहे भक्तियोगात उपास्य व उपासक असा प्रथमत देवभक्तात भेद किंवा द्वैत मानले जात असल्यामुळे हे अद्वैत तत्त्वज्ञानाचे पूर्व साधन किंवा अध्यात्मज्ञान प्राप्तीचा पूर्व उपाय म्हणून काही ज्ञानी लोक सागत असतात भगवद्गीतेच्या नवव्या अध्यायात या भक्तियोगाला राजविद्या म्हणजे सर्व विद्याचा राजा किंवा अत्यत महत्त्वाची गुप्त गोष्ट म्हणून मान्यता मिळालेली आहे गतिर्भर्ता प्रभू साक्षी या श्लोकात सकलकल्याणगुणनिधान असा परमेश्वर उपास्य मानीत आले आहे शाडिल्य महर्षि, भक्तीचे लक्षण परानुरक्तिरीश्वरे म्हणजे ईश्वराच्या ठिकाणी परा म्हणजे श्रेष्ठी अनुरक्ति यातील अनु या उपसर्गाचा मागाहून असा अर्थ आहे मागाहून म्हणजे परमेश्वराच्या स्वरूप त्याचे ज्ञान झाल्यानतर भक्ताकडून जे प्रेम केले जाते त्याला भक्ति असे शाडिल्य महर्षीनी म्हटले आहे म्हणजे परमेश्वराच्या सगुण व निर्गुण दोन्ही प्रकारचे स्वरूप समजल्यानतर जी भक्ति केली जाते, तीच श्रेष्ठ भक्ति होय सद्गुण समजता प्रेम करणे व न समजता प्रेम करणे याप्रमाणेच या भगवत्प्रेम यातातील तरतमभाव म्हणजे श्रेष्ठ कनिष्ठ भाव किंवा कमी अधिकपणा मानावा लागेल म्हणूनच चार प्रकारच्या भक्तामध्येहि 'ज्ञानीत्वात्मैव मेमतम्' असे भगवतानीच ज्ञानी भक्त हाच माझा आत्माच आहे असे म्हणून श्रेष्ठत्व सांगितले आहे श्रीमद्भागवतादि अनेक ग्रथ या भक्ति मार्गाचे माहात्म्य वर्णन करीत असतात त्याचेहि कारण या मार्गात कर्मांची कटकट नाही म्हणून सामान्य ससारी जीवाना सर्वात सोपा मार्ग सतानाहि हाच सांगितला आहे

—'पुरुष सपर पार्थ भक्त्या लभ्य स्त्वनन्यया'

ही भक्तीची महती आहे नवव्या अध्यायात भक्तीचा गाढवा उत्कटतेचे लावविला आहे यात कर्म उपासना व ज्ञानादि वर्णन आल असल्यामुळे या अध्यायाला गौरवाने गीता रहस्य म्हटले असताहि शोभून दिसेल यानधारणादि योग शास्त्रातील अनेक उपाय सांगितल्यानतर शेवटी आठराव्या अध्यायात 'मामेक शरण व्रज' या श्लोकात परमेश्वर पदपद्मी अनन्य शरणागति स्वीकारणे हाच सामान्य ससारी जीवाना सुकर मार्ग आहे असा भक्तीमार्ग भगवतानीच अर्जुनाला निमित्त करून जगाला उपदेशीला आहे नवव्या अध्यायात प्राधान्याने भक्तिमार्गच विवक्षित दिसतो या अध्यायात भक्तीचा गोडवा व अधिक प्रेमळपणा असल्यामुळे व हा अध्याय गीतेत सांगितल्यामुळेच तिला दुसरी मान्यता लाभली आहे या अध्यायात ज्ञानात भक्ति व भक्तिज्ञानही गुरफून दिल्यामुळे या भक्तियोगास राजमार्ग म्हणणे अधिक उचित ठरेल

'यद् यद् विभूतिमत सत्वम' हे सामान्य जीवाला उलटल्याने परमेश्वराचे सामान्य सगुण स्वरूप सांगून विश्वरूपदर्शनाने अकराव्या अध्यायात परमेश्वराच्या विराट स्वरूपाचाहि प्रत्यय आणून दाखविला आहे. या जगात कोणी कोणी आपल्या स्वभावानुरूप आवडीप्रमाणे गणपतीचे भजन करतील, परंतु कोणत्याहि प्रतिमात खरा देव दिसू शकणार नाही. कारण 'अव्यक्त व्यक्तिमापन्न' या श्लोकात परमेश्वराचे निर्गुण निराकार असे अव्यक्त स्वरूपच सत्य आहे असे ईश्वरस्वरूपाचे वर्णन केलेले आहे.

'एको देव सर्व भूतेषु गूढ
सर्वव्यापी सर्वभूतान्तरात्मा' ॥

कर्माध्यक्ष सर्वभूताधिवास साक्षी चेता केवलो निर्गुणश्च' असे श्वेताश्वतर उपनिषदामध्ये वर्णन केलेले आहे निर्गुण अशा अव्यक्त सच्चिदानंदस्वरूप परब्रह्माच्या ठिकाणी कोणतेहि सगुण साकार स्वरूप धरण्याचे सामर्थ्य असते. कारण मूळ निर्गुण अव्यक्त स्वरूपास कोणतेच नाम आणि रूप, आकार, चिन्ह इत्यादि बाह्य इंद्रियास प्रत्यक्ष दिसणाऱ्या गोष्टी प्रतीत होत नसल्यामुळेच ते निर्गुण अव्यक्त व सर्व शक्तिसंपन्न परब्रह्म वाटले. त्या स्वरूपामध्ये प्रतिक रूपाने प्रकट होऊ शकते व आपल्यालाहि वाटेल त्या प्रतिकात चित्ताची स्थिरता करण्यासाठी व आनंदाचा अनुभव घेण्यासाठी प्रतीकाच्या स्वरूपातहि उपासना करिता येते व उपासनेच्या शेवटी 'हासी जीवा शीवा भेटी' असा अनुभव येतो श्रीतुकाराममहाराज सगुणस्वरूपाची भक्ताच्या दर्शने उपयुक्तता सांगण्यासाठी

"अरूपे ब्रह्मरूप रिता नाही ठाव।
मूर्ति माझी देव कैसा नाही."

असेच विचारतात. कारण 'श्रद्धामयोय पुरुष' 'ये यथा मा प्रपद्यन्ते ता स्तथैव भजाम्यहम्' या भगवद्गीतेच्या वचनावरून 'भाव तांचि देव' असे श्रीनाथमहाराजाच्याप्रमाणे सतहि म्हणतात 'देव भावाचा भुकेला' असे तुकाराममहाराजहि म्हणतात. या भाव भक्तीच्या जोरावरच श्रीनामदेव महाराजहि पांडुरंगास प्रत्यक्ष जेवावयास लावू शकतात हा सर्व सगुण स्वरूपातील श्रद्धाभक्तीचा प्रताप आहे. परंतु याचे मूळ स्वरूप एकच सच्चिदानंदस्वरूप आहे हे "एकं सत् विप्रा बहुधा वदन्ति अग्नि यम मातरिश्वान माहु" असे वेद वचनाहि परब्रह्मस्वरूपाचे अद्वैतत्व दाखवीत आहे. म्हणूनच

'तुज सगुण म्हणू की निर्गुणरे।
सगुण निर्गुण एक गोविंदुरे ॥'

यातहि एकमेवाद्वितीय देव अद्वैततत्व दोघटी प्रतिपादन केलेले आहे.

"ईश्वरोगुरु रात्मेति मूर्तिभेद विभागिने।
व्योमवद् व्याप्त देहाय दक्षिणामूर्तये नमः ॥"

असे श्रीमद् आद्य शंकराचार्यहि परब्रह्माचे अद्वैतत्व दाखवीत आहेत. भासमान होणाऱ्या देवभक्त व गुरु शिष्यादि संप्रदायालाहि ते एकच परब्रह्म अधिष्ठान आहे हे उपासनेच्या उत्कटत्वानेच समजू शकत असते.

'काष्ठी अग्नि जसा वा दुग्धी घृत सागरोदकी लवण।
पुष्पी परिमल तैसा भरला विश्वात पार्वती रमण ॥

या आर्येप्रमाणे दिसणाऱ्या वुधाला न दिसणारे दूर अधिष्ठान जसे मानावेच लागते. त्याप्रमाणेच व्यक्त जगाला अव्यक्त परब्रह्माचे अधिष्ठान मानावे लागते. श्रीविद्यारण्य स्वामींनीहि पंचदशी या वेदान्तप्रधान ग्रंथात

'ब्रह्माद्या स्तंभ पर्यन्ता प्राणिनोऽत्र जडाअपि ॥
उत्तमाधम भ वेन वर्तन्त पटचित्रवत् ॥'

म्हणजे सिनेमाच्या पडद्यासुभ्र पडद्यावर सिनेमा सुरु होण्यापूर्वी कोणतहि चित्र भासत नाही व सिनेमा संपल्यावर हि पुन पडद्यासुभ्र पडद्याला दिसतो आणि सिनेमाच्याकाली मात्र त्या एकाच पडद्यावर अनेक विविध श्रेष्ठ कनिष्ठ भावाने दिसतात त्याप्रमाणेच एकाच अद्वैत परब्रह्माच्या ठिकाणी ह्या जगाचा भास होत आहे. तथापि हे अद्वैत तत्त्वज्ञान दाखविणारा भक्तिमार्ग सर्व विद्यांचा राजा असल्यामळे या मार्गास राजविद्या असेहि नाव दिलेले आहे देव आहे किंवा नाही दोन्ही गोष्टी जर सामान्य जीवाला समजत नसल्या तरी त्याबाबतीत तर्क करावयाचा असेल तर तो

'श्रुतिमतस्तर्कों नु सधीयताम्'

असे श्रीशंकराचार्यांनी 'साधन पचक स्तोत्रात' म्हटले आहे. कविकुलगुरु कालिदास यांनी रघुवंश काव्यात

'प्रत्यक्षोऽपि अपरिच्छेद्य मह्यादिर महिमातव।
आप्त्या गनुमानाभ्या साध्य त्वा प्रति का कथा ॥'

असे ईश्वराचे अस्तित्व आप्त वाक्यावरुन आणि अनुमाना वरून त्याच्या सगति सिद्ध केले आहे

" गुलाबावरी काटे म्हणुनि लोक निंदिती देवाला ।
काट्यावरी जो गुलाब फुलवी वातु नये कां परि त्याला ॥"

असा आस्तिक व नास्तिकाच्या दृष्टीतील दोन प्रकारचा फरक दोन चरणात दाखविला आहे. नास्तिक मनुष्य God is No Here असे दोन शब्द उच्चारून ईश्वराचे अस्तित्व सिद्ध करील. काय म्हणावयाचे ते आपण आपल्या कल्याणाच्या दृष्टीने व आनंद अनुभवाच्या दृष्टीने ठरवावयाचे असते. एका विनोदी गृहस्थाने असे म्हटले आहे की, ' मला देव आहे की नाही हे दोन्हीहि माहीत नसतानाही मी मात्र आहे असेच म्हणत असतो. कारण नाही म्हणण्यात आपला काहीहि फायदा नाही. पण आहे म्हणण्यात मात्र तो असेल तर माझ्यावर रागावणार नाही असा फायदा आहे, असे म्हटले आहे. स्वामी रामतीर्थ यांनीहि विनोदाने God कडे लक्ष न द्याल तर या शब्दांतील स्पेलिंग तुमच्यावर उलटेल असे म्हटले आहे. तात्पर्य; जीवाला अखंड सच्चिदानंदरूपता लाभण्यासाठी सगुण उपासनाहि आवश्यक आहे. सुवर्णाप्रमाणेच कोणताहि दागिना नसता ते सुवर्ण कोणत्याहि दागिन्याच्या रूपाने आकार घेऊ शकते व त्या दागिन्याच्या धारकासहि आनंद देऊ शकते. त्याप्रमाणेच भक्ताच्या आनंदासाठी व योगक्षेमासाठीहि ते निर्गुण परब्रह्म सगुण व साकार होऊ शकते व अशा सगुण ब्रह्माची उपासना श्रीरामकृष्ण इत्यादि अवतारांनी सोपी केली आहे. कारण देहवान् माणसाला अव्यक्त ब्रह्माचे चिंतन करून निर्विकल्प समाधि लावता येणे कठीण असते आणि यदाकदाचित ती लावली तरी कष्ट करून फलदृष्ट्या त्याला अधिक ते काय मिळणार ? असा प्रश्न पडतो. म्हणून अव्यक्तोउपासनेहून व्यक्तोपासना कमी क्लेशप्रद होतात. फलदायी होत असल्याने परमेश्वराची सगुण भक्तीच कर असा उपदेश अध्याय बारा श्लोक आठ यातहि केला आहे. परमेश्वर प्राप्तीचा सोपा उपाय म्हणजे परमेश्वराला सर्व कर्मे समर्पण करणे हा होय. मग भक्ताचे सर्व जीवन प्रेममय व शांतीपूर्ण होते. तो प्रेममूर्तीच होतो. त्याच्या उद्धाराची जबाबदारीहि भगवतानी आपल्याकडेच घेतली आहे. भक्ताच्या इच्छेनुरूप अचिंत्य शक्तिमान् परमेश्वर, रूपे धारण करीत असतो व भक्ताच्या कामना पूर्ण करीत असतो. हे जरी सत्य आहे तथापि भक्तावरहि फार मोठी जबाबदारी आहे. कारण त्यांनी परमेश्वराविषयी अनन्यनिष्ठा बाळगली पाहिजे. ज्ञान व भक्ति यात वस्तुतः विरोध नसून भासमान शाब्दिक भेद आहे.

' सर्व भुतेषु यः पश्येत् भगवद्भाव मात्मनः ।
भूतानि भगवत्यात्मन्ये भागवतोत्तमः ॥ '

असे श्रीमद् भागवद् ग्रंथातहि भक्तश्रेष्ठाचे लक्षण सांगितले आहे. त्यावरूनहि ज्ञान व भक्तियोगात वस्तुतः विरोध नाही हे सहज समजेल. भक्ति व ज्ञान यांची ताटातूट होतच नाही. त्यांचा समन्वय सत्वर कार्यसिद्धि करीत असतो. कन्हाडचे सुप्रसिद्ध श्रीरामभक्त विठोबा आण्णा दप्तरदार यांनी आपल्या ' सुश्लोक लाघव ' या ग्रंथात भक्ति हीच मुक्ति कशी सिद्ध होते, याबद्दलचा एक सुंदर श्लोक घातलेला आहे. तो असा

" आदिमा भक्ति रित्येतत् सर्वसज्जन संमतम् ।
यद्यना शोचिता सैव मुक्तिर्भवति निश्चितम् ॥ १ ॥

या श्लोकात भक्ति या शब्दात जर आदि मा म्हणजे म च्या ऐवजी म घातला आणि ती भक्ति या शब्दातील अ चा नाश केला आणि उचिता म्हणजे उ या स्वराने युक्त केली तर अनाशोचित म्हणजे दुसऱ्या अर्थाने निरपेक्ष किंवा निष्काम आचरली तर ती भक्तीच मुक्ति होत असते. म्हणून ती आदिमा म्हणजे श्रेष्ठ आहे असे म्हटले आहे. अशा सर्वशक्तिमान् परब्रह्मतत्वाचे निर्गुण आणि सगुण स्वरूपाची कितीही शाब्दिक वर्णन केले तरी श्रीसमर्थ रामदास ' आत्माराम ' ग्रंथात

' जेथे मांबावला तर्क । जेथे पांगुळला विवेक ॥
तेथे शब्दाचे कौतुक । केवी घडे ! ॥ '

असे म्हणतात तेच सत्य आहे. एका हिंदी कवीनेही

' रामतेरी, रचना अचरजभारी ॥
जाको वर्णन कर सब हारी ॥ १ ॥
जलसे बिंदुसे देह बनाई, तामे नर अरू नारी,
हात पाव सब, अंग मनोहर भीतर प्राण संचारी ॥२॥
ऋषी मुनी निशिदिनी ध्यान लगाये,
लख, न, सके गती सारी,
ब्रह्मानंद अनंत महाबल ईश्वर शक्ति तुम्हारी ।

असे म्हटले आहे. यावरून या एकमेवाद्वितीय परब्रह्मात व्यावहारिक व पारमार्थिक असे दोन भाग दाखविता येतील.

"एक च मृद् भाड मनेकरूपम्,
गावो विवर्णाः पय एक रूपम् ॥
सुवर्णमेकम् बहुभूषणानि भिन्नाश्च देहाः परमार्थ एक "
ह्याच अभिप्राय
पय दधि घृत आणि नवनीत,
तैसे हृदय जात एकपणे ॥ १ ॥
कनकाचे पाही अलंकार केले ।
कनकत्वा आले एकपणे ॥ २ ॥
मृत्तिकेचे घट झाले नानापरी ।
मृत्तिका अवधारी एकपणे ॥ ३ ॥
तुका म्हणे एक एक ते अनेक ।
अनेकत्वी एक एकपणे ॥ ४ ॥'

हेच परब्रह्म स्वरूपाचे ज्ञान होण्यासाठी आणि ससारी जीवासही अखंड सच्चिदानंदरूपता लाभण्यासाठी हा भगवत्प्रेमयोग म्हणजे भगवत्ताच्या विश्वस्वरूपावर प्रेम करण्याचा उपाय लाभावा म्हणून मी हा लेख श्रीवासुदेवनिवास सस्थेच्या सेवेसाठी समर्पण करीत आहे.

—कल्याण श्रीपाद कुलकर्णी



चंद्रिकेप्रमाणे मनोल्हादक आहे. या देवीपासून कधीच अपाय होत नाही. धन, धान्य, सोने गाई, घोडे, पुत्र-मित्रादि आप्तजन, दासदासी यांची प्राप्ती याच देवींच्या आराधनेपासून होते. ही देवी ब्रह्मस्वरूपिणी आहे, मद हास्याने विलसत आहे. आर्द्रा नक्षत्रावर हिचा जन्म झाला आहे. ही कमलासनस्थ असून सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे. हिच्या उपासनेने दारिद्र्य दूर होते. हिच्यापासूनच बिल्व वृक्ष निर्माण झालेला आहे ही सुगधसंपन्न व दुर्जय असून सर्व प्राणिमात्राची स्वामिनि आहे आर्द्र वेत हातात धरणाऱ्या, गळ्यात सुवर्णाचे हार धारण करणाऱ्या अशा या श्रीलक्ष्मीची प्रार्थना ऋग्वेदकालीन साधकानी वारवार केलेली आहे. याच सूक्तात म्हटले आहे.

'कमलनयने! अखड सुख लाभेल असा मला वर दे महाधने! अश्व, गाई, बैल व धन देणारी अशी तू मजवर प्रसन्न हो. पुत्रपौत्र, धनधान्य, हत्ती, घोडे, गाई, रथ इत्यादि मला देऊन तू मला आयुष्यमान् कर या सर्व प्रजेची तू माता आहेस हे कमलनिवासिनी पद्महस्ते! शुभ्र गधमालादिकानी शोभणारे भगवती! तू मला सतुष्ट कर विष्णुपत्नी, क्षमादेवी, माधवी, माधवप्रिया, प्रियसखी, अच्युतवल्लभा अशा या लक्ष्मी देवीला माझा नमस्कार असो या महालक्ष्मीला आम्ही ओळखतो या विष्णु पत्नीचेच ध्यान आम्ही करतो, हीच लक्ष्मी आम्हास आमच्या सत्कार्यास प्रेरणा देते आनद, कर्दम, श्रीद, चिक्लीत असे विख्यात ऋषि हिचेच पुत्र आहेत ऋण, रोग, दारिद्र्य, पाप, भूक, अज्ञान, अपमृत्यू, भय, शोक, मनस्ताप ही सर्व नाश होवोत सपत्ती, वर्चस्व, आयुष्य व आरोग्य यानी माझे आयुष्य समृद्ध व्हावे यासाठी धन, धान्य, पशु, वधु, बहुपुत्रलाभ, शभर वर्षाचे उदड आयुष्य याची प्राप्ती मला व्हावी.'

## देवीभागवतातील रमणीय स्तोत्रे

*ऋग्वेदातील या प्रसिद्ध सूक्तात जरी ऐहिक वैभवाची मागणी श्रीदेवीस केलेली असली तरी तिचे रूपवर्णन व भक्ताची अनन्यता यानी हे स्तोत्र परिपूर्ण आहे भावाने आपण मातृस्वरुपी ईश्वराशी अनन्य असावे हेही आपल्या लडिवाळ लेकराशी अनुसधान व दुहेरी भूमिका यापुढे मातृभक्तीच्या परपरेत* उदित झालेली दिसून येईल आणि

'पिताहमस्य जगतो माता, धाता, पितामह'

या भगवद्गीतेतील वचनाने तर या धारणेस बळकट असा तात्त्विक पाया प्राप्त करून दिला पुराणग्रथानी या देवीतत्त्वाची व मातृतत्त्वाची निष्ठेने उपासना केली देवीची विविध रूपे, तिचे विविध प्रसगीचे आविष्कार, दुष्टाचा तिने केलेला सहार, तिची विविध स्थाने इत्यादींचे सविस्तर वर्णन देवी भागवता सारख्या प्रसिद्ध ग्रथात आलेले आहे. नाना प्रसगाच्या निमित्ताने झालेल्या देवीच्या विविध अवताराच्या कथा या ग्रथात विस्ताराने आलेल्या आहेत. देवीच्या विविध अवताराच्या कथा या ग्रथात विस्ताराने आलेल्या आहेत देवीच्या विविध ध्यानाची मनोज्ञ वर्णने येथे आहेत, देवीच्या प्रार्थनेची अनेक रमणीय स्तोत्रे या ग्रथात आहेत. ही देवी ललिता, राजराजेश्वरी, महात्रिपुरसुदरी, बाला, पचदशी, षोडशी, कुमारी, त्रिरूपा, गौरी, रमा, भारती, काली, भद्रकाली, चडिका, कालिका, महिषासुरमर्दिनी, दुर्गा, महाकाली, महालक्ष्मी, सरस्वती, अबा, अष्टभुजा, दशभुजा, मनसा, श्रीराधा, भगवती, भवानी, रेणुका, एकवीरा इत्यादि विविध नावानी त्या त्या वेळच्या अवतार प्रसगाना अनुसरून प्रसिद्ध आहे.

विविध प्रसगानी उचित अशी अनेक भावपूर्ण स्तोत्रे देवीची स्तुति व प्रार्थना करण्यासाठी या ग्रथात प्रकट झाली आहेत. सर्व देवीभक्ताना पुढील प्रार्थनासूक्त अवगत असे आहे

*नमो देव्यै महादेव्यै शिवायै सतत नम ।*
*नम प्रकृत्यै भद्रायै नियता प्रणता स्म ताम् ॥*
*तामग्निवर्णां तपसा ज्वलन्तीं वैरोचनीं कर्मफलेषु जुष्टाम् ।*
*दुर्गां देवीं शरणमह प्रपद्ये सतरसि तरसे नम ॥*
*देवीं वाचमजनयन्त देवास्ता विश्वरूपा पशवो वदन्ति ।*
*सा नो मन्द्रेषमूर्ज दुहाना धेनुर्वागस्मानुप सुष्टुतैतु ॥*
*कालरात्रीं ब्रह्मस्तुता वैष्णवीं स्कन्दमातरम् ।*
*सरस्वतीमदितिं दक्षदुहितर नमाम पावना शिवाम् ॥*

देवी भागवताप्रमाणेच दुर्गा सप्तशती हाही छोटा ग्रथ मातृभक्तीच्या उपासकाना अत्यत मार्गदर्शक व इष्ट सिद्धि देणारा असा आहे मार्कण्डेय पुराणातील हे आख्यान व त्यातील गर्भितार्थ अनेकाना उपकारक

# संतांचा मातृभक्तियोग

एका बीजापासून या चराचराचा विस्तार झाला एका भागारापासून, सुवर्णापासून नाना प्रकारचे अलंकार निर्माण झाले, एका पाण्यावरच नाना तरंग निर्माण झाले, परंतु हा सर्व व्यक्त विस्तार एकाच तत्त्वाचा आहे आणि या सर्व विस्तारपूर्वक पसरलेल्या सचेतन अचेतन वस्तुजातात एकच तत्त्व भरून राहिले आहे ही भारतीय तत्त्वज्ञानाची व भक्तितत्त्वाची प्रमुख धारणा आहे 'सूत्रे मणिगणा इव' या जगातील सर्व पदार्थ एकाच आत्मतत्त्वात सामावून गेले आहे ज्ञानदेवाच्या भाषेत सांगावयाचे तर "सोनियाच्या सुतात सुवर्णाचे मणी ओविले आहेत" ऐक्याची ही अनुभूती जितकी तीव्र तितकी सर्व सुखाची बहार अवर्णनीय मानली गेली आहे मनुष्य जन्माला येऊन जे अद्वितीय व अलौकिक सुख संपादन करायचे ते हेच हे कधी ज्ञानाने, कधी कर्मयोगाने कधी ध्यानयोगाने, कधी भक्तियोगाने, कधी तपश्चर्येने, कधी सत्संगतीने तर कधी सर्व प्रापंचिक कर्मे करीत असताना नुसत्या अनुसंधानानेही मिळत राहते ससीमाने असीमाशी, जीवाचे शिवाशी, आत्म्याचे परमात्म्याशी हे जे अतूट नाते आहे त्याचा सानंद अनुभव भक्तियोगात येतो

## भावरम्य व सर्वसुलभ साधनाविष्कार

ही भक्ति किती प्रकारांनी करता येते, तिचे स्वरूप कसे आहे, ती किती अपरंपार मोठी आहे यासंबंधीचे विवेचन येथे प्रस्तुत नाही भक्तिसाधनासाठी ईश्वराशी जी अनेक प्रकारची नाती साधकांनी कल्पिली, त्यांतील एका भावरम्य व सर्वांना सुलभ वाटणाऱ्या साधनविकासाचा विचार येथे करावयाचा आहे चैतन्य तत्त्वास, आदिकारणास, व्यक्ताव्यक्त परमेश्वरास, ब्रह्मास मातृस्वरूपात मानणे व आपण सर्व त्यांचीच लडीवाळ लेकुरे आहोत हा भाव या मातृभक्तियोगात प्रामुख्याने असतो या मातृतत्त्वाच्या उपासनेचे धागेदोरे संस्कृतीच्या आरंभ काळीच जो भक्ताच्या मनोव्यापाराचा सहज सुंदर आविष्कार झाला त्यात दिसून येतात शक्तीची, देवीची, श्रीची उपासना ऋग्वेदकाळापासूनच विकसित झालेली दिसते मनात येईल ते मागावे, निर्भय होऊन प्रार्थना करावी, संरक्षणासाठी आसरा घ्यावा, संकोच सोडून दैन्य सांगावे, रूपवर्णनासाठी स्तुतिस्तोत्रे गाऊन स्वतःस धन्य समजावे कधी हट्टाने, आग्रहाने लडिवाळ भावनेत आळवावे, हे सर्व मनोज्ञ आविष्कार एका मातेच्या नात्याखेरीज इतरत्र कुठे उपलब्ध होणार !

## ऋग्वेदातील श्रीसूक्त

ऋग्वेदातील श्रीसूक्त या दृष्टीने किती रमणीय व अर्थगर्भ आहे हे पहण्यासारखे आहे मातृस्वरूपी असणाऱ्या या देवीची कांती सुवर्णाप्रमाणे आहे सुवर्णाच्या विविध पुष्पमाला तिने धारण केल्या आहेत तिचा प्रकाश

चंद्रिकेप्रमाणे मनोल्हादक आहे. या देवीपासून कधीच अपाय होत नाही. धन, धान्य, सोने, गाई, घोडे, पुत्र-मित्रादि आप्तजन, दासदासी यांची प्राप्ती याच देवींच्या आराधनेपासून होते. ही देवी ब्रह्मस्वरूपिणी आहे, मद हास्याने विलसत आहे. आर्द्रा नक्षत्रावर हिचा जन्म झाला आहे. ही कमलासनस्थ असून सर्व मनोरथ पूर्ण करणारी आहे. हिच्या उपासनेने दारिद्र्य दूर होते. हिच्यापासूनच बिल्व वृक्ष निर्माण झालेला आहे. ही सुगंधसपन्न व दुर्जय असून सर्व प्राणिमात्राची स्वामिनि आहे. आर्द्र वेत हातात धरणाऱ्या, गळ्यात सुवर्णाचे हार धारण करणाऱ्या अशा या श्रीलक्ष्मीची प्रार्थना ऋग्वेदकालीन साधकानी वारवार केलेली आहे. याच सूक्तात म्हटले आहे.

'कमलनयने! अखड सुख लाभेल असा मला वर दे. महाधने! अश्व, गाई, बैल व धन देणारी अशी तू मजवर प्रसन्न हो. पुत्रपौत्र, धनधान्य, हत्ती, घोडे, गाई, रथ इत्यादि मला देऊन तू मला आयुष्यमान् कर. या सर्व प्रजेची तू माता आहेस. हे कमलनिवासिनी पद्महस्ते! शुभ्र गधमालादिकानी शोभणारे भगवती! तू मला सतुष्ट कर. विष्णुपत्नी, क्षमादेवी, माधवी, माधवप्रिया, प्रियसखी, अच्युतवल्लभा अशा या लक्ष्मी देवीला माझा नमस्कार असो. या महालक्ष्मीला आम्ही ओळखतो या विष्णु-पत्नीचेच ध्यान आम्ही करतो, हीच लक्ष्मी आम्हास आमच्या सत्कार्यास प्रेरणा देते आनद, कर्दम, श्रीद, चिक्लीत असे विख्यात ऋषि हिचेच पुत्र आहेत ऋण, रोग, दारिद्र्य, पाप, भूक, तहान, अपमृत्यू, भय, शोक, मनस्ताप ही सर्व नाश होवोत. सपत्ती, वर्चस्व, आयुष्य व आरोग्य यांनी माझे आयुष्य समृद्ध व्हावे. यासाठी धन, धान्य, पशु, बधु, बहुपुत्रलाभ, शंभर वर्षांचे उदड आयुष्य याची प्राप्ती मला व्हावी.'

## देवीभागवतातील रमणीय स्तोत्रे

ऋग्वेदातील या प्रसिद्ध सूक्तात जरी ऐहिक वैभवाची मागणी श्रीदेवीस केलेली असली तरी तिचे रूपवर्णन व मागणाराची अनन्यता यानी हे स्तोत्र परिपूर्ण आहे. बालकभावाने आपण मातृस्वरूपी ईश्वराशी अनन्य असावे व ईश्वरानेही आपल्या लडिवाळ लेकराशी अनुसधान ठेवावे अशी दुहेरी भूमिका यापुढे मातृभक्तीच्या परपरेत उदित झालेली दिसून येईल आणि

'पिताहमस्य जगतो माता, धाता, पितामहः'

या भगवद्गीतेतील वचनाने तर या धारणेस बळकट असा तात्त्विक पाया प्राप्त करून दिला. पुराणग्रंथानी या देवीतत्त्वाची व मातृतत्त्वाची निष्ठेने उपासना केली. देवीची विविध रूपे, तिचे विविध प्रसगीचे आविष्कार, दुष्टाचा तिने केलेला सहार, तिची विविध स्थाने इत्यादींचे सविस्तर वर्णन देवी भागवता-सारख्या प्रसिद्ध ग्रथात आलेले आहे. नाना प्रसंगाच्या निमित्ताने झालेल्या देवीच्या विविध अवताराच्या कथा या ग्रथात विस्ताराने आलेल्या आहेत. देवीच्या विविध अवताराच्या कथा या ग्रथात विस्ताराने आलेल्या आहेत. देवीच्या विविध ध्यानाची मनोज्ञ वर्णने येथे आहेत, देवीच्या प्रार्थनेची अनेक रमणीय स्तोत्रे या ग्रथात आहेत. ही देवी ललिता, राजराजेश्वरी, महात्रिपुरसुदरी, बाला, पचदशी, षोडशी, कुमारी, निरूपा, गौरी, रमा, भारती, काली, भद्रकाली, चडिका, कालिका, महिषासुरमर्दिनी, दुर्गा, महाकाली, महालक्ष्मी, सरस्वती, अबा, अष्टभुजा, दशभुजा, मनसा, श्रीराधा, भगवती, भवानी, रेणुका, एकवीरा इत्यादि विविध नावानी त्या त्या वेळच्या अवतार प्रसगाना अनु-सरून प्रसिद्ध आहे.

विविध प्रसगानी उचित अशी अनेक भावपूर्ण स्तोत्रे देवीची स्तुति व प्रार्थना करण्यासाठी या ग्रथात प्रकट झाली आहेत. सर्व देवीभक्ताना पुढील प्रार्थनासूक्त अवगत असे आहे.

नमो देव्यै महादेव्यै शिवायै सतत नमः।
नमः प्रकृत्यै भद्रायै नियताः प्रणताः स्म ताम् ॥
तामग्निवर्णां तपसा ज्वलन्तीं वैरोचनीं कर्मफलेषु जुष्टाम्।
दुर्गां देवीं शरणमह प्रपद्ये सतरसि तरसे नमः ॥
देवीं वाचमजनयन्त देवास्ता विश्वरूपाः पशवो वदन्ति।
सा नो मन्द्रेषमूर्ज दुहाना धेनुर्वागस्मानुप सुष्टुतैतु ॥
कालरात्रीं ब्रह्मस्तुतां वैष्णवीं स्कन्दमातरम्।
सरस्वतीमदितिं दक्षदुहितरं नमामः पावना शिवाम् ॥

देवी भागवताप्रमाणेच दुर्गा सप्तशती हाही छोटा ग्रंथ मातृभक्तीच्या उपासकाना अत्यत मार्गदर्शक व इष्ट सिद्धि देणारा असा आहे. मार्कण्डेय पुराणातील हे आख्यान व त्यातील गर्भितार्थ अनेकाना उपकारक

झाला आहे. देवीच्या प्रचुर अवतारांचे पार वेधक वर्णन या ग्रंथात असून देवीची अनेक सुंदर व नित्य पठणीय स्तोत्रे यातही एकत्र झालेली आपणास दिसतील. वर दिलेल्या पुस्तकाच्या पहिल्या दोन ओळी देऊन एक अति विस्तृत व भावपूर्ण स्तोत्र या ग्रंथाच्या पाचव्या अध्यायात देवांनी केलेल्या देवीस्तुतीच्या निमित्ताने प्रकट झाले आहे. अशीच स्तुति एकादश अध्यायातही आलेली आहे. देवीभागवत व दुर्गा सप्तशती या दोन महान् व प्रासादिक ग्रंथाखेरीज देवीकवच, अर्गलास्तोत्र, दुर्गामानसपूजा इत्यादि स्फुट प्रकरणे देवीमाहात्म्य व देवीस्तुति यासाठी प्रसिद्ध आहेत. शंकराचार्यांची समजली जाणारी अनेक सुंदर स्तोत्रे मातृभक्तीच्या जिव्हाळ्याने भारावलेली अशी आहेत. भवानी भुजंगस्तोत्र, कनकधारास्तोत्र, त्रिपुरसुंदरस्तोत्र, कल्याणवृष्टिस्तोत्र यांसारखी अनेक हृद्य व नित्य उपासनेस उपयुक्त अशी स्तोत्रे आचार्यांची आहेत. नित्य पठनीय असे देव्यपराधक्षमापनस्तोत्र तर मातृभक्तीच्या श्रेष्ठ आविष्काराचे एक देखणे असे दर्शन आहे. त्यातील काही ओळी अशा आहेत.

न मन्त्रं नो यन्त्रं तदपि च न जाने स्तुतिमहो।
न चाह्वानं ध्यानं तदपि च न जाने स्तुतिकथाः ॥
न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपनं।
परं जाने मातस्त्वदनुसरणं क्लेशहरणम् ॥१॥
विधेरज्ञानेन द्रविण विरहेणालसतया।
विधेयाशक्यत्वात्तव चरणयोर्या च्युतिरभूत् ॥
तदेतत् क्षन्तव्य जननि सकलोद्धारिणि शिवे।
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥२॥
पृथिव्या पुत्रास्ते जननि बहवः सन्ति सरलाः।
परं तेषां मध्ये विरलतरलोऽहं तव सुतः ॥
मदीयोऽयं त्यागः सुमुचितमिदं नो तव शिवे।
कुपत्रो जायेत कुचिदपि कुमाता न भयति ॥३॥
जगन्मातर्मातस्तव चरणसेवा न रचिता।
न वा दत्तं देवि द्रविणमपि भूयस्तव मया।
तथापि त्वं स्नेहं मयि निरुपम यत्प्रकुरुषे।
कुपत्रो जायेत कुचिदपि कुमाता न भवति ॥४॥

आई, मी यंत्र जाणीत नाही, मंत्र जाणीत नाही. तुझी स्तुति कशी करावी याचेही ज्ञान मला नाही. तुला आवाहन कसे करावे ! तुझे ध्यान कसे करावे हेही मला समजत नाही. तुझे स्तोत्र, तुझी कथा, तुझ्या मुद्रा याचीही माहिती मला नाही. व्याकूळ होऊन तुझ्यासाठी विलाप करणेही मला जमत नाही. पण एक गोष्ट मात्र खरी आहे, केवळ तुला अनुसरणे, तुझ्या मागे मागे चालणे मात्र मला माहीत आहे. यामुळे माझे सर्व क्लेश दूर होतात. .. सर्वांचा उद्धार करणारी आई, मला पूजाविधि नीट समजत नाही. माझ्याजवळ पुरेसे धन नाही. स्वभावाने मी थोडा आळशीच आहे. तुझी नीट पूजाही मला जमत नाही. या सर्व कारणांमुळे आई, तुझ्या सेवेत काही कमी पडले तर मला क्षमा कर. कारण कुपुत्र निर्माण होणे शक्य असले तरी कुमाता कधीच निर्माण होत नाही. .. आई, या पृथ्वीवर तुझे साधेसुधे पुत्र पुष्कळ आहेत; परंतु त्यात मीच एक तुझा अत्यंत चपल असा बालक आहे. माझ्याइतका चंचल व चपल दुसरा कुणीच नाही. माझा हा त्याग माते तुझ्यासाठी उचित नाही, कारण या जगात कुपुत्र निपजतील; परंतु कुमाता कधीही निपजणार नाही .. जगदंबे, तुझ्या चरणाची सेवा मी कधीच केलेली नाही. देवी, तुला कधी मी धन समर्पण केले नाही. तरीसुद्धा या अधमावर तू अपार स्नेह करीत आहेस, याचे कारण हेच की या जगात कुपुत्र निर्माण झाला तरी आई कधीच कुमाता होत नाही.'

## महाराष्ट्रात देवीच्या भक्तीचा परिपोष

आचार्यांचा या स्तोत्रातील भाव अत्यंत हृदयस्पर्शी व चित्त व्याकूळ करणारा आहे. स्वतःची दयनीय अवस्था यात चांगल्या रीतीने प्रकट झाली आहे. वेद, उपनिषदे, पुराणे, स्तोत्रे यांनी परिपुष्ट झालेली ही मातृभक्तीची धारा पुढे प्राकृत वा देशी भाषांतूनही दुथडी भरून राहिलेली दिसून येईल. आपल्या ग्रंथांच्या आरंभी अनेक मराठी संतांनी या देवीचे स्तवन केले आहे. एकनाथांची कुलस्वामिनी रेणुका अथवा एकवीराच होती. या संस्कृत व प्राकृत वाङ्मयाच्याद्वारे महाराष्ट्रात देवीच्या भक्तीचा परिपोष झाला. तुळजापूर, मातापूर, कोल्हापूर, औंध, सप्तशृंगी (वणी), चंद्रपूर (चांदा), शांतादुर्गा (गोमंतक), जोगेश्वरी इत्यादि देवीस्थाने महाराष्ट्रात प्रसिद्ध आहेत. असुरांचा, दुष्ट शक्तींचा निःपात करणाऱ्या [illegible] ींना वारंवार अवतार घेऊन युद्धप्र[illegible] या रूपे

अकाळविकाळ व भयानक दिसतात रक्तमांसाशी याचा संबंध असल्यामुळेच कित्येक ठिकाणी यांना या प्रकारच्या नैवेद्याचीही सोय झालेली आहे देवीची मुद्रा भयानक आहे, ती नाना शस्त्रधारी आहे, रक्ताने माखलेली आहे, खड्गधारी आहे, परंतु हे तिचे रूप दुष्ट शक्तीच्या नाशासाठी आहे महिषासुर, कोल्हासुर, चंड, मुंड इत्यादींचा नाश झाल्यावर भक्तांच्या रक्षणार्थ उभ्या असणाऱ्या या देवीइतके ममताळू व वात्सल्ययुक्त दुसरे कुणीच नाही प्रसंगी ती शस्त्राधारी होतेच व आपल्या अनुयायानाही युद्धार्थ प्रेरणा देते तीच आपल्या लडिवाळ लेकराचे रक्षण करीत असते एकनाथानी, रामदासानी रेणुकेची भवानीची स्तुति अनेक प्रसंगी केली आहे. तिचा भावार्थ हाच आहे 'बया दार उघड दार उघड' या पालुपदाचे एकनाथकृत भवानीस्तोत्र मराठी लोकमानसात कायमचे रुजले आहे समर्थांनी अनेक प्रसंगी देवीचे महात्म्य विवरण करून सांगितले आहे कधी त्यांनी तिला साकडे घातले आहे देवीच्या दर्शनाने संतुष्ट झाल्यावर एका स्तोत्रात समर्थ तृप्ततेने म्हणत आहेत,

"देखिली तुळजा माता । निवाले अंतरी सुखें ।
तुटली सर्वही चिंता । थोर आधार वाटला ॥ १ ॥
संसार पाहता मागे । पाळिले सर्वही कुळा ।
प्रस्तु प्रत्ययो आता । रक्षितें बहुतापरीं ॥ २ ॥
पूर्वि जे कामना सर्वै । ईच्छा पूर्ण मनोगतें ।
धन्य हा देव लोभाळु । सांभाळ करितो सदा ॥ ३ ॥
आघात संकट वारी । निवारी दुष्ट दुर्जना ।
संकटी भर्वसा मोठा । तत्काळ काम होतसे ॥ ४ ॥
लाल्ची चुकते वेडे । कृपाळु जननी खरी ।
लक्ष की कोटी अन्यायें । बहुत क्षमिले पर ॥ ५ ॥
वन्ही हो सर्प हो विंचु । बाळकु घेतसे बळे ।
सवही चुकवी माता । पोर ल्याड नेणत ॥ ६ ॥
लोभाळु बायका माया । त्यामध्ये मुख्य जननी ।
बाळका वाढवी माता । मातेला मुख्य जननी ॥ ७ ॥

समर्थांचे हे स्तोत्र व इतर स्तोत्र मातृभक्तीने आर्द्र झालेली आहेत मातृभक्तियोगात मराठी संतांची योग्यता फार मोठी आहे मराठी संतांचे दैवतच 'विठ्ठल माऊली कृपेची कोवळी' असे आहे मराठी संतांच्या मातृभक्तीच विशेष अशा की त्यांनी मातृभक्तांमधील कर्मकांड, व्रताचा, उपासनेचा तपशील, मंत्रतंत्रादि साधने, यज्ञयागादि उपाय, तंत्रोक्त विधि यांचे अवडंबर दूर करून शुद्ध व वत्सल प्रेमाची जोपासना नामस्मरण, भजन, सत्संगती यांच्या साह्याने केली समाजातील सर्व थरांवरील लहान थोर लोकांना पतितानाही या मातृभक्तीयोगात अवसर मिळाला मराठी संतांची ही माता मनाची अत्यंत कोमल, ममताळु व स्नेहपूर्ण असल्याने तिचा आधार सर्वांना सारखाच वाटतो या मातेचे रूपवर्णन संतांनी विविध प्रकारांनी आळवून आळवून केलेले आहे तिच्या प्रीतीच्या वात्सल्याच्या विविध छटा संतांच्या अभंगात आज चाखावयास मिळतात

'माझे कुळींची कुळस्वामिनी । विठाई जगत्रय जननी ।
येई वो पंढरपूरवासिनी'

म्हणून एकनाथांसारख्या प्रापंचिक संतांनी हिला अनेक प्रसंगी नम्रतेने आवाहन केले आहे

नामदेवतुकारामांच्या अभंगानी या मातेच्या वात्सल्य भरांची अनेक सुरम्य कारंजी मोठ्या देखण्या स्वरूपात निर्माण केली आहेत आज कित्येक शतके याच तुषारांच्या वर्षावात तप्त झालेली मने शीतल होत आहेत मातृभक्तियोगाचे अनेकांना दर्शन मराठी संतांच्या अभंगातून घेण्यासारखे आहे मातृभक्तीच्या मुळात किती विविध छटा संतांनी व्यक्त केल्या आहेत त्याचे काही नमुने पाहण्यासारखे आहेत आईचे व लेकराचे काय काय काम ते मोठ्या कुशलतेने तुकाराम महाराजांनी एके ठिकाणी सांगितले आहे

न लगे मायेसी बाळ निरवावें ।
आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥
मज का लागला करणे विचार ।
ज्याचा जारभार त्याच्या माथा ॥
गाडधड त्यासी ठेवी ना मागता ।
समाधान माता नेदी मना ॥
खळाया गुंतले उमगूनी आणी ।
बैसोनिया स्तनीं लावी बळे ॥
त्याच्या दुःखें पडे आपण सांकडीं ।
लाही तळीं वरीं होय जैसी ॥
तुका म्हणे देह विसरे आपुला ।
आघात तो त्याला लागों नेदी ॥

झालेला आहे. देवीच्या प्रमुख अवतारांचे फार वेधक वर्णन या ग्रंथात असून देवीची अनेक सुंदर व नित्य पठनीय स्तोत्रे यातही एकत्र झालेली आपणास दिसतील. वर दिलेल्या सूक्ताच्या पहिल्या दोन ओळी देऊन एक अति विस्तृत व भावपूर्ण स्तोत्र या ग्रंथाच्या पाचव्या अध्यायात देवांनी केलेल्या देवीस्तुतीच्या निमित्ताने प्रकट झाले आहे. अशीच स्तुति एकादश अध्यायातही आलेली आहे देवीभागवत व दुर्गा सप्तशती या दोन महान् व प्रासादिक ग्रंथाखेरीज देवीकवच, अर्गलास्तोत्र, दुर्गामानस पूजा इत्यादि स्फुट प्रकरणे देवीमाहात्म्य व देवीस्तुति यासाठी प्रसिद्ध आहेत शंकराचार्यांची समजली जाणारी अनेक सुंदर स्तोत्रे मातृभक्तीच्या जिव्हाळ्याने भारावलेली अशी आहेत भवानी भुजंगस्तोत्र, कनकधारास्तोत्र, त्रिपुर सुंदरस्तोत्र, कल्याणवृष्टिस्तोत्र यासारखी अनेक हृद्य व नित्य उपासनेस उपयुक्त अशी स्तोत्रे आचार्यांची आहेत नित्य पठनीय असे देव्यपराधक्षमापनस्तोत्र तर मातृभक्तीच्या श्रेष्ठ आविष्काराचे एक देखणे असे दर्शन आहे त्यातील काही ओळी अशा आहेत

न मन्त्र नो यन्त्र तदपि च न जाने स्तुतिमहो।
न चाह्वान ध्यान तदपि च न जाने स्तुतिकथा ॥
न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपन।
पर जाने मातस्त्वदनुसरण क्लेशहरणम् ॥१॥
विधेरज्ञानेन द्रविण विरहेणालसतया।
विधेयाशक्यत्वात्तव चरणयार्या च्युतिरभूत् ॥
तदेतत् क्षन्तव्य जननि सकलोद्धारिणि शिवे।
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥२॥
पृथिव्या पुत्रास्ते जननि बहव सन्ति सरला ।
पर तेषा मध्ये विरलतरलोऽह तव सुत. ॥
मदीयोऽय त्याग समुचितमिद नो तव शिवे।
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥३॥
जगन्मातर्मातस्तव चरणसेवा न रचिता।
न वा दत्त देवि द्रविणमपि भूयस्तव मया।
तथापि त्व स्नेह मयि निरुपम यत्प्रकुरुषे।
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥४॥

आई, मी यंत्र जाणीत नाही, मंत्र जाणीत नाही तुझी स्तुति कशी करावी याचेही ज्ञान मला नाही तुला आवाहन कसे करावे ? तुझे ध्यान कसे करावे हेही मला समजत नाही तुझे स्तोत्र, तुझी कथा, तुझ्या मुद्रा याचीही माहिती मला नाही व्याकूळ होऊन तुझ्यासाठी विलाप करणेही मला जमत नाही. पण एक गोष्ट मात्र खरी आहे, केवळ तुला अनुसरणे, तुझ्या मागे मागे चालणे मात्र मला माहीत आहे यामुळे माझे सर्व क्लेश दूर होतात.

सर्वांचा उद्धार करणारी आई, मला पूजाविधि नीट समजत नाही माझ्याजवळ पुरेसे धन नाही स्वभावाने मी थोडा आळशीच आहे. तुझी नीट पूजाही मला जमत नाही या सर्व कारणामुळे आई, तुझ्या सेवेत काही कमी पडले तर मला क्षमा कर कारण कुपुत्र निर्माण होणे शक्य असले तरी कुमाता कधीच निर्माण होत नाही

आई, या पृथ्वीवर तुझे साधेसुधे पुत्र पुष्कळ आहेत, परतु त्यात मीच एक तुझा अत्यत चपल असा बालक आहे माझ्याइतका चचल व चपल दुसरा कुणीच नाही माझा हा त्याग माते तुझ्यासाठी उचित नाही, कारण या जगात कुपुत्र निपजतील, परतु कुमाता कधीही निपजणार नाही जगदबे, तुझ्या चरणाची सेवा मी कधीच केलेली नाही देवी, तुला कधी मी धन समर्पण केले नाही तरीसुद्धा या अधमावर तू अपार स्नेह करीत आहेस, याचे कारण हेच की या जगात कुपुत्र निर्माण झाला तरी आई कधीच कुमाता होत नाही.'

## महाराष्ट्रात देवीच्या भक्तीचा परिपोष

आचार्यांचा या स्तोत्रातील भाव अत्यत हृदयस्पर्शी व चित्त व्याकूळ करणारा आहे स्वत ची दयनीय अवस्था यात चागल्या रीतीने प्रकट झाली आहे वेद, उपनिषदे, पुराणे, स्तोत्रे यानी परिपुष्ट झालेली ही मातृभक्तीची धारा पुढे प्राकृत वा देशी भाषातूनही दुथडी भरून राहिलेली दिसून येईल आपल्या ग्रथाच्या आरभी अनेक मराठी सतानी या देवीचे स्तवन केले आहे एकनाथांची कुलस्वामिनी रेणुका अथवा एकवीराच होती या सस्कृत व प्राकृत वाङ्मयाद्वारे महाराष्ट्रात देवीच्या भक्तीचा परिपोष झाला तुळजापूर, मातापूर, कोल्हापूर, औंध, सप्तशृंगी (वणी), चद्रपूर (चांदा), शातादुर्गा (गोमतक), जोगेश्वरी इत्यादि देवीस्थाने महाराष्ट्रात प्रसिद्ध आहेत असुराचा, दुष्ट शक्तींचा नि पात करणाऱ्या या देवींना वारवार अवतार घेऊन युद्धप्रसग करावा लागल्यामुळे यांची रूपे

अक्राळविक्राळ व भयानक दिसतात. रक्तमांसाशी यांचा संबंध असल्यामुळेच कित्येक ठिकाणी यांना या प्रकारच्या नैवेद्याचीही सोय झालेली आहे. देवीची मुद्रा भयानक आहे, ती नाना शस्त्रधारी आहे, रक्ताने माखलेली आहे, खड्गधारी आहे, परंतु हे तिचे रूप दुष्ट शक्तींच्या नाशासाठी आहे. महिषासुर, कोलासुर, चंड, मुंड इत्यादींचा नाश झाल्यावर भक्तांच्या रक्षणार्थ उभ्या असणाऱ्या या देवीइतके ममताळू व वात्सल्ययुक्त दुसरे कुणीच नाही. प्रसंगी ती शस्त्रधारी होतेच व आपल्या अनुयायांनाही युद्धार्थ प्रेरणा देते. तीच आपल्या लडिवाळ लेकराचे रक्षण करीत असते. एकनाथांनी, रामदासांनी रेणुकेची भवानीची स्तुति अनेक प्रसंगी केली आहे. तिचा भावार्थ हाच आहे. 'बया दार उघड दार उघड' या पालुपदाचे एकनाथकृत भवानीस्तोत्र मराठी लोकमानसात कायमचे रुजले आहे. समर्थांनी अनेक प्रसंगी देवीचे महात्म्य विवरण करून सांगितले आहे. कधी त्यांनी तिला साकडे घातले आहे. देवीच्या दर्शनाने संतुष्ट झाल्यावर एका स्तोत्रात समर्थ तृप्ततेने म्हणत आहेत,

" देखिली तुळजा माता । निवाली अंतरी सुखें ।
तुटली सर्वही चिंता । थोर आधार वाटला ॥ १ ॥
संसार पाहतां मागें । पाळिले सर्वही कुळा ।
प्रस्तु प्रत्ययो आतां । रक्षितें बहुतांपरीं ॥ २ ॥
पूर्वि जे कामना सर्वे । ईच्छा पूर्ण मनोगतें ।
धन्य हा देव लोभाळु । सांभाळ करितो सदा ॥ ३ ॥
आघात संकटें वारी । निवारी दुष्ट दुर्जना ।
संकटी मर्वसा मोठा । तत्काळ काम होतसे ॥ ४ ॥
लाटकी चुकते वेडे । कृपाळु जननी खरी ।
लक्ष की कोटी अन्यायें । बहुत क्षमिले खरं ॥ ५ ॥
वन्हा हो सर्प हो विंचु । बाळकु घेतसे बळें ।
सर्वही चुकवी माता । थोर ल्चाड नेणत ॥ ६ ॥
लोभाळु बायका माया । त्यामध्यें मुख्य जननी ।
बाळका वाढवी माता । मातेला मुख्य जननी ॥ ७ ॥

समर्थांचे हे स्तोत्र व इतर स्तोत्र मातृभक्तीने आर्द्र झालेली आहेत. मातृभक्तियोगात मराठी संतांची योग्यता फार मोठी आहे. मराठी संतांचे दैवतच 'विठ्ठल माऊली कृपेची कोवळी' असे आहे. मराठी संतांच्या मातृभक्तीचा विशेष असा की त्यांनी मातृभक्तीमधील कर्मकांड, व्रतांचा, उपासनेचा तपशील, मंत्रतंत्रादि साधने, यज्ञयागादि उपाय, तंत्रोक्त विधि यांचे अवडंबर दूर करून शुद्ध व वत्सल प्रेमाची जोपासना नामस्मरण, भजन, सत्संगती यांच्या साह्याने केली. समाजातील सर्व थरांवरील लहान थोर लोकांना पतितांनाही या मातृभक्तीयोगात अवसर मिळाला. मराठी संतांची ही माता मनाची अत्यंत कोमल, ममताळु व स्नेहपूर्ण असल्याने तिचा आधार सर्वांना सारखाच वाटतो. या मातेचे रूपवर्णन संतांनी विविध प्रकारांनी आळवून आळवून केलेले आहे. तिच्या प्रीतीच्या वात्सल्याच्या विविध छटा संतांच्या अभंगात आज चारावयास मिळतात.

' माझे कुळींची कुळस्वामिनी । विठाई जगत्रय जननी ।
येई वो पंढरपूरवासिनी '

म्हणून एकनाथासारख्या प्रावचिक संतांनी तिला अनेक प्रसंगी नम्रतेने आवाहन केले आहे.

नामदेवतुकारामाच्या अभंगांनी या मातेच्या वात्सल्य धारांची अनेक सुरम्य कारंजी मोठ्या देखण्या स्वरूपात निर्माण केली आहेत. आज कित्येक शतकें याच तुषारांच्या वर्षावात तप्त झालेली मने शीतल होत आहेत. मातृभक्तियोगाचे अनेकांना दर्शन मराठी संतांच्या अभंगातून घेण्यासारखे आहे. मातृभक्तीच्या सुखात किती विविध छटा संतांनी व्यक्त केल्या आहेत. त्यांच काही नमुने पाहण्यासारखे आहेत. आईचे व लेकराचे काय काय काम ते मोठ्या कुशलतेने तुकाराम महाराजांनी एके ठिकाणी सांगितले आहे.

न लगे मायेसी बाळ निरवावें ।
आपुल्या स्वभावें ओढे त्यासी ॥
मज का लागला करणे विचार ।
ज्याचा जारभार त्याच्या माथा ॥
गोडधड त्यासी ठेवी ना मागतां ।
समाधान स्वातां नेदी मना ॥
खेळाया गुतलें उमगूनी आणी ।
बैसोनिया स्तनीं लावी बळें ॥
त्याच्या दुःखें पडे आपण खापरी ।
लाही तळीं वरी होय जैसी ॥
तुका म्हणे देह विसरे आपुला ।
आघात तो त्याला लागों नेदी ॥

मुख्य, भक्ताचे आईशी-ईश्वराशी अनन्यशरणभाव व्यापक आहे जितके खरे तितकेच हेही खरे की तो ईश्वरही आपल्या भक्ताशी अनन्य असतो त्याला तरी कुठे आहेत या संतांसारखी लेकुरे ! तोही कासावीस होतो प्रिय वत्स भेटले नाही तर त्याच्याही अंगाची लाहीलाही होते या प्रिय लेकराला आपल्या माथ्यावर मुकुट करून घ्यावे म्हणून त्याची तळमळ असते भक्तास अलिंगन देण्यासाठी दोन नव्हे तर चार हातानी तो तत्पर झालेला असतो आम्ही लेकरानी हट्ट करावा व आईने तो पुरवावा असाच भाव तुकारामासारखे सत्पुरुष नेहमी बोलताना दिसतात आईने जर सोडले तर आम्ही जावे तरी कुठे ? असा त्याचा प्रश्न असतो

'मायें मोकलिलें कोठें जावें बाळें ।
आपुलिया बळें न वचे तें ॥
रुसोनिया पळे सांडुनिया ताट ।
मागें पाहे वाट यावें ऐसी ॥
भाडवल आम्हां आळी करावी हें ।
आपणाची माये धावसील ॥
तुका म्हणे आळी करूनिया निकी ।
देसील मातुकी बुझावूनी ॥
आम्ही आईपाशी दु ख न सांगावे तर कुठे ?
' बाळ मातेपाशी सांगे तानभूक ।
उपायाचें दु ख काय जाणें ।'

अशीच त्याची अवस्था झालेली असते या मातृस्वरूपी परमेश्वरावेगळे आम्हास कोण आहे ? असाच भाव सर्वत्र प्रकट झालेला दिसून येतो

' कोण आम्हा पुसे सिणले भागलें ।
तुजविण उगले पांडुरंगा ॥
कोणापाशी आम्ही सांगावे सुखदु ख ।
कोण तानभूक निवारील ? '

म्हणून गात पुकार तुकारामानी केला आहे

संताच्या मातृभक्तियोगाचा सारा अर्क नामदेवरायाच्या आर्त व रसाळ अभंगातून अनुभविता येतो ईश्वराशी आपण व ईश्वराने आपणाशी कसे अनन्य असावे ! त्यांनी अनेक दृष्टान्त देऊन सांगितले आहे

' उडाली पक्षिणी गेली अंतराळी ।
चित्त बाळाजवळी ठेवोनिया ॥१॥
तैसे माझे मन राहो का ईश्वरीं ।
मग सुखें संसारीं असेन का ॥२॥
धेनु चरे वनीं वत्स असे घरी ।
चित्त वत्सावरी ठेवोनि फिरे ॥३॥
दुडीवरी दुडी सखिशीं गोष्टी करी ।
चित्त दुडीवरी ठेवूनिया ॥४॥
विष्णुदासनामा विनवी परोपरी ।
हे प्रेम श्रीहरी द्यावें मज ' ॥५॥

दुसऱ्या एका अभंगात तर नामदेवानी मातृभक्तीचे सर्वांगसुंदर दर्शन उभे केले आहे

" तू माझी माऊली मी वो तुझा तान्हा ।
पाजीं प्रेमपान्हा पांडुरंगे ॥
तू माझी गाऊली मी तुझें वासरू ।
नको पान्हा चोरू पांडुरंगे ॥
तू माझी हरिणी मी तुझें पाडस ।
तोडीं भवपाश पांडुरंगे ॥
तू माझी पक्षिणी मी तुझें अंडज ।
चारा घालीं मज पांडुरंगे ॥
नामा म्हणे होसी भक्तीचा वल्लभ ।
मागे पुढे उभा सांभाळिसी ॥ "

संतानी मातृभक्तीच्या ज्या विविध छटा कधी प्रेमाने, कधी करुणेने, कधी लटक्या रागाने, कधी अखंड तृप्तीच्या समाधानाने, कधी व्याकुळतेने, कधी हट्टाने, कधी तरी आर्ततेने ज्या आळविल्या आहेत त्याला तुलना कुठेच मिळायची नाही

मी बालक भुकाळू, तू माऊली कृपाळु ।
करीं माझा सांभाळु । पंढरीराया

अशी आर्त भावना सर्वत्र आहे मातृभक्तीच्या विविध वत्सलधारानी अभंग वाचक भिजून चिंब होऊन जावा व त्यास अनेकदा स्वत च ते सुख भोगीत आहोत असा साक्षात्कार होतो

जगज्जननी श्रीच्या हिच्या व आपल्या नात्याचे आणखी तपशीलवार अविष्कार आधुनिक काळात बंगालमध्ये रामकृष्ण परमहंस व विवेकानंद यांच्या परंपरेत व महाराष्ट्र मध्ये श्रीमाहूर क्षेत्रीच्या श्रीविष्णुदास कवी यांच्या कवितात प्रकट झालेले दिसतील मातापूरच्या श्रीरेणुकेचे श्रीविष्णु दास हे एकनिष्ठ उपासक त्यानी ' आई ऽऽ ' म्हणून

रेणुकेस हाक मारावी व रेणुकेने ' आलेच ' म्हणून त्यांना मांडीवर घेऊन कुरवाळावे. असा हा मायलेकरांच्या संबंधाचा मनोज्ञ व अति रमणीय देखावा या विसाव्या शतकातही पहावयास सापडतो. श्रीविष्णुदासांची रेणुका अति वत्सल आहे. तिचे स्वरूप, तिचे गुण, तिचा अधिकार व तिला वाटणारी स्वतःविषयीची तळमळ यांची फार बहारीची शब्दचित्रे श्रीविष्णुदासांनी अभंग, अष्टके, पदे, आरत्या इत्यादी प्रकारांच्या वाङ्मयातून साकार केली आहेत. अत्यंत सोपे असे ' साधन ' आईसाठी त्यांनी सांगितले आहे. पण आईसाठी साधन आपण तिच्या पुत्रांनी करायचे ? का हीच अनंत पुण्यकारक व्रतांनी व उपायांनी आपणास प्रसन्न व स्वतःच धन्य झाली ? कोण कुणाशी अनन्य आहे ? कोण कुणासाठी साधने करणार ? श्रीविष्णुदासांनी थोडक्यात सांगितले आहे,

' नको साधनधन कांहीं । नाम स्तवनाचें नाहीं ॥
तुला रेणुके, बाई । ' आई ऽ , ' बोलणें पुरे ॥ '

नुसती ' आई ' अशी आर्त हाक पुरे आहे. या मना पासूनच्या हाकेत सारे जपतप, स्नानसंध्या, पुराणकीर्तन, व्रतवैकल्य, ध्यानधारणा इत्यादींचा साठा पुरेपूर आहे. या विष्णुदासांनी मातृप्रेमाचे जे विविध रसाळ असे अनुभव घेतले त्यांचे सर्व दर्शन येथे उभे करणे शक्य नसले तरी एक दोन उदाहरणे देणे अस्थानी होणार नाही त्यांनी श्रीरेणुकेची अनेक सुंदर व प्रेरक अशी रूपे रंगविली आहेत. त्यातील एक किती रमणीय व प्रत्ययकारी आहे पाहा—

' रूप सुंदर सुंदर । ध्याती योगी निरंतर ॥ धृ० ॥
रत्नजडित सिंहासनीं । शोभे सिंहाद्रिवासिनी ॥ १ ॥
दिसे मळवट चांगला । मुखीं तांबूल रंगला ॥ २ ॥
साडी नेसली पिवळी । माय मनाची कोंवळी ॥ ३ ॥
नाना रत्न अलंकार । अंगीं सर्व अधिकार ॥ ४ ॥
गोठ पाटल्या बांगड्या । कानीं मोत्यांच्या बुगड्या ॥५॥
शिरीं मोगऱ्याच्या कळ्या । पायीं पैंजण सांखळ्या ॥६॥
विष्णुदासमनव्यापिनी । भेट देई नारायणी ॥ ७ ॥ '

या स्वरूपाचे नित्य ध्यान विष्णुदासांना होते. त्यांना देवीची सगुण दर्शने अनेक प्रसंगी झालेली होती त्यातील एक देऊन हा लेख संपविणार आहे. भर उन्हात एके दिवशी दुपारी माहुरगडास संपूर्ण फेरी घातल्यावर विष्णुदास कासावीस झाले. डोळ्यापुढें भोवळ आली. त्यांचा घसा कोरडा झाला. प्राण तळमळू लागल्यावर त्यांनी ' मातेऽ, रेणुकेऽऽ ! ' म्हणून आईचे स्मरण केले आणि लगेच त्यांना काय अनुभवास आले ? त्यांच्याच शब्दात अनुभवा

' माझी रेणुका माऊली । कल्पवृक्षाची साऊली ॥ १ ॥
जैसी वत्सालागीं माय । तैसी अनाथांसी माया ॥ २ ॥
हाकेसरशी धाईधाई । वेगें धावतची पायीं ॥ ३ ॥
आली तापल्या उन्हांत । नाहीं आळस मनांत ॥ ४ ॥
खालीं बैस घे आराम । मुखावरती आला घाम ॥ ५ ॥
विष्णुदास आदरानें । वारा घाली पदरानें ॥ ६ ॥ '

मातृभक्तीच्या या अनुभवाचे मोल कुणास कधी करता येईल काय ?

—डॉ. प्र. न. जोशी, पुणे

• • •

# ज्ञा न – सो पा न

जय जय देव श्री गुरो। अकल्पनाख्य कल्पतरो।
स्वसंविद्द्रुम बीज प्ररो–। हणावनी॥

कल्पनाही करता येणार नाही किंवा कल्पना करूनही समजणार नाही, अशा स्वसंवेद्य स्वरूपाचे (जीव ब्रह्मैक्याचे) बीज हे श्रीगुरो आपण मजमध्ये रुजविता आणि त्यामुळे त्या परम स्थितीचा अनुभव मी घेऊ शकतो. हा अनुभव केवळ मी आपल्या कृपेमुळेच घेत असल्यामुळे हे श्रीगुरो मी आपला जयजयकार करतो व पुन: पुन नमस्कार करतो

तैसा पुढत पुढती तोची। मिया अभिवंदिला श्रीगुरूची
अभिलाषित मनोरूपी। पुरविता तो॥

शिवाय सद्‌गुरूच माझे मनोरथ पूर्ण करणार असल्यामुळे पुन सद्‌गुरूस नमस्कार करून विषयास सुरुवात करतो

महात्मानस्तु मां पार्थ दैवीं प्रकृतिमाश्रिता
सततं कीर्तयन्तो मां (गीता अ ९ श्लोक १३-१४)

यात साधुसंताचे, सिद्धाचे, महानुभावाचे वर्णन वरील दोन श्लोकात ऐकून अर्जुनाच्या मनामध्ये असा विचार आला की, ही सर्व मंडळी या परम पदावर कशी प्राप्त झाली असतील बरे असे मनात येताच परचित्ताचा ठाव घणाऱ्या भगवताने अर्जुनाचे हे मनोगत जाणून त्यास ते सागू लागले की,

कैसे माझ्या गुणी धाले। देशकाळाते विसरले।
कीर्तन सुखे सुखावले। आपण पाचि॥

'अर्जुना! तुझ्या मनात असेच आले ना? की, साधक स्वत: माझ्या गुणामध्ये कैसे धाले! देशकाळाने कैसे विसरले? कीर्तन सुखामधे कैसे सुखावले?

अर्जुन हो म्हणताच भगवान् सागू लागले—

प्रथम साधक (ज्याला आध्यात्म ज्ञानाकडे जाण्याकरता लागणाऱ्या प्रत्यक्ष साधनेची आवड आहे असा) रामकृष्ण हरी गोविंदु' ह्यापैकी एखाद्या सिद्ध नामाचा जप करु लागतो जप करता करता तो त्याच्या गळी उतरला म्हणजे त्यावर तो बोलू किंवा लिहू लागतो

या नामाचे निखिल प्रबंध।

बोलत असताना किंवा लिहित असताना तो आत्मचर्चे संबधी विस्तृत विवेचन करु लागतो असे त्याचे व्रत दीर्घकाळ चालू असते.

माजी आत्मचर्चा विशद। उदंड गाती।

पुढे पुढे कीर्तन प्रवचनामध्ये रगून राहून बोलके पाहेत होतात

हे नंदु असो यापरी। कीर्तित माते अवधारी॥

आत्मानात्म विवेक, इहामुत्र विराग, शमदमादि षट्‌संपत्ति व मुमुक्षत्व असे साधन चतुष्टय झाल्याशिवाय (अंगी बाणल्याशिवाय) ब्रह्मसूत्राचा विचारसुद्धा करु नये असे भगवत् पूज्यपाद श्रीमत् आद्य शंकराचार्यांनी आपल्या ब्रह्मसूत्राचे प्रारंभी नमूद केले आहे परंतु काही मंडळी तेवढे पान गाळूनच कोरडी ज्ञानचर्चा करतात

त्यामुळे ते कृतार्थ होत नाहीत व इतरांसही कृतार्थ करू शकत नाहीत, म्हणून कर्म, उपासना व ज्ञान यांची फारकत न करता त्या सर्वांबद्दल आस्था असून ती आचारात आणणारासच भक्त म्हणतात व त्याबद्दलच्या प्रेमासच भक्ति म्हणतात. श्रीज्ञानेश्वरमहाराज म्हणतात.

ज्ञानी इये तें स्वसंवित्ती । शैव म्हणती शक्ती ॥
आम्ही आपली परम भक्ति । ऐसें म्हणो ॥

म्हणून नुसत्या शाब्दिक ज्ञानासच पूर्णता मानणाऱ्यास माऊली म्हणते–

' अनंत वाचाळ बरळती बरळ ।
त्या कैंचा दयाळ पावे हरी ! "

या ज्ञानेश्वर महाराजांच्या म्हणण्याप्रमाणे त्यास खरा हरि भेटत नाही. एवढ्याकरता नामस्मरण, आत्मचर्चा वगैरे करणाऱ्या साधकांतील एखादा विरळा पुढील विचार करतो–

एक विचरती चराचरी । पांडु कुमरा ।

हे धनंजया, चराचरामध्ये भरलेले परमतत्त्व अनुभवण्याकरता असा विरळा साधक काय करतो ते नीट चित्त देऊन ऐक.

मग आणिक ते अर्जुना । साविया बहुवाजतना ।
पंचप्राण मना । पाटाऊ घेऊनी ॥

त्यांतील एखादा भाग्यवान् साधक मनाचा चंचलपणा लक्षात घेऊन त्याला पंचप्राणरूपी वाटाड्याच्या ताब्यात देतो. आता मन व प्राण कसे निर्माण झाले ते पाहू.

खाल्लेल्या अन्नाचे तीन भाग होतात. जसे डांबरापासून डांबर, रॉकेल व पेट्रोल. तसेच खाल्लेल्या अन्नापासून अनुक्रमे विष्ठा, मांस व मन उत्पन्न होते. त्याचप्रमाणे आपण जे पाणी पितो त्यापासून मूत्र, रक्त व प्राण तयार होते असे श्रुतिमाउली म्हणते. अन्नापासून मन व पाण्यापासून प्राण. प्राण हा मनाचा वाटाड्या असल्यामुळे अन्न व पाणी हे शुद्ध तसेच पवित्र पाहिजे. सात्विक आहाराची साधकाला यासाठीच अतिशय जरूरी आहे.

साधकाने मनाला, प्राणरूपी वाटाड्याला ताब्यात देत असताना, प्रथम त्याने बाहेरच्या बाजूने यम नियमांचे कुंपण घातले पाहिजे.

बाहेरी यम नियमांची काटी लाविली ।

यम पाच. अहिंसा, सत्य, आस्तेय, ब्रह्मचर्य, अपरिग्रह.

१ ) अहिंसा–जगाचिया सुखोद्देशें ।
शरीर वाचा मानसें । रहाटों ॥

जगाच्या सुखाच्या उद्देशाने कोणाच्याही अंतकरणाला दुःख न देता जो जगामध्ये शरीराने, वाचेने व मनाने व्यवहार करतो तोच अहिंसा पाळू शकतो.

२ ) सत्य : किंबहुना प्रियपणें । कोणातेंही झकवूं नेणे ।
यथार्थ तरी खुपणे । नाही कवणा ॥

गोड बोलून फसविणे किंवा खरे बोलायचे पण कठोर भाषण करणे, या दोन्हीला सोडून ह्या जगतामध्ये परमार्थ तत्वाचा विचार करणाऱ्यांनी त्या संबंधीच बोलणे व तेही न खुपेल असे तेच सत्य.

३ ) आस्तेय : केव्हाही व कोणतीही वस्तु चोरून घेऊ नये. इतकेच काय रस्त्यावर पडलेला पैसा, हा मी उचलला तर चोरी नव्हे असा विचार करण्यापेक्षा हा माझा आहे का ? असा विचार केला असता तो उचलण्याचा मोह होणार नाही. मग दुसऱ्याची वस्तु चोरण्याचे विचार कसे येतील ! ही मनाची बैठक तयार करणे.

४ ) ब्रह्मचर्य : स्त्रीविषयी नियमिजे ।
नावे नाव । १७/२१०

कलीयुगामध्ये साधकाला ब्रह्मचर्याचे यथायोग्य पालन करणे कठीण असल्यामुळे शास्त्रांनी सांगितलेल्या गृहस्थाश्रमाचा विधियुक्त आश्रय करणे व त्यातही शास्त्रसंमतीने वागणे. ज्यांना गुरुकृपेने ब्रह्मचर्याचे पालन करता येते ते करीत असतातच.

५) अपरिग्रहः फाजील गरजा न वाढविता अत्यंत आवश्यक असणाऱ्या वस्तूंचा संग्रह.

नियम पाच : शौच, संतोष, तप, स्वाध्याय, ईश्वर, प्रणिधान.

१) शौच :—निर्वाळुनि कनके । भांगें भरला पियुखे ।
तया कलशाचिया सारिखे । शौच असे ॥

अग्नीत हिणकस जाळून शुद्ध सोन्याचा तांब्या तयार करून त्यात पवित्र गंगाजळ भरावे त्याप्रमाणे

' मन भावशुद्धी भरले । अगक्रिया अलंकारीलें ।

मनामध्ये शुद्ध पवित्र भाव व त्याचप्रमाणे बाह्यक्रिया हेच खरे शौच

२ ) संतोष : ठेविले अनंते तैसेचि रहावें ।
चित्तीं असो यावे समाधान ॥

ज्या ज्या गोष्टी घडतात त्या त्या पूर्वकर्मानुसार

असल्यामुळे व ते कर्म आपणच केले असल्यामुळे त्याबद्दल सुखदुःख किंवा आनंद इकडे लक्ष न देता साधनेकडे लक्ष देऊन परमपदाची प्राप्ति करून घेणे म्हणजेच खरा संतोष.

३ ) तप : तेविंची सटवीचिये राती।
न विसंबिजे जेवी वाती।

बाळंतीण झाल्यानंतर षष्ठीपूजनाच्या दिवशी ( नवीन पिढीच्या लक्षात ही गोष्ट येणार नाही ) पाटावरवटा, कागद, लेखणी, दौत आदि मांडून ठेवून एक समई लावून ठेविली असते. कदाचित सुईण व इतर सर्वांना जरी झोप लागली तरी माझ्या बाळाच्या कपाळावर सटवाई लिहून जाणार आहे तेव्हा त्या मुलाची आई समईची ज्योत त्याप्रमाणे मालवू देत नाही. त्याप्रमाणे

तैसा स्वरुपाचिया प्रसरा। लागीं प्राणेंद्रिय शरीरा।
आटणी करणे जे वीरा। तेंचि तप ॥ १६ । १०८

गुरूने सांगितलेल्या मार्गाने शरीराची, मनाची व प्राणाची पूर्णपणे आटणी करण्याकरता साधकाने सतत साधना करणे हेच तप.

४) स्वाध्याय: जे द्विजांसीच ब्रह्मसूत्र।
येश स्तोत्रका नाममंत्र।
आवर्तणे पवित्र। पावावया तत्व ॥ १६ । १०४

व्रतबंध समयीं पित्याच्या चरणावर मस्तक ठेवून मिळविलेल्या गायत्रि मंत्राचा नित्यनेमाने जप करणे हेच ब्राह्मणाचे आद्य कर्तव्य, त्याचप्रमाणे इतरानी स्तोत्र किंवा नामस्मरण याचा परी पाठ ठेवणे अत्यावश्यक आहे हाच खरा स्वाध्याय.

५ ) ईश्वर प्रणिधान:

आत बहेरी योग। निर्वाळलेयाही चाग।
तरी माझा अनुराग। सप्रेम तया। १२।१६६.

एवढ्याकरिता आतल्या बाजूनी व बाहेरील बाजूने योगाचा अवलंब केल्याशिवाय माझे प्रेम ( परमेश्वराचे प्रेम ) साधकास मिळविता येणार नाही.

म्हणून शास्त्रे का ध्यान वळे। सत्व शुद्धीचिये वेळे।
ईश्वर तत्त्विंचि मिळे। निष्टंक बुद्धि ! ८।४०

अशा तऱ्हेने यमनियमाचे पालन (कुंपण) करून [ यम म्हणजे जगाशी वागणे. नियम म्हणजे स्वतःशी वागणे ] मग

' आत वज्रासनाची पौळी पन्नासिली ॥ '

आतल्या बाजूने पद्मासन, सिद्धासन, वज्रासन किंवा स्वस्तिकासन यापैकी जमेल त्या आसनावर बसून

वरी प्राणायामाची माडिली। वाहातीं यंत्रे ॥

प्राणायाम करू लागला. या ठिकाणी खुलासा करण्याची तावश्यकता आहे गुरूंनी सांगितल्याप्रमाणे बसून ज्याच्यामध्ये

' विषयाचा विसर पडे ॥ इंद्रियाची कसमस मोडे ॥
मनाची घडी घडे हृदयामाजीं ॥ अशी अनुभवाची
उजरी होचि लागे ॥

विषयाचा विसर पडतो. इंद्रियाची कसमस मोडते. मनाची घडी होऊन हृदयात जाऊन बसते असे अनुभव आपोआप होऊ लागतात. ह्यालाच "पंथराज" असे म्हणतात. एवढ्याकरिता परंपरायुक्त शक्तिशाली किंवा शक्तियुक्त ज्ञान असलेल्या सद्गुरूची आवश्यकता आहे. नाही तर स्वतःच्या बाहुबळावर समुद्र तरू पाहणाऱ्या माणसासारखी गत, स्वतःच्या जबाबदारीवर किंवा *अहंकाराच्या बळावर कुंडलिनी जागृत करून घेणाऱ्या* मानवाची होते. अशी शक्ति गुरूनी जागृत करून देण्या-बरीता शिष्याचा भाव हा कसा असावा.

" अहंकाराचे ओझे साडूनी।
आणि विकल्पाचिया झुळका चुकाउनी।
अनुरागाचा निरुता होऊनी।

म्हणजे वृथा अहंकार सोडून देऊन संशयविरहीत होऊन, अंतःकरणात अत्यंत प्रेम उत्पन्न होऊन साधक सद्गुरूस शरण जाईल तर, पण हे केव्हा होईल !

' जया सद्गुरू तारु फुडे। जे अनुभवाचे कासे काढे ॥
जया आत्मनिवेदन तराडे आकाळिले ॥

ज्या साधकाला सद्गुरूरूपी नाव मिळाली आहे, तसेच ते सद्गुरूसुद्धा परंपरेने शक्तिरुपी, ज्ञान (आचार, विचार, उच्चाराशी मेळ असलेले ) संपादन करून आत्मनिवेद-नात्मक कृतीत उतरविलेले असे असले तरच ते साधकाची कुंडलिनी शक्ति जागृत करू शकतात. अशी शक्ति जागृत झाल्यावर-

तेथ उल्हाट शक्तिचेनि उजिवडे।
मन पवनाचेनि सुराडें।

कुंडलिनी शक्तीच्या जोरावर ह्या साधकाच्या सर्व

क्रिया आपोआप होऊन सहस्रधार चक्राजवळ अमृताचे जे तळे आहे ते अमृत प्राशन करून ती शक्ति साधकामध्ये भक्ति निर्माण करते किंबहुना तिच्या जोरावरच साधकाकडून भक्ति होते.

न मागे मी भीक आता हाचि झाला भरवसा ।
ओळली सयानिगा । तेणे पुरविली इच्छा ॥

श्रीसंत तुकाराम महाराज आपल्या अभंगात असे म्हणतात. सतरावी कला ( कुंडलिनी ) जागृत झाल्यावरच त्यास परम तत्वाचा लाभ झाल्यामुळे कोणापाशी काही भीक मागण्याचे काम उरले नाही.

तेव्हा प्रत्याहारे ख्याति केली। विकाराची सरली बोहली।
इंद्रिये बांधोनी आणिली । हृदया आत ॥

जेव्हा कुंडलिनी शक्ति जागृत होते तेव्हाच प्रत्याहार ( विषयापासून इंद्रिय दूर असणे ) घडतो. एरवी प्रत्याहार घडूच शकत नाही. हा विस्तृत विषय सहाव्या अध्यायात ११ व्या श्लोकापासून २८ व्या श्लोकापर्यंत सांगितला आहे तो पहावा.

तव धारणावाघ दाटिले । महाभूताते एकवटिले ।
मग चतुरंग सैन्य निवटिले । संकल्पाचे ।

अशा कुंडलिनी शक्तीच्या जोरावर प्रत्याहार घडू लागला म्हणजे साधकाची धारणा होते. धारणा होऊ लागताच मनाचे जेवढे संकल्प आहेत ते आपोआप ल्याला जातात.

तयावरी जैत रे जैत । म्हणोनि ध्यानाचे निशाण वाजत
दिसे तन्मयाचे झळकत । एक छत्र ।

अशा तन्द्रेने मनाचे संकल्प नाहीसे झाल्यावर जिंकली रे जिंकली अशा तन्द्रेची साधकाची अनुभवजन्य खात्री होते व तो तन्मय होतो.

पाठी समाधि श्रियेचा अशेखा । आत्मानुभव राज्यसुखा
पट्टाभिषेक देखा । समरसे झाला ।

त्याप्रमाणे आईच्या मांडीवर मूल आनंदाने बसते किंवा सिंहासनावर राजा बसतो, त्याप्रमाणे जीव परमात्मा बैसले एकासनी अशा त्या साधकाला गुरूनी जागृत करून दिलेल्या शक्तीने आत्मानुभव अनुभवता येतो.

ऐसे हे गहन । अर्जुना माझे भजन ।

असे अत्यंत गहन असलेले भगवंताचे भजन त्या साधकाचे सद्‌गुरु कृपेच्या जोरावर सहज होऊ शकते.

आणि दोन्ही पालवेवरी । जैसा एक तंतू अवधी ।
तैसा मी वाचूनि चराचरी । जाणती ना ॥

सर्व जगतात परमात्म्याशिवाय दुसरे काहीही नाही असा त्यास अनुभव अनुभवता येतो. एवढ्या करताच,

जयाचे केलीया स्मरण । होय सकल विद्याधि अधिकरण
तोचि वंदू श्री चरण श्री गुरूचे ।

सकल विद्याची अधिष्ठात्रि जी आध्यात्मविद्या ती विद्या ज्या गुरूच्या कृपेमुळे मिळते त्याचेच चरण-वंदन करणे आवश्यक आहे. का, तर श्री गुरूकृपा ही केव्हा होईल ते सांगता येत नाही झाली तर मात्र साधक कृतार्थ होईल हे नक्की.

हे असो दिठी जयावर झळके ।
की हा पध्यकर माथा पारखे
तो जिवचि परिसुखे । महेशेसी ।

दृष्टिक्षेप करून जशी कासव आपल्या पिलाचे पोषण करते तसे सद्‌गुरु आपल्या कृपा कटाक्षानी किंवा मस्तकावर हात ठेवून साधकास कृतार्थ करतात.

माशा आपल्या बालकाचे पोषण नुसत्या संकल्पाने करतो तसे शक्तिसंपन्न सद्‌गुरु संकल्पमात्रे साधकास दिक्षा देऊ शकतात व साधक कृतार्थ होतो. त्याचप्रमाणे शब्दशाते करूनहि साधकास कृतार्थ करतात. एवढ्याकरता सद्‌गुरु मिळणे अत्यावश्यक आहे मात्र सद्‌गुरु मिळेपर्यन्त साधकाने स्वकर्मांचा कंटाळा करता कामा नये कर्म हे वर्ण व आश्रम याप्रमाणे करणे उचित होय. उदाहरणार्थ यज्ञापासून पाऊस पडतो, पावसापासून अन्न व अन्नापासून मानव. पण तोच यज्ञ अनाधिकाऱ्याने केल्यावर अनावृष्टि किंवा अतिवृष्टि होते हे मात्र साधकाने विसरू नये. म्हणूनच

' स्वे स्वे कर्मण्य भिरत' ससिद्धि लभते नर. '

याचे महत्व विशेष आहे. म्हणून स्वत च्या आश्रमाचे व वर्णाचे पालन करता करता साधकास सद्‌गुरू ( अपेक्षा भेटे ) आपोआप भेटतात व त्याचेकडून शक्तियुक्त ज्ञान मिळाले म्हणजे साधकास आपोआप अनुभव येऊ लागतात ते अनुभव कसे ते पाहू

या ठिकाणी एक धोक्याची सूचना आहे ती अशी साधकाची कुंडलिनी शक्ति जागृत झाल्यावर म्हणजे सद्‌गुरूनी शक्तियुक्त दिक्षा साधकाने फार काळजी घेण्याची जरूरी आहे. ती अशी :

ज्याप्रमाणे गरोदर स्त्री जर डॉक्टर किंवा वैद्य अगर घरातील अनुभवी स्त्रिया सागतील त्याप्रमाणे वागली नाही तर त्या स्त्रीचा गर्भपात होण्याचा सभव असतो त्याचप्रमाणे 'सल' रहाण्याचा सभव असतो. गर्भपात झाला तर पुन्हा औषधपाणी करून तब्येत दुरुस्त झाल्यावर गर्भधारणा होऊ शकते परतु 'सल' राहिले तर (त्या गर्भाचा रोग बनणे) मात्र ऑपरेशन करून तो कुजलेला गर्भ काढून टाकून मग तब्येत उत्तम झाल्यावर गर्भधारणा असा दुप्पट उपद्व्याप करावा लागतो. पुन्हा गर्भधारणा झाली तरी पथ्य आहेच.

त्याप्रमाणे साधकाने दीक्षा मिळाल्यावर सद्गुरु सागतील त्याप्रमाणेच वागण्याचे आटोकाट प्रयत्न करावेत,

साधकावर ज्यावेळी सद्गुरु कृपा करतात व आपल्या दैवी शक्तिच्या योगाने त्या साधकाची दैवी शक्ति (कुडलिनी) जागृत करतात तेव्हा साधकाची मूळची यमनियमाची तयारी नसेल तर ती तयारी होऊ लागते. तो यमनियमाचे पालन करू लागतो. चातुर्वर्ण्यावर त्याचा विश्वास बसू लागतो. आचार, विचार, उच्चाराशी तो सहमत होतो

अशा तऱ्हेने शक्ति जागृति झाल्यावर ती शक्ति प्रथम त्याची शरीरशुद्धि करून घेते नतर अत करण शुद्धि होते, आणि त्यास खरे दैवी अनुभव येऊ लागतात ते असे —

मी एक आहे व दुसरे विश्व आहे अशा तऱ्हेचे काहीसे द्वैताचे अनुभव आटून जाऊन त्याचे अत करण द्रवू लागते व एकत्वाचा अनुभव येऊ लागतो

ती जागृत झालेली शक्ति आत जसा जसा आनद निर्माण करते तसे तसे बाहेरील मायाचे बळ हरपून जाते आणि रोमाचानी सर्व शरीर आच्छादिले जाते.

सोमकात मण्यात चद्र आपल्या हातानी (किरणानी) स्पर्श करतो, तेव्हा तो चद्रकात मणि पाझरू लागतो तसे साधकाचे अगावर घामाचे बिंदू येऊन ते पाझरू लागतात

कमलामधील पराग नेण्याकरता भ्रमर त्यावर बसून पराग सेवन करीत असतो, परतु त्या नादात तो सूर्य अस्ताला जाण्याचा समय विसरतो सूर्य अस्ताला जाताच कमळ मिटून पुन्हा कलिका बनते व भ्रमर कोडला जातो (वास्तविक पाहता गिरमिटाप्रमाणे लाकडाना भोक पाडून आत राहणारा भ्रमर ही कमल कलिका चिरून सहज बाहेर येऊ शकतो, परतु मोहामुळे आतच अडकून पडतो)

कमल कलिकेत अडकलेला भुगा हा वाऱ्याच्या योगाने कमलाचरोवर सरोवरातील पाण्यावर ज्याप्रमाणे डोलतो त्याप्रमाणे हृदयाकाशरूपी कमळामध्ये अडकलेला जीव सद्गुरुच्या कृपेच्या वाऱ्यामुळे सुखी होऊन डोलत असतो

कर्दळीची सोपटे काढताना ज्याप्रमाणे मोत्यासारखे पाण्याचे थेंब टपाटपा गळतात. त्याप्रमाणे शक्ति जागृत झालेल्या व साधनेस बसलेल्या साधकाच्या नेत्रातून आनदाश्रु स्रवत असतात.

नेहमीच भरून असलेला समुद्र चद्रोदय होताच भरून उचबळतो, त्याप्रमाणे सद्गुरु कृपेमुळे साधकास जे सुख होते त्यामुळे तो वरचेवर आनदाने उचबळून येतो

अशा तऱ्हेने कोणाला एक, कोणास दोन, तर कोणास आठही सात्विक भाव होऊन जीवाला आनदाचे साम्राज्य प्राप्त होते.

एवढ्याकरता हा आनद ज्याच्यामुळे प्राप्त होतो त्या सद्गुरुना हृदयामध्ये साठवून त्याचेच स्मरण सतत करावेसे वाटते व त्याना वरचेवर नमस्कार करावासा वाटतो एवढ्या करीता (१) मार्गशीर्ष शु. ८ मी शके १८६३ बुधवार या दिवशी मजवर झालेली मातृकृपा व त्याच्याच आदेशाप्रमाणे (२) गुरुपौर्णिमा शके १८७६ या साली प्रथम दृष्टीत माझे सद्गुरु प. पू. श्रीवामनरावजी गुळवणी महाराज यानी दिलेला अनुभव आणि पुढे त्याचेच आज्ञेने (३) मी कुरवपूर (करवपूर) येथे गेलो. त्या ठिकाणी प्रत्यक्ष श्रीपाद श्रीवल्लभानी दिलेला प्रसाद या घटनात्रयीचा उल्लेख करणे अत्यावश्यक आहे. यामुळेच सद्गुरूचा वास हृदयामध्ये सतत अनुभवीत आहे.

वेदमूर्ति दत्तमहाराज कवीश्वर यानी आज्ञा केल्यावरून केवळ आज्ञेचे उल्लघन होऊ नये म्हणून हा लेख माझे गुरुबधू श्री. शरद दाते याचेशी चर्चा करून निर्माण झाला तो श्रीसद्गुरु चरणी अर्पण करून व वे. दत्तमहाराजाचे आभार मानून पूर्ण करीतो

मजहृदयी सद्गुरु। जेणे तारिलो हा ससार पुरु।
म्हणोनि विशेषे आत्यादरू। विवेकावरी॥

वरील सर्व लिखाण हे सद्गुरूच्याच कृपेचे फळ असल्यामुळे मी त्याचाच सेवक म्हणून मिरवू शकतो

किंबहुना तुमचे केले। धर्म कीर्तन हे सिद्धी गेले।
येथे माझे जी उरले। पाइकपण॥

—श्री. द देशपांडे

*with*

*best*

*wishes*

*of*

*a*

*publisher*

# ब्रह्मविद्या —
# अशक्य गोष्टीचा विचार

'नरदेहाचेनि ज्ञानें। सच्चिदानंद पदवी घेणें।
एवढा अधिकार नारायणें।
कृपावलोकनी दिधला॥ ना० भा०

ब्रह्मविद्या म्हणजे काय? तिचा अधिकारी कोण? तिचे फल काय? आणि ब्रह्मविद्येचा व अधिकाऱ्याचा सम्बन्ध काय? अशा चार गोष्टींचा विचार येथे करावयाचा आहे. तो असा :—

ही ब्रह्मविद्या सोपी करून ठेवली आमच्या वारकरी साधुसंतांनी. पण कोणाकरिता? तर जीवाकरिता? नाही. तर मुमुक्षूकरिता. आता मुमुक्षू कोण होतो? व केव्हा होतो? याबद्दल प्रथम खुलासा करणे जरूर आहे. तो खुलासा असा की—

पशुपक्षी हेही आपल्या स्थितीत राहातात असे नाही किंवा देवादिकही आपआपल्या स्थितीत राहातात असे नाही, तर सर्वांचे स्थित्यंतर होतेच. यास दृष्टांत —

श्रीमंत हे गरीब होतात व गरीब हे श्रीमंत होतात. श्रीमंत आणि गरीब यात फरक म्हणजे सामुग्री असणे किंवा नसणे. त्याचप्रमाणे पशुपक्ष्यात आणि देवादिकात पापपुण्याचा फरक तो असा की, पापी देव नाहीत व पुण्यवान् पशु नाहीत याचे कदाचित स्थित्यंतर होते.

## बद्ध आणि मुक्त

पण बद्ध, मुक्त याची स्थिति बदलणे शक्यच नाही मुक्त जर परत बद्ध झाला असता तर मुक्तीला पुरुषार्थच म्हटले नसते व तो एक संसारच झाला असता. वरील दोन वर्ग म्हणजे एक पशुपक्ष्याचा वर्ग व दुसरा देवादिकांचा वर्ग. या दोघांचेहि स्थित्यंतर होते म्हणून ते संसारातच आहेत. त्याचप्रमाणे मुक्तही संसारीच ठरेल. (मुक्त बद्ध झाला तर) मुक्त होणे म्हणजे ब्रह्म होणे व कधी जीव झालाच नाही म्हणून पुरुषार्थताही अनंत आहे व वरील दोघांच्या अवस्थेला अनंतता नाही. सारांश, मुक्त कधी बद्ध होत नाही मुक्त होणे म्हणजेच ब्रह्म होणे

मग असा प्रश्न येतो की—बद्ध कसे दिसतात? त्याचे उत्तर असे की, बद्ध दिसतच नसतात. किन्तु ते आपल्याला बद्ध मानीत असतात. असा सूक्ष्म विचार केला म्हणजे कळेल. आता प्रश्न असा की तो आपल्याला बद्ध तरी का मानतो? याला उत्तर नाही पण मानतो एवढे मात्र खरे. व तो बद्ध मुक्त होतच नाही कारण मुक्तास शरीर नसते व बद्ध म्हणतो त्यास शरीर असते (आहे). आता तो कदाचित् पशु असेल कदाचित् देव असेल कदाचित् श्रीमंत असेल कदाचित गरीब असेल पण तो त्या स्थितीत राहातच नाही आणि मुक्तही होतच नाही. कारण तो कोणत्या तरी शरीराने असतोच श्रीमंत, गरीब, पशु, देव हे सर्व सशरीरीच आहेत व जोपर्यंत तो आपल्याला सशरीरी समजतो, तोपर्यंत तो मुक्त होत नाही तात्पर्य, मुक्त कधी बद्ध होत नाही तसेच बद्धही मुक्त होत नाही म्हणून

शास्त्रकाराने मुक्तास सादि अनंत म्हटले आहे व बद्धास अनादि म्हटले आहे. असा सादि व अनादीचा फरक लक्षात आणावा.

बद्ध मुक्त होत नाही म्हणजे ब्रह्मविद्या प्राप्त होईल तेव्हा बद्धता जाईल. ती ब्रह्मविद्या जर प्राप्त करून घेतली नाही तर बद्धता अनादि तर आहे न ती अनंत कल्प जरी गेले तरी जाणार नाही. हे लक्षात घेऊनच बद्ध हा मुक्त होतच नाही असे म्हटले आहे. सादि अनादीचा फरक जर लक्षात आला तर मुक्तता किती अवघड आहे हे लक्षात येईल.

## नरशरीर कशाने मिळते ?

अरे ! जीवन्मुक्त होतच नाही. कारण मुक्त होण्याकरिता जीवास नरशरीर मिळावे लागते, पण हे नरशरीर कशाने मिळते हे शास्त्रकारानाही कळत नाही मग इतराना कळत नाही हे काय निराळे सांगावयाचे आहे ? नरशरीर हे कार्य आहे. कार्य म्हटले की कारण आलेच. एकदर कारणे चार आहेत. १. पाप, २. पुण्य, ३ ज्ञान, ४ अज्ञान एवढेच की त्यात पापाने नरशरीर मिळत नाही. त्यास पशुशरीर मिळेल तसेच पुण्यानेही नरशरीर मिळत नाही. त्यास देवशरीर मिळेल तसेच अज्ञानाने जीव होईल पण नरशरीर मिळत नाही. तसेच ज्ञानाने मुक्त होईल पण नरशरीर मिळत नाही. अशी ही चारच कारणे कार्याचे कारण आहेत. शरीर हे कार्य आहे म्हणून त्यास कोणतीतरी कारण लागतेच. हे चार सोडून शरीर झाले म्हणले तर स्वभाववाद येईल, पण कोणत्याहि शरीररूप कार्यास वरील चार कारणे लागतात. (पाप, पुण्य, ज्ञान, अज्ञान). नुसत्या पापाने, नुसत्या पुण्याने तसेच नुसत्या ज्ञानाने किंवा नुसत्या अज्ञानाने हे नरशरीर होत नाही. मग हे नरशरीर कसे झाले ? हा प्रश्न शिल्लकच रहातो. हे सर्व श्रीतुकाराम महाराजांच्या मनात आले म्हणून श्रीतुकाराम महाराज म्हणतात की :—

'पावलो हा देह काकतालीन्याय ।
न घडे उपाय घडो आले ॥'

असा हा नरदेह अवघड आहे. आणि या नरदेहाशिवाय बद्धता म्हणजे जन्ममरणाची परंपरा चुकत नाही आणि ती जन्ममरणाची परंपरा चुकल्याशिवाय पुरुषार्थता नाही म्हणून हे जीवा, तुला हे नरशरीर मिळाले आहेना ? ते कशाने मिळाले हे सांगता येणे शक्य नाही हे आम्ही वर लिहिलेच आहे. पण तुला मिळाले आहे ते काकतालीन्यायाने मिळाले आहे. या नरशरीरानेच फक्त ब्रह्मविद्या संपादन करता येते. इतर देहात ब्रह्मविद्या संपादन करून घेतल्यावाचून मक्ति म्हणजे परम पुरुषार्थ प्राप्त नाही मग विचारवानाने काय करावे ? हे त्याचे त्यानेच लक्षात घ्यावे. जीवाला नरदेह मिळणे किती अवघड आहे याचा विचार काकतालीन्याय ज्याना कळला त्यानी करावा. येवढेच नव्हे तर या विचाराचा अधिकारी तोच.

## करण्याच्या गोष्टी तीन

येथपर्यंत नरदेहाशिवाय ब्रह्मविद्या प्राप्त होत नाही सांगितले. तो नरदेह तर मिळाला आहे. त्यात त्याला स्वातंत्र्य आहे. जीवास काही अंशात स्वतंत्रता व काही अंशात परतंत्रता आहे. तसेच ईश्वरासही आहे त्याचा निर्णय असा की:-जीव हा करण्यात स्वतंत्र आहे व ईश्वर त्या जीवास केल्या कर्मांचे फल देण्यात स्वतंत्र आहे. या विषयात पुष्कळ मतभेद आहेत. पण सिद्धांत मात्र आम्ही वर लिहिला असाच आहे हा सर्व दर्शन संग्रहाच्या उपोद्घातात पहावा. (अभ्यंकरकृत) सार गोष्ट, जीवास नरदेह तर मिळाला व त्यात त्याला स्वतंत्रता आहे हेही सांगितले. करण्यात स्वतंत्रता आहे. त्यात करण्याच्या गोष्टी तीन आहेत. त्या अशा—

१. लौकिक-व्यावहारिक विद्या, २ वैदिक विद्या

या वैदिक विद्येमध्ये पुन दोन भाग—

१. व्यवहारिक विद्या, २ पारमार्थिक विद्या

या पारमार्थिक विद्येलाच ब्रह्मविद्या म्हणतात

आता या तीन विद्येचे फल सांगतो तो प्रकार असा की—

१. लौकिक-व्यावहारिक विद्या ही एक जन्माची अडचण दूर करते. (कदाचित्) पण झाली तर,

२ दुसरी वैदिक विद्या आहे. जिचा व्यावहारिक विषय आहे या विद्येने अनेक जन्माची अडचण दूर होते म्हणजे फार तर एक कल्पाची म्हणा आणि

३ तिसरी विद्या म्हणजे ब्रह्मविद्या. ही मात्र अनंत जन्माची नव्हे, अनंत कल्पाची अडचण दूर करते.

याचाच अर्थ दुसऱ्या रीतीने सांगतो

१ लौकिक व्यावहारिक विद्या समूळ दुःखाची निवृत्ती करीत नाही कारण असा प्रत्यय आहे की या लौकिक व्यावहारिक विद्येने संपन्न झालेले पदवीधर क्वचित्

ऐश्वर्यावर आरूढ असतील, पण ते दुःखातून पार पडले असे म्हणू नये व तसे म्हणताही येणार नाही. कारण कितीही मोठा पदवीधर असला तरी त्यास माथाशूळ, पोटशूळ, मूळव्याध वगैरे दोष असतातच व त्याद्वारा त्यास असह्य दुःख भोगावेच लागते. तसेच

२. वैदिक विद्या, जिचा विषय व्यावहारिक आहे. तिचा लाभ झाल्यास कदाचित् वरील दुःखातून पार पडेल. पण त्यासही दुःखाचे बीज राहाणारच. हा विचार श्रीज्ञानेश्वरमहाराजानी गीतेच्या नवव्या अध्यायातील २० व २१ श्लोकावर व्याख्यान करताना चागल्या रीतीने केला आहे तो पहावा म्हणजे लक्षात येईल. आणि

३. तिसरी विद्या म्हणजे ब्रह्मविद्या ही मात्र दुःख व दुःखाचे बीज सर्व निवृत्त करते. पण ही ब्रह्मविद्या म्हणजे काय ? हे तरी कळावयास पाहिजे म्हणून सागतो.

**ब्रह्मविद्येचे स्वरूप**

मी ब्रह्मरूप आहे व जगत् मिथ्या आहे. असा निश्चय होणे याला ब्रह्मविद्या म्हणतात. मिथ्याचा अर्थ असा की, ज्या वस्तूचा त्रैकालिक अत्यतभाव असतो, पण प्रतिक्षेला तर येतो, यास मिथ्या म्हणावे, परतु काही केल्या जिवास म्हणजे नरदेहातल्या जीवास हे ज्ञान होत नाही. असे म्हणण्यापेक्षा पटत नाही हे म्हणणे बरे. आता श्रवण करणाऱ्याचा निश्चय होत नाही मग श्रवणच न करणाऱ्या बद्दल काय सागावयाचे ? पण इतके मात्र खरे की, हे ज्ञान झाल्याशिवाय जिवाची बद्धता निवृत्त होत नाही आणि तसे ज्ञान तर निश्चित होत नाही म्हणून तर बद्ध कधी मुक्त होतच नाही, असे आम्ही म्हटले आहे. हे ज्ञान म्हणजे ब्रह्मविद्या सपादन झालीच तर या नरदेहातल्या जीवासच कदाचित् होईल कदाचित् निश्चय झाला तर त्याचा प्रत्यय जीवास येतो व ज्यास प्रत्यय येईल त्यासच जीवन्मुक्त म्हणावे. ही ब्रह्मविद्या सागणारे श्रीव्यास आहेत. वैदिक व्यावहारिक विद्या सागणारे जैमिनी आहेत. त्या विद्येस अनुक्रमे उत्तर मीमांसा व पूर्व मीमासा म्हणतात

आता विचारवन्ताने विचार करावा की, आपण कोणत्या विद्येवर आरूढ व्हावे. ल्यान प्राय जिवाची धाव लौकिक व्यावहारिक विद्येत आयुष्य गेले तर फार तर एका जन्माची अडचण दूर होईल पण पुढच्या जन्माची अडचण दूर होणार नाही. अनत जन्माची तर नाहीच नाही. मग अमोल अशा नरदेहाची प्राप्ती झाल्यानतरही त्याची हानी त्यानीच करून घेतली का दुसऱ्यानी ? याचा विचार करावा. म्हणून नरदेहात आलेल्या जिवाने उत्तर मीमासेचा अभ्यास करून ब्रह्मविद्या सपादन करावी. त्या ब्रह्मविद्येनेच पुरुषार्थ होतो. जो जीव नरदेहास आला आहे, तो श्रीमत असो. गरीब असो. तो कोणीही असो. त्याला ब्रह्मविद्या सपादन करण्याचा अधिकार आहे जिवास देह मिळत नाही असे नाही. तर नरदेह मिळत नाही आणि तो ज्यास मिळाला आहे, त्या शरीराने काय करावे ? ते श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात.

'तैसे येणेचि शरीरे । शरीरा येणे सरे ।
किंबहुना येरझारे । चिरापडे ॥ '

ही ओवी ज्ञानेश्वरीत पहावी अशरीरच मोक्षाचे स्वरूप आहे अशी श्रुति आहे. ती श्रुति म्हणजे 'अशरीर वाव सत,' ही श्रुति वाचकाने लक्षात घ्यावी असेच महत्त्वाचे म्हणणे पूर्व मीमासेचेही आहे. त्या पूर्व मीमासेमध्ये चार वर्णांचा उल्लेख आहे. यद्यपि उत्तर मीमासेमध्ये चार वर्णांची महती नाही श्रीतुकाराम महाराजही असेच म्हणतात

'तुका म्हणे याती । हो का तयाची भलती ॥ '

सार गोष्ट, प्रत्येक मतवाद्यानी चार वर्णांची महती गायलेली नाही एवढे मात्र खरे की, चार वर्णांची महती पूर्व मीमासेशिवाय कोणी गायलेली नाही त्या चार वर्णात ब्राह्मण वर्ण श्रेष्ठ म्हटला गेला आहे व त्या ब्राह्मणास वेद सपादन करावा अशी आज्ञा आहे ती आतापर्यंत अमलात आहे. कारण वेद पाठ करून ब्राह्मणच वैदिक होतात. इतर वर्णाचे लोक होत नाहीत. यद्यपि भगवत् प्राप्तीत वर्णांची आवश्यकता नाही तरी पण ब्राह्मणाशिवाय कोणी वैदिक होत नाहीत ब्राह्मणच वैदिक होतात. ब्राह्मणाने वेद सपादन केला तर चित्त शुद्ध होते व चित्त शुद्ध झाल्यावर त्यास ब्रह्मविद्येचा अधिकार येतो. त्यानी जर ब्रह्मविद्या सपादन केली तर ते मुक्त होतील. ब्राह्मणाने वेद सपादन करूनच ब्रह्मविद्या सपादन करावी असा श्रुतीचा निरोप आहे. ( रत्नप्रभेत पहा ) इतरास नाही इतराकरिता प्राकृत ग्रथ आहेत. पण मौज अशी की ब्राह्मण कुलात जन्मून वेद सपादन न करिता इतरत्र विद्या सपादन करतात इतर विद्या कोणासही सपादन करता येते पण वेद वाचेल तो सपादन करील असे आतापर्यंत दिसत नाही तेव्हा

सांगण्याचा अभिप्राय असा की वेद संपादन न केला तर ब्राह्मणाची हानी कोणी केली ?

### वारकरी सांप्रदायाची महती

सार गोष्ट, उत्तर मीमांसा व पूर्व मीमांसा ब्रह्मविद्या संपादन करून घ्या असेच सुचवितात. हेच प्राकृतमध्ये संतानी शिकविले. ही शिकवण ज्याची, तोच वारकरी म्हणून वारकरी संप्रदाय निनचूक, अबाधित स्थितीपर पोहचविणारा असे म्हणावयास हरकत नाही या स्थितीवर आमचे संतमहात्मे पोहचवितात म्हणून श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात —

' किंबहुना श्रीनिवृत्ती । ठेविलो असो जिये स्थिती ।
न काय देऊ हाती । वाचेनिया ॥' ( अमृतानुभव )

हा अधिकार नरदेहातल्या जिवास मिळालेला आहे या नरदेहानेच सच्चिदानंद पदवी घेता येते म्हणनेच मोक्षप्राप्ती होते यालाच ब्रह्मविद्या म्हणतात म्हणून श्रीनाथमहाराज या प्रस्तुत ओवीत सांगतात —

नरदेहाचेनि ज्ञानें । सच्चिदानंद पदवी घेणें ।
एव्हढा अधिकार नारायणें । कृपावलोकनी दिधला ॥'

पण वरील ब्रह्मविद्या कोणास प्राप्त होऊन कोणी मुक्तच होत नाही व मुक्त झालेले बद्ध होतच नाहीत. त्यात मुक्त बद्ध होत नाही, हे तर निश्चितच आहे म्हणून वेदांत शास्त्राचा असा सिद्धांत आहे की —

ब्रह्म–अनादि अनंत
अज्ञात ब्रह्म–अनादि सान्त
ज्ञात ब्रह्म–सादि अनंत
घटपटादि–सादि सान्त

त्यात ब्रह्मज्ञान झालेला पुरुष जीवन्मुक्त व हा जीवन्मुक्तच विदेहमुक्त होतो विदेह मुक्ति सादि अनंत आहे असे म्हटले पाहिजे जरी ब्रह्म अनादि अनंत आहे, तरी पण ब्रह्मरूप असलेली विदेह मुक्ती सादि अनंतच म्हणावी लागते म्हणजे ब्रह्म अनादि अनंत आणि अज्ञात ब्रह्म अनादि सान्त व ज्ञात ब्रह्मरूप विदेह मुक्ति सादि अनंत ती ज्ञानता विदेषत नाही किंवा उपाधि नाही तर उपलक्षण आहे उपलक्षण गेले तरी उपलक्षित राहात १ विदेह मुक्ति उपलक्षित, २ जीवन्मुक्ति उपहित, व ३ अज्ञात काली ज्ञातता विशेष यात ब्रह्माची अज्ञातता म्हणजेच बद्धता व नानात्व कालीही अज्ञातता जाते म्हणून सान्त आहे मग तुमची बद्धता जातच नाही हे कसे म्हटले ? याचे रहस्य असे की :–तुम्ही बद्ध आहात असे जर सिद्ध पुरुषाने तुम्हास म्हटले तर शास्त्रसंस्कार रहितास कळतच नाही शास्त्र संस्कार ज्यास आहेत त्याना कळते पण पटतच नाही. म्हणून तर अद्वैतसिद्धि, भेदधिक्कारादि ग्रंथ सार गोष्ट, असा असो किंवा तसा असो प्राय कोणास पडत नाही. हे शेवटी खरे.

### भ्रम भ्रम न वाटणे म्हणजे भ्रम

हे तस काय सामान्य असतात काय ? त्याना सगुण साक्षात्कार झालेला असतो. असे सगुण साक्षात्कारापर्यंत पोहोचलेले व अष्टांग योगाने परिपूर्ण झालेले तेसुद्धा वेदांत शास्त्र मानीतच नाहीत त्याचे कारण ते आपणास बद्ध समजतच नाहीत बद्ध समजणे म्हणजेच आपल्या ज्ञानास भास समजणे असे भ्रम असतोच पण भ्रम वाटत नाही म्हणून भ्रम अशी ही महात्म्याची खरची खूण आहे भ्रम भ्रम न वाटणे म्हणजे भ्रम आता लक्षात घ्या की देहास आत्मा म्हणणारा जर आपल्या ज्ञानास भ्रम म्हणत नाही तर विशेष स्थानी पोहोचलेले ते आपल्या ज्ञानास भ्रम म्हणत नाहीत हे काय निराळे सांगावयाचे आहे ?

म्हणून श्रीनाथ महाराज म्हणतात :-

' निजवृत्तीचा करवेल निरोधु । जीवाशिवाचा भोगवेल आनंदु॥

हा अभंग वाचकानी अवश्य पहावा
या अभंगाचे मूळ ' ब्रह्मसर्वगत सदाशम ' हे आहे.
तसाच चिंतनीय अभंग ' पूर्ण ब्रह्म सदोदित पाहि '
हा एक अभंग फार चिंतनीय आहे या अभंगातील दोन चरण लिहितो ते असे —

' मी तूपण दि साहे जेथ । जेथ क्रियाकर्मही कुंठीत ।
अष्टांग साधने झाली प्रांत । एक ब्रह्म सभरा भरीत ॥'

तसेच—

' अहं सोऽहं सर्व विरालें । चित्त चित्तपणा विसरलें ।
भेदाभेद द्वैत राहिले । जीवशीवपण हरपलें ॥ '
गुरुकृपेचें फळ हेचि जाण ॥ ध्रु० ॥

असे वारकरी सांप्रदायाचे महात्म्ये उच्च भूमिकेचे आहेत श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

' आमचि करवेल गोठी ।
ती झालीच नाही वाक्सृष्टि ।
अमुने नेत्रे दिठी ।

ते दिठीच नोहे ॥ ' ( अमृतानुभव )

सार गोष्ट, अशी नजर घेतली म्हणजे प्राय: कोणी मुक्त होत नाही असे जे म्हटले आहे त्या म्हणण्याचे रहस्य आहे.

अहो ! इतर मतवादी ज्यास मोक्ष म्हणतात, त्यास समाधानली सद्गति असे सिद्धान्ती म्हणतात हा खुलासा मोक्षाचे प्रांतीत पहाणे असेल तर मतदर्शन संग्रहाचा उपोद्घात पहावा. असा सिद्धांत मनात घेऊन श्रीज्ञानेश्वर महाराज म्हणतात—

जया दोरामाजी एकादें । निशये उमजले होय निदे ।
घटवात गिळूनि नु सुखें । काही न की ( अमृतानुभव )

त्याचप्रमाणे गीतेमध्येही श्री भगवान् असेच म्हणतात

' मनुष्याणांसहस्रेषु कश्चिद्यततिसिद्धये '

त्याचप्रमाणे श्रीनाथ महाराजही असेच म्हणतात.

' एका जनार्दनी ऐसा जो का पुरुष ।
कोटीमाजी एक ब्रह्मज्ञानी ॥ '

यात कोटी शब्द उपलक्षण आहे. सार, नरदेह दुर्लभ गोष्ट. बरे तो नरदेह मिळाला तरी पूर्व मीमांसा व उत्तर मीमांसा याचे ऐकतो कोण ? पूर्व मीमांसेप्रमाणे वर्ण सांभाळावा व उत्तर मीमांसेप्रमाणे मार्ग करून घ्यावे पण असे सांगणाऱ्याला महत्त्व देतो कोण ? अमोल अशा नरदेहात आलेल्या जीवाची धाव पदवीधर होण्यात आहे त्यात त्याना मानही आहे व स्वास्थ्यही आहे. मग कष्ट कर अशी तुमची समजूत कोण स्वीकारील ? म्हणून तुमचे मुक्तीवर कोणी आरूढ होत नाही. आमच्या मुक्तीत जर अबाधित पणा असेल तर या ब्रह्मविद्येवर आरूढ न होणारा मग तो कोणीही असो, संसारीच म्हणावे लागेल. आणि संसार म्हणजे श्रीमंत किंवा गरीब, सुखी किंवा दु:खी त्याचे तर एकसारखे स्थित्यंतर होते. म्हणूनच आमचे साधुसंत दयेने कळवळून येऊन सांगतात की, ' बाबानो ! तुम्हास नरदेह मिळाला आहे. त्यातच ब्रह्मविद्या संपादन करून मुक्त व्हा ' पण ऐकतो कोण ? प्राय: कोणी मुक्त होत नाही हा अभिप्राय आहे जर महात्म्याचे ऐकले तर मुक्तच होईल म्हणजे अनादिसान्त बद्धता आहे. या शास्त्रास विरोध नाही पण पटले तर. म्हणूनच मुक्त बद्ध होत नाही व बद्ध मुक्त होतच नाही. असे आम्ही म्हटले त्याचे हे रहस्य आहे.

—श्रीरंगनाथमहाराज, परभणीकर



मजजवळ कायम स्तोत्र संग्रही असते.

अगदी ल्हानपणापासून मी एकादशी व्रत करतो. तेही मला सद्‌गुरूंनी करावयास सांगितले. दशमीचे दिवशी एकदा जेवतो. एकादशीचे दिवशी व्रतस्थ राहून फलाहार, पेये घेत होतो रात्री कीर्तनाला जात होतो. झोपण्यापूर्वी नामस्मरण करून झोपायचे. द्वादशीला एका सत्पात्र द्विजाला बरोबर घेऊन जेवायचे दर १५ दिवसाची एकादशी मी करतो.

असेच एकदा मला गुरूंनी श्रीमत् भागवतातील दशम स्कंध वाचावयास दिला होता. घरी नेऊन मी तो वाचू लागलो. त्यात रासक्रीडेचे वर्णन होते अजाणतेपणी मी त्यांना म्हणालो, 'हे शृंगारिक तर नाही ना ?' ते म्हणाले 'मी वाचीत जाईन, तू ऐकायला येत जा' रात्री ८ ते ९ त्याप्रमाणे मी रोज जात होतो. अध्याय झाला की रोज त्याचा अर्थ त्याच्या अनुषंगाने त्याच विषयावर १०-१५ मिनिटे असे ज्ञानामृताने उपदेश करीत असत ते ऐकत असतांना देहाची विस्मृति पडत असे. सर्वांगाला दरदरून घाम येत असे अंगावर रोमांच येत अद्वितीय आनंदाने डोळ्यातून टपटप टिपे येत. कधी कधी ११॥-१२ वाजत. दशम स्कंध अशा रीतीने ऐकल्यावर सर्व भागवत असेच ऐकले. नंतर त्यांनी मला ग्रंथ कसा वाचायचा ? त्यातून सार कसे काढायचे ? याविषयी दिव्यदृष्टी दिली त्यानंतर मी भक्तिविजय, हरिविजय, रामविजय, रामायण, नवनाथ, गुरुचरित्र, भागवत, महाभारत, काशीखंड असे अद्वितीय ग्रंथ त्या दिव्यदृष्टीने अभ्यासिले

गुरुचरित्र आमचे घराण्यात फार पूर्वीपासून वाचीत आले आहेत. आमचे घराण्यात गाणगापूरला जाऊन श्रीदत्त सेवा प्रत्येक पिढीने केली आहे. माझे वडिलांनी श्रीदत्तसेवा-नामस्मरण अहोरात्र समाद करून केली दत्त दर्शन, साक्षात्कार, दृगत होऊन ऐहिक व पारमार्थिक असे शाश्वत त्यांनी मिळविले

सोपानदेव महाराजाचे देऊळ साधारण रात्री १० ला बंद होते एकादशी सोडून रात्री १२ ला बंद होते. एक दिवस असाच मी बाहेरगावी गेलो होतो. रात्री ११ वाजता आलो देवळापर्यंत जावे. पायरीचे दर्शन घ्यावे व परत यावे हाच विचार. तसाच गेलो पायरीचे दर्शन घेतले अन् परत फिरणार इतक्यात श्रीगुरुंनी आतून दार उघडले व दर्शन घ्या म्हणाले. मी आत गाभाऱ्यात जाऊन सोपानदेव महाराजाचे दर्शन घेतले. आता उशीर झालाय, जातो म्हणालो अन् तडक घरी आलो. दुसऱ्या दिवशी ही हकीकत मी त्यांना सांगितली व विचारले की नेमके त्याचवेळी रात्रीचे तुम्ही कसे काय बाहेर आलात ? त्यावर ते म्हणाले "मी आलो नव्हतो दार मी उघडले नाही अन् मुख्य गाभारा तर एकदा बंद झाल्यावर पहाटे काकड आरतीशिवाय उघडला जात नाहीच." मी स्वत पाहिले की त्यांनीच दार उघडले. मुख्य गाभाराही त्यांनी उघडला। मला दर्शन घ्या म्हणाले. परत मुख्य दरवाज्यापर्यंत मला पोहोचविण्यात आले मी म्हणालो, 'तुम्ही स्वतः तर आला होता ' हे ऐकून त्यांचे मन भरून आले. डोळ्यातून पाणी आले. ते म्हणाले, 'तुम्ही अत्यंत भाग्यवान् आहात. भगवान् श्रीकृष्णाचा जन्म बंदिशाळेत झाला तेथील कुलपे तुटली. दारे उघडली व वसुदेवाने वासुदेवाला गोकुळात नंदाचे घरी पोहोचविले ती कुलपे व दारे कोणी उघडली ?' या दिव्य साक्षात्काराने व अद्वितीय आनंदाने मन भव्य अनुभूतीने न्हाऊन निघाले सकल्पावरची श्रद्धा दृढतम झाली

नंतर मला १८ अध्याय ज्ञानेश्वरी त्यांनी ऐकवली त्यावरील विवेचन व प्रत्येक प्रसंगावरचे विचार दिव्य वाणीतून ऐकायला मिळाले ज्ञानेश्वरीमुळे सर्व जगाचा उद्धार झाला आहे पण ती समजण्यासाठी अंतःचक्षु दिव्य होणे जरूरीचे आहे. त्या सत्पुरुषाच्या संगतीत मला अशा दिव्यदृष्टीने ग्रंथ ऐकायला मिळाले मी १२ वर्षे नियमाने, संयमाने व्रतस्थ राहिलो, अनेक धार्मिक ग्रंथाचे वाचन केले.

भगवताचे साक्षात् दर्शन होणे ही गोष्ट फार भाग्याची आहे. परंतु ती फार कठीण व दुरापास्त आहे अशी बऱ्याच जणांची समजूत आहे. परंतु माझी अशी धारणा आहे की तेजस्वी इच्छाशक्तीच्या व आचरणाचे बळावर ही गोष्ट सहज साध्य आहे. त्या ध्यासाने व अभ्यासू नजरेने मात्र वावरायला हवे मी त्याच महाराजांना गुरु केले सोपानमहाराजाचे पायथ्याशी असलेल्या चंद्रभागेच्या कुंडातील पवित्र पाण्याने स्नान करून एका गुरुवारी भल्या पहाटे त्यांचे दर्शन घेतले त्यांनी एक नारळ माझे हातात दिल्यावर मी पद्मासन घालून डोळे

मिटून पूर्वाभिमुखी सोपान महाराजांचेकडे तोंड करून बसलो असता माझ्या डोक्यावर त्यांनी वरदहस्त ठेवला व सांगितले की, तुजवर भगवंताची कृपा होईल. त्यांनी ज्ञानेश्वरी नामजपाचे महत्व हे पुस्तक असे दोन ग्रंथ मला दिले. तो संबंध दिवस माझा फारच आनंदात गेला. गाडी रुळावर सुरू झाली. स्टेशन आज ना उद्या येणारच. असे कोणीतरी म्हटल्याचा भास झाला.

१९४३ साली देवळातच एक थोर–सत्पुरुष भेटले. असंख्य माणसे दर्शन घेऊन जात होती. मी दर्शन घेऊन आलो अन् परत रात्री ८॥ वाजता त्यांचे दर्शनास गेलो. रात्री ९ ते २ वाजेपर्यंत मी अनन्य साधारण होतो. ते बोलत होते व मी ऐकत होतो. जीवनातले जीवन व जीवनातला गाभा मी शिकलो. मन अगदी भारावून गेले. हृदय भरून आले. चित्तवृत्ति बधीर झाल्या. ते काय बोलले ते सांगून समजायचे नाही. ते सुख अनुभवायला मिळाले पाहिजे. काही गोष्टी सांगून समजतात. ते मला दुसऱ्या दिवशी पहाटे ५ वाजता स्नान करून या म्हणाले.

मी स्नान करून ठरल्याप्रमाणे गेलो. देवळात गेल्यावर परत स्नान केले व स्वच्छ वस्त्र नेसून सोपानदेवाचे देवळात गाभाऱ्यात पूर्वाभिमुख बसलो. त्या थोर सत्पुरुषाने काही मंगल स्तोत्र म्हणत माझे डोक्यावर उजवा हात जवळ जवळ दोन मिनिटे ठेवला. ती अनुभूति फारच मंगलकारक होती. सर्व जगाचा बाह्य स्मृतीचा विसर पडला. देहाचा विसर पडला. दोन्ही मांड्यापासून वरचा भाग, उरीपोट व बेंबीच्या खालचा भाग ते बरगड्यापर्यंतच्या भागात खळबळ सुरू झाली. एक चेंडूच्या आकाराचे तेजोवलय खालून वरखाली वरखाली जोरात उसळ्या मारीत होते व तेजाची ज्योत बरगड्यापर्यंत आली. अन् तेथच थांबली. त्यांनी डोक्यावरचा हात काढलाअन् मी धपकन् जमिनीवर पडलो. थोड्या वेळाने भानावर आलो. दिव्य संचार अंगात झाल्यासारखे वाटले. त्या थोर सत्पुरुषाचे दर्शन घेऊन नंतर घरी आलो. येताना त्यांनी सांगितले "चार वर्षांनी म्हणजे १९४७ साली व पुढे परत चार वर्षांनी म्हणजे १९५१ साली गुरुवारी तुला स्फूर्ति येईल व आपोआप उपरती होईल. तेव्हा अशाच रितीने याच अनुभूतीत अशाच विचाराच्या धारणेत, याच स्थितीत, याच साच्यात बस. घाबरू नकोस. गुरुवर विश्वास ठेव. तुझी इच्छा पूर्ण होईलच होईल."

१९३९ सालपासून ३ वर्षे मी गणपतीची आराधना केली. चतुर्थीचे कडक व्रत केले. चतुर्थीला रात्री स्नान करून २१ वेळा गणपती अथर्वशीर्ष म्हटले. प्रत्येक चतुर्थी सोडताना चतुर्था असलेला द्विज पंगतीला घेऊन चतुर्थी सोडली. माझा नित्यनेमाचा जप चालू असूनही या तीन वर्षात रात्री ११॥ ते १२ चतुर्थीला "श्रीगणेशाय नमः" याचा मी जप केलाय. या व्रताची सांगता १९४३ साली पुरी केली.

नंतरची ३ वर्षे मी मारुतीची उपासना केली. शनिवारी कडक उपास करीत होतो. रात्री मारुतीचे दर्शन घेत होतो. रुईच्या पानाची माळ दर शनिवारी मारुतीला घालीत असे. गोडे तेलाचा दिवा लावीत असे. मारुती स्तोत्र २१ वेळा दर शनिवारी मारुतीचे समोर बसून म्हणत होतो. या व्रताची सांगता १९४५ साली पूर्ण केली.

नंतरची दोन वर्षे मी शंकराची आराधना केली. सोमवारी कडक उपास करायचा. रात्री स्नान करून महादेवाला रुद्राध्यायाचा अभिषेक करायचा. त्रिपूर करून लावायचे. शिवलीलामृत वाचायचे व रात्री नित्य नेमाचा जप करून शिवाय 'ओम नमः शिवाय' हा जप रात्री ११॥ ते १२ वाजेपर्यंत करायचा. याच दोन वर्षात मी सोळा सोमवारचे व्रत केले होते. त्या व्रताचे उद्यापन केले व शिवाची उपासना १९४७ ला पुरी केली.

नंतर एके दिवशी नित्य नेमाच्या जपाला बसलो असता एकदम कानात कोणी तरी सांगितल्याचा भास झाला की 'येणारा गुरुवार १९४७ सालातला ४ वर्षांनी आलाय.' अंगाचा थरकाप झाला. गुरूंना वृत्तांत सांगितला व त्यांचे आज्ञेप्रमाणे बुधवारी काहीच आहार घेतला नाही. गुरुवारी स्नान करून देवदर्शन घेतले. मातापिता यानाही वंदन केले. पहाटे ५ ला स्नान करून त्याच ठिकाणी पोहोचलो. पक्षी किलबिल करत होते. गाईचे हंबरणे ऐकू येत होते. पावसाचा झरा झुळझुळ वहात होता. आनंदाचा उन्माद चढला होता. त्यास जागी, त्याच धारणेने, त्याच असनात, तीच अनुभूती आठ

रत असताना डोळे आपोआप बंद झाले व व ४ वर्षापूर्वीचा वरदहस्त डोक्यावर आहे असे जाणवले. क्षणार्धात ४३ साली बरगड्यापर्यंत आलेला तेजाचा चेंडू येवढ्या आकाराचा गोळा छातीत दणादण वाजू लागला काही तरी फुटून बाहेर येते असा भास झाला. सर्व जगाचा, स्मृतीचा विसर पडला तो गोळा वरवर गळ्यापर्यंत आला व तेथे थांबला. सर्व शांत होते. डोळे उघडले समोर गुरु होते. त्यांना अनुभूती सांगून देवदर्शन घेतले. मन आनंदित झाले. हृदयात आनंदाच्या लाटा उसळल्या. त्या दिवशी कशातच लक्ष लागेना सारखे एकांतात, निवांत नदीच्या घाटावर, मठमावर, देवळात शांत पद्मासन घालून बसावे असे मनात यायचे.

त्यानंतर पुढील २ वर्षे ४९ सालपर्यंत स्वामी श्रीमद्गुरु दत्तात्रयाची उपासना केली. गुरुवारी कडक उपास करीत असे औदुंबराची झाडे मी असंख्य लावली आहेत. रोज सकाळी औदुंबराला पाणी घालून दर्शन घ्यायचे. रात्री स्नान करून श्रीदत्तपूजा व आरती करायची. दिवसभर कडक उपास करून रात्री गुरुवार सोडताना एका द्विजाला जेवायला बसवायचे नित्य नेमाचा जप करून गुरुवारी रात्री ११॥ ते १२ 'श्रीदत्त गुरु जय दत्तगुरु जय जय परब्रम्ह दत्त सद्गुरु' हा जप करायचा. गुरुचरित्र रोज वाचायचे. १ दिवसाचे, ३ दिवसाचे, ७ दिवसाचे असंख्य सप्ताह मी केले आहेत. कडी कडक सप्ताह केले आहेत. ७ दिवस संपूर्ण उपास करून सप्ताह केले आहेत. स्नान केल्यावर मी अंग पुसत नसे. फक्त पाणी निथळू द्यायचे व सप्ताह वाचायला ओल्यानेच सुरुवात करायची. थंडी वाजायची, पण आनंदाचा उन्माद सांगून समजण्याचा नव्हता. या दोन वर्षात मी गाणगापूरला जाऊन एक पारायण केले आहे. ~ सात दिवस संपूर्ण सोवळ्यात होतो. रात्रंदिवस सोवळे सगळे विधि सोवळे नेसून करायचे. सातही दिवस उपास समाप्तीचा सातवा दिवस गुरुवारी आला. सकाळी सप्ताहाचे ७ व्या दिवशीचे वाचन झाले. डोळ्यातून अश्रुपूर वाहू लागला आवरता आवरेनात. आज तो दिवस आठवला की अजूनही अश्रुपूर सुरू होतो त्यादिवशी नंतर तेथील औदुंबराला १०८ घागरी पाणी घातले. १०८ प्रदक्षिणा घातल्या. तोंडाने सारखा श्रीदत्त नामाचा जप चालू होता. सायंकाळी आरती केली. दत्तपूजा केली. दत्त जन्माची जी वेळ ५–७ वाजता, त्यावेळी एक ब्राह्मण मजजवळ आला व मी नेसलेले सोवळे–गुलाबी वद–त्याने मला मागितला. मी जागरूक होतो. क्षणाचाही विलंब न लावता नेसते सोवळे सोडून त्याच्या अंगावर टाकले. मला लाज वाटली. घाबरलो अरे. मी विवस्त्र झालो! पण काय आश्चर्य! साधकहो ही अनुभूति आहे मी परत पहिला होता तसाच गुलाबी वद नेसून उभा, अन समोरच्या ब्राह्मण साक्षात् श्रीदत्त मूर्ति होती. पाठरी गाय, पाठी कुत्रे–त्रिमूर्ति अन त्याचे हातात मी टाकलेला माझ्या अंगावरचा गुलाबी वद समक्ष, दिसला, माझ्या डोळ्यांनी पाहिलेली सत्य घटना ही मी तसाच दर्शनासाठी धाऊन त्याचे पायावर पडलो पण क्षणार्धात् श्रीगुरु अंतर्धान पावले. मला ज्या ठिकाणी श्रीगुरु दिसले त्या ठिकाणचे त्याच्या पायाखालचे दोन दगड मी येताना बरोबर आणले आहेत ते रोज पुजतो. दुसऱ्या दिवशी मी सप्ताहाची सांगता केली द्विजाला भोजन दिले व परत फिरलो. या अद्वितीय समाधानाने चित्तवृत्ति भारावून गेल्या मन अनन्य साधारण आनंदात रमून गेले.

या नंतरची पुढची दोन वर्षे म्हणजे १९५१ सालपर्यंत मी श्रीविष्णुची आराधना केली. एकादशी व्रत करीत होतोच. रात्री परत स्नान करून विष्णुपुजा करायची, देव दर्शन घ्यायचे, रात्री कीर्तनाला जायचे नित्य नेमाचा जप करून शिवाय रात्री ११॥ ते १२ 'श्रीनारायण जय नारायण–जय नारायण नारायण' हा जप करीत होतो व्यंकटेश स्तोत्र रात्री एकवीस वेळा वाचून नामस्मरण करून झोपायचे अशा तऱ्हेने १९५१ सालात पाचव्या दैवताची उपासना संपत होती. अशाच एके दिवशी जप झाल्यानंतर गुरुवार चार वर्षांनी येणारा असून तुझ्या भाग्याचा आहे असे कोणीतरी कानात म्हटल्याचे वाटले घाबरलो डोळे उघडले तो एक वाक्य समोर दिसले. "सत्य संकल्पाचा दाता भगवान." लगेच ते वाक्य विरले

१९५१ साल. आषाढ शुद्ध एकादशी. माझे आयुष्यातील परमोच्च भाग्याचा दिवस तो ४७ सालानंतर परत ८ वर्षांनी म्हणजे ५१ साली आषाढी एकादशीला पहाटे उठून स्नान केले. सोपानदेव महाराजांचे दर्शन घेतले. पण बैठकीस बसलो नाही. गुरूंनी रात्री बैठकीस बस असा आदेश दिला दिवसभर उपोषण केले. तोंडाने नमस्कारण

केले. रात्री कीर्तनाला गेलो कीर्तन रात्री ११॥ ला संपले व मी गाभाऱ्यात दर्शनाला गेलो पद्मासन घालून त्रिसत्वृत्ती स्थिर केल्या. पूर्वीची अनुभूती स्मरली. अष्टांग भाव दाटून आला. देह भान हरपले. जगाची व देहाची विस्मृति पडली डोळे मिटले डोक्यावर तीन वरदहस्त आहे असे जाणवले जप चालू होता. क्षणार्धात गळ्या पासून एक नेंडूच्या आकाराचा तेजाचा गोळा गडगड, धडधड, खडखड, आवाज करीत मागेपुढे, खालीवर आद ळत आपटत एकदम डोक्यात वर जेथे टाळू आहे तेथे दणदण आदळतोय असे भासू लागले. मोठा आवाज झाला अन एकदम शांत झाले. डोळे उघडून पहातोय तो काय आश्चर्य ! साक्षात् भगवान श्रीमहाविष्णू समोर पुढे उभे राहिल्याचे पाहिले. चतुर्भुज मूर्ति, पिवळा पितांबर नेसलेला, मागे तेजोवलय गरगरत होते. हातात चक्र, शंख, गदा व उजवा हात अभय देणारा वर उचललेला. खूप सुवासिक उदबत्याचा वास, चिक्कार वासाची फुलेच फुले, तुळ शीची पानेच पाने, भोवताली दैदिप्यमान एक मोठा तेजाचा गोळा, प्रकाशच प्रकाश डोक्यावर. मुगुट, गळ्यात तुळशीच्या माळा, शांत तेजस्वी मूर्ती समोर पुढे पाहिली. क्षणात मूर्ति अंतर्धान पावली. रात्री १२ वाजले होते. बाहेर मंडपात हरिनामाचा गजर चालला होता. त्यावेळच्या आनंदाचे वर्णन मला करताच येत नाही

७ व्या वर्षी मी श्रीमहाविष्णूची आराधना करीत होतो. म्हणून आजही त्याचीच आराधना चालू आहे दिव्य दर्शनाचे वेळी ' ओम् नमो भगवते वासुदेवाय हा जप करत होतो, म्हणून आजही मी तोच जप करतो रात्री ११॥ ते १२ या वेळात नामस्मरणानंतर मला दिव्य तेजाचा साक्षात्कार झाला म्हणून आजही मी जप रात्री ११॥ ते १२ करतो एकादशीचे व्रत आजही करतो. व्यंकटेश स्तोत्र नियमित आजही वाचतो. या १२ वर्षात मी एक वर्ष गहू व त्याचे पदार्थ, एक वर्ष तांदूळ, एक वर्ष हरभरे डाळ, एक वर्ष तूर डाळ, एक वर्ष कांदे, एक वर्ष लसूण, एक वर्ष वांगी, ज्वारी, बाजरी, मूग, मसूर डाळ व १२ वे वर्षी चहा असे पदार्थ खाण्याचे सोडून दिले होते. परमेश्वराचे मला दर्शन होणारच होते व याप्रमाणे मी रोज जप झाल्यावर संकल्प करीत होतो

१९७२ साली मी पंढरपूरला जाण्याचे ठरविले. त्यावेळी मजजवळ ऑफिसची कॅश बॉक्स होती. कॅश बॉक्समधून मी शंभर रुपये घेतले. व रजेवर गेलो. पुढे दोन दिवसानी पगार होता. मे क्लार्कला भेटून मागितले की, " माझा पगार कॅश बॉक्समध्ये जर मी पैसे घेतलेत पगार मिळाल्याची त्यास सही दिली. परंतु पगाराचे आधीच कॅश बॉक्स तपासली गेली अन नवल असे की रजिस्टरमधील आकडा व कॅश बॉक्समधील रक्कम पै अन पै जुळली गावाहून आल्यावर मे क्लार्कने माझा पगार दिला. त्या पांडुरंगाला काय याचे अन उतराई व्हावे ? डोळे भरून आले. रात्री नित्य नेमाच्या ध्यान धारणेस बसलो असता श्रीगुरु समोर बोलताहेत असे वाटले, ते दिव्य वाणीने म्हणत होते ' जशी भक्ती तसा भगवान् भक्तीचा दरवाजा जसा उघडेल तवढा भगवान आत येईल दामाजी पंताचा भरणा परमेश्वरानी केला ना ! द्रौपदीच्या अंत करणाने आजही जे कोणी देवाकडे जातील त्यानाही भगवान वस्त्रे पुरवणार ' डोळे उघडले तर जवळ कोणीही नव्हते.

दुसऱ्या दिवशी श्रीगुरूना सर्व वृत्तांत सांगितला. ते फक्त हसले. नंतर मी जेजुरीस जाऊन खंडोबाचे दर्शन घेतले. देहूस जाऊन तुकाराममहाराजांचे दर्शन घेतले. आळंदीस जाऊन ज्ञानेश्वरमहाराजांचे दर्शन घेतले. चिंचवडला जाऊन गणपतीचे दर्शन घेतले. प्रत्येक ठिकाणी श्रींचे दर्शन घेऊन एकांतात बसलो असता कोणीतरी बोलते आहे असा भास व्हायचा याचा आशय असा– " दुसऱ्यास दुःख्रव नकोस, परोपकारी रहा. परमेश्वर कोणत्या रूपात येईल सांगता येणार नाही " म्हणून

जे जे भेटे भूत । ते ते मानी भगवंत—

मला घाबरल्यासारखे व्हायचे. ती सगळी वाक्ये, ते सगळे संदेश मी टिपून ठेवलेले आहेत.

साधकाच्या आचरणाने श्रीगुरुवर विश्वास ठेवून ध्यान, धारणा व नाद ब्रह्माची उपासना केली तर कोणाच्याही दिव्य दृष्टीला मंगल साक्षात्कार होईल. अशी माझी धारणा आहे. याप्रमाणे माझे स्वानुभव आहेत. ओम् नमो भगवते वासुदेवाय.

—रंगनाथ एकनाथ विश्वदास

# स्वसंवेद्य योग

सवाला माहीत आहे की जागे असलेले आपणच झोपी जातो, कदाचित् स्वप्नही पाहतो आणि पुन्ह जागेवर येतो

पण हे सारे आपण एकजातीच्या अज्ञानानेच करतो

करतो कसले ?

ते होते

झोप कुणाच्या हाती आहे ?

आणि वेळेवर जागे होणे हेहि आपल्या हाती नाही

झोप येते, उडते, जाग येते, जाते

दिसलेली स्वप्ने आठवत नाहीत

आणि आठवलेलेहि स्वच्छ गवसत नाही

आमच्या आठवणीला जोडीदार म्हणून विसरणहि आहे.

या दोन्हीच्या अडकित्यात आपोआप ज्ञान असते तरी कसे !

शकुंतलेला पाहून न ओळखणारा दुष्यन्त, अभिज्ञानाची अंगठी पाहून शकुंतलेला आठवतो ।

एवढेच काय, तिचे हुबेहूब चित्र काढू शकतो ।

ही ज्ञानमुद्रा सापडते कशी ?

गमावते कशी ?

ज्याचे त्याला माहित

सारे आत्मस्वरूप.

स्व- संवेद्य !

' आत्मा चतुष्पाद आहे ' या अर्थाची श्रुति आहे

जणू आपणच आपल्यापासून दूर होतो

या दूर होण्याला कारण आपल्या आठवणीला आपणच अडवितो

एकच वस्तु चौफाळले आणि त्याचा एकवटलेपणा प्राप्त होण्याला श्रीगुरुमुख लागले

* मागें गुरुमुखें उघडत दिसे । आणि हृदयीं स्वयमेव असे ॥

ज्यांची मुळात प्रेमसंगतीच नाही त्यांच्यात विरह येतो कसला ?
विरह ही जशी तोडणारी, तशी जोडणारी आग आहे.
आणि ही आग आपल्याच राखेत निखाऱ्याप्रमाणे लपली असते
श्रीगुरुमुखाची फुंकर त्याला लागताच राख उडते; आणि अग्निशिखा उंच होते.
हा शक्तिपात प्रभाव।
या क्रियेत गुरुशक्तीचा अवतार शिष्यक्षेत्रावर होतो.
हा पात पतितोद्धारक ठरतो.
हे क्षेत्र मुळात 'छत्तीसाचे' असून त्याचा ज्ञाता 'सदतीसावा' आहे.
हाच 'छत्तीसाहूनि निराळा'.
या ज्ञत्वाचे एक टोक गुरुमुख, दुसरे शिष्यमुख.
जणू उत्तरारणी दक्षिणारणी !
काष्ठात झोपलेला तो अग्नि इष्टेपणाने जागा होतो.
हाच जातवेद, हाच स्व-संवेद्य, हाच सद्योजात.
हे अग्निहोत्र किती दिवस चालावयाचे ते काळालाच माहीत.
अग्नि मात्र त्रिकाळापलीकडेही आपल्या 'अ—त्रि' अशा तुरीय रूपाने अमृतच असतो.
तो स्मरणमात्राने 'दत्त' म्हणून केव्हा साक्षात् उभा राहील त्याचे त्याला माहीत.
म्हणूनच दैवदत्त अग्निहोत्र आत्मदेवाळीच चालवावे लागते.
तुरीयता चव्हाट्याने पांगली म्हणजे तेथे प्रकाश प्रकट होते.
तेथेहि अव्यय अग्नि असतोच; तो श्रीगुरुदत्त व्हावा लागतो.
'शक्तिपात – योग' हा सिद्धच आहे
तशा सिद्धपुरुषांना पाहिले म्हणजे वेगळे सिद्ध करावे लागत नाही.
मौज तर ही आहे की भगवान् आमच्यात असूनहि आम्ही हतभाग्याप्रमाण वणवण हिंडतो.
भाग्य फळाला येताक्षणी हे आत्मरूप स्व—संवेद्य आहे हे वेगळे सांगावे लागत नाही:—
'आपण आपुला साक्षी.'
ही भिक्षा देहि गुरुगृही जेवढी मिळते तेवढी ती मधुकरी, अभ्यासाला पुरून उरते.
ही सेवा गुरुचरणी समर्पित असो.
श्री गुरुदेव दत्त.

—द. रा. बेंद्रे



दत्तयोगी प. पू. योगिराज श्रीवामनरावजी गुळवणीमहाराज

# TRANSMISSION OF SPIRITUAL POWER

By Shri Vaman Dattatray Gulvani, Poona

There is a process by which a real Spiritual teacher imparts his spiritual power to his disciple. The process is known as Shakti pata or transmission of spiritual power. The teacher who is possessed to this power of transmission can give his knowledge of Truth or the knowledge of the way of union with the Divine to a deserving disciple in an instant without any effort whatsoever. Nay, he can transform his disciple into his own likeness, 'स्वीय साम्य विधत्ते' as the great Shankar declares in the first verse of his work, the 'Vedant Kesari'. Tukaram, the great saint of Maharashtra, repeats the same idea in one of his Abhangas where he says, that *the real teachers make their devoted disciples exactly like themselves* in no time. A philosopher's stone, he says cannot stand in comparison with the Guru whose greatness is beyond all measure. Jnaneshwar, the crown jewel of saints, declares in choicest terms the greatness of the real Guru in his 'Bhavarth-dipika', the great commentary on the 'Bhagawatgeeta' to the effect that, *a man on whom the real Guru lets fall his glance or on whose head he places his lotus hand, be he however small and in*significant a being, is at once raised to a status equal to the Lord of the Universe himself. He who has the good luck of receiving spiritual teaching from a real Guru is at once freed from all dualities and is established in his own real self. The Guru gives and the disciple *at once receives the* 'Mahavakya' or the great word of Vedant, and the same *moment finds himself transformed into a living embodiment* of the great word. Jnaneshwar then proceeds to describe *how the Lord, in the Bhagawatgeeta*, transformed Arjun, His greatest devotee into His likeness by transmitting His power to him. The Lord extended His right hand with its dark blue colour and the radiance of the bracelet round the wrist and embraced His loving devotee, Arjun, to his heart. The Lord intended to give him that transcendent experience

